# मोगल दरबारची बातमीपत्रे

## खंड तिसरा

अनुवाद

## सेतुमाधवराव पगडी




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## खंड तिसरा

डॉ. जदुनाथ सरकार लिखित

“अखबारात–ए–दरबार–इ–मुअल्ला” चा अनुवाद

अनुवादक

*सेतुमाधवराव पगडी*




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

मोगल दरबारातील बातमीपत्राचा अनुवाद वाचताना अभ्यासकांनी एका बाबतीत सावधगिरी बाळगली पाहिजे. बातमीपत्रातील मूळ मजकुराच्या नोंदी तारखेप्रमाणे सलग लिहिल्या गेल्या आहेत असेच नाही. एखाद्या महिन्याचे बातमीपत्र सलग असे समजून चालावे तो मध्येच दोन-तीन महिने आधीच्या तारखेचे बातमीपत्र त्यात आढळावे, असे होते. तो नीट करावा आणि शक्य तितके महावारी आणि तारीखवारी दैनंदिनी अभ्यासकांना सादर करावी असा प्रयत्न केला, पण नोंदींच्या तारखा एकेका महिन्यात मिसळत गेल्या की, त्या अलग करणे जवळ जवळ अशक्यच झाले. शेवटी असे ठरविले की, ज्या क्रमाने मुळात नोंदी दिल्या गेल्या आहेत, त्या तशाच द्याव्या. मात्र प्रत्येक नोंदीवरील तारीख आवर्जून लिहावी म्हणजे अभ्यासकांना कोणच्या तारखेचे आपण बातमीपत्र वाचीत आहोत हे समजणे सोपे जाईल. हा सावधगिरीचा इशारा मुद्दाम देऊन ठेवला आहे. पुढील अनुक्रमणिका १७०३ आणि १७०४ या वर्षाची आहे. या अनुक्रमणिकेत प्रत्येक वहीच्या पहिल्या पानावरील आणि शेवटच्या पानावरील बातमीपत्रांच्या तारखा दिल्या आहेत. त्या लक्षात ठेवाव्या.

**सेतुमाधवराव पगडी**

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

## *संपादकीय टीप*

बातमीपत्रांचे कागदपत्र ज्या स्वरूपात आले त्यात मागील तारखांचे कागद पुढे अनपेक्षितपणे यावेत असे अनेकदा घडले. जेथे जमले तेथे व्यवस्थितपणे क्रमांक लावण्याचा प्रयत्न केला. पण जमले नाही तेथे मजकूर महत्त्वाचा असल्यामुळे ते जेथे आणि जसे आढळले तसे देणे भाग पडले. प्रत्येक बातमीपत्राच्या वर तारखेची नोंद केली असल्यामुळे अभ्यासकांची विशेष गैरसोय होणार नाही अशी आशा.

अनुक्रमणिका

# प्रस्तावना

## इ. स. १७०३

**इ.** स. १७०३ चा जानेवारी महिना सुरू झाला. मोगलांनी सिंहगडाला वेढा घातला होता. औरंगजेबाची छावणी गडाच्या पायथ्याशी पडली होती. मोगलांचे मोर्चे गडाच्या दिशेने सरकत होते. दरबारातील बातमीपत्रावरून असे दिसते की, शंकराजी नारायण, सचीव हा १ जानेवारीपर्यंत सिंहगडावर होता. गडावरील सर्व व्यवस्था लावून देऊन त्याने सिंहगड सोडले. मुगलांच्या बातमीपत्रात किल्लेदारांचे नाव बंधूजी असे दिले आहे. तो धनाजी जाधवच्या भाऊबंधांपैकी होता, असे म्हटले आहे. किल्ल्याभोवती मोर्चे बसवून औरंगजेबाने किल्ल्यासमोरील टेकडीवर तोफा चढविल्या. वेढ्याचे काम चालविण्यासाठी बादशहाने निरनिराळ्या ठिकाणाहून तोफा मागविल्या. या तोफा विशालगड, ब्रह्मपुरी, पेडगाव, अहमदनगर येथून आणण्यात आल्या होत्या. बादशाही छावणीत असलेले सैन्य वेढ्यासाठी कमी पडत असावे असे दिसते. बादशहाने सिंहगडाभोवती, पुणे-सिंहगड मार्गावर शिवापूर आणि इतर ठिकाणी ठाणी कायम ठेवली. वेढ्याच्या कामासाठी त्याने इतर प्रदेशातील किल्लेदारांना आणि फौजदारांना आपापली पथके घेऊन छावणीत रुजू होण्यासाठी हुकुम पाठविले. चाकणचा किल्लेदार अमानुल्लाखान, रायगडचा किल्लेदार शिवसिंग, धारूरचा किल्लेदार उजबेगखान इत्यादी अधिकारी मुगलछावणीत येऊन दाखल झाले. वेढा चालवण्याची प्रमुख जबाबदारी, बादशहाच्या तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याच्याकडे देण्यात आली. बादशहाचा सुप्रसिद्ध सेनापती झुल्फिकारखान हाही चार फेब्रुवारीला येऊन बादशहाला मिळाला. त्याचीही नेमणूक सिंहगडासमोरील ठाण्यावर करण्यात आली.

बादशहाच्या या हालचालीला प्रतिकार करण्यासाठी मराठ्यांनी एक मोठी योजना आखली. तीचे स्वरूप जितके व्यापक तितकेच प्रभावी होते. सिंहगडकडे येणारी रसद अडविणे, विशालगड ब्रह्मपुरी, पेडगाव इत्यादी ठिकाणांहून सिंहगडाकडे येणाऱ्या तोफा गडापर्यंत न पोहोचतील असे प्रयत्न करणे. या तोफा आणणाऱ्या मोगल पथकांवर हल्ले करणे, आणि खुद्द बादशाही छावणी भोवती सतत आक्रमणे करून दहशतीचे वातावरण निर्माण करणे हा मराठ्यांच्या योजनेचा केवळ एक भाग होता.

दक्षिणेस मोगलांच्या विरुद्ध लढा चालू ठेवण्याचे महत्त्वाचे काम बहिर्जी हिंदुराव घोरपडे हा करीत होता. गोव्याजवळील फोंडा, मर्दनगड ही स्थळे त्याने डिसेंबर १७०२ व जानेवारी १७०३ मध्ये जिंकून घेऊन मोगल फौजदार हसन कुलीखान याला कैद केले होते व मोगलांना दक्षिण कोकणातून हाकलून लावले होते. तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील विजापूर प्रांतात मोगलांचा अकार्यक्षम अधिकारी खुदाबंदाखान (औरंगजेबचा मामेभाऊ) हा होता. तो मराठ्यांना भिऊनच काम करी. त्यामुळे मराठ्यांची सैन्य दक्षिण कर्नाटकात धुमाकूळ घालीत फिरत होती. गोळकुंडा-कर्नाटक सुभ्यात फौजदार झुल्फिकारखान याच्या तर्फे दाऊतखान पन्नी हा काम करीत होता. त्याने मोठ्या शर्तीने मराठ्यांना थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. तमीळनाडमधील मराठ्यांचा शेवटचा किल्ला वेल्लोर हा १७०२ च्या मध्यात मोगलांच्या हाती पडला होता. मराठ्यांचे सैन्ये प्रामुख्याने विजापूर आणि विजापूर-कर्नाटक या सुभ्यात पसरली होती. मराठ्यांचा सरसेनापती धनाजी जाधव हा कृष्णा आणि भीमा या दोन नद्यांच्यामधील प्रदेशात फिरत होता. हा प्रांत म्हणजे कर्नाटकातील लढाऊ बेडरांचा प्रांत. भीमा आणि कृष्णा यांच्या संगमाजवळचा प्रांत. बेडर जमातीशी मराठ्यांनी संपूर्ण संपर्क साधला होता. बादशहाच्या छावणीत रसदेची टंचाई कमालीची असे. ती दूर

अनुक्रमणिका

करण्यासाठी बादशहाला हैद्राबाद, तमीळनाड इत्यादी लांब लांबच्या ठिकाणाहून रसद मागवावी लागे. ती अडविण्याचे काम ही सैन्य करीत.

मराठ्यांच्या योजनेचा सर्वात मोठा पैलू म्हणजे उत्तरेकडे धडक मारून, तिकडून बादशहाकडे सतत येणारे खजिने आणि मनुष्यबळ अडविणे हा होय. दक्षिणेच्या मोहिमेत औरंगजेबाला दक्षिण प्रांतातून काडीचेही उत्पन्न होत नव्हते. मोहिम चालविण्यासाठी त्याची मुख्य भिस्त होती ती उत्तरेकडून येणारे सैन्य आणि खजिने यावर होय. ती प्रभावीपणे अडवून धरण्यासाठी मराठ्यांनी खानदेश, माळवा आणि वऱ्हाड या प्रांतात मोठ्या प्रमाणावर आपली सैन्ये घुसविण्याचा निर्णय घेतला. बादशहा सिंहगडच्यासमोर असताना मराठ्यांचे सैन्ये वऱ्हाड आणि खानदेश या प्रांतात पसरली आणि त्यांनी तिकडे एकच धुमाकूळ उडवून दिला.

एकतीस जानेवारी १७०३ ची बातमी पहा—"असीरगडचा किल्लेदार व फौजदार (असीरगड हा किल्ला बऱ्हाणपूराहून तेरा मैलावर) शाहमतखान याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले. मराठ्यांचे सुमारे वीस हजार स्वार आणि सहा हजार पायदळ असे सैन्य आले असून त्याने खरगोणचा भोवतालचा भाग लुटून फस्त केला आहे. हे सैन्य असीरगडच्या पायथ्याशी येऊन पोहचले आहे. किल्लेदार हा तटावरून तोफाचा मारा करीत आहे."

इतिहासकार भीमसेन सक्सेना हा त्यावेळी झुल्फिकारखानाच्या छावणीत होता. झुल्फिकारखान हा मराठ्यांचा पाठलाग करून बादशहाच्या छावणीत आला होता. सिंहगडच्या वेढ्याचे वर्णन करताना भीमसेनने मराठ्यांनी मोगल फौजांची ठिकठिकाणी कशी अडवणूक केली याचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे :——

"बादशहा स्वतः कोंडाणा जिंकून घेण्यासाठी निघाला. (२ डिसेंबर १७०२) या कामासाठी लागणाऱ्या तोफा आणि इतर सामग्री खेळण्याहून (विशालगड) आणण्याचे काम फत्तेउल्लाखान आलमगीर शाही यास देण्यात आले. रहमतपुराच्या जवळ मराठ्यांनी फत्तेउल्लाखानावर मोठा कठिण प्रसंग आणला. बादशहाच्या आज्ञेने झुल्फिकारखानाने फत्तेउल्लाखान यास मदत केली. धनाजीचा मोड करावा म्हणून झुल्फिकारखान रवाना झाला. तो मिरजेच्या पलीकडे गेला असेल नसेल तोंच बातमी आली ती, ही चीन किलोचखान (निजामउल्मुल्क) हा विजापूरी कर्नाटकचा फौजदार होता. या हुद्याला जोडून त्याची विजापूरच्या सुभ्यावर पण नेमणूक झाली होती. तो तिकडे येण्यास रवाना झाला. विजापुरापासून सोळा कोसावर तो कृष्णेच्या काठी पोहोचला. त्याचा निकाल लावावा म्हणून मराठे त्या दिशेने चालून गेले. जुल्फिकारखानाने मराठ्यांचा पाठलाग केला. चीन किलोचखानावर मराठ्यांचा हल्ला होऊ देऊ नये असे जुल्फिकारखानाने ठरविले. जुल्फिकारखान हा विजापूरावरून पुढे निघाला असता त्याला कळले की, चीन किलोचखान हा मराठ्यांच्या हालचालीची बातमी ऐकून मुदगलच्या किल्ल्याच्या आश्रयाला गेला आहे. धनाजीने चीन किलोचखानावर हल्ला करण्याचा बेत टाकून दिला आणि तो गुलबर्गा प्रांताकडे वळला. (मोगल आणि मराठे पान १६४)."

धनाजी जाधव आणि जुल्फिकारखान यांच्या जानेवारी महिन्यातील हालचालीवर वरील घटनेने प्रकाश पडतो. या पुढील दोन-तीन महिने धनाची जाधव हा कृष्णा-भिमेच्या संगमाच्या प्रांतात फिरत होता असे दिसते. जुल्फिकारखान याला बादशहाने तातडीने सिंहगडासमोर बोलावू पाठविले. बक्षी

बहिरामनखानच्या मृत्युने (नोव्हेंबर १७०२) ही जागा रिकामी झाली होती. त्या जागेवर जुल्फिकारखान याची नेमणूक करण्यात आली. जागांसाठी माणसे कशी कमी पडू लागली याचे हे एक उदाहरण आहे. जुल्फिकारखान हा औरंगजेबाचा मावस भाऊ. मोगलांचा तडफदार सेनापती. त्याला एकाहून अधिक कामे सांगण्यात आली. रायगड व जिंजी हे किल्ले त्याने मराठ्यांच्याकडून घेतले, ही त्याची मोठी कामगिरी, गोळकुंडा, कर्नाटक म्हणजे तमीळनाडचा फौजदार (प्रशासक) हा त्याचा प्रमुख होता पण मराठ्यांचा पाठलाग करणे आणि त्यासाठी चौफेर फिरणे हे काम त्याच्याकडे आल्यामुळे त्याने तमीळनाडमध्ये आपल्यातर्फे नायब (डेप्युटी) म्हणून दाऊतखान पन्नी यास ठेवले, हे बादशहाच्या आज्ञेने आणि तो कृष्णेच्या अलीकडे आला. बक्षी बहरामनखान वारल्यामुळे त्याची मीर बक्षीची जागा जुल्फिकारखानाला मिळाली, हा हुद्दा त्याच्या तमीळनाडमधील फौजदारीला जोडून होता. बादशहाने जुल्फिकारखानाला सिंहगडाच्या वेढ्याचे काम दिले. (फेब्रुवारी १७०३). मीर बक्षीगिरीचे काम पाहण्यास जुल्फिकारखानाचा डेप्युटी म्हणून मतलबखान याची नेमणूक करण्यात आली. याचे कारण मराठ्यांची खानदेश आणि नर्मदापारची आक्रमणे ही बादशहाला अस्वस्थ करू लागली होती. औरंगाबाद सुभ्यावर औरंगजेबाचा नातू बेदारबख्त हा सुभेदार होता. नांदेड आणि वऱ्हाड या दोन सुभ्यावर गाजिउद्दीन फिरोजजंग हा सुभेदार होता. दोन-दोन सुभे एकाच माणसाकडे देणे या गोष्टी मनुष्य बळाची कमतरता दाखवितात. वऱ्हाडचा नायब सुबेदार अलीमर्दानखान हा मराठ्यांचा प्रतिकार करण्यासाठी झटत होता. या घटनेला उद्देशून भीमसेन सक्सेनानाने म्हटले आहे: "या गोष्टीला काही दिवस झाले असतील नसतील तोच मराठ्यांनी नर्मदा ओलांडली आणि उज्जैनपर्यंत त्यांनी मोठा धुमाकूळ घातला. त्या भागातील अफगाणांनीही बंडे उभी केली. हे पाहून औरंगजेबाने जुल्फिकारखानाला सिंहगडासमोरील मोर्चातून बाहेर काढले आणि त्याला तातडीने औरंगाबादकडे रवाना केले. मराठ्यांनी खानदेश आणि माळवा या सुभ्यावर आक्रमण केल्यावर त्याचा प्रतिकार करण्यात शाहजादा बेदारबख्त आणि जुल्फिकारखान हे झटू लागले. शाहजादा बेदारबख्त याने सवाई जयसिंग आणि रूस्तुमखान दखनी या सरदारांना मराठ्यांच्याविरूद्ध पाठविले. मोगलदरबाराच्या बातमीपत्रात मोगल आणि मराठ्यांच्या युद्धांची वर्णने आहेत. मोगलांनी पराक्रम गाजविले असा सूर बातमीपत्रात दिसतो. पण सवाई जयसिंग आणि रूस्तुमखान हे मराठ्यांची आक्रमणे थोपवून धरण्यास असमर्थ ठरले असे त्यावेळी जुल्फिकारखानाच्या छावणीत असलेला भीमसेन सस्क्सेना लिहितो. तो म्हणतो: "सवाई जयसिंग आणि रूस्तुमखान यांच्याने काही होऊ शकले नाही." मराठ्यांनी बऱ्हाणपूरला वेढा घातला. तो उठविण्यासाठी जुल्फिकारखान आणि बेदारबख्त हे बऱ्हाणपूरकडे रवाना झाले. मोगलांची सैन्य जवळ येत आहे हे पाहून मराठ्यांनी बऱ्हाणपूरचा वेढा उठविला आणि ते वऱ्हाडकडे वळले. वऱ्हाड खानदेश या भागात पसरलेल्या या मराठा सैन्याचे नेतृत्व नेमाजी शिंदे याचकडे होते.

मोगलांनी वऱ्हाड आणि खानदेश या सुभ्यांचा बंदोबस्त करण्याची पराकाष्ठा केली. वऱ्हाडचा नायब सुभेदार अलीमर्दानखान याला बेदारबख्याचा नायब म्हणून खानदेशावर (बऱ्हाणपूर) बदलण्यात आले. वऱ्हाडवर रूस्तुमखान म्हणजे पूर्वीचा विजापुरी सरदार सर्जाखान याची नायब सुबेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

इकडे सिंहगडच्या वेढ्याचे काम चालू होते. समकालीन इतिहासकारांनी वेढ्याचे तपशील फार दिले नाहीत. भीमसेन सक्सेना हा या काळात जुल्फिकारखानाच्या सैन्याबरोबर अनेक वेळा बादशाही छावणीत आला होता. त्याने लिहिले आहे की——

“मागे जसवन्तसिंग याने (इ.स.१६६३ मध्ये) ज्या टेकडीजवळ मोर्चे घातले होते तेथेच तरबियतखान याने मोर्चे बांधले. जुल्फिकारखानाने किल्ल्याच्या पायथ्याशी बादशहाची गाठ घेतली. शिवापूरच्या बाजुने नवीन मोर्चे उभे करण्याची बादशहाने जुल्फिकारखानास आज्ञा केली.”

ही हकीकत जुल्फिकारखान हा सिंहगडाहून खानदेशाकडे जाण्याच्या पूर्वीची आहे. साकी मुस्तैदखान हा ही त्यावेळी बादशाही छावणीत हजर होता. त्याने सिंहगडासंबंधी थोडक्यात पुढीलप्रमाणे लिहिले आहे:

“किल्ल्याच्या बुरुजासमोर एक टेकडी होती. तरबियतखानाने त्यावर तोफा चढविल्या. काही दिवस त्याने तोफांचा मारा केला आणि शत्रूंचे तट बुरूज आणि घरे दारे उध्वस्त केली.” पण मोगल दरबारातील बातमीपत्रात वेढ्याचे तपशील बरेच आढळतात. ते संक्षिप्तपणे पुढे दिले आहेत.

**एक जानेवारी**

शिवापूरच्या ठाण्यावर मन्सूरखान, किल्ल्याच्या दरवाज्यासमोर अमानुल्लाखान, किल्ल्याच्या पलीकडे अमिनखान, मोगल छावणीत धान्याची महर्गता.

**चार जानेवारी**

मोगल छावणीभोवती चौक्यांचा बंदोबस्त.

**सात जानेवारी**

विशाळगडच्या तोफा सिंहगडच्या वेढ्याच्या कामासाठी मागविण्यात येतात.

**अकरा जानेवारी**

वऱ्हाडची बातमी. मराठा सरदार परसोजी आणि अलीमर्दानखान यांच्यात चकमकी. वऱ्हाडात मराठ्यांचे आक्रमण.

**तेरा जानेवारी**

अहमदनगर आणि ब्रह्मपुरी येथून सिंहगडच्या वेढ्यासाठी तोफा मागविण्यात येतात.

**चौदा जानेवारी**

पुण्याजवळील ठाण्यावर गुलबर्ग्याचा किल्लेदार याची नेमणूक.

अनुक्रमणिका

**सोळा जानेवारी**

मोगलातर्फे मुहमद जमाल हा सिंहगडच्या वेढ्यात गोळा लागून ठार.

**सतरा जानेवारी**

रायगडचा किल्लेदार शिवसिंग मुगल छावणीत.

**वीस जानेवारी**

वेढ्यांचे कामासाठी चाळीस मण सरब व बंदुकीची दारू आणि पाचशे लोखंडी गोळे पाठविण्याची बादशाहाची आज्ञा.

**एकवीस जानेवारी**

विशाळगडच्या किल्लेदारीचे काम चालू ठेवण्यास जाबताखानाचा नकार. किल्लेदारीवर ओरछाचा राजा उदीतसिंग याची नेमणूक.

**पंचवीस जानेवारी**

ब्रह्मपुरीच्या दोन तोफा सिंहगडच्या वेढ्यात.

**सत्तावीस जानेवारी**

सिंहगडासमोर बादशाही छावणीभोवती भिंत बांधण्याचे काम सुरू.

**एकोणतीस जानेवरी**

ख्वाजाखान (तुर्कताजखानाचा भाऊ) हा मराठ्यांच्या कैदेत.

**एक फेब्रुवारी**

मोगल अधिकारी गौतम हजारी, ठाणेदार पायदळ, सिंहगडासमोरील चकमकीत ठार.

**दोन फेब्रुवारी**

झुल्फिकारखान मराठ्यांच्या पाठलागावरून छावणीत परत. बादशहाच्या शय्यागृहाभोवती आतापर्यंत असलेले वीस हिंदू बर्कंदाज बदलून त्यांच्या जागी मुसलमान बर्कंदाज नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

### चार फेब्रुवारी

झुल्फिकारखान बादशहाना भेटतो. मीर बक्षीगिरीवर त्यांची नेमणूक. तो आणि त्याच्या सैन्यातील सरदार इस्माइलखान मका, कान्होजी शिर्के, राव दलपत बुंदेला, बिकानेरचा सुजानसिंग हे बादशहाना भेटतात.

### सहा फेब्रुवारी

सिंहगडासमोर झुल्फिकारखानाचे ठाणे.

### दहा फेब्रुवारी

बादशहाची मुलगी झिन्नतउन्नीसा बेगम आणि बायको उदेपुरी बेगम यांना ब्रह्मपुरी (सोलापूर जिल्हा) हून औरंगाबादला हलविण्याची योजना.

### अकरा फेब्रुवारी

मराठे नर्मदा ओलांडतात. झुल्फिकारखानाला सिंहगड समोरील मोर्चातून काढून औरंगाबादेत पाठविण्यात येते.

### बारा फेब्रुवारी

सिंहगड किल्ल्याभोवती नवी व्यवस्था.

### सोळा फेब्रुवारी

मोगलखान याजकडे औरंगाबाद ते बादशाही छावणीपर्यंतच्या मार्गाचे संरक्षण करण्याचे काम.

### अठरा फेब्रुवारी

बादशहा स्वतः जाऊन किल्ल्यासमोरील मोर्चे पाहून येतो. सिंहगड किल्ल्यावरून बादशहाच्या स्वारीवर तोफांचे दोन गोळे. मतलबखानाचा शिरपेच चक्काचूर.

### एकवीस फेब्रुवारी

मराठ्यांचे सैन्य बादशाही छावणीभोवती घिरट्या घालीत आहे.

उत्तरेकडून आलेला खजिना बऱ्हाणपुराहून आणण्यासाठी बेदारबख्ताचे सैन्य बऱ्हाणपूरकडे रवाना.

अनुक्रमणिका

घासदाणा आणण्यासाठी छावणीतून गेलेल्या मोगल पथकांवर मराठ्यांचा हल्ला.

**पंचवीस फेब्रुवारी**

झिन्नतउन्नोसा व उदेपुरी बेगम यांनी औरंगाबादे ऐवजी बहादुरगडला जावे अशी बादशाहाची आज्ञा (बहादुरगड——पेडगाव), बऱ्हाणपुरासमोर मराठे.

**एक मार्च**

मराठे सरदार नारोजी व संताजी यांची अहमदनगर परिसरात आक्रमणे.

**आठ मार्च**

सिंहगडचा वेढा पुढे सरकत नाही अशी बादशहाची तक्रार.

धनाची जाधव अक्कलकोट जवळ आळंद येथे पंधरा हजार सैन्यासमवेत. कामबक्षाचे त्याला पत्र.

**दहा मार्च**

सिंहगडावरील मराठा शिबंदीचा मोगलांशी संपर्क.

**अकरा मार्च**

शिवापूर भागात (सिंहगडजवळ) मराठ्यांची धामधूम.

**बारा मार्च**

सिंहगडच्या किल्लेदाराचा मृत्यू, किल्ल्यावर रोगाची साथ, पाण्याची विलक्षण टंचाई.

**तेरा मार्च**

सिंहगड किल्ल्यातील मोगलांचे हत्ती उपासमारीमुळे मरत आहेत म्हणून मराठ्यांच्याकडून परत करण्यात येतात.

**वीस मार्च**

सातारा व कऱ्हाड येथील फौजदार यासीनखान हा बादशहाच्या छावणीत.

**एकवीस मार्च**

अनुक्रमणिका

मोगलांचे मोर्चे कल्याण दरवाज्यापर्यंत.

**चोवीस मार्च**

बाळाजी विश्वनाथ (पेशवे घराण्यांचे संस्थापक) हमीदोद्दीनखानाला भेटतात.

**पंचवीस मार्च**

सिंहगडातून दीड हजार मराठे बाहेर पडतात, उज्बेकखानाच्या ठाण्यावर हल्ला. उभयपक्षी माणसे मारली गेली.

बाळाजी विश्वनाथ (बाळू पंडित) आणि इतर चार मराठे, हमीदोद्दीन व कामबक्ष यांच्या भेटीस.

**एक एप्रिल**

सिंहगडावरील मराठे एक महिन्याची मुदत आणि किल्ल्यातील सामुग्रीची किंमत मागतात. बादशहा विनंती फेटाळतो.

**तीन एप्रिल**

दोर लावून सिंहगडावर मोगलांचा चढण्याचा प्रयत्न, मोगलांची चार माणसे ठार, प्रयत्न अयशस्वी, तटावर चढण्यासाठी बादशहाकडून सैनिकांना सोन्याची दहा कडी बक्षीस.

**चार एप्रिल**

झिन्नतउन्नीसा आणि उदेपुरी बेगम ब्रह्मपुरीहून बहादुरगडकडे रवाना.

**पाच एप्रिल**

धनाजी जाधवचा मुलगा शंभूसिंग जाधव आणि मल्हारजी व खंडोजी हे चार हजार स्वारासहित बादशाही छावणीपासून चार कोसावर. इरादतखानाच्या ठाण्यावर मराठ्यांचा हल्ला. बादशहाकडून कुमकेची फौज रवाना. बादशाही पथकातील सैनिक जखमी.

**दहा एप्रिल**

अखरापूर येथे मोगलांच्या रसदेवर मराठ्यांचा हल्ला, मराठे रसद लुटतात.

**अकरा एप्रिल**

अनुक्रमणिका

बाळाजी विश्वनाथ आणि इतर दोन मराठे हे मोगलांशी बोलणी करण्यासाठी सिंहगडावरून मोगल छावणीत येतात. याच सुमारास हिंदुराव व खंडोजी हे अहमदनगर प्रांतात धामधूम करतात. झुल्फिकारखान हा खानदेशाकडून बादशाही छावणीकडे.

**तेरा एप्रिल**

मोगल सिंहगड घेतात. मोगल सेनापती आणि तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याचा भाऊ कामियाबखान हा सिंहगडावर दाखल होतो. मराठे किल्लातून बाहेर पडतात. झुल्फिकारखान हा शंभूसिंग जाधवचा पाठलागावर बादशाही छावणीपर्यंत येतो.

**पंधरा एप्रिल**

बादशाही छावणीसमोर मोगल आणि मराठे यांच्या चकमकी. मराठे छावणीचा परिसर सोडून निघून जातात.

**वीस एप्रिल**

जुल्फीकारखान बादशहाला भेटतो. त्याला बहादुरगडकडे जाण्यास निरोप.

**चोवीस एप्रिल**

बादशहा सिंहगडाकडून पुण्याकडे रवाना. सिंहगडाचे नवीन नाव बक्षिंदाबक्ष.

**पंचवीस एप्रिल**

झिन्नतउन्निसा आणि उदेपुरी बेगम या बहादुरगडात दाखल.

सिंहगडाबद्दल मोगल इतिहासकार साकी मुस्तैदखान याने फार त्रोटक उल्लेख केला आहे. तो मोगलांच्या ताब्यात कसा आला याबद्दल तो बोलत नाही. तो इतकेच म्हणतो की “वास्तविक पाहता तो किल्ला (सिंहगड) इतका मजबूत आहे की परमेश्वरानेच तो मिळवून द्यावा, नाही तर, कितीही प्रयत्न करा तो सर होणे शक्यच नाही.” भीमसेन सक्सेना हाही त्याकाळी सिंहगडाच्या जवळपासच होता. तो अधिक मोकळेपणाने लिहितो. तो म्हणतो: “तरबियतखानाने किल्ल्यातील लोकांशी बोलणे लावले आणि त्यांना भक्कम रक्कम चारून किल्ला ताब्यात घेतला.

सिंहगडावरील पाण्याची टंचाई, रोगराई, आणि अन्न धान्याचे दुर्भिक्ष इत्यादी कारणांनी मराठ्यांनी किल्ला सोडून द्यावयाचे ठरविले असे दिसते, तरी किल्ला इतक्या लवकर का सोडला, पावसाळा येईपर्यंत तरी लढवायचा होता. असा ठपका ताराबाईने किल्ल्याच्या शिबंदीवर ठेवला.

आपल्या पत्रात ताराबाई म्हणतात—-"सिंहगडास औरंगजेब बिलगला होता. त्यास नतिजा पावावया निमित्त स्वामीने तुम्हास किल्ला मजकुरी ठेविले होते. उतावळी करून हिंमत सोडून, तहरह करून किल्ल्यावरून उतरून राजगडास आलेस म्हणोन हे वर्तमान धोंडोजी चव्हाण दिंमत लबे यांनी हुजूर विदित केले. त्यास स्वामीने तुमचे मदतीस लोक पाठवले. ऐवज दास पाठविण्यास काही न्यून केले नसता उताविळी करून हिंमत सोडून ही गोष्ट केली, हे काही बरे केले नाही, पर्जन्य पडेपर्यंत (किल्ला) भांडवावयाचा होता, ती गोष्ट न केली."

यावेळी जरी मराठ्यांना सिंहगड सोडावा लागला तरी मराठ्यांनी तो १७०५ मध्ये जिंकून घेतला. मोगलांनी शाहूराजांना पुढे करून इ.स.१७०६ मध्ये परत घेतला. त्याच्या पुढच्याच वर्षी म्हणजे १७०७ मध्ये मराठ्यांनी तो कायमचा परत मिळविला. महाराष्ट्रात सिंहगडासाठी इतके अटीतटीचे संघर्ष झाले तितके इतर कोणत्याही किल्याबद्दल झाले नाहीत. त्या दृष्टीने सिंहगड हा महाराष्ट्राचा मान बिंदु म्हणावा लागेल.

पावसाळ्यात मोहीम करावी लागू नये ही औरंगजेबाची इच्छा. विशालगडच्या वेढ्यात पावसाळ्यामुळेच त्याची विलक्षण हानी झाली होती. त्यामुळे सिंहगडचा वेढा लवकर आटोपावा अशी त्याची धडपड होती. सिंहगड हाती पडल्यावर तो पावसाळ्यासाठी म्हणून पुण्याला आला. पुण्यात पावसाळा काढावा आणि हिवाळ्यात रायगड आणि तोरणा जिंकून घ्यावेत असा त्याचा बेत होता. १ मे १७०३ रोजी औरंगजेबाने पुण्यात छावणी केली.

## पुण्यात औरंगजेब

मराठ्यांच्या तुकड्या बादशहाच्या छावणीभोवती घिरट्या घालीत होत्या. औरंगजेबाने झुल्फिकारखानाला मराठ्यांचे पारिपत्य करण्यासाठी छावणीतून बाहेर पाठविले होते. झुल्फीकारखानाने आपले जड सामान आणि बाजारबुणगे ब्रम्हपुरीहून हलवून बहादूरगड (दौंडजवळ) येथे ठेवले. तेथे त्याने आपली छावणी कायम केली.

७ मे च्या बातमी पत्रात म्हटले आहे की, धनाजी जाधव हा पंधरा हजाराचे सैन्य घेऊन सोलापूरच्या पूर्व सीमेवर आळंद भागात धामधूम करीत आहे. त्याच्याजवळ पंधरा हजारांचे सैन्य आहे. तेथून निघून धनाजी जाधव हा अकलूज इंदापूरकडे येत आहे. विजापूर प्रांतात मराठ्यांची धामधूम चालू होती. तेथे मराठा सरदार शहाजी (निबांळकर) हा वऱ्हाडात दाखल झाला होता. फत्ते उल्लारखान हा विशालगडाहून बादशहाना येऊन भेटला.

वरीलकारणे असोत किंवा इतर काय कारण घडले ते असो औरंगजेबाने शाहूला मुसलमान करण्याचा निर्णय घेतला.

## शाहुच्या धर्मांतराचे प्रयत्न

९ मे १७०३ या तारखेची नोंद पुढीलप्रमाणे आहे: बादशहाने हमीदोद्दीनखान यास म्हटले, "तुम्ही शाहुकडे जा, त्याला म्हणावे——तू मुसलमान हो". त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान शाहूकडे गेला. त्याने शाहूला

अनुक्रमणिका

बादशहाचा निरोप सांगितला. शाहूने त्या सूचनेला निर्धाराने नकार दिला परत येऊन हमीदोद्दीनखानाने शाहूचा नकार बादशहाला कळविला. हे ऐकून बादशहा इतकेच म्हणाला "शाहूवर कडक नजर ठेवा."

ही बातमी मोगल दरबाराच्या अखबारामध्ये सहजपणे नोंदली गेली आहे. पण महाराष्ट्राच्या इतिहासात त्याला अनन्य साधारण महत्त्व आहे. काय आश्चर्य आहे पहा. संभाजी राजांना ठारच मारावयाचे असा निर्णय औरंगजेबाने घेतला होता. तू धर्मांतर कर असे संभाजीला म्हणण्याचे औरंगजेबाला काहीच कारण नव्हते. तसे म्हटल्याचा पुरावा ही नाही. असे असूनही, महाराष्ट्रात, या विषयी भल-भलत्या दंतकथा पसरल्या आहेत. या उलट शाहूला "तू मुसलमान हो असे औरंगजेबाने म्हटल्याचा लेखी पुरावा अखबारामध्ये मिळतो पण या गोष्टीचा महाराष्ट्राच्या इतिहासात उल्लेखही नाही. शाहूने धर्मांतराला नकार दिल्यामुळे महाराष्ट्रातील केवढे तरी मोठे संकट टळले. शाहूला असा ठाम निर्णय घेण्याची शक्ती कोठून आली असावी? त्याचा विचार करता आपले लक्ष येसूबाईकडे जाते. मोगलांच्या छावणीतील सगळे वातावरण आणि संस्कार हे मुसलमानी धर्माला पोषक होते. बादशहाच्या सान्निध्यांत, निर्बंधात राहात असतांना शाहूच्या संस्कारक्षम वयात त्याच्या मनावर धर्मांतराला अनुकूल असे परिणाम होणे काही अशक्य नव्हते. पण असे घडले नाही. याला मोठे कारण म्हणजे शाहूवर येसूबाईचीं सतत नजर हेच होय. सतत १८ वर्षेपर्यंत शाहू हा मुगलांच्या निर्बंधात होता. या काळात त्याची आई येसूबाई ही त्याच्या मागे सतत सावली सारखी वावरत होती. शाहूचे धर्मरक्षण येसूबाईने महाराष्ट्राच्या या जगदंबेने केले असेच म्हणावे लागेल.

शाहूने धर्मांतर केले असते तर काय घडले असते याची कल्पनाही करवत नाही. धर्मांतरित शाहूला मराठ्यांनी बाजूला सारला असता. पुढील काळातील शाहूचे आणि पेशव्याचे पराक्रम, मराठी राज्याचा भारतभर विस्तार या गोष्टी घडणे अशक्य झाले असते, असे वाटू लागते. शाहू नाही तर पेशवे नाहीत. आणि पेशवे नाहीत तर शिंदे-होळकर नाहीत. असा प्रकार झाला असता. महाराष्ट्राच्या इतिहासाला काय वळण लागले असते हे सांगणे कठिण आहे. इतके मात्र खरे की, ९ मे १७०३ रोजी औरंगजेबाने शाहूला धर्मांतर करण्यास सांगितले आणि शाहूने त्याला ठाम नकार दिला.

बादशहाच्या पुण्याच्या मुक्कामात मोगल छावणीत रसदेची टंचाई सतत जाणवत होती. इ.स. १७०३ मध्ये महाराष्ट्रात मोठा दुष्काळ पडला. मोगल छावणीतील दुर्दशेचे चित्र त्यावेळी तेथे हजर असलेल्या मंडळींनी रेखाटले आहे. बादशहाच्या छावणीत असलेला त्यांचा चिटणीस साकी मुस्तैदखान हा लिहितो— "बादशहा पुण्यात सहा महिने आणि अठरा दिवस होता. अवर्षणामुळे धान्याचा दुष्काळ पडला. अनेक गरीब लोक त्यामुळे मृत्यूमुखी पडले. अनेक दुबळी माणसे शोक करू लागली. चणे, गहू, आणि तांदूळ फार कष्टाने मिळत. बादशाही लष्करातील धान्याचा बाजार (शहागंज) तर गरीबांच्या आक्रोशांनी भरून गेला होता. पण एक वेळ काळ आपला बेत बदलेल पण बादशहा आपल्या निर्धारापासून हटणार नाहीत.

**भीमसेन सक्सेना लिहितोः**—"कोंडाणा जिंकून घेतल्यानंतर बादशहाने पुण्यात छावणी केली. (१ मे १७०३) मराठ्यांच्या धामधुमीमुळे बादशाही छावणीत धान्य आणि इतर रसदही येईनाशी झाली. धान्याची महर्गता भयंकर झाली. रूपयाला तीन शेर या भावाने धान्य विकू लागले. दख्खनच्या मुलखात त्या वर्षी पाऊस असा झाला नाही. त्यामुळे पिके आली नाहीत. महर्गता इतकी भयंकर झाली की, लोक आपली घरे-दारे सोडून परागंदा झाले. नर्मदेच्या दक्षिणेस रूपयाला सहा शेरापेक्षा जास्त असे धान्य कोठेच मिळेनासे झाले."

अनुक्रमणिका

हे असे का घडले असावे याचे विवेचन करताना भीमसेन सक्सेना हा मराठ्यांचे वाढते आक्रमण, औरंगजेबाची प्रवृत्ती आणि राजनिती याचे थोडक्यात पण मार्मिक विवेचन करतो. त्या काळाचा तो साक्षीदार असल्यामुळे त्याचे विवेचन मोठे उद्‌बोधक आहे, तो म्हणतो—-"बादशहा प्रजाहिततत्पर असला की राज्य समृद्ध आणि प्रजा आरामात असते. बादशहाच्या हुकूमाचा सर्व सर्व लहान-थोरांना वचक असतो. बादशहाचे अधिकारीही व्यवस्थितपणे वागू लागतात. हे प्राचीन ग्रंथाच्या अवलोकनाने दिसून येईल. पण आता सध्याच्या युगात कुणाची नियत चांगली असल्याचे दिसून येत नाही. बादशहाच्या डोक्यात किल्ले जिंकून घेण्याचे वेड शिरले आहे. प्रजाहिताची कामे करणे त्याने आजिबात टाकून दिले आहे. बादशहाचे वजीर आणि अमीर हे योग्य सल्ला देईनासे झाले आहेत. यामुळे देशाची स्थिती भयंकर झाली आहे. देशाची विलक्षण अशी दुर्दशा झाली आहे. मराठ्यांचा जोर सर्वत्र वाढला आहे, त्यांची आक्रमणे वाढली आहेत, त्यांना अडविण्याचे काम कुणाच्याने होत नाही. लोक चांगला मार्ग सोडून वागू लागले आहेत. म्हणून परमेश्वराची त्यांच्यावरील कृपा नाहीशी झाली आहे."

औरंगजेबाच्या पुण्याच्या मुक्कामातील दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे रायभान भोसले याचा मोगल राजकारणात प्रवेश ही होय. मोगल आणि मराठे यांच्या प्रदिर्घ संघर्षामुळे मोगल जेरीस आले होते, हे उघड आहे. पाच-सात महिन्यात मोहीम आटोपेल या विचाराने निघालेला औरंगजेब वर्षानुवर्षे दक्षिणेच्या मोहिमेत गुंतून पडू लागला. इतकेच नव्हे तर मराठ्यांनी मोगलांशी लढा अधिक व्यापक केला. महाराष्ट्र, आन्ध्र, कर्नाटक, तामीळनाड येथे मोगल आणि मराठे यांची धावती युद्धे सतत चालू होती. इकडे बादशहा लष्करी डावपेचाचा विचार न करता, इरादतखानाने म्हटल्याप्रमाणे जिहादच्या वेडगळ कल्पनांना बळी पडून मराठ्यांचे किल्ले घेण्यासाठी व्यर्थ वणवण भटकत होता. मराठे आता नर्मदा पार होऊन माळवा आणि गुजराथ येथे आक्रमणे करु लागले होते. या दीर्घ युद्धाचा शेवट कसा होईल हे कोणीही सांगू शकत नव्हते. मोगलांचे सैनिक काय आणि अधिकारी काय? वीस वर्षे सतत चाललेल्या युद्धामुळे मेटाकुटीला आले होते. अशावेळी काहीही होवो मोगल आणि मराठे यांच्यात तडजोड होऊन मोगलांना अब्रुनिशी परत उत्तरेकडे जाण्यास मिळावे असे अनेकांना वाटू लागले. औरंगजेबाचा मुलगा शहाजादा कामबक्ष याने या कामात पुढाकार घेतलेला दिसतो. औरंगजेबाची हीच इच्छा असावी पण जिद्दी स्वभावामुळे तो बोलत नव्हता. पण कामबक्षाची भीड त्याला पडली आणि मराठ्यांशी बोलणी करण्यास त्याने परवानगी दिली असे दिसते. कामबक्षाने धनाजी जाधवशी पत्र व्यवहार केला होता, हे बातमीपत्रावरून दिसून येते. मुगलांना हवा होता मराठ्यांशी बोलणी करण्यासाठी एखादा विश्वासू मनुष्य अशी दोन माणसे त्यांना दक्षिणेत सापडलेली दिसतात. त्यापैकी एक म्हणजे तंजावरचे राजे व्यंकोजी यांचा मुलगा रायभान भोसले हा होय आणि दुसरा म्हणजे शंकराजी मल्हार हा होय. या दोघांना मोगल छावणींत पाठविण्यात तामिळनाडचा नायब फौजदार दाऊदखान पन्नी याने पुढाकार घेतला. रायभान भोसले हा शिवाजी महाराजांच्या घराण्यापैकी होता. त्यामुळे तडजोडीच्या बोलण्यात त्याचा उपयोग आपल्याला होईल असे मोगलांना वाटले. त्या रायभानचे कौतुक औरंगजेबाने किती करावे? मोगल छावणीत आल्या आल्या औरंगजेबाने त्याला सहाहजारी मनसब दिली. त्याच्या अनुयायांना दोन वर्षासाठी कराची सूट दिली. इतरही सवलती रायभानला देण्यात आल्या. शाहूराजे हे मोगल छावणीत होते. त्यांच्याशी सतत संपर्क ठेवण्याची रायभानला परवानगी देण्यात आली. शाहू महाराजांच्यासंबंधी औरंगजेबाची वागणुकही काहीशी चमत्कारीक असे. त्यांना बादशाही छावणीच्या बाहेर कधी जाऊ देण्यात येत नसे. याचाच अर्थ हा की ते सरळ सरळ बादशाही छावणीत निर्बंधात होते. इतकेच नव्हे तर मोगल छावणीत बादशहाच्या निवासस्थानाची गुलालबार नावाची जी जागा असे तेथेच त्यांना बादशहाच्या देखरेखीखाली राहावे लागे. कामबक्ष आणि रायभान यांच्याशी बोलणी करण्यासाठी शाहूला मोकळीक मिळावी म्हणून बादशहाने शाहूचा तंबू गुलालबारच्या बाहेर कामबक्षाच्या तंबूच्या शेजारी

उभा करावा अशी आज्ञा केली. बोलणी यशस्वी होत नाहीत असे वाटले की, शाहूला परत गुलालबार मध्ये आणण्यात येई.

रायभानची बोलणी यशस्वी होण्याचा फारसा रंग दिसेना. मराठे सरदारांच्या हालचाली कमी होईना. जून महिन्यात धनाजी जाधव आणि हणमंतराव निंबाळकर हे भीमेच्या खोऱ्यात फिरत होते आणि रूहल्लाखान व झुल्फिकारखान त्यांच्या पाठीवर होते. मोगल छावणीतील अन्नाचा दुष्काळ हा पराकोटीला पोहोचला होता. धान्य आणण्यासाठी बादशहाला लांब लांब पर्यंत पथके पाठवावी लागत आणि वंझारी लोकांना धान्य आणण्यासाठी भक्कम संरक्षण द्यावे लागे. वऱ्हाडात नेमाजी शिंदे यांच्या आक्रमक हालचाली चालू होत्या. एकवीस जूनच्या बातमी पत्रावरून नेमाजी शिंदे हा पंधरा हजार स्वारांचे सैन्य घेऊन देऊळघाटावरून वऱ्हाडात उतरला असे दिसते. बेदारबख्ताने त्याच्या विरुद्ध सैन्य पाठविले पण त्यांना यश मिळाले नाही. कर्नाटक भागात बहिर्जी हिंदुराव घोरपडे हा विजापूर प्रांतात धामधूम करीत होता.

ऐन याच वेळी बादशहाने चमत्कारीक निर्णय घेतला. येसूबाई आणि संभाजीराजांच्या परिवारातील इतर बायका-माणसे यांना बहादुरगडावर ठेवण्यात आले होते. संभाजीराजे यांच्या मुली (त्या नाटक शाळांच्याकडून झालेल्या दिसतात) यांना बहादुरगडावरून बादशाही छावणीत आणावे अशी आज्ञा औरंगजेबाने केली. संभाजी राजांच्या दोन मुली होत्या. त्यांची लग्ने मोगल अधिकाऱ्यांशी करून द्यावी असे बादशहाने ठरविले. ही नोंद १६ जून १७०३ ची आहे. जून महिना संपला. बादशाही छावणीभोवती मराठ्यांचे हल्ले थांबविण्यासाठी मोगल सरदार सतत गस्त घालू लागले. काफिले आणि खजिने मोठ्या अडचणीतून उत्तरेकडून दक्षिणेत येऊ लागले. असाच एक खजिना ६ जुलै १७०३ रोजी बादशाही छावणीत आला. जुलै महिन्यात कामबक्षाचा मुलगा महिमुलमिल्लत हा वयाच्या दहाव्या वर्षी पुण्यात मृत्यू पावला. बादशहाने पुण्याचे नाव मुहियाबाद ठेवले. त्याची कबर शनिवारवाड्यासमोर शेखसल्लाच्या दर्ग्यात आहे. इकडे धनाजी जाधवाच्या हालचाली चंदन-वंदन भागात चालू असता हणमंतराव निंबाळकरांनी राणी ताराबाई यांची प्रतापगडी भेट घेतली, अशी ७ जुलै १७०३ ची नोंद आहे. उलट १० जुलैला राजे शाहू आणि रायभान हे परस्परांना भेटल्याची नोंद त्या दिवशीच्या बातमीपत्रात आलेली आहे. २७ जुलैला तामिळनाडचा नायब फौजदार दाऊदखान पन्नी याने बादशाहकडे शंकराजी मल्हार याची शिफारस केली. इ.स.१७१२ मध्ये हुसेन अलीखान आणि बाळाजी विश्वनाथ यांच्यात चौथाई आणि सरदेशमुखी यांची तडजोड घडवून आणणारा हाच तो शंकराजी मल्हार हे लक्षात ठेवले पाहिजे. या शंकराजीची अधिक माहिती २७ जुलैच्या नोंदीत सापडते, ती अशी, शंकराजीचा भाऊ त्रिंबक मल्हारमुळे व्यंकटराव, रामराव इत्यादिंना मनसबी देण्याची शिफारस करण्यात आली.

ऑगस्ट महिना उजाडला. नर्मदेच्या काठावर मराठे हे मोगल पथकांच्यावर धाडशी हल्ले करू लागले. अशा बातम्या येऊ लागल्या. खुद्द बादशाही छावणीच्या जवळ मोगलांचे उंट, बैल जनावरे चरत असतानां मराठे पळवून नेऊ लागले. रायभानच्यामुळे तंजावरचे शहाजीराजे (व्यंकोजीचा पुत्र) हे आता मोगलांचे मांडलिक बनले होते. औरंगजेबाने त्यांच्याकडे खिलातिची वस्त्रे पाठविली. इकडे शाहूराजे आणि कामबख्श यांच्या भेटी होत होत्या. शाहूच्या जहागिरीची व्यवस्था औरंगजेबाने पुन्हा एकदा नीट लावून दिली. शाहू आणि रायभान यांच्या मार्फतीने मराठ्यांशी काही तडजोड होणे शक्य आहे कां? याचा अंदाज औरंगजेब घेत होता.

अनुक्रमणिका

२१ सप्टेंबरच्या बातमीपत्रातील नोंदीवरून बादशाही छावणीतील सैन्याचा थोडा अंदाज लागतो. छावणीभोवती गस्त घालण्यासाठी बादशहाने बक्षी रूहुल्लाखान, बक्षी सदरूद्दीन आणि मुहंमद अमीनखान यांच्या खाली अनुक्रमे——पाचहजार तीनशे छत्तीस, तीनहजार आणि तीनहजार असे एकंदरीत अकरा हजार तीनशे घोडेस्वार दिले. हे सेनापतीही महत्त्वाचे होते आणि त्यांच्या हाताखाली हे सैन्यही बरेच होते. साधारणपणे यावेळी औरंगजेबाच्या छावणीत पंचवीस ते तीस हजार सैन्य असावे असे म्हणता येईल. अर्थात् औरंगजेबाचे इतर मोठमोठे अधिकारी, उदाहरणार्थ बेदारबख्त, जुल्फिकारखान, गाजीउद्दीन फिरोजजंग, चीनकुलीजखान, (भावी निजामउल्मुल्क) दाऊदखान पन्नी हे मोठ्या सैन्यासहित ठिकठिकाणी मराठ्यांचा प्रतिकार करत होते, हे लक्षात घेतले पाहिजे. पुण्याच्या बादशाही छावणीत यावेळी धान्याची मोठीच टंचाई झाली होती. छावणीत धान्य आणण्यासाठी बादशहाने सुबे हैद्राबाद, तामिळनाड वगैरे भागातून अधिकाऱ्यांना रसद पाठविण्याच्या आज्ञा पाठवल्या. सप्टेंबर मध्ये बादशाही छावणीतील पैशाची टंचाई भागविण्यासाठी बादशहाचा नातू, आणि बंगालचा सुभेदार अजीमुश्शान याने पुण्याकडे खजिना पाठविला. याच महिन्यात शंकराजी मल्हार हा दाऊदखानकडे येऊन बादशहाला भेटला. तडजोडीच्या बोलण्यात त्याचाही उपयोग होईल असे औरंगजेबाला वाटत होते. कोंकणातूनही जंजिऱ्याचा शिद्दी याने बादशाही छावणीत सरद पाठवावी अशी औरंगजेबाने त्याला आज्ञा केली पण मराठ्यांच्या अडवणुकीच्या धोरणामुळे बादशाही छावणीत रसद सुरळितपणे येईना. छावणीतील महर्गतेचे हे ही एक मोठे कारण होते. त्यामुळे छावणीत वारंवार दंगली होऊ लागल्या. शिपायांना पगारही वेळेवर मिळेनासा झाला. अशा दंगलीत बादशाही अधिकाऱ्यांवर हल्लेही झाले. बादशाहाचा चिटणीस इनायतउल्ला खान (अहकामे आलमगिरी, औरंगजेबाचे आदेश या पत्र संग्रहाचा संपादक) याच्या पालखीची मोडतोड करण्यात आली. हे १७ सप्टेंबरच्या नोंदीवरून आढळून येईल.

ऑक्टोबर महिन्यापासूनच औरंगजेबाने राजगडकडे जाण्याची तयारी केली. राजे शाहू यांचा भाव वाढत चालला होता. त्यांना पुढे केल्यास मराठ्यांचे किल्ले घेणे सोपे जाईल असेही औरंगजेबास वाटत असावे. राजे शाहू यांचा संपर्क शाहजादा कामबक्ष याच्याशी करून देण्यात आला होता. ऑक्टोबर महिन्यात जुल्फिकारखान हा येऊन बादशहांना भेटला. औरंगजेबाच्या आज्ञेवरून ७ ऑक्टोबर रोजी शाहूराजे यांनी जुल्फिकारखानाची भेट घेतली. या सुमारास मराठ्यांनी औरंगाबाद प्रांतात पुन्हा हालचाली सुरू केल्या त्यामुळे जुल्फिकारखानाला घाईघाईने औरंगाबादकडे निघून जावे लागले. या भेटीनंतरच जुल्फिकारखानाला शाहूराजांच्या बद्दल थोडी अधिक आस्था वाटू लागली असावी. शाहूराजे आपल्या बरोबर असल्यास आपले बरेच प्रश्न सुटतील असे जुल्फिकारखानाला वाटू लागले. बादशहापासून शाहूला वेगळे करून आपल्याकडे घ्यावे या दृष्टीने त्याची पावले पडू लागली. सिंहगडच्या वेढ्यासाठी शाहू आपल्या बरोबर हवा तरच सिंहगड आपल्या हाती लवकर पडेल असे निमित्त सांगून जुल्फिकारखानाने शाहूला बादशहाकडून मागून घेतले. बादशहाने शाहूला तो पर्यंत आपल्या खास देखरेखीखाली निर्बंधात ठेवले होते. पण जुल्फिकारखानाच्या मागणीला त्याला नकार देता येईना. त्यामुळे सतराशे सहा पासून शाहूराजे हे बादशाही छावणी सोडून जुल्फिकारखानाबरोबर राहिले. औरंगजेबाच्या आयुष्याच्या शेवटच्या वर्षांत (१७०६-१७०७) शाहुराजे हे औरंगजेबाच्या छावणीत नव्हते तर जुल्फिकारखानाच्या बरोबर होते. औरंगजेब राजगडच्या मोहिमेवर जाण्याच्या पूर्वी बहादुरगडची व्यवस्था नीट लावण्याच्या विचारात होता कारण झिन्नतउन्निसा वगैरे औरंगजेबाचा कबिला तिथे होता. त्या साठी बहादुरगडावर औरंगजेबाने बक्षी सदरुद्दीन याची नेमणूक केली. पुण्यापासून पेडगाव, (बहादुरगड) अहमदनगर, आणि औरंगाबाद या मार्गाचे रक्षण मुगलखानाकडे देण्यात आले होते. जुल्फिकारखान याचाही तळ, (जड सामानापुरता) बहादुरगडाला असे. आता बहादुरगडच्या विशेष रक्षणासाठी औरंगजेबाने मुद्दाम बक्षी सदरूद्दीन याची

अनुक्रमणिका

नेमणूक केली. २२ ऑक्टोबरपासून औरंगाबाद प्रांतात नेमाजी शिंदे याने एकच धामधूम उडविली होती. त्यामुळे पेडगावच्या संरक्षणाकडे (बहादुरगड) विशेष लक्ष द्यावे लागले. नेमाजी शिंदे याने नोव्हेंबर महिन्यात वऱ्हाड मध्ये मोगलांवर मोठा कठिण प्रसंग आणला. तोपर्यंत बादशहा राजगडच्या वाटेवर निघाला होता. औरंगजेबाने राजगड जिंकून घेण्यासाठी १० नोव्हेंबर १७०३ रोजी पुणे सोडले.

पुण्याच्या मुक्कामातील पुढील प्रसंग हे मुगल-मराठा संघर्षास महत्त्वाचे ठरले:—

(१) वऱ्हाड आणि खानदेश येथे मराठ्यांची आक्रमणे वाढली;

(२) मराठ्यांच्या धामधुमीमुळे बादशाही छावणीत धान्याची महर्गता भयंकर झाली;

(३) शाहुराजे यांनी धर्मांतर करावे असा बादशहाने निष्फल प्रयत्न केला;

(४) कामबक्षाच्या मध्यस्थीने मराठ्यांशी तडजोडीची बोलणी करण्याचा प्रयत्न झाला.

या शेवटच्या प्रसंगाबद्दल बादशाही छावणीत हजर असलेला मोगलांचा इतिहासकार पुढीलप्रमाणे लिहितो (भिमसेन सक्सेना):——

मोगल आणि मराठे (पान १६७)

> "या सुमारास बातमी पसरली की, बादशहाला काहीनी सल्ला दिला असून शहाजादा कामबक्ष याच्या मध्यस्थीने मराठ्यांच्याबरोबर तडजोड होण्याचे घाटत आहे. शहजादा कामबक्ष याने विनंती केल्यावरून बादशहाला भीड पडली. त्याने शाहूला आपल्या गुलालबार येथील निवासस्थानातून काढून शाहजाद्याच्या हवाली केले. शहाजादा कामबक्ष यांनी आपली माणसे एकाहून अधीक वेळा धनाजी जाधवकडे पाठविली. पण मोगलांनी मराठ्यांना थोडेच जिंकून घेतले होते. दख्खनचा तमाम सुभा काही कष्ट न करता शिऱ्याचा गोळा घशात घालण्यास मिळावा, तसा ताब्यात गेला होता. ते काय म्हणून तहाला प्रवृत्त होतील? रायभान नावाचा एक मराठा होता. तो आपल्याला शिवाजीच्या भाऊबंदापैकी म्हणवीत असे, त्याच्या मध्यस्थीने तडजोडीची बोलणी चालू होती. त्याच्याकडून हे काम होईल असे वाटत होते. तो बादशहाला येऊन भेटला. त्याला बादशहाने सहा हजारी मनसबदार बनविले. बादशहाने मराठ्यांच्याकडे पाठवलेली माणसे निराश होऊन परत फिरली. राजा शाहू यास गुलालबारेत परत नजरकैदेत ठेवण्यात आले."

१० नोव्हेंबर १७०३ ला औरंगजेबाने पुणे सोडले. राजगडाला जाण्यासाठी त्याने सिंहगडावरून जाण्याचा मार्ग पत्करला. सिंहगड आणि राजगड यांच्यामधील घाटाचा मार्ग नीट होण्यास वेळ लागू लागला, तसे बादशहाला सिंहगडच्या जवळ मुक्काम करावा लागला. बादशहाच्या छावणीत त्याच्याबरोबर शाहूराजे, रायभान भोसले ही मंडळीही होती. राजे शाहू यांनी घोड्यावर स्वार होऊन हुजुरात येत जावे आणि मुजरा करीत जावा अशी बादशहाने १६ नोव्हेंबरला आज्ञा केली. बादशहा पुण्याच्या मुक्कामात असतानाच छावणीतील एक सरदार मुनीमखान याची काबुलचा सुबेदार शाहजादा मोअज्ज़म याचा दिवाण म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याप्रमाणे मुनीमखानाने पुणे सोडले. हे सांगण्याचा उद्देश हा की,

औरंगजेबच्या मृत्यूनंतर झालेल्या अंतःकलहात शहाजादा मोअज्ज़म हा विजयी झाला आणि त्याबरोबर हाच मुनीमखान हा मोगल साम्राज्याचा मुख्य प्रधान झाला. त्या पदावर तो इ.स. १७११ पर्यंत होता.

## नंदूरबारचा देसाई

मराठी इतिहास संशोधनात काही वर्षापूर्वी एक चमत्कारिक घटना घडली. पुण्याच्या भांडारकर संशोधन संस्थेचे क्युरेटर डॉ. गोडे यांनी शंभूराज चरितम नावाचे एक काव्य प्रसिद्ध केले. हे काव्य संस्कृतमध्ये होते. त्यात वर्णिखेला शंभूराज म्हणजे शिवाजीचा पुत्र संभाजी राजे होत. असा निष्कर्ष डॉ. गोडे यांनी काढला. या शंभूराजाचे लग्न सुरतेच्या चंपा नावाच्या मुलीशीं झाले होते. यावरून संभाजीराजांची ती दुसरी पत्नी असावी असा तर्क त्यांनी केला. यावर महाराष्ट्रात बरीच चर्चा झाली. इतिहास संशोधक श्री. भा. रं. कुलकर्णी, यांनी दाखवून दिले की, काव्यातील शंभूराज हे संभाजी राजे नसून नंदुरबारचा देसाई शंभूनाथ हा होता. पण गोडे आपल्या मताला चिकटून राहिले. पुढे श्री. वा.सी.बेंद्रे यांनी हे मत उचलून धरून, ही चंपा म्हणे रजपूत मुलगी संभाजी राजांचे दोन पुत्र उद्धवसिंग व मदनसिंग यांची आई होय, असा मुद्दा मांडला. औरंगजेबाच्या दरबारातील बातमीपत्रावरून हा शंभूनाथ उर्फ शंभूराज देसाई हा नंदुरबारचा राहणारा असून त्याला मोगलांनी कैद केले होते. २२ नोव्हेंबर १७०३ च्या नोंदीप्रमाणे शंभूनाथ देसाईने कदेतून सुटका करून घेण्यासाठी इस्लाम धर्माचा स्वीकार केला. त्याचे मुसलमानी नाव अब्दुल मोमीन असे ठेवण्यात आले. २४ नोव्हेंबर १७०३ पर्यंत मोगलांचे सैन्य घाटापाशी पोहोचले. अर्धे सैन्य घाट ओलांडून पलीकडे पोहोचले. राजगडासमोर मोगल आणि मराठे यांच्या चकमकी होऊ लागल्या. औरंगजेबही पाठोपाठ राजगडाला पोहोचला. साकी मुस्तैदखान हा या मोहिमेत बादशहाच्याबरोबर होता. राजगडजवळील घाट ओलांडून जाण्यास मोगलांना किती कष्ट पडले याची प्रत्यक्ष हकीकत सांगताना त्याचे काहीसे काव्यमय वर्णन त्याने केले आहे:

> “रजब महिन्याच्या बारा तारखेस (१० नोव्हेंबर १७०३) रोजी मोगल सैन्य राजगड जिंकून घेण्यासाठी पुण्यातून बाहेर पडले. राजगडच्या अलिकडे चार कोसावर एक डोंगराचा घाट आहे. हा डोंगर म्हणजे गगनचुंबी आहे. त्या घाटाचा रस्ता नीट करण्यासाठी माणसे दोन महिन्यापासून खपत होती, पण जमिनीवरच्या माणसांची दृष्टी आकाशपर्यंत (डोंगराच्या टोकापर्यंत) कशी पोहोचावी आणि आकाशातील प्राण्यांचे हात जमिनीपर्यंत कसे पोहोचावे? या वाटेवर भयंकर चढ-उतार होते, तो मार्ग आक्रमण्यास मोगल सैन्याला अपार कष्ट पडले. सात दिवसात सैन्यांने तो घाट ओलांडला. आणखी एक मजल मारून रजब महिन्याच्या तीस तारखेस (२८ नोव्हेंबर १७०३ रोजी) जे सैन्य राजगडाच्या पायथ्याशी असलेल्या अरूंद मैदानात पोहोचले.” (मराठे व औरंगजेब पान ११६).

औरंगजेब राजगडसमोर पोहोचल्यावर मोगलांनी मोर्चे बांधण्यास सुरूवात केली. मराठे हे किल्ल्यातून मोगलांचा निकराने प्रतिकार करीत होते. मोगलांच्या छावणीत धांन्याची अतिशय टंचाई झाली होती. भीमसेन सक्सेना लिहितो—“महागाई इतकी होती की, बादशाही छावणीत धान्य रुपयाला दोन शेर मिळू लागले. जुल्फिकारखानाने बादशहाच्या आज्ञेने मराठ्यांना मागे हटविले आणि चहूकडून वंझाऱ्यांना गोळा करून, त्याने बादशाही छावणीपासून सहा कोसावर धान्य आणले. बादशाही छावणीभोवती मराठे घिरट्या घालीत होते, त्यांचा मोड करून रसद छावणीत आणून पोहोचवावी अशी बादशहाने त्याला आज्ञा केली.”

अनुक्रमणिका

राजगडचा वेढा चालू असताना मराठ्यांनी खानदेशात मोगलांचा दणदणीत पराजय केला. १४ डिसेंबर १७०३ च्या नोंदीवरून असे दिसते की, नेमाजी शिंदे हा चाळीस हजार स्वार व पायदळ असे सैन्य घेऊन वऱ्हाडात दाखल झाला. वऱ्हाडचा सुभेदार गाजिउद्दीन फिरोजजंग याचा नायब म्हणून रुस्तमखान हा काम करीत होता. तो मराठ्यांच्यावर चालून गेला. मोगलांचा या लढाईत जबर पराजय झाला. खुद्द रुस्तमखान याला भाल्याच्या जखमा होऊन तो मराठ्यांच्या कैदेत सापडला. उभय पक्षाची एक हजार माणसे या लढाईत ठार झाली. या लढाईने औरंगजेबाला फार धक्का बसला. या लढाईसंबंधी भीमसेन सक्सेना म्हणतो:

> "वऱ्हाडचा सुभेदार गाजीउद्दीन फिरोजजंग (निजामऊल्मुल्काचा बाप) याच्यातर्फे रुस्तमखान (विजापूरी) हा नायब म्हणून काम करीत होता. रुस्तमखान हा सात हजारी मनसबदार होता. मराठे वऱ्हाडात घुसले आहेत हे पाहून तो आपल्याबरोबर जय्यत सैन्य घेऊन एलिचपुराहून निघाला आणि मराठ्यांवर चालून गेला. लढाईत त्याने काही विशेष कामगिरी केली नाही. त्याची लढाईची योजना धुळीला मिळून तो मराठ्यांच्या कैदेत सापडला. मराठ्यांनी यापूर्वी पण त्याला असाच पकडला होता. रुस्तमखानचा बाप सय्यद इलियास उर्फ शर्जाखान हा पूर्वी विजापूरच्या चाकरीत असून तो लढाईत मारला गेला होता. विजापूर खालसा झाल्यापासून त्याचा मुलगा रुस्तमखान हा बादशहाच्या पदरी होता. त्याने काही मोठी कामगिरी बजाविली असे झाले नाही." (मोगल व मराठे, पान १६८).

बादशाही छावणीपासून चौदा कोसावर, हणमंतराव निंबाळकर आणि इतर मराठे सरदार हे चौदा हजार सैन्यासहित हालचाली करीत होते. त्यांना मागे हटवून जुल्फिकारखानने रसद आणली हे मागे सांगितले आहे. ही हकीकत २२ डिसेंबरची होय. ऐन यावेळी वऱ्हाडातील मोगल फौजेच्या दुर्दशेची बातमी औरंगजेबला कळली. त्याने जुल्फिकारखानला ताबडतोब औरंगाबादेकडे रवाना केले. नेमाजी शिंद्याने मोगलांच्यावर हा प्रचंड विजय मिळविला होता. (नोव्हेंबर १७०३), त्याने नर्मदा ओलांडली. वऱ्हाडचा सुभेदार गाजिउद्दीन फिरोजजंग याचा तळ कंधार (नांदेड जिल्हा) येथे होता. फिरोजजंग हा मराठ्यांच्या पाठलागावर नर्मदेपर्यंत पोहोचला. औरंगजेबाने शहाजादा बेदारबख्त याला आज्ञा केली की, शहाजाद्याने नर्मदा पार होऊन मराठ्यांचा मोड करावा. या मोहिमेवरून तो परत येईपर्यंत, जुल्फिकारखान याने औरंगाबाद आणि बुऱ्हाणपूर या दोन प्रांताची देखरेख करावी.

कामबक्षाला अजून वेडी आशा वाटत होती की मराठ्यांशी तडजोड होऊ शकेल. तो धनाजी जाधवला पत्रावर पत्रे लिहित होता. भीमसेन सक्सेना म्हणतो—"शहाजादा कामबक्ष हा धनाजी जाधवाकडे तहासाठी म्हणून पुन्हा पुन्हा माणसे पाठवीत होता. तहाच्या वाटाघाटी होत होत्या; पण धनाजीने निरनिराळी निमित्ते काढून काळ काढूपणाचे धोरण अवलंबिले.——(मोगल आणि मराठे, पान १७०), मोगलांनी राजगडचा वेढा जिद्दीने चालू ठेवला होता. मराठ्यांची महाराणी ताराबाई हीने मराठा शिबंदीला उत्तेजनाची पत्रे पाठविली. राजगडच्या संरक्षणाचे काम संताजीराव सिलंबकर व महिपतराव सिलंबकर देशमुख, तालुके गुंजळ, मावळ त्यांच्याकडे होते. रांगणा किल्ल्यावरून १९ डिसेंबर १७०३ रोजी महाराणी ताराबाई यांनी त्यांना उत्तेजनाचे पत्र लिहिले त्यातील काही मजकूर असा:—

अनुक्रमणिका

"श्री राजा शिव छत्रपती यांनी संताजीराव सिलंबकर व महिपतराव सिलंबकर देशमुख, ता. गुंजण मावळ यासी आज्ञा केली ऐसीजे, अवरंगजेब किल्ले राजगडास बिलगला आहे. मोर्चे चालवून यलगार (हल्ला) करीतो. परंतु तुम्ही त्याचा हिसाब न धरिता शर्तीनसी नतीजा पावविता म्हणून शंकराजी पंडित, सचिव यांनी लिहिले व सांप्रत तुमचे मर्दानगीचे वर्तमान राजश्री सोनजी फर्जंद यानी लिहिले. त्यावरून कळोन आले. तुमचे सेवेचा मजुरा जाला. तरी तुम्ही स्वामीचे एकनिष्ट सेवक तरवारेचे आहा. पुढेहि एकच रितीनें अवरंगजेबास नतीजा पाववून फत्तेचे वर्तमान लिहून पाठवणे. स्वामी तुमची सर्फराजी करितील. (१९ डिसेंबर १७०३)".

२० डिसेंबर १७०३ रोजी मोगलांनी राजगडच्या सुवेळा तटबंदीच्या बाजूने जोरदार हल्ला चढविला. या मोर्च्याच्यासमोरच औरंगजेबाचा तळ होता. मराठ्यांनी मोगलांचा हल्ला मोडून काढला खरा पण या लढाईत संताजीराव सिलंबकर हा तोफेचा गोळा लागून ठार झाला.

बाजी देशपांडे, मुरारबाजी, तानाजी मालुसरे इत्यादिंप्रमाणे त्यालाही हौतात्म्य लाभले.

हा वेढा चालू असतानाच इ.स. १७०३ चे वर्ष संपले आणि १७०४ सुरू झाले. मोगल राजगडासमोर तर मराठे माळव्यात असे हे चित्र मोगल-मराठा संघर्षाचे होते.

अनुक्रमणिका

# प्रस्तावना

## इ.स. १७०४

**इ.** स. १७०४ उजाडले त्यावेळी मोगल राजगडासमोर बसून होते. मोगल बातमीपत्रात छावणीतील धान्याच्या टंचाईचे उल्लेख येतात. १ जानेवारीच्या बातमीपत्राप्रमाणे बादशाही छावणीत धान्याचे भाव फारच कडाडले. बादशहाने शाही बाजाराचा अधिकारी मस्तअलीखान याची बदली केली आणि इतर माणसांना नेमले. राजगडसमोरील मोर्चावर मोगलांच्या तोफखान्याचा प्रमुख तराबियतखान हा सतत झटत होता.

७ जानेवारीच्या बातमीपत्रात पुढील नोंद आहे.——“शत्रूंचे सैनिक हे काल रात्री राजगड किल्ल्याच्या बाहेर आले. ते एका टेकडीच्या आसऱ्याने उभे राहिले. तेथून त्यांनी मन्सूरखान व बक्षीरुहुल्लाखान याच्या पथकावर बाण फेकण्यास सुरवात केली, मोगलांचे सैन्य येत आहे असे पाहून मराठे परत किल्ल्यात निघून गेले.

याच तारखेच्या नोंदीत वऱ्हाडची बातमी आहे. वऱ्हाडचा नायब सुबेदार रुस्तुमखान हा मराठ्यांच्या कैदेतून सुटून आला (जबर खंडणी भरून) आणि वऱ्हाडातील आपल्या बाळापूर जहागीर गांवात जाऊन बसला. त्याची मनसब बहाल ठेवण्यात यावी अशी खटपट चालविली. बादशहाने ती विनंती मान्य केली, हे अर्थात् पुढे घडले.

### नऊ जानेवारी रोजी

इरादतखान (याला पुढे काही काळ राजगडवर किल्लेदारी करावी लागली) याचा मुलगा हितायतउल्ला याला गुलबर्ग्याच्या किल्लेदारीवरून बोलावून घेण्यात आले आणि राजगडच्या समोरील मोर्चात तैनात करण्यात आले. वेढ्याचे पाऊल अजून पुढे पडत नव्हते. किल्ल्यावर सरळ हल्ला करून घ्यावा अशी बादशहाची इच्छा. पण किल्ल्याची तटबंदी मजबूत होती. मोगलांचे पाऊल काही पुढे पडेना. छावणीमध्ये रसद येऊन पोहोचण्यास किती अडचणी येत याचे उदाहरण १९ जानेवारीच्या नोंदीवरून दिसून येते. वंझाऱ्यांनी धान्याच्या गोण्या आणल्या, पण मराठ्यांच्या उपद्रवामुळे ती सगळी रसद छावणीपासून सात कोसावर अडकून पडली. शेवटी शेवटी बादशहाला भक्कम फौज पाठवून रसद छावणीत मागवून घ्यावी लागली. अशा स्थितीतही औरंगजेबाची विशिष्ट धोरणे चालूच होती.

### राजारामाच्या मुलीचे लग्न

२४ जानेवारीची नोंद पहा: मरहूम फेंजखान याचा नातू शमशेरबेग याला बादशह बोलावू पाठविले. बादशाही छावणीतील काजी अक्रम, फाजिलखान इत्यादी माणसे बादशाहापाशी होती. बातमी पत्रात म्हटले आहे—“नरक वासी रामा (राजाराम महाराज) याच्या मुलीचे लग्न शमशेरबेग याजबरोबर लावून देण्याचे बादशहाने ठरविले होते. बादशहाने काजी अक्रमला म्हटले—तुम्ही शमशेरबेगचा निकाह पढवा

अनुक्रमणिका

आणि वधूसाठी दहा हजार रुपयांचा मेहेर ठरवा. बादशाहाच्या आज्ञेप्रमाणे करण्यात आले." ही मुलगी राजाराम महाराजांना नाटक शाळेपासून झाली असली पाहिजे.

याच्या पाठोपाठ राजाराम महाराजांच्या नाटक शाळेपासून झालेल्या दुसऱ्या मुलीचे लग्न नागपूरचा गोंडराजा नेकनामखान याच्याशी लावून देण्यात आले. २५ जानेवारी १७०४ ची ही नोंद आहे. २७ जानेवारीची पण हीच नोंद आहे. लग्नाची तपशिलवार वर्णने देण्यात आली आहेत. बादशहाने आज्ञा केली की, दोन्ही मुलीना दोन हजार रुपयाचे अलंकार देण्यात यावे. राजगडच्या वेढ्यात भाग घेण्यासाठी जंजिऱ्याचा शिद्दी याकूतखान याने दोनशे स्वार आणि पायदळ सैन्य पाठवावे अशी आज्ञा करण्यात आली होती. याकूतखानाने लिहून पाठविले "माझ्यापाशी असलेल्या पथकांपैकी एक हजार शिपायांचे पथक हे बादशाही छावणीत धान्याची रसद पोहोचविण्याच्या कामगिरीवर आहे. माझे उरलेले पथक हे ठिकठिकाणी पसरलेल्या शत्रूच्या (मराठ्यांच्या) पारिपत्याच्या कामावर आहे. सिद्दी अंबर हा ठाण्यावर कामगिरी बजावित आहे. त्याला मी बोलावू पाठविले आहे. तो येताच मी त्याला हुजुरात पाठवीन." सिद्दी अंबरला लवकर पाठवावे अशी बादशहाने आज्ञा केली. ही नोंद २९ जानेवारीची आहे. या सुमारास सिद्दी याकूतखानाने विश्रामगड नावाचा किल्ला जिंकून घेतला होता. (याच किल्ल्याचे नाव पुढे याकूतगड असे ठेवण्यात आले होते.) ही बातमी बातमीपत्रातून आढळते. फेब्रुवारी महिन्याला सुरुवात झाली. वऱ्हाडच्या सुभ्यात मराठ्यांनी रूस्तुमखानाचा जो दणदणीत पराभव केला त्याचा अधिक तपशील आपल्याला ७ फेब्रुवारीच्या नोंदीत मिळतो. खंडणीच्या भरपाईत मोगल सुभेदार हे कसे मेटाकुटीला आले होते, हे ही या पत्रावरून कळते. ७ फेब्रुवारीच्या नोंदीत म्हटले आहे:

बादशहाने आज न्याय कचेरी केली. रूस्तुमखानाच्या (वऱ्हाडच्या नायब सुभेदार) अर्जात म्हटले होते, "नेमाजी शिंदे यांजबरोबर वऱ्हाड सुभ्यात झालेल्या युद्धात माझा जावई मारला गेला तसेच दोन हजार स्वार मारले गेले. सुभ्याच्या हरकाऱ्याने माझ्याशी वैरभाव धरून विपरीत वृत्तांत पाठविला आणि माझी कागाळी केली. माझा काही अपराध नसताना माझ्या मनसबीतून एक हजार स्वार कमी करण्यात आले. माझ्यावर तीन लाख रुपयाचे देणे बसविण्यात आले. माझ्याकडे कारंजाचे परगणे आणि इतर महाल होते. त्याचे उत्पन्न वर्षाला एक लक्ष पंचाऐंशी हजार रुपये होते. ते काढून घेण्यात आले. ते देणे देण्याच्या मोबदल्यात होते. याशिवाय एक लाख दाम वळते करून घेण्यात आले. माझी आर्थिक स्थिती कमालीची डबघाईची झाली आहे. माझी पुढीलप्रमाणे विनंती आहे.––"माझ्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं एक अमीन (अधिकारी) नेमण्यात यावा. माझ्या विनंतीवरचा निकाल लागेपर्यंत अमीनाने माझ्यावरील सरकारी देण्याच्या मोबदल्यात माझी जहागीर बदलू नये व माझी मनसब पूर्वीप्रमाणे बहाल समजण्यांत यावी." बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली––वऱ्हाडचा बदललेला माजी दिवाण सिराजउद्दीन याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा असे आज्ञा पत्र बक्षी रूहुल्लाखान याने त्याला (सिराजउद्दीनला) लिहून पाठवावे. उत्तर येईपर्यंत दाम वळते करण्याचे काम स्थगित करण्यात यावे.

याच तारखेच्या नोंदीवरून असे दिसते की, धनाजी जाधव, माधव (?), केशव (?) वगैरे मराठ्यांचे सरदार हे मिरजेकडून कऱ्हाडवर चालून आले. कऱ्हाडचा फौजदार सुलेमानखान याने त्यांच्याशी युद्ध केले. मराठे मागे हटले पण मोगलांची बरीच माणसे मारली गेली किंवा जखमी झाली. बातमीपत्रातील माधव म्हणजे परशुरामपंत प्रतिनिधीचा भाऊ माधवराव होय. कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याचे या संदर्भातील पत्र वाचण्यासारखे आहे. बुधपाचेगावचा मोगल ठाणेदार पदाजी घाटगे, खटावचा ठाणेदार कृष्णराव आणि म्हसवडचे ठाणेदार नागूजी माने यांचे उल्लेख या पत्रांत आले आहेत.

राजगडच्या वेढ्यासंबंधी ८ फेब्रुवारीची पुढील बातमी आहे. मोर्चात तैनात असलेला खडकसिंग हजारी हा आपले बंदूकची सहकारी यांना घेऊन दमदम्याच्या मार्गाने किल्ल्याच्या (बुरुजावर) चढला. मराठे तेथून निघून किल्ल्याच्या आत गेले. मोगलांनी बुरुज जिंकून घेतला.

१२ फेब्रुवारीच्या बातमीपत्रावरून मोगलांचे मोर्चे राजगड किल्ल्याच्या तटापर्यंत जाऊन भिडले होते, असे दिसते.

**नंदूरबारचा देसाई**

मागील पानावर नंदुरबारचा देसाई शंभूराज हा मुसलमान झाला याची हकीकत आली आहे. या संबंधीची अधिक हकीकत १५ फेब्रुवारी १७०४ च्या नोंदीत आढळते.

सकाळी बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले "सुल्तानपूर नंदुरबारचा देशमुख मुहम्मद मोमीन उर्फ शंभूनाथ हा बादशहाच्या छावणीत होता तो वारला. त्याचे वारस म्हणतात की एका माणसाने त्याला विष घालून मारले आहे" बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली की, मयताच्या (शंभूनाथ उर्फ मुहम्मद मोमीन) वारसांना आणि ज्याच्यावर आरोप आहे त्याला धार्मिक न्याय कचेरीसमोर (शरा) उभे करण्यात यावे. हे काम बादशाही छावणीचा कोतवाल सर्रबराहखान यांजकडे देण्यात आले."

शंभूराज उर्फ मोहम्मद मोमीन याचा अंत अशा प्रकारे झालेला दिसतो. ही माहिती अद्याप बाहेर आलेली नव्हती. त्याचे वारस त्याचे प्रेत घेऊन नंदुरबारला गेलेले दिसतात.

[**संपादकाची टीप**. ——काही वर्षापूर्वी मी नंदुरबारला गेलो असतांना तेथील वाणी लोकांच्या आळीत जाऊन आलो. शंभूराज देसाई याचा वाडा अद्याप तेथे असून वाड्यातील एका कोपऱ्यांत अद्याप त्याची कबर पहायला मिळते. ती दुर्लक्ष अवस्थेत आहे. शंभूराजचे वंशज हे हिंदूच आहेत, हे सांगणे नको. वरील बातमीवरून या पुढे तरी शंभूराज म्हणजे संभाजीराजे असा गैरसमज पुढील इतिहास ग्रंथात चालू ठेवण्यांत येणार नाही अशी आशा आहे.]

सततच्या युद्धामुळे मोगलांना मनुष्यबळ कसे कमी पडू लागले याचे जळजळीत उदाहरण याच तारखेच्या (१५ फेब्रुवारी) बातमीपत्रात आहे. हैद्राबाद सुभ्यातील मुस्ताफानगरचा किल्लेदार बादशहाला कळवितो—"नियमाप्रमाणे येथील शिबंदी तीनशे सैनिकांची हवी. त्यापैकी फक्त सत्तावीस हजर आहेत. वेळेवर पगार मिळत नसल्यामुळे तीही मन लावून काम करीत नाहीत. नियमाप्रमाणे येथे तोफखाना आणि गोलंदाजही नाहीत. धान्याचे साठे नाहीत. किल्ल्याचे दरवाजे आणि भिंती यांची दुरूस्ती होणे आवश्यक आहे," अशी परिस्थिती अनेक किल्ल्यांची झाली होती. त्यामुळे मराठ्यांचा मुक्तसंचार कसा होत होता, हे समजण्यासारखे आहे.

सोळा फेब्रुवारीच्या पुढे किल्यासंबंधी मराठ्यांशी बोलणी चालू झालेली दिसतात. राजगडबरोबर तोरणाही घेऊन टाका अशी औरंगजेबाने मागणी केलेली दिसते. या सुमारास खानदेशातील मराठ्यांच्या हालचालींची माहिती बऱ्हाणपूरच्या बातमीपत्रातून सापडते नेमाजी शिंदे हा आपले सैन्य घेऊन होशंगाबाद

अनुक्रमणिका

भागात धामधूम करीत होता. जानेवारी महिन्यात गाजिउद्दीन फिरोजजंग हा नेमाजीच्या पाठलागावर होता. बऱ्हाणपूरचा नायब सुबेदार मीर अहमदखान याला बऱ्हाणपूरच्या रक्षणाचे काम देण्यात आले.

**राजगडचा पाडाव**

सतरा फेब्रुवारीच्या बातमीवरून त्या तारखेस मराठ्यांनी राजगड सोडला आणि मोगल सेनापती तरबियतखान याने किल्ल्यात प्रवेश केला, असे दिसते. साकी मुस्तैदखान हा त्यावेळी बादशाही छावणीत होता. त्याच्या औरंगजेब चरित्र या ग्रंथावरून असे दिसते की, राजगडासमोर मोगलांनी एक दमदमा (तोफा ठेवण्याची ऊंच जागा) बांधला. किल्ल्यातला बुरूज तीस गज उंच होता त्यासमोरील टेकडीवर दमदमा बांधण्यात आला तो किल्ल्याच्या तटाएवढा उंच झाला. सहा फेब्रुवारीला मोगल सैनिक टेकडीसमोर असलेल्या किल्ल्याच्या बुरूजावर चढले. आणि मोठ्या शर्तीने त्यांनी तो बुरूज आपल्या ताब्यात ठेवला. मुस्तैदखानाने किल्लेदारांची नावे फिरौनजी आणि आमानजी अशी दिली आहेत. रुहुल्लाखानाच्या मध्यस्थीमुळे बादशहाने आज्ञा केली की मराठ्यांनी निःशस्त्र होऊन किल्ल्यातून निघून जावे. किल्ल्याचे नाव नबी शाहगड हे ठेवण्यात आले.

राजगड घेतल्यानंतर औरंगजेबाने तोरण्याकडे प्रस्थान केले. बादशहाने २३ फेब्रुवारी रोजी राजगड सोडले. ते तोरण्याच्या वाटेला लागले. मोगलांची पथके यापूर्वीच तोरण्यासमोर मोर्चे बांधण्याच्या कामाला लागली. औरंगजेब हा लवकरच तोरण्याला पोहोचला. वेढ्याला सुरवात झाली होती. किल्ल्यासमोर मोर्चे सुरू करण्यात आले. चार मार्च रोजी मोर्चे दोन साखळ्या पुढे सरकले.

**संभाजीराजांची मुलगी (नाटकशाळेकडून)**

पाच मार्च १७०४ ची ही बातमी वाचकाना निश्चितपणे विचार करण्यास लावेल. बादशाही छावणीतून औरंगाबादपर्यंतच्या रस्त्याचे रक्षण करण्याचे काम मुगलखान याच्याकडे देण्यात आले होते. तो येऊन बादशहांना भेटला.

"नरकवासी संभा (संभाजीराजे) यांची मुलगी हिला बहादूरगडहून आणण्यात आले होते. तिचे लग्न फकीरमहंमद शाइर याच्याबरोबर करण्याचे ठरविले. फकीर मुहमदला बादशहांने खिलातीची वस्त्रे दिली." या बातमीपत्रात तिचा उल्लेख आहे. तो संभाजी राजांची नाटक शाळेकडून झालेली मुलगी असावी.

तोरण्याचा वेढा फार दिवस चालला नाही. किल्ल्यावर सरळ हल्ला करून तो जिंकून घेण्याचे हे एकच उदाहरण मोगलांच्या मोहिमेत आढळते. यासंबंधी मुस्तैदखान म्हणतो.

**तोरण्याचा पाडाव**

अल्लावर्दीखानाचा नातू अमानुल्लाखान हा त्या शूर घराण्यातही अतिशय शूर आणि निधड्या छातीचा म्हणून नावाजला होता. जिल्काद महिन्याच्या पंधरा तारखेस (१० मार्च १७०४) बादशहाला एकूण नव्वदावे वर्ष (चांद्रमास) लागले. त्या रात्री अमानुल्लाखानाने काही मावळ्यांना तयार केले. त्यापैकी एक जण जिवावर उदार होऊन किल्ल्याच्या तटावर चढला. तटाला त्याने एक भक्कम दोर बांधला आणि मग वीस-

अनुक्रमणिका

पंचवीस माणसे दोराच्या साहाय्याने तट चढून गेली आणि किल्ल्यात दाखल झाली. त्यांनी मारामारीला सुरवात केली. अमानुल्लाखान आणि त्याचा भाऊ अताउल्लाखान आणि इतर काही माणसे जिवावर उदार होऊन त्यांच्या पाठोपाठ पोहोचली. हमीदुद्दीनखान बहादुर हा चहुकडे टेहेळणी करीत हिंडत होता. त्याला ही हकीकत कळली. त्यानेही कमरेला दोर बांधून किल्ल्यात प्रवेश केला. गनीम प्रतिकारार्थ धावले. त्यांना ठार मारण्यात आले. त्यापैकी वाचलेले लोक किल्ल्याच्या आतील बाजूस गेले आणि त्यांनी तेथील दरवाजा बंद केला. वास्तविक पाहता हे मोठे अवघड काम होते. पण निधड्या छातीच्या वीरांशी लढण्याची कुणाला ताकद आहे? किल्ल्यातील लोक निराधार होऊन शरण आले. निशःशस्त्र होऊन त्यांनी किल्ल्याबाहेर निघून जावे अशी बादशहाने आज्ञा केली. किल्ल्याचे नाव कुतुहुल्गैब (दैवी विजय) असे ठेवण्यात आले.

बातमी पत्रातील माहिती पुढीलप्रमाणे सांगते, आठ मार्च १७०४ ची नोंद पहा:—

> "काल रात्री बादशहाला कळविण्यात (पुढीलप्रमाणे) आले. तोरण्याच्या पायथ्याशी असलेला ठाणेदार अमानुल्लाखान याने किल्ल्याच्या तटाला दोर लावले आणि मावळ्यांना बरोबर घेऊन तो तटावर चढला. किल्ल्यातील चोर (मराठे) सावध झाले. बादशहाने आज्ञा केली की, उद्या सकाळी हमीदोद्दीनखान बहादुर आणि मुहंमद अमीनखान बहादुर यांनी मानुल्लाखान याच्या मदतीस जावे."

नऊ मार्च १७०४ च्या बातमीपत्रात पुढे असे म्हटले आहे की, अमानुल्लाखान हा बुरुजावर चढला, त्यावेळी त्याच्या मराठ्यांशी चकमकी झाल्या. त्यात काहिजण मारले गेले आणि दोन मराठे कैद झाले. त्याचवेळी हमीदोद्दीनखान व मतलबखान हे अमानुल्लाच्या मदतीस आले. त्यांनी बुरुजाचा ताबा घेतला. मराठे किल्ल्याच्या आंतील भागात निघून गेले. मोगलांनी किल्ल्यावर हल्ला करण्याची पूर्ण तयारी केली. हे पाहून मराठ्यांनी तोरणा किल्ला सोडून द्यायचे ठरविले.

दहा मार्च १७०४ रोजी तोरणा किल्ला मोगलांच्या ताब्यात आला. किल्ल्यात असलेल्या मराठे सैनिकांची संख्या सुमारे ३५० असावी असे बातमीपत्रातील नोंदीवरून दिसते.

### मातबरखानाचा मृत्यू

कल्याण—भिवंडी येथे मोगलाची सत्ता स्थापन करणारा फौजदार मातबरखान याचा मृत्यू या सुमारास झाला असे १० मार्च १७०४ च्या नोंदीवरून दिसून येईल. मातबरखानाकडे नाशिक, आरणी, कल्याण-भिवंडी हे दोन प्रांत होते. नाशिक प्रांतातून मराठ्यांचे किल्ले त्याने प्रथम जिंकून घेतले आणि १६८९ मध्ये तो कोकणात उतरला. कल्याण-भिवंडी येथे त्याने मोगलांची सत्ता स्थापन केली. माहुली, सिंध्दगड, कर्नाळा इत्यादि किल्ले त्याने जिंकून घेतले. कोकणात एकीकडे जंजिऱ्याचा शिद्दी यांने (सध्याचा) रायगड प्रांत व्यापला होता. उत्तरेकडील कल्याण-भिवंडी भाग मातबरखानाकडे होता. या दोघाच्या मधील एक लहानसा भाग, अलीबाग, पद्मगड इत्यादि मराठ्यांच्याकडे राहिला होता. मातबरखानाच्या मृत्यूने मोगलांची कोकणातील बाजू उघडी पडल्याप्रमाणे झाले.

अनुक्रमणिका

तोरणा किल्ल्यात कामगिरी गाजविल्याबद्दल, अमानुल्लाखान आणि त्याचा भाऊ अताउल्ला यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली. पुढील मुक्काम म्हणून बादशहाने पावसाळ्यासाठी जुन्नर जवळील खेड येथे छावणी घालण्याचे ठरविले.

दक्षिण कर्नाटकातील गोंधळाच्या परिस्थितीचा अंदाज पुढील विलक्षण हकीकतीवरून लागतो मोगलांच्या किल्लेदाराने शत्रूंना दारुगोळा विकावा, असेही प्रकार घडत होते.

१७०४, ८ मार्चची ही नोंद पहा—हैद्राबाद कर्नाटक प्रांतातील जगदेवच्या इलाख्यातील मुहम्मद मसवूद वगैरे किल्लेदार हे आपल्या किल्ल्यातून दारुगोळा बाहेर काढून पाळेगार आणि इतर यांच्याकडे विकण्यासाठी पाठवितात. बादशहाने आज्ञा केली की त्यांना ताकीद पत्र पाठवावे.

## माळव्यात मराठे

अकरा मार्च १७०४ च्या नोंदीवरून आपल्याला माळव्यातील मराठ्यांच्या हालचालीची कल्पना येते. नेमाजी शिंदे यांने मालोदा हे गाव लुटून उध्वस्त केले. त्याने सिरोंज गावाला वेढा घातला. मोगलांनी खान फिरोजजंग याच्या नेतृत्वाखाली त्याच्यावर हल्ला करून त्याला वेढा उठविण्यास भाग पाडले. नेमाजी हा बुंदेलखंडाच्या वाटेने गढमंडल्याकडे निघून गेला.

## राजाराम महाराजांच्या मुलीचे लग्न

याच तारखेची म्हणजे ११ मार्चची पुढील बातमी पहा:

> “शमशीरबेग याचे लग्न नरकवासी रामा (राजाराम महाराज) याच्या मुलीशी (नाटक शाळेकडून) ठरले होते. तो बादशहाकडे मुजरा करण्यासाठी आला. बादशहाने त्याला एक घोडा, खिलातीची वस्त्रे आणि मुंडावळ (सेहरा) या वस्तू त्याला दिल्या आणि त्याला आपल्या तंबूकडे जाण्यासाठी निरोप दिला.

राजगडच्या किल्ल्यावर लोदीखान याची नेमणूक करण्यात आली. तो येऊन पोहोचेपर्यंत इरादतखानाला तेथे काम करण्यास सांगण्यात आले. लोदीखानाचा मुलगा अबदुल्ला याला तोरण्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. इरादतखानाचे आत्मचरित्र प्रसिद्ध असून राजगडला आपली नेमणूक कशी झाली आणि आपण तिथे चाळीस दिवस कसे काढले त्याची तपशीलवार हकीगत त्याने आपल्या आत्मचरित्रात दिली आहे. मराठ्यांच्या मुलखात किल्लेदारी पतकरण्यासाठी मोगल अधिकारी हे कसे कांकू करीत याची कल्पना आत्मचरित्रावरुन येईल. इरादतखान हा खानदानी सरदार, याचा आजा आजमखान हा दक्षिणचा सुभेदार (इ.स.१६३०) याचा बाप हा अयोध्या प्रांताचा सुभेदार. (इ.स.१६५८) इरादतखानाची आत्या ही औरंगजेबाची भावजय (शुजाची बायको) याच इरादतखानाने नमूद करून ठेवले आहे की, वास्तविक पाहता औरंगजेबाला मराठ्यांचे किल्ले घेत वणवण भटकत फिरण्याचे काहीही कारण नव्हते. केवळ औरंजेबाचा जिहादचा (धर्मयुद्ध) हट्ट हेच एक कारण होते; पंधरा मार्च १७०४ ला औरंगजेबाने तोरणा सोडला आणि तो खेडच्या वाटेला लागला. नेमाजी शिंद्याला सिरोंजचा वेढा उठविण्यास लावला आणि

अनुक्रमणिका

नेमाजीला हटविले म्हणून औरंगजेबाने गाजिउद्दीन फिरोजजंग याला सिपहसालार ही पदवी देण्यात आली.

## अगा जे झालेची नाही

गाजिउद्दीन फीरोजजंग ह्याने नर्मदा ओलांडून सिरोंज जवळ नेमाजी शिंदे याजवर हल्ला केला. अशा बातमीवरुन औरंगजेबाने फिरोजजंगला मोठी पदवी दिली आणि त्याच्या अधिकाऱ्यांना बढत्या दिल्या. त्यावेळी जुल्फिकारखानाच्या छावणीत भीमसेन सक्सेना हा हजर होता. त्याने लिहून ठेवले आहे की, "गाजिउद्दीन फिरोजजंग याने नेमाजीशी युद्ध केले नाही. उलट आपण नेमाजीवर मोठा जय मिळविला असा वृत्तांत त्याने बादशहाला लिहून कळविला. बादशहाने त्याला सिपहसालार ही पदवी दिली आणि त्याच्या अधिकाऱ्यांना बढत्या दिल्या. पण खरी वस्तुस्थिती काय आहे, हे बादशहाला कळून आल्यावर त्याने खान फिरोजजंग याची सिपहसालार ही पदवी काढून घेतली, तसेच बढत्या वगैर दिल्या होत्या त्याही काढून घेण्यात आल्या. खान फिरोजजंग हा वऱ्हाडला परत आला. औरंगजेबाचे अधिकारी त्याला कसे बनवीत आणि त्याच्याकडे खोटे रिपोर्ट कसे पाठवीत, याचे हे उत्तम उदाहरण आहे. माळव्यात मराठ्यांचा बंदोबस्त व्हावा आणि उत्तरेकडून येणारा खजिना सुरक्षितपणे दक्षिणेकडे पाठवावा यासाठी शाहजादा बेदारबख्त याला उज्जैनकडे पाठविले. औरंगाबाद आणि खानदेश या प्रांताची देखरेख जुल्फिकारखानाकडे होती.

अठरा मार्च रोजी (१७०४) बादशहा सिंहगडासमोर होता. त्याचा बक्षी रूहुल्लाखान हा अतिशय आजारी पडल्यामुळे बादशहाला आपला प्रवास हळूहळू करावा लागला. रूहुल्लाखानाचा आजार बळावत गेला आणि तो खेडच्या वाटेवर एप्रिल महिन्यात वारला. औरंगजेब हा स्वतः प्रवास करीत १३ एप्रिल १७०४ रोजी भीमेच्या काठावर खेड येथे आला. पुणे, जुन्नर वाटेवर असलेले हे गाव आज राजगुरुनगर म्हणून ओळखले जाते. या ठिकाणी १७०४ च्या ऑक्टोबर अखेरपर्यंत औरंगजेबाचा मुक्काम होता.

## खेड येथे औरंगजेब

इ.स.१७०४ च्या सुरूवातीस औरंगजेबाने राजगड आणि तोरणा हे किल्ले जिंकून घेतले. त्यानंतर तो पुढील मुक्कामासाठी म्हणून पुणे जिल्ह्यात खेड या भीमाकाठच्या मुक्कामावर आला. एप्रिल १७०४ पासून ऑक्टोबरच्या अखेरीपर्यंत औरंगजेबाचा मुक्काम खेड येथे होता. आदल्यावर्षी म्हणजे १७०३ मध्ये औरंगजेब हा पुण्याला असताना (मे १७०३ ते ऑक्टोबर अखेर १७०३) पुणे प्रांतात मोठा दुष्काळ पडला होता. धान्याच्या महर्गतेमुळे मोगल लष्कराचे जे विलक्षण हाल झाले त्याचे मोठे हृदयद्रावक वर्णन छावणीत असलेल्या औरंगजेबाचा चरित्रकार आणि खाजगी कारकून साकी मुस्तैदखान याने केले आहे. असाच उल्लेख औरंगजेबाचा सेनापती झुल्फिकारखान याच्या छावणीत असलेला भीमसेन सक्सेना याने आपल्या आत्मचरित्रात केला आहे. पण या सर्व अडचणींना न जुमानता औरंगजेब हा नोव्हेंबर महिन्यात राजगड व तोरणा जिंकून घेण्यासाठी पुण्यातून बाहेर पडला. सतराशेचारच्या फेब्रुवारी आणि मार्च मध्ये त्याने हे दोन्ही किल्ले जिंकून घेतले. पण मराठे सैन्य सर्वत्र पसरलेले, राजगडची किल्लेदारी पतकरण्यास कुणी मोगल सरदार तयार होईना. शेवटी इरादतखान [औरंगजेबाच्या भावजयीचा (शुजाची बायको) भाचा] दक्षिणचा माजी सुबेदार आजमखान इ.स. १६३० याचा नातू, अयोध्येच्या सुबेदाराचा मुलगा, वऱ्हाडचा माजी सुबेदार आणि औरंगजेबाच्या मावशीचा नवरा खानजमीन याचा पुतण्या) याचे मन बादशहाने वळविले; आणि

महिन्या-दीड महिन्यात तुझी बदली करतो, असे त्याला सांगून त्याला राजगडचा किल्लेदार म्हणून नेमले. तोरण्यावर अशीच तात्पुरती नेमणूक करण्यात आली.

सिंहगडचा किल्ला देवीसिंग बुंदेला यांजकडे देण्यात आला. हे सर्व झाले तरी मराठ्यांच्या हालचालीमुळे औरंगजेब अस्वस्थ होता. पुणे प्रांतातून निघून त्याने भीमाकाठी खेड येथे मुक्काम करण्याचे ठरविले. पुण्याहून तो खेडच्या वाटेवर असताना एप्रिल महिन्यात औरंगजेबाचा बक्षी (संरक्षण खात्याचा प्रमुख, सैन्याला पगार वाटप करण्याची जबाबदारी असलेला.) रूहल्लाखान हा मरण पावला. बावीस वर्षापूर्वी औरंगजेब दक्षिणेत उतरला तेव्हा पासून त्याचे चार सेनाप्रमुख बक्षी हे मरण पावले होते. औरंगजेबाच्या मावसभावाचा मुलगा रूहुल्लाखान पहिला, हा इ.स. १६९२ मध्ये विजापूर जिल्ह्यातील कृष्णाकाठच्या गलगली येथे वारला. त्यानंतर बक्षी मुफलिसखान हा इ.स.१७०० (सतराशे) च्या जानेवारी महिन्यात मीरज येथे वारला. बक्षी बहिरामंदखान हा इ.स.१७०२ च्या नोव्हेंबर मध्ये पेडगाव (बहादुरगड) जवळ वारला आणि आता रूहुल्लाखान दुसरा हा खेडच्या वाटेवर मरण पावला.

मोगलांचे मनुष्यबळ हळूहळू कमी होऊ लागले होते, हे उघड आहे. गेल्या वीस वर्षात औरंगजेबाचे अनेक नामांकित सरदार मरण पावले होते. दिलेरखान, बहादुरखान खानजहान, रूहुल्लाखान, हिंमतखान, हसनअलीखान ही काही नावे झाली. त्यांची जागा घेईल अशी माणसे सापडेनात प्रातांच्या सुभेदाराच्या जागाही रिकाम्या पडू लागल्या. औरंगजेबाने दोन-दोन हुद्यांवर एकाच माणसाची नेमणूक केली. त्याचा आणखी एक उपक्रम म्हणजे एका हुद्यावर असलेल्या अधिकाऱ्याला लष्करी काम किंवा मोहिमेचे काम सांगितले की त्याच्या मूळच्या हुद्यावर त्याच्यातर्फे नायब (डेप्युटी) म्हणून नेमणुका करावयाच्या. बऱ्याच प्रांतावर तर त्याने आपली मुले आणि नातवंडे यांना सुभेदार म्हणून नेमले होते. पंजाब आणि काबुल हे प्रांत औरंगजेबाचा मोठा मुलगा शाहजादा मोअज्ज़म यांजकडे होते. याच मोअज्ज़मचा मोठा मुलगा मुईजोद्दिन (हा पुढे जहादारशहा या नावाने बादशहा झाला. इ.स. १७११) हा मुलतानचा सुबेदार (आणि ठठ्ठाचा पण सुबेदार—सिंध) होता. मोअज्ज़मचा दुसरा मुलगा अजीमुश्शान (ह्याचा मुलगा फरूखसीयर हा पुढे बादशहा झाला. १७१३ ते १७१९) हा बंगालचा आणि बिहारचा सुबेदार होता.

औरंगजेबाचा दुसरा मुलगा आज़्ज़म हा गुजराथचा सुबेदार तर आजमचा मुलगा बेदारूख्त हा औरंगाबाद आणि खानदेश, दोन प्रांतावर सुभेदार होता. सुभे हैद्राबादवर औरंगजेबाचा मुलगा कामबक्ष हा सुभेदार असला तरी तो नेहमी आपल्या बापापाशी असे—त्यामुळे हैद्राबादचे प्रशासक हे कामबक्षाचे नायब (डेप्युटी) म्हणून काम करीत.

एकाच अधिकाऱ्याकडे किती हुद्दे होते ते पहा: औरंगजेबाचा मावस भाऊ आणि मुख्य प्रधान असदखान याचा मुलगा झुल्फिकारखान नुस्रतजंग याच्याकडे हैद्राबाद—कर्नाटक (तामिळनाडू) हा प्रांत होता. त्या बरोबरच बक्षी बहरामंदखानाच्या मृत्यूनंतर त्याला प्रमुख बक्षी म्हणून नेमण्यात आले. पुढे खानदेशात मराठ्यांची आक्रमणे थोपविण्यासाठी त्याला सतत तिकडे राहावे लागले. त्यामुळे बादशाही छावणीत बक्षीचा नायब म्हणून मतलबखान हा काम करू लागला. हैद्राबाद—कर्नाटक प्रांतावर झुल्फिकारखानाचा नायब म्हणून दाऊदखान हा काम पाही.

औरंगजेबाच्या या शेवटच्या काळात त्याचे महत्त्वाचे आणि मातबर सरदार असे दोनच राहिले होते. एक झुल्फिकारखान आणि दुसरा शाहबुद्दीन फिरोजजंग, शाहाबुद्दीन फिरोजजगकडे सुभे बदिर आणि सुभे

वऱ्हाड हे दोन सुभे देण्यात आले होते. फिरोजजंग हा स्वतः कंधार (नांदेड जिल्हा) जवळ तळ देऊन असे. वऱ्हाडच्या सुभ्यावर त्याच्या तर्फे नायब म्हणून सर्जाखान हा असे. १७०३ च्या नोव्हेंबर महिन्यांत नेमाजी शिंदे याच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचे सैन्य सर्जाखानावर चालून गेले. लढाईत सर्जाखानाचा जावई मारला गेला आणि स्वतः सर्जाखान हा भाल्याच्या जखमा होऊन मराठ्यांच्या हाती कैद झाला. जबर खंडणी भरूनच त्याला आपली सुटका करून घेता आली.

याच खान फिरोजजंगाचा मुलगा मीर कमरुद्दीन चीनकुलीजखान हा होय. हा इ.स.१७०२ पासून १७०७ पर्यंत विजापूरचा सुबेदार होता. निजाम हैद्राबादच्या घराण्याचा संस्थापक निजाम उल्मुल्क तो हाच होय.

बादशहा खेडला पोहोचला त्यावेळी त्याच्या छावणीतील सैन्य वीस हजाराहून अधिक नसावे. त्याचे दोन प्रमुख सरदार तर बाहेरच होते.

खेडच्या मुक्कामात असताना (बादशहा) त्याचा सरदार अमानुल्लाखान याने तुंग आणि तिकोणा हे किल्ले जिंकून घेतले. बादशहाने तिकोण्याचे नाव अमानगड आणि तुंगचे नाव बंकीगड असे ठेवले. या अमानुल्लाखानाचा आजा अलाबर्दीखान ह्याने सोळाशेएकतीस (१६३१–३२) च्या सुमरास मोगलांतर्फे नाशिक जिल्ह्यातील चांदवड, धोडप इत्यादी किल्ले गंभीरराव (सुप्रसिद्ध शिवकालीन संस्कृत कवी जयराम पिंडे याचा बाप) याच्याकडून जिंकून घेतले होते. अमानुल्लाखान याला त्याच्या आज्याची अलाबर्दीखान ही पदवी देण्यात आली.

कल्याण-भिवंडी येथील ठाणेदार व फौजदार मातबरखान हा १७०४ च्या सुरुवातीस मरण पावला होता. त्याच्या हाताखाली नाशिकचाही भाग होता. ही ठाणी त्याचा नातेवाईक जैनुद्दीन अलीखान याजकडे देण्यात आली. सध्याच्या रायगड जिल्ह्यात जंजिऱ्याचा सिद्दी याकूतखान याने मोगलांच्या पाठिंब्याने आपले बस्तान बसविले होते. सरकारी कागदपत्राप्रमाणे तो दंडराजपुरीचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून ओळखला जात असे. त्याने रत्नागिरी जिल्ह्यात हातपाय पसरुन महिपतगडचा किल्ला जिंकून घेतला होता. बादशहाने त्या किल्ल्याचे नाव याकूतगड असे ठेवले. महिपतगड हाती आल्यावर बादशहाला प्रतापगड जिंकून घेण्याची इच्छा झाली. या दृष्टीने सिद्दी याकूतखानाने तयारी करावी अशी बादशहाने आज्ञा केली. बादशहाचा हा डाव लक्षात येताच मराठ्यांचे बारा हजार सैन्य हे प्रतापगडाजवळ जमले आणि त्याने महिपतगड उर्फ याकूतगडाला शह दिला. त्यामुळे बादशहाची प्रतापगडची योजना बारगळली. सिद्दी याकूतखान याच्या विनंतीवरुन बादशहाच्या तोफखान्याचा अधिकारी तरबियतखान हा चिपळूण येथे मोगलांचे ठाण बसवून आला. दक्षिण कोकण आणि फोंडा प्रांत हे शेवटपर्यंत मराठ्यांच्या ताब्यात राहिले.

मोगलांचे रसद तोडण्याच्या मराठ्यांच्या सततच्या प्रयत्नामुळे बादशाही छावणीतील धान्य पुरवठा करणे हे मोठे जिकिरीचे काम होऊन बसले. एकोणीस मे ची मोगल दरबारची बातमीपत्रे पहा: “बादशहाना कळविण्यात आले की, छावणीपासून काही अंतरावर घोड नदीच्या भागात पंधराहजार मराठे स्वारांचे सैन्य गोळा झाले आहे. त्यांच्यावर चालून जाण्यासाठी बादशहाने जे सैन्य पाठविले ते अवघे आठ हजार तीनशे वीस स्वारांचे. बादशाही छावणीत महागाई फार वाढली आहे. गहू वगैरे धान्याचा भाव रुपयाला अडीच शेर झाला आहे. छावणीतील माणसे अतिशय हैराण झाली आहेत.”

अनुक्रमणिका

छावणीत अधूनमधून रसद येई. धान्याची ने-आण करण्यासाठी वंजाऱ्यांचे तांडे हजारो बैलांवर धान्याच्या गोण्या लादून लांब-लांबून छावणीत आणीत. मराठ्यांची सैन्ये त्यांच्या तांड्यावर तुटून पडत आणि रसद लुटून नेत. हे टाळण्यासाठी मराठ्यांच्या विरुद्ध मोगलांना तीन-चार हजार स्वारांची संरक्षण पथके पाठवावी लागत. याशिवाय मराठ्यांची सैन्ये दक्षिण कर्नाटक. तामिळनाड, विजापूर प्रांत, औरंगाबाद, वऱ्हाड, खानदेश इत्यादी भागात मुक्तपणे संचार करीत होती. मोगलांचे सुभेदार बादशहाना लिहित की, “मराठ्यांची अनेक सैन्ये आहेत आणि एकेक सैन्य वीस ते पंचवीस हजार स्वारांचे आहे.” औरंगजेबाने आपल्या पत्रात त्यांना कळविले की, शिवाजीच्या काळात मराठ्यांचे सैन्य दहाबारा हजारांच्यावर नव्हते ते इतके कसे वाढले ह्याचा शोध घ्यावा. “तुमचे पत्र म्हणजे एक कोडेच वाटते.” असे बादशहा आपल्या अधिकाऱ्यांना लिहितो.

## मराठ्यांचे व्यापक डावपेच

या काळातील प्रमुख मराठे सरदारांची नावे मोगलांच्या कागदपत्रात आढळतात. ती म्हणजे धनाजी जाधव, बहिर्जी हिंदुराव घोरपडे, हणमंतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे ही होत. दक्षिण कर्नाटकात मराठ्यांच्या आक्रमणामुळे हिंदुची म्हैसूर, चित्रदुर्ग आणि बिदनुर ही राज्ये वाचली तर तामिळनाडूमध्ये तंजावर हे सर्वनाशापासून बचावले गेले. मराठ्यांनी १७०४ च्या जून-जुलाईत हैद्राबाद शहरालाच वेढा घातला आणि तेथील सुभेदाराकडून जबर खंडणी वसूल केली. विजापूर-कर्नाटकाचा सुभेदार खुदाबंदाखान याच्यानेही मराठ्यांचा प्रतिकार करवला नाही. मराठ्यांना त्याने जबर रक्कम देऊन स्वतःची कातडी बचावली हे बादशहाला कळले. खुदाबंदाखान हा शाईस्ताखानाचा मुलगा, बादशहाचा मामेभाऊ अशा अकार्यक्षम अधिकाऱ्याला औरंगजेबाने आपल्या खेडच्या छावणीत बोलावून घेतले. आणि विजापूर कर्नाटकच्या सुभेदारीवर हैद्राबादचा नायब सुभेदार रूस्तुमदिलखान याची नेमणूक केली. हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान पन्नी याच्याकडे हैद्राबादचा सुभाही लावून देण्यात आला.

बादशाही छावणीत येणारी अगर इतरत्र मुगल सैन्याला मिळणारी धान्याची रसद तोडूनच मराठे थांबले नाहीत, त्यांनी यापेक्षाही मोठी आणि व्यापक योजना आखली. बादशहाच्या मोहिमेला लागणारा पैसा हा सतत उत्तरेकडून येत होता. तो खजिना नर्मदेवर अगर नर्मदेपार अडवून मोगलांचे दक्षिणेतील सैन्य कोंडीत पकडावे ही ती योजना होती. यासाठी नेमाजी शिंद्याच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचे प्रचंड सैन्य प्रथम वऱ्हाडात घुसले आणि तेथील सुभेदाराला कैद करुन या खानदेशात सरकले. या सैन्याने नर्मदा ओलांडली आणि आगऱ्याहून येणाऱ्या खजिन्याच्या वाटेवर माळव्यातील सिरोंजपर्यंत धुमाकूळ घातला.

बादशाहाची तारांबळ काय वर्णावी! मराठ्यांची ही योजना म्हणजे बादशहाच्या अस्तित्वावरच घाला. औरंगजेबाने प्रथम जी गोष्ट केली ती ही की, माळव्याचा अकार्यक्षम सुबेदार शास्ताखान (शिवकालीन शाइस्ताखानाचा मुलगा) याची बदली करुन त्यांच्या जागेवर आपला तडफदार नातू बेदारबख्त याची नेमणूक केली. खानदेश आणि औरंगाबाद भागात झुल्फिकारखान याला ठेवण्यात आले. फिरोजजंग याला वऱ्हाडातून निघून मराठ्यांवर चालून जाण्याची आज्ञा करण्यात आली. १७०४ मधील औरंगजेबाच्या अनेक पत्रांचा एकच सूर आहे. “उत्तरेकडून येणारा खजिना सुरक्षित आणा.” हाच तो सूर. मोगल सैन्यातील सैनिकांचे पगार वर्षवर्षभर तुंबून पडले होते. छावणी सोडून अनेक लोक पळून जात. सरदारांच्या जहागिरीचे उत्पन्न येईना. त्यामुळे काही सरदार सरदाऱ्या सोडून घरी बसू लागले. अशी ही विलक्षण परिस्थिती होती.

अनुक्रमणिका

आदल्या वर्षापासूनच म्हणजे १७०३ पासूनच मराठ्यांशी तडजोडीची बोलणी करावी म्हणून औरंगजेबाचा मुलगा कामबक्ष याच्या मध्यस्थीने अंतस्थ प्रयत्न चालू होते. यासाठी मोगलांनी दोन मराठ्यांना दक्षिणेतून आणले. एक तंजावरचे राजे व्यंकोजी यांचा मुलगा रायभानजी आणि दुसरा म्हणजे दाऊदखानाच्या मार्फतीने आलेला शंकराजी मल्हार. या दोघांचा भाव मोगलांच्या छावणीत बराच वाढविण्यात आला. रायभान हा सहा हजारी तर शंकराजी हा पांच हजारी मनसबदार झाला. पण इतकेहीकरुन त्यांच्या प्रयत्नांना यश आले नाही. दक्षिणचा सुभा हा शिऱ्याच्या गोळ्यासारखा आयता घशात पडत असता मराठ्यांनी तरी तडजोडीस कां तयार व्हावे? असा प्रश्न समकालीन इतिहासकार भीमसेन सक्सेना विचारतो. तरी पण खेडच्या छावणीत रायभानजी भोसले आणि शंकराजी मल्हार हे दोघेही असून मराठ्यांशी बोलणी करण्याचे प्रयत्न करीतच होते. शाहूला सोडून द्यावे, स्वराज्य मराठ्यांच्या ताब्यात द्यावे आणि मराठ्यांचा चौथाईचा अधिकार मान्य करावा, अशा मागण्या मराठ्यांच्या होत्या असे दिसते. पण शाहूला सोडून देणे आणि स्वराज्याच्या भौगोलिक मर्यादा व चौथाईचे स्वरुप आणि निश्चिती यावरुन बोलणी फिसकटली, असे दिसते. औरंगजेबाच्या पत्रावरून या गोष्टी लक्षात येतात. औरंगजेबाला आता वाटू लागले की, शाहूला पुढे आणणे हे सर्वच दृष्टीने आवश्यक आहे. "तुमचाच राजा आहे आणि आम्ही त्याला फक्त मदत करीत आहोत" असे मराठ्यांना सांगायचे. आपल्यानंतर शाहाजादा कामबक्ष याला दक्षिणेत स्थिर करुन त्याला शाहूचे सहकार्य मिळेल अशी व्यवस्था करावयाची ही योजना औरंगजेबाच्या मनात घोळू लागली. "शाहू हा तुमचाच राजा आहे आणि किल्ला त्यालाच मिळणार आहे" असे सांगून औरंगजेबाने राजमाचीचा किल्ला मिळविला होता. आपल्या मृत्युनंतरच्या राजकारणात शाहूचे आणि शाहूमुळे मराठ्यांचे सहकार्यही करावे असी औरंगजेबाने इच्छा व्यक्त केली होती, पण तो डाव फसला. संभाजी महाराज आणि राजाराम महाराज यांना नाटकशाळांकडून झालेल्या मुलीची लग्ने मोगल अधिकाऱ्यांशी लावून दिली होती. पण आता शाहू महाराजांचे कौतुक करण्यात औरंगजेबाने कोणतीही गोष्ट कमी पडू दिली नाही.

## राजे शाहू यांचे लग्न

बादशहाच्या छावणीतील दैनंदिन अखबार म्हणजे बातमीपत्रात चौदा आणि पंधरा जून १७०४ या तारखांच्या पुढील नोंदीवरून बादशहाने शाहू महाराजांच्या लग्नाचे किती कौतुक केले याची कल्पना येईल. त्या नोंदी अशा:

### १४ जून १७०४

राजा शाहू याचे लग्न बहादुरजी (जाधव) यांच्या मुलीशी ठरले. त्या निमित्त राजे शाहू यांस मदत म्हणून तेरा हजार रुपयांचे अलंकार देण्यात आले. बहादुरजी (जाधव) याने आपल्या मुलीच्या अंगावर दागिने घालावे म्हणून त्याला तेराशे रुपयाचे अलंकार देण्यात आले.

### १५ जून १७०४

काल (१४ जून) चौदा जून दिवस मावळता राजा शाहू हा स्वतःचे लग्न ठरल्यामुळे बादशहाच्या हुजुरात आला. त्याने बादशहाला मुजरा केला. बादशहाने त्याला मुंडावळीसाठी म्हणून हजार रुपये किंमतीचा माणकाचा शिरपेच, तेराशे रुपये किंमतीचा रत्नजडित कंबरपट्टा व खिलातीची वस्त्रे दिली.

बादशहा म्हणाले "दौलत खान्यापासून (बादशहाच्या वास्तव्य स्थानापासून) बहादुरजीच्या तंबूपर्यंत नौबती वाजविण्यात याव्यात. राजा शाहू याच्या स्वारीसाठी छत्र असलेला लाल अंबारीचा हत्ती देण्यात यावा. वरातीमध्ये पुढील मंडळीनी राजा शाहू याच्याबरोबर राहावे—– (१) छावणीचा कोतवाल सर्रबराह खान, (२) नगार खान्याचा अधिकारी मुहंमद अमीन, (३) फत्ते दौलत कौल, (४) फरासखान्याचा अधिकारी मुहंमद हादी, (५) खाजगीतील निरीक्षक खिदमतगारखान याचा नायब हाजी सुहेल, (६) वरातीबरोबर हमीदोद्दीनखानाची पथके राहावीत.

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली अशी पंधरा तारखेची नोंद आहे

सिंहगड, राजगड, तोरणा इत्यादि किल्ले मोगलांच्या हाती गेलेले होते. ते मोगलांना पचू द्यायचे नाहीत म्हणून मराठ्यांच्या फौजा त्या किल्ल्याच्या भोवती सतत गस्त घालीत संधीची वाट पाहात होत्या. बादशहाच्या अंतःपुराचा पूर्वीचा तळ सोलापूर जिल्ह्यात भीमेकाठी ब्रह्मपुरी येथे होता. १६ डिसेंबर १६९९ मध्ये धनाजी जाधव याने ब्रह्मपुरीच्या छावणीवर हल्ला करून मोगलांवर मोठा कठिण प्रसंग आणला होता. बादशहाची मुलगी झिन्नतउन्निसा बेगम आणि त्याची बायको उदेपुरी बेगम यांच्यासकट बादशहाचा सगळा कबीला मराठ्यांच्या हाती पडण्याची मोठी भीती निर्माण झाली होती. मोगलांनी मोठ्या शिकस्तीने आपला बचाव केला. पण या घटनेमुळे औरंगजेब हादरून गेला आणि त्याने आपली बायको, मुलगी आणि अंतःपुरातील इतरत्र स्त्रिया यांना पेडगाव (बहादुरगड) या भीमेच्या कांठच्या मुगल किल्ल्यात आणून ठेवले. त्या तळाचे रक्षण करण्यासाठी बादशहाने आपला मातब्बर सरदार मुहंमद अमीनखान (भावी निजामउल्मुल्काचा चुलत चुलता आणि मुगल साम्राज्याचा भावी मुख्यप्रधान) याची नेमणूक केली. औरंगाबादेहून बादशाही छावणीपर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्याचे काम मुगलखान (निजामउल्मुल्काचा साडु) याजकडे देण्यात आले.

खुद्द बादशहाच्या छावणीत एक तरबियतखान सोडला तर बाकीचे सरदार दुय्यम दर्जाचे होते. मुगलांच्या तर्फे लढणाऱ्या मराठ्या सरदारांची नावे आढळतात त्यांत सिंदखेडचे जाधव, फलटणचे निंबाळकर, मुधोळचे घोरपडे, जतचे डफळे, बुधपाचगावचे घाटगे, म्हसवडचे माने अशी नावे आहेत. कान्होजी आणि गणोजी शिर्के हे शेवटपर्यंत मोगलांना चिकटून होते. पण मोगलांना सोडून मराठ्यांना मिळणारे मराठे सरदारही काही कमी नव्हते. १७०४ च्या बातमीपत्रात अशा फरारी झालेल्या मराठे सरदारात रावप्रभु हे एक नाव आढळते. दुसरे आश्चर्य म्हणजे औरंगजेबाला जाऊन मिळालेला धर्मांतरित सूर्याजी पिसाळ उर्फ शेख फत्तेउल्ला हा याच वर्षी मोगलांची छावणी सोडून पळाला आणि जाऊन ताराबाईला मिळाला. कृष्णा आणि भीमेच्या संगमाचा प्रांत हा कर्नाटकातील बेडर या लढाऊ जातीचा प्रांत आहे. मराठ्यांनी आपल्या स्वातंत्र्य-संग्रामात या जमातीचे भरपूर सहकार्य मिळविले. त्या प्रांतात मराठे आणि बेडर यांचे प्रचंड सैन्य गोळा झाले. बेडरांचा किल्ला, वाकिणखेडा (गुलबर्गा जिल्हा) जिंकून घेण्यासाठी औरंगजेब खेड सोडून नोव्हेंबर महिन्यांत बाहेर पडला. पाबळ, कोरेगांव असे करीत तो बहादूरगडला आला. येथे झिन्नतउन्निसा बेगम आणि उदेपुरी बेगम ही त्याला भेटली. बहादुरगड येथेही औरंगजेबाला आपल्या कबिल्याची सुरक्षितता वाटेना. त्यानें आपल्या कबिल्याची अहमदनगरकडे रवानगी करण्याची व्यवस्था केली. पळसदेव, अकलूज असे करीत तो ३१ डिसेंबर १७०४ रोजी पंढरपूर येथे आला. प्रवासातच त्याला कळले की मराठ्यांनी सामानगड आणि लोहगड हे किल्ले जिंकून घेतले आहेत आणि सिंहगडला गंभीर धोका निर्माण झाला आहे.

अनुक्रमणिका

१७०४ च्या अखेरीस औरंगजेबापाशी छावणीत जी फौज शिल्लक राहिली ती अधिकाऱ्यांची पथके वगैरे जमेस धरून वीस हजाराहून अधिक नव्हती. वाकिणखेड्याला वेढा घालण्यासाठी विजापूरचा सुभेदार (भावी निजाम उल्मुल्क) हा पुढे गेला होता. तो महाराष्ट्रातून बाहेर पडला हे मराठ्यांनाही हवे होते, आणि त्यामुळे मराठ्यांना किल्ले घेणे सोयीचे होऊ लागले.

अशी ही हकीकत आहे औरंगजेबच्या खेडच्या मुक्कामाची.

१६ एप्रिल १९८६ **सेतूमाधवराव पगडी.**

वसुधा,
देवी दयाळ रोड,
मुलुंड पश्चिम, मुंबई–८०.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १ जानेवारी इ. स. १७०३ ते ६ मार्च १७०३

### एक जानेवारी १७०३

बादशहाचा मुक्काम कोंडाणा किल्ल्याच्या पायथ्याशी. आज कचेऱ्यातून कामकाज झाले नाही. काल रुहुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली:—

> "आपल्या आज्ञेप्रमाणे मी, हमीदुद्दीन खान बहादुर, मुहंमद अमीन खान बहादुर, अजीजखान व मतलबखान असे कोंडाणा किल्ल्याभोवती फिरून आलो. आम्ही पाहणी केली. किल्ल्याच्या भोवती आम्ही ठाणी बसविली व आसपासच्या खेड्यांना आगी लावल्या."

किल्ल्याच्या दरवाज्यासमोर अमानुल्लाखानाचे ठाणे कायम करण्यात आले आहे. पण अमानुल्लाखानाचे म्हणणे आहे की, "माझ्या हाताखालचे पथक लहान आहे. दुसऱ्या ठाण्यावर मला नेमले तर मी कबूल करीन." बादशहांनी आज्ञा केली की, त्या ठाण्यावर इतराची नेमणूक करावी.

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: "हमीदुद्दीन खान बहादुर याने रुहुल्लाखान यांजकडे जाऊन पुढील निरोप सांगावा शिवापूरच्या दिशेने जे ठाणे कायम करण्यात आले आहे तेथील ठाणेदारीवर मन्सूरखान याची नेमणूक करावी. हमीदुद्दीनखानाने रात्री येऊन मला भेटावे."

### दोन जानेवारी १७०३

सकाळी न्यायकचेरी बंद होती. दुपारी बादशहानी न्यायकचेरी (अदालत) भरविली.

काल बख्शीउल्मुल्क रुहुल्लाखान हमीदुद्दीनखान बहादुर व मतलबखान हे कोंडाण्याभोवती ठाणी बसविण्यासाठी गेले होते. मुहंमद अमीनखान बहादुर याने कोंडाणा किल्ल्याच्या पलीकडे ठाणे कायम केले. ते परत येऊन त्यांनी बादशहाला हकीकत कळविली.

नगारखान्याचा दरोगा मुहंमद अमीन याने विनंती केली की, "कर्णे वाजविण्यासंबंधी काय आज्ञा." बादशहा म्हणाले "तूर्त बंद करा." बादशहानी काल रात्री एक प्रहर उलटला असता बख्शी उल्मुल्क, रुहुल्लाखान आणि मीर आतिश (दारूखान्याचा प्रमुख) तरबियतखान यांना एक हत्ती बक्षीस दिला आणि त्यांना कोंडाण्यावर मोर्चे कायम करण्यासाठी निरोप दिला. बख्शीउल्मुल्क, रुहुल्लाखान आणि हमीदुद्दीन खान बहादुर यांना बादशहांनी आज्ञा केली की, "उद्या सकाळी तुम्ही जा आणि परस्पर एकमताने मोर्चे कायम करा."

काबुलचा सुभेदार बादशहाजादा मुअज्ज्म (शहाआलम) याने मध्य आशियातून चाकरीसाठी आलेल्या मोगलांना वाटखर्चाला म्हणून रक्कम देऊन हुजुरात पाठविले. तो खर्च बादशहाजाद्याच्या खात्यातून व्हावा अशी बादशहानी आज्ञा केली.

हसन कुलीजखान व ख्वाजाखान यांना मराठ्यांनी कैद करून नेले होते. त्यांच्या जहागिरी बहाल ठेवण्यात याव्या अशी बादशहानी आज्ञा केली.

बादशहाना कळविण्यात आले की, मीर आतिश तरबियतखान हा कोंडाण्यासमोर मोर्चे कायम करण्यासाठी गेला होता. त्याने किल्ल्यापासून पाच सांखळ्यापर्यंत (जरीब) मोर्चे नेऊन कायम केले आहेत. बख्शीउल्मुल्क, रुहुल्लाखान आणि हमीदुद्दीनखान बहादुर हे या कामात होते.

काल रात्री बादशहानी बख्शीउल्मुल्क, रुहुल्लाखान यांस आज्ञा केली की, "रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग आला आहे. तो, मुनीमखान इत्यादींना तरबियतखानाच्या बरोबर द्या. त्याच्याबरोबर देण्यासाठी एकंदरीत दोन हजार तीनशेसाठ स्वारांची यादी (तूमार) तयार करा."

याच तारखेची वरील माहिती दुसऱ्या ठिकाणी पुढील पद्धतीने दिली आहे.:—

> "काल रात्री बाहशहांनी रुहुल्लाखान हमीदुद्दीनखान बहादुर व खानाजादखान यांना एकांतात खलबतीसाठी बोलावले, बादशहा त्यांना म्हणाले "उद्या तुम्ही सैन्य घेऊन जा आणि कोंडाण्याच्या किल्ल्याभोवती मोर्चे कायम करा. मन्सूरखानाला शिवापूरच्या ठाण्यावर बसवा."

यानंतर बादशहानी मीरमोर्चेल (मोर्च्याचा प्रमुख) तरबियतखान याला एक हत्ती बक्षीस दिला व फातेहाखैर (योगक्षेमाची प्रार्थना) पढून तरबियतखानाला कोंडाण्याच्या मोर्च्याकडे जाण्यासाठी निरोप दिला. तरबियतखानाबरोबर मुनीमखान, कामयाबखान (तरबियतखानाचा भाऊ) वगैरे अधिकारी आणि दोन हजार तीनशे अठ्ठावीस स्वार देण्यात आले.

रुहुल्लाखान याने विनंती केली की "तरबियतखान हा नगाऱ्याच्या मानमरातबाची आशा बाळगून आहे." बादशहा म्हणाले "इन्शाल्ला (परमेश्वर इच्छील तर), किल्ला हाती आल्यानंतर" तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक याला दीडशे जात व तीस स्वार अशी मन्सब होती. तीत पन्नासची भर घालण्यात आली.

फतेह दौलत कौल हा मोर्च्यातून आला. त्याने पुढीलप्रमाणे माहिती दिली. "मोर्चे कोंडाणा किल्ल्यापासून चार साखळ्यापर्यंत पोहोचले आहेत. पण उपद्रव्याविरुद्ध (मराठे) हातघाईची लढाई चालू आहे." बादशहा त्याला म्हणाले "तुम्ही जाऊन सांगा की मोर्चे किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत गेले पाहिजेत."

हरकाऱ्यांनी पुढील बातमी आणली: "परशुराम (पंतप्रतिनिधि) याचा गुमास्ता (एजंट) शंकरा नारायण (शंकराजी नारायण, सचिव) याने धनाजी जाधवाच्या पथकातील (बिरादरान, भाऊबंद) बंधूजी (?) याची कोंडाण्याचा किल्लेदार म्हणून नेमणूक केली. तो स्वतः (शंकराजी) दोनशे स्वारांसहित किल्ला सोडून गेला.

अनुक्रमणिका

बादशहांनी आज्ञा केली की “आज रात्री रुहुल्लाखान याने मोर्च्यात राहावे.”

हमीदुद्दीनखान बहादुर याने मतलबखानाचा मुलगा असदुल्लाखान याला पत्र लिहिले. त्यात पुढील मजकूर होता: “मोर्चे किल्ल्यापासून चार सांखळ्याच्या अंतरावर पोहोचले आहेत”

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील माहिती मिळाली:—

> “धनाजी जाधव व बहिर्जी हे सैन्य घेऊन कृष्णेच्या प्रदेशात गेले आहेत. त्यांना बातमी लागली की, खान जुस्रतजंग (जुल्फिकारखान) हा फतेहुल्लाखानाच्या कुमकेला येत आहे. त्यामुळे ते (धनाजी जाधव व बहिर्जी घोरपडे) हे मिरजेच्या इलासपूर (?) गावाच्या दिशेने निघून गेले.

**तीन जानेवारी १७०३**

आज दीवाण (कचेरी) चे काम बंद होते.

खानसामानचा नायब फाजलखान याने बादशहाकडे एक चिठ्ठी पाठविली. त्यांत पुढील मजकूर होता: आइऱ्यांची जनावरे बाळगणारे भाडेकरी म्हणतात “आमचे उंट वगैरे जनावरे यांना (चरण्यासाठी) लांब पाठवावे अशी आमची इच्छा आहे.” बादशहा म्हणाले “किल्ला लवकर हाती आला तर येथे वाहने राहायची नाहीत. त्यामुळे वाहनांना (जनावरांना) जवळच बाळगून त्यांच्यावर लक्ष ठेवा.”

**चार जानेवारी १७०३**

आज बादशहानी न्यायदानाचे काम केले.

आज्ञमगड उर्फ पुरंदर येथील किल्लेदार हा आज्ञेप्रमाणे किल्ल्यात आपला एक नायब ठेवून भेटीसाठी आला. किल्लेदार खानचंद याने पांच मोहोरा निसार (ओवाळणी) म्हणून बादशहासमोर ठेवल्या. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन आपल्या कामाकडे (पुरंदर) जाण्यासाठी त्याला निरोप देण्यात आला.

छावणीचा कोतवाल सरबराहखान याला आज्ञा झाली की “छावणीच्या भोवती चौक्या बसवा.”

सरफराजखान हा चदावल (पिछाडी) ला होता. किल्ल्याच्या भोवती जी ठाणी बसविण्यात आली त्यापैकी एका ठाण्यावर सरफराजखान याला ठेवावे असे बख्शीउल्मुल्क, रुहुल्लाखान व हमीदुद्दीनखान बहादुर यांनी ठरविले. त्याप्रमाणे बादशहाने सरफराजखानाला नेमलेल्या ठाण्यावर पोहोचण्यासाठी मतलबखानाला पाठविले. मतलबखान हा सरफराजखानाला किल्ल्यासमोरील ठाण्यावर पोहोचवून आला.

पेडगाव उर्फ बहादुरगडच्या बातम्यावरून पुढील हकीकत कळली:—

अनुक्रमणिका

“उपद्रवी (मराठे) चे सैन्य येथे आले आणि या भागातील लोकात धुमाकुळ माजवून गेले. येथील किल्लेदार व फौजदार फखरूद्दीनखान याने त्यांच्या पारिपत्यासाठी स्वतःची पथके पाठविली नाहीत.”

बादशहानी फखरुद्दीनला पेडगावच्या किल्लेदारीवरून बदलला. इंदापूर व चांभारगोंद्याचा ठाणेदार, बहादुरगड ते औरंगाबाद या मार्गाचा रक्षक आणि मीरतुजक (शिष्टाचार, प्रोटोकोल, प्रमुख मुगलखान) याला पेडगावची किल्लेदारी देण्यात आली. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन त्याला निरोप देण्यात आला.

इतर ठिकाणी थोडा अधिक तपशील आला आहे. तो पुढीलप्रमाणे.—— “बादशहानी आज्ञापत्र रवाना केले की, खान नुस्रतजंग, जुल्फिकारखान याने हुजुरात यावे.”

रुहल्लाखान व हमीदुद्दीन खान बहादुर हे आज्ञेप्रमाणे कोंडाण्याच्या मोर्च्यावरून आले. त्यांनी मोर्चे आणि ठाणी बसविणे यासंबंधी बादशहाना माहिती दिली.

पुण्याचा किल्लेदार व फौजदार खानचंद दानकी (वानकी असे हि वाचन होऊ शकेल) हा रुहुल्लाखानाबरोबर कोंडाण्याच्या मोर्च्यावर गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

इंदूर व बेमगल (निजामाबाद जिल्हा, आंधप्रदेश, समर्थ सांप्रदायातील इंदूरबोधनचा मठ येथीलच) चा अमीन व फौजदार शेख गुलाम महंमद कंबू याच्या मृत्यूने रिकाम्या झालेल्या जागेवर अमानतखानाचा नातेवाईक मुहंमद मोमिन याची नेमणूक करण्यात आली.

मीर आतिश तरबियतखान याचा पेशदस्त (निजी कारकून) म्हणून रामजी याची नेमणूक भवानीदासच्या जागेवर करण्यात आली. बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:——

दागे तसीह खात्याचा अमीन ख्वाजाबाबा याने अब्दुरहीमखानाच्या तर्फे या परिसरातील ठाण्यांना भेट द्यावी व तेथे प्रत्यक्षात (मौजूदात) काय साधनसामग्री आहे याची तपासणी करावी. पाटसचा ठाणेदार राजा खानचंद याचा भाऊ अमरसिंग याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. अटलसिंगाची मुले उद्धवसिंग आणि माधवसिंग यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या.

मुहंमद अमीन खान बहादुर हा आज्ञेप्रमाणे मोर्च्यावरून आला होता. त्याने सांगितले की, “एक (मराठा) शत्रुसैनिक हेरगिरी करण्यासाठी माझ्या छावणीत आला होता. मी त्याला कैद करून आणला आहे.” बादशहानी आज्ञा केली की, “त्याला कोतवालाच्या हवाली करण्यात यावे.”

चांभारगोंद्याचा बदललेला ठाणेदार इबादुल्लाखान यास खान फीरोजजंग याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**पाच जानेवारी १७०३**

अनुक्रमणिका

आज कचेऱ्यांचे कामकाज बंद होते.

बादशहानी आज्ञा केली की, आझमगड (पुरंदर) चा किल्लेदार याने अमानुल्लापाशी तैनात असलेले आपले शंभर स्वार घेऊन, मन्सूरखानाच्या बरोबरीने किल्ल्याच्या भोवती कामगिरी बजवावी.

मुहंमदबेगखानाचा मुलगा अमानुल्लाबेग हा यलगंदल (करीमनगर, हैद्राबादच्या उत्तरेस शंभर मैल) येथे किल्लेदार होता. त्याला तेथून बदलवून हुजुरात बोलावून घेण्यात आले.

शहाजादा अजीमुश्शान हा बंगालचा सुभेदार होता. ओरिसाचा सुभेदार अस्करखान याच्या मृत्यूमुळे ती सुभेदारीपण अजीमुश्शानला देण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली व त्याच्या खिलातीची वस्त्रे व फर्मान ही पाठविण्यात आली.

**सहा जानेवारी १७०३**

परंड्याहून बदललेला किल्लेदार व फौजदार इज्जतखान हा खान फीरोजजंग याजपाशी तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

कर्नाटकी प्याद्याचा प्रमुख गौतम याला पाचशे जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. त्याला मन्सूरखानाच्याबरोबर कोंडाण्याभोवती कामगिरीवर नेमण्यात आले.

खालील पथकांना कोंडाण्याच्या भोवती मुहंमद अमीन खान बहादुर याच्या हाताखाली नेमण्यात आले.—— (१) अहसनाबाद गुलबर्गा येथील किल्लेदार व फौजदार इरादतखान (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.) याला एक हजार जात व सातशे स्वार अशी मनसब होती, (२) मिहदीखान एक हजार जात व पाचशे स्वार त्यांत दोनशे दुघोडी होते.

काबुलचा माजी सुभेदार मरहूम अमीरखान याचा नातू मुहंमद हुसेन हा दिल्लीहून येऊन बादशहाला भेटला.

अमानुल्लाखान याची स्थापना कोंडाण्याच्या दरवाज्यासमोर करण्यात आली. त्याच्याबरोबर एक हजार स्वार देण्यात यावेत अशी आज्ञा देण्यात आली.

बाबाजीचा मुलगा सिलहाजी ही बाबुळगांव (तामुळगांव वाचन होऊ शकते.) येथे ठाणेदार होता. त्याला दोनशे जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. तीत शंभर जात व तीस स्वार अशी भर घालण्यात आली.

बादशहानी आज्ञा केली की, खानचंदचे पन्नास स्वार यांनी तरबियतखानाबरोबर मोर्च्यात कामगिरी बजवावी.

अनुक्रमणिका

खान फीरोजजंग याच्या तोफखान्याचा दारोगा रुस्तमबेगखान याने विनंती लिहून पाठविली की, “माझ्यापाशी स्वारीचे घोडे नाहीत, आज्ञा झाली की, दोन घोडे देण्यात यावेत. दुसरी विनंती अशी की तोफखान्यातील माजी व वर्तमान माणसांपैकी शंभर जणांना माझ्यापाशी तैनात करण्यात यावे.” आज्ञा झाली की “पूर्वीप्रमाणे चालावे. आज्ञा झाली की, हमीदुद्दीनखान बहादुर यांच्या सैनिकांनी तरबियतखानाबरोबर मोर्च्यात काम करावे.”

परंड्याचा बदललेला किल्लेदार व फौजदार इज्ञतखान याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

खानेआलमचा भाऊ (शेखनिजामचा मुलगा) अब्दुलकादर याची मनसब वाढविण्यात आली.

महदाजी दारोगा याची मनसब वाढविण्यात आली. त्याची मुले हुसेन व अब्दुलनबी यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या.

मुहंमद अमीरखान बहादुर यांजबरोबर पन्नास अधिकारी (सरदार) तैनात करण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

**सात जानेवारी १७०३**

बख्शीउल्मुल्क, रुहुल्लाखान याचा भाऊ नेमतुल्ला हा बंगालमध्ये होता. त्याने आपल्या भावासाठी दोन हत्ती पाठविले. हत्ती लहान होते. रुहुल्लाखानाने बादशहाला विनंती केली की, माझे दोन लहान हत्ती घ्यावे व एक मोठा हत्ती मला द्यावा. बादशहानी विनंती मान्य केली, त्याला सात हजार रुपये किंमतीचा हत्ती देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

विजापूर कर्नाटकाचा फौजदार खुदाबंदाखान याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले.

राव दलबत बुंदेला हा जुल्फिकारखानापाशी तैनात होता. आपले पुतणे भारतीचंद व पृथ्वीचंद (नरसिंगदेवची मुले) यांना लग्नासाठी स्वदेशी जाऊ देण्याची त्याने परवानगी मागितली होती. त्यांनी आपली पथके इकडे सोडून स्वदेशी जावे अशी आज्ञा देण्यात आली.

भवानीदास हरकारा याची नव्याने नेमणूक करण्यात आली.

गुजरातचा दिवंगत सुभेदार शुजाअतखान याच्या मालमत्तेपैकी नऊ हत्ती बादशहाच्यासमोर हमीदुद्दीनखान बहादूर यांनी आणले.

घोरीखान व मुमताजखान हे मुगलखानाबरोबर रवाना झाले. त्यांनी बादशहाचा निरोप घेतला.

तरबियतखानाचा भाऊ कामयाबखान याला कोमारी (?) परगण्यात एक खेडे सरंजाम जहागीर होते. परगण्याची फौजदारी त्याला देण्यात यावी अशी विनंती करण्यात आली. विनंती मान्य झाली.

अनुक्रमणिका

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

“फतेहुल्लाखान बहादुरला लिहा की, त्याने हुजुरात यावे आणि कऱ्हाडचा ठाणेदार यासीनखान याला लिहा की, त्याने सकरलना (विशाळगड) च्या तोफा हुजुरात आणाव्या.

मोगलखानाने पुढीलप्रमाणे विनंती केली:

“काल मला आज्ञा झाली होती की, चिकोडीच्या जमिनदाराला मी औरंगाबादेस पोहोचवावे. तेथून वाटेवरचे फौजदार त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात नेऊन पोहोचवतील. पण मी आपल्या इलाख्याच्या बंदोबस्तासाठी जात आहे. काय आज्ञा.” बादशहा म्हणाले की, “हुकुम मागे घेण्यात आला.”

बाहशहानी मुहंमद अमीनखान बहादुर याला चार हजार रुपयांचा एक हत्ती बक्षीस दिला. सैफुल्लाखान यालाहि एक हत्ती देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

मतलबखानाने पुढीलप्रमाणे विनंती केली: “उद्धव श्रीपत हा जुल्फिकारखानाच्या सैन्यात तैनात आहे. त्याला पाचशे जातची मनसब मिळाली आहे. मनसबदारांच्या यादीमध्ये त्याचे नाव नोंदण्यासंबंधी काय आज्ञा.” बादशहानी आज्ञा केली की, “तो आपल्या तैनातीच्या जागेवर जाणार असेल तर त्याला बहाल समजण्यात यावे.”

बादशहानी आज्ञा केली की, मन्सूरखानाचे दोनशे प्यादे अमानुल्लाखानाबरोबर तैनात करण्यात यावेत.

**आठ जानेवारी १७०३**

आज बादशहानी दोन्ही दिवाण (कचेऱ्या) बंद ठेवल्या.

**नऊ जानेवारी १७०३**

आजही कचेऱ्या बंद ठेवण्यात आल्या. रमजानचा महिना बादशहाच्या कारभाराला सत्तेचाळिसावे वर्ष लागले. बादशहाजादा कामबख्श याने येऊन नम्रपणे अभिवादन केले.

**नऊ जानेवारी १७०३**

आज बादशहानी दिवाण कचेऱ्या बंद ठेवल्या.

मुहंमद आरिफ कौल याला मोर्च्यावरची बातमी काढण्यासाठी बादशहानी पाठविले होते. त्याने येऊन सांगितले की, “मोर्चे बुरुजापर्यंत पोहोचले असून दगड फोडणारे (बेलदार, संगतराश.) हे

अनुक्रमणिका

किल्ल्याचा बुरुज खणीत आहेत. बुरुजाजवळ शत्रूच्या झोपड्या होत्या, त्या आपल्या सैन्याने जाळून नष्ट केल्या आहेत.

**दहा जानेवारी १७०३**

आजही बादशहानी दिवाण कचेऱ्या बंद ठेवल्या. दिवसाचा एक प्रहर व पाच घटका झाल्या असतां बादशहाना कळविण्यात आले की, अमीरूलउमरा (मुख्य प्रधान असदखान) हे मुजऱ्यासाठी आले आहेत. बादशहानी आज्ञा केली की, मी दिवाण आज बंद ठेवला आहे. अमीरूल-उमरांनी आपल्या तंबुकडे जावे. बादशहानी कृपायुक्त होऊन त्याला एक संत्र दिले.

आका हुसेनचा मुलगा अब्दुल्ला हा पेडगाव उर्फ बहादुरगड येथे तोफखान्याचा दारोगा होता. त्याला तेथील बख्शीगिरी आणि वाकेनवीशी पण देण्यात आली. यापूर्वी किल्लेदारखानाचा पुतण्या आणि अहमदचा मुलगा मुहंमद हुसेन त्या जागेवर होता. त्याला तेथून बदलण्यात आले.

**अकरा जानेवारी १७०३**

आज रमजान महिना सुरू. तसेच बाहशहाच्या कारकिर्दीचे सत्तेचाळिसावे वर्ष सुरू. अमीर उमरावांनी येऊन बादशहाला नम्रपणे अभिवादन (तसलीम) केले.

सटवाजी डफळे याला सहा हजार जात आणि सहा हजार स्वार अशी मनसब होती. त्याला इंदापूरचा ठाणेदार व बहादुरगडचा किल्लेदार आणि फौजदार मुगलखान याजपाशी तैनात करण्यात आले होते. त्याने पुढीलप्रमाणे विनंती केली: “माझ्या पथकाशी मुगलखानाची वागणूक बरोबर नाही. मला उम्दतुल्मुक गाजिउद्दीन खान बहादुर फीरोजजंग यांच्या फौजेत तैनात करण्यात यावे.” बादशहानीं विनंती मान्य केली.

इरादतखान (यांचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे) याला एक हजार जात व सातशे स्वार अशी मनसब होती. तो मुहंमद अमीनखान बहादुर याजपाशी तैनात होता. त्याला तेथून काढून बादशहानी आपली छावणी आणि पुणे यामधील भागावर ठाणेदार म्हणून नेमले.

**बारा जानेवारी १७०३**

आज बादशहानी सकाळच्या ऐवजी दुपारी दिवाण (आपली सरकारी कामाची जागा) भरविला.

दुपारीच बादशहानी हमीदुद्दीन खान बहादुर याला आज्ञा केली की, “तुम्ही मोर्च्यावर जा. बुरुज खणण्याचे काम आणि मोर्च्याची परिस्थिती पाहून परत या.”

बादशहाना कळविण्यात आले की, “मजनून नावाची तोफ तरबियतखानाच्या मोर्च्याच्या टेकडी (किंवा लहान डोंगर) वर (कोहे मोर्चास) पोहोचली असून तिच्याद्वारे कोंडाणा किल्ल्याच्या बुरुजावर मारा चालू आहे.”

अनुक्रमणिका

बाहशहानी आज्ञा केली की, “तोफांसाठी लागणारी सरंजाम सामग्री शमशेर बेगने घालून दिलेल्या नियमाप्रमाणें फकीरमुहंमद अईजखानी करावल यांनी तयारीत ठेवावी.”

**तेरा जानेवारी १७०३**

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: “तळावरून (ब्रह्मपुरीच्या) तोफा येत आहेत. अब्दुल्लाबेग चौरागाशी याला तोफा घेऊन येण्यासाठी पाठवावे. तोफा ओढण्यासाठी लागणाऱ्या बैलाच्या खर्चा-खुराकासाठी त्याला शंभर अश्रफ्या देण्यात याव्या.”

**चौदा जानेवारी १७०३**

दाभाडी (औरंगाबाद जिल्हा) येथील ठाणेदार मोतिकदखान याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले की, “शहाजादा मुहमद बेदारबख्त बहादुर (औरंगाबादेचा सुभेदार आणि औरंगजेबाचा नातू) हे वाघाच्या शिकारीसाठी इकडच्या भागात आले होते. त्यांनी मला एक घोडा बक्षीस दिला.” बादशहांनी आज्ञा केली की, “घोडा बक्षीस म्हणून दिला आहे तो ठाणदारांनी घ्यावा.”

पालीगडचा किल्लेदार सेनापत याने कळविले की, “मी शत्रूंच्या एका सरदाराला जिवंत पकडला आहे. त्याला मी हुजुरात पाठवीत आहे. माझा मुलगा रतनसिंग हा माझा नायब म्हणून पालीगडला आहे. त्याने कामगिरी केली. त्याला मनसब मिळावी. ” त्याला अडीचशे जात व पन्नास स्वार अशी मनसब देण्यात आली.

वऱ्हाडच्या बातम्यावरून कळले की, अलीमर्दातखानापाशी मुहमद जाफर हा मनसबदार तैनात होता. त्याला शंभर जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. तो मरण पावला.

हैदराबाद-कर्नाटकच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले: पराणगड (?) वर पुरुषोत्तमदास हा किल्लेदार होता. शिबंदीच्या शिपायांनी पगार बाकीसाठी त्याला ठार मारले. बादशहानी रूहुल्लाखानाला आज्ञा केली की, “दुसऱ्या कुणाला किल्लेदार नेमा.”

**पंधरा जानेवारी १७०३**

बादशहानी आज्ञा केली की, कर्नाटकी (पायदळाची) ठाणी कायम करा आणि एकंदरीत ठाण्यांचे कसे काय आहे, तपासणी करून रूहुल्लाखानांनी यावे.”

**सोळा जानेवारी १७०३**

बऱ्हाणपूर (खानदेश) चा सुभेदार व बागलाण वगैरेचा फौजदार याला दोन हजार जात व दीड हजार स्वार अशी मनसब होती. तीत वाढ करण्यात आली.

अनुक्रमणिका

फळफळावळ खात्याचा दारोगा मुहरमखान याने काल बादशहाना कळविले की, “बादशहाजादा मुहमद आज्ञमशहा (गुजरातचा सुभेदार) याने डाळिंबाच्या दहा करंड्या पाठविल्या आहेत.

मीर यूसफ (मीर इब्राहीमचा मुलगा) हा मन्सूरखानापाशी तैनात होता. त्याची नेमणूक अहसनाबाद उर्फ गुलबर्गा किल्ल्याच्या तोफखान्याचा दारोगा म्हणून करण्यात आली. कान्होजी शिर्के या पाच हजारी मनसबदाराची मनसब वाढविण्यात आली. आज्ञमगड उर्फ पुरंदर किल्ल्याच्या तोफखान्याचा दारोगा मुहमद मीर हा येऊन बादशहाना भेटला.

शिवापूरची ठाणेदारी अमानुल्लाखान याला देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**सतरा जानवारी १७०३**

बख्शीउल्मुक रूहुल्लाखान व मतलबखान हे सर्फराजखानाचे ठाणे पाहण्यास गेले होते. त्यांनी ठाणे पाहिले. कर्नाटकी पायदळ (प्यादे) पथकाचा अधिकारी गौतम याला सरफराजखान व मुहमद अमीनखान बहादुर यांच्या ठाण्याजवळ टेकडीवर त्यांनी नेमले. नंतर ते येऊन बादशहाना भेटले.

इस्लामगड उर्फ रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग हा किल्ल्यावर आपला नायब ठेवून, बादशहाकडे येऊन त्यांना भेटला. त्याला एक हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. हजार स्वार दुघोडी होते. मनसबीत पाचशे (जात) अशी वाढ करण्यात आली.

शिवनेरीचा बदललेला किल्लेदार नस्रुल्लाखान हा येऊन बादशहाना भेटला.

फतेहुल्लाखान बहादुर आलमगीर शाही हा सखरलना उर्फ खेळणा (विशाळगड) येथून तोफा आणण्यासाठी व गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी गेला होता. शाबान महिन्याच्या चोवीस तारखेस तो सखरलना (विशाळगड) किल्ल्यावर पोहोचला असे बादशहाना कळविण्यात आले.

ख्वाजा मुहंमद अशरफ हा हुक्केरीचा फौजदार होता. त्याची फौजदारी काढून घेण्यात आली पण हुक्केरीची किल्लेदारी व त्या महालाची अर्मानी त्याच्याकडे देण्यात आली.

**वीस जानेवारी १७०३**

वऱ्हाड व नांदेड या प्रांतातील देशमुख अब्दुल्ला याचे चोरांशी (मराठ्यांशी) संगनमत आहे असे कळले. त्याला पकडून आणण्यासाठी मिर्जाबेग गुर्जबर्दार याला नेमण्यात आले. त्याच्या बरोबर वऱ्हाड व नांदेड या दोन्ही सुभ्यांचा सुभेदार (गाजिउद्दीन खान फीरोज जंग) याच्या नावे आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

अंतूर (? औरंगाबाद जिल्हा) चा किल्लेदार गुलामअली याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

मेमार (बांधकाम करणारा आर्किटेक्ट) शुक्रुल्ला याने बादशहाच्या आज्ञेने मोगल सैन्य खणीत असलेल्या कोंडाण्याच्या बुरुजाचा नकाशा तयार केला होता. तो त्याने बादशहाना दाखविला.

गोविंदराव हरकारा याने मुजऱ्यासाठी अदालत (न्याय) कचेरीत येत जावे अशी बादशहाने आज्ञा केली.

बादशहानी आज्ञा केली की, "तरबियतखानाच्या मोर्च्यावर चाळीस मण सरब व बंदुकीची दारू आणि पाचशे लोखंडी गोळे (तोफांचे) पाठविण्यात यावे."

**एकेवीस जानेवारी १७०३**

बहादुरगड ते औरंगाबाद या मार्गाने रक्षण करण्याचे काम मुगलखान याजकडे देण्यात आले होते. त्याच्या सैन्यात सटवाजी डफळे हा तैनात होता. त्याच्याऐवजी बहिर्जी (पांढरे?) ला तैनात करण्यात आले.

**बावीस जानेवारी १७०३**

फतेहुल्लाखान बहादुर आलमगीर शाही याच्या सैन्यातील बातम्यावरून पुढील हकीकत कळली:

"फतेहुल्लाखान हा खेळण्याला पोहोचला. त्याने खेळण्याचा (विशाळगड) किल्लेदार जाबताखान याला बोलाविले आणि बादशहानी आज्ञा केल्याप्रमाणे त्याला विचारले "तुम्ही किल्लेदारीचा राजीनामा का देता?" जाबताखान म्हणाला, "मला ही किल्लेदारी नको आहे."

यानंतर फतेहुल्लाखानाने राजा अवधूत सिंग (उदितसिंग) याला देण्यासाठी बादशहाचे फर्मान व खिलातीची वस्त्रे आणली होती. ती त्याला दिली आणि किल्लेदारीची कामगिरी त्याला दिली.

आता फतेहुल्लाखान, बादशहानी मागे तेथे (विशाळगडावर) तोफा ठेवल्या होत्या, त्या बरोबर घेऊन येण्याचा बेत करीत आहे.

**तेवीस जानेवारी १७०३**

आज बादशहानी दिवाण (न्यायदान वगैरे) चे काम बंद ठेवले.

**चोवीस जानेवारी १७०३**

मुगलखान याजकडे पेडगाव (बहादुरगड) ची किल्लेदारी, इंदापूर, चांभारगोंदा ही ठाणी होती. त्याच्याकडे बहादुरगडपासून औरंगाबादपर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्याचेही काम होते. बादशहानी बहादुरगडावर मुगलखानाचा मुलगा अब्दुल्है याला नायब म्हणून नेमले. दुसरा मुलगा बहरामंद याला

अनुक्रमणिका

इंदापूरच्या ठाण्यावर नेमण्यात आले. अबुल्कासिम फालजी (?) याला मुगलखानाचा नायब म्हणून चांभारगोंद्यावर नेमण्यात आले.

## पंचेवीस जानेवारी १७०३

मिहदी आबाद (तुळजापूर अगर जवळचे ठाणे?) चा बदललेला ठाणेदार अब्दुल्रसूलखान (हा व याचा मुलगा हे पुढे निजामाच्या काळात शिवनेरीचे किल्लेदार होते) हा येऊन बादशहाला भेटला. त्याचा मुलगा मकबूल आलम हाही बादशहाना भेटला.

बख्शी उल्मुल्क रहुल्लाखान हा काही (घासदाणा) आणण्याच्या मोहिमेवर गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

मरहूम सरबराहखानाचा मुलगा जमाल हा तरबदारांचा (परशुधारी) दारोगा (अधिकारी) होता तो मोर्च्यात तैनात होता. त्याला दोनशे (जात) ची मनसब होती. तरबियतखानाच्या विनंतीवरून त्याची मनसब पन्नासने वाढविण्यात आली.

तळावरून (ब्रह्मपुरीच्या) दोन तोफा आल्या होत्या. त्या मोर्च्यावर पाठविण्यात याव्या अशी बादशहानी आज्ञा केली. विजापूर येथील हरकऱ्यांच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले: "शत्रूचे सैन्य विजापूरच्या आसपास पसरले आणि त्यांनी धामधूम सुरू केली. पण चीनकुलीजखान बहादूर येत आहे असे कळल्यावर शत्रूचे सैन्य पांगले आणि तेथून निघून गेले."

औरंगाबादच्या हरकाऱ्याच्या लिहिण्यावरून पुढील हकीकत कळली: "फुलंब्रीच्या पलीकडे (औरंगाबादेजवळ) चोरांची (मराठ्यांची) पथके ठिकठिकाणी पसरली होती. ते धामधूम करीत होते. शहाजादा बेदारबख्त याचे सरदार हाजी शहाब व तोफखान्याचा दारोगा आका मुहंमद नामी हे सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून गेले. त्यांनी शत्रूपैकी अनेकांना ठार मारले व अनेकांना जखमी केले. यानंतर ते शहाजाद्याकडे परत आले.

## सव्वीस जानेवारी १७०३

हैदराबाद सुभ्यावर रूस्तमदिलखान हा (कामबख्श तर्फे) नायब म्हणून काम करीत होता. त्याला तेथून बदलण्यात येऊन कोहीरचा फौजदार मुजफ्फरखान याला त्याच्या जागेवर नेमण्यात आले.

सरफराजखान याची आर्थिक स्थिति चांगली नाही असे कळले. त्याला एक हजार अश्रफ्या द्याव्या अशी आज्ञा झाली होती. याशिवाय त्याला मदत म्हणून पाच हजार रुपये देण्यात आले.

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: "बादशाही छावणी (सिंहगडासमोर) चे रक्षण करण्यासाठी छावणी भोवती सावधानतेचा उपाय म्हणून भिंत (अहाता, कंपौंड) बांधावी. सातारच्या वेढ्याच्या वेळी छावणीभोवती बांधली होती तशी. हे काम सरबराहखान कोतवाल याने करावे. श्रेष्ठ सरदारांनीं सक्का (पाणी पुरविणारे) व इतर माणसेही या कामासाठी पुरवावी.

अनुक्रमणिका

राव उदितसिंग याला खेळण्याचा (विशाळगड) किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला अडीच हजार जात व दोन हजार स्वार (पैकी पाचशे स्वार दुघोडी) अशी मनसब होती. शिवाय त्याला एक कोटि आठ लक्ष दान इनाम म्हणून देण्यात येत. त्याच्या मनसबीत पाचशे (जात) अशी वाढ करण्यात आली. पूर्वीचा किल्लेदार जाबताखान याला हुजुरात बोलवण्यात आले.

**(रमजान वीस,) सत्तावीस जानेवारी १७०३**

बादशहानी मुहरमखान यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली:

> "सर्व अमीर उमराव व शहाजाद्यांचे वकील यांजकडून प्रत्येकी एक हजार पोती (एक हजार पोत्यांची किंमत दिडशे रुपये) गोळा करा आणि मीरआतिश तरबियतखान याजकडे मोर्च्यावर पाठवून द्या."

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: "शिवापूरची ठाणेदारी खानचंद याजकडे राहील, पण किल्ला हाती येईपर्यंत अमानुल्लाची पथके तेथे राहतील. किल्ला हाती आल्यावर ठाणे खानचंदाकडे राहील.

**अठ्ठावीस जानेवारी १७०३**

मीर आजमुल्ला याला सजावली (अंमलबजावणीचा अधिकारी) म्हणून हमिदखान (फीरोजजंगाचा भाऊ) याजकडे पाठविले होते. त्याच्याबरोबर फीरोजजंगाच्या नावे सादर केलेले फर्मान देण्यात आले होते. ते काम आटोपून व फीरोजजंगाचे विनंतीपत्र घेऊन तो परत बादशहाकडे आला.

माळव्यातील बातम्यावरून पुढील हकीकत कळली: "तेथे मुहंमद हकीम हा जिजिया कराच्या वसुलीचा अमीन (अधिकारी) होता.

ब्रम्हदेव शिसोदियाचा मुलगा देवीसिंग याच्या जमिनदारीतील प्रदेशात जिजिया वसूल करण्यासाठी त्याने जलाल मुहंमद नावाच्या स्वाराला पाठविले. तेथे कुणीतरी माणसांनी जलाल मुहंमदच्या दाढी-मिशा भादरून त्याला परत पाठविले. बादशहानी देवीसिंगाची मनसब कमी केली.

बादशहाना कळविण्यात आले की, "रामगडचा बदललेला फौजदार व दलपतचा मुलगा गजपत याने गुलाम मुहंमद कंबू याला कुणाकडून तरी ठार मारविले आणि त्याची मालमत्ता बळकाविली. सध्या गजपत हा हैदराबाद येथे आहे."

बादशहानी आज्ञा केली की, हैदराबादच्या नायब सुभेदाराने गजपत याला पकडून हुजुरात पाठवावे.

**एकोणतीस जानेवारी १७०३**

अनुक्रमणिका

ख्वाजाखान (तुर्कताजखानाचा भाऊ) हा मराठ्यांच्या कैदेत होता. ख्वाजाखान याचा मुलगा खानख्वाजा याच्याकडे बादशहानी फळफळावळांचे एक ताट पाठविले.

करडे नमुने येथील ठाणेदाराकडून मजूर व सुतार इत्यादि मागवून घ्यावे आणि त्यांना कोंडाण्याच्या मोर्च्याच्या कामासाठी पाठवावे अशी आज्ञा झाली. या कामावर असदबेग वगैरे गुर्जबर्दार हे नेमण्यात आले. असदबेग हा करडे निमोण्याच्या ठाण्याकडे आणि सय्यदकासिम हा माहुलच्या ठाणेदाराकडे बादशहाच्या आज्ञेकरून गेला. दाऊदखानाच्या लिहिण्यावरून मुल्क जगदेवचा ठाणेदार अब्दुलनबी याची मनसब कमी करण्यात आली.

माहुलच्या ठाण्यावर सय्यद मुजम्मिल हा ठाणेदार होता. त्याला अबुल्बरकतखान याच्या जागेवर दामरली (?) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले. मुहंमद अली, अल्लाहयारबेग वगैरे गुर्जबर्दार फरारी झाले असे बाहशहाना कळविण्यात आले.

**तीस जानेवारी १७०३**

मतलबखान याने विनंती केली की, बादशहाजादे आणि अमीर उमराव यांच्याकडून कोंडाण्याच्यां मोर्च्यासाठी प्रत्येकी दीडशे रुपये अगर हजार पोती वसूल करावी अशी आज्ञा झाली होती. पण अमीर उमरावांच्या गुमास्त्याकडून पोत्याचा, अगर रकमेचा पुरवठा होणे शक्य दिसत नाही. बादशहानी आज्ञा केली की, हा पुरवठा हुजुरात हजर असलेले बादशहाजादे व अमीर उमराव यांच्या गुमास्त्यांकडूनच करवून घ्यावा. इतरांना त्रास देण्यात येऊ नये. दाऊदखानाने लिहिले की, वेलोरच्या वेढ्यात कान्होजी (शिर्के) वगैरेंनी कामगिरी बजावली नाही, त्यांना बदलण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

**एकतीस जानेवारी १७०३**

बख्शी उल्मुल्क रहुल्लाकान याची मुलगी मरण पावली.

अहदियानचा बख्शी नेकनामखान हा आजारी होता. तो बरा झाला आणि बादशहाना येऊन भेटला.

अष्टीचा ठाणेदार व नाहरखान मरहूम (दिवंगत) चा मुलगा संगरामखान हा येऊन बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

असीरगडचा किल्लेदार व फौजदार शहामतखान याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले: "मराठ्यांचे सुमारे वीस हजार स्वार आणि सहा हजार पायदळ असे सैन्य आले असून त्याने खरगोणचा भोवतालचा भाग लुटून फस्त केला आहे. हे सैन्य आता असीरगडच्या पायथ्याशी येऊन पोहोचले आहे. किल्लेदार हा तटावरून तोफांचा मारा करीत आहे."

बाहशहानी ते नजरेखालून घातले. हमीदुद्दीनखान बहादुरचा सासरा व मंगळवेढ्याहून बदललेला अमीन मुहंमद सईद हा बादशहाना भेटला.

अनुक्रमणिका

बऱ्हाणपूर (खानदेश) चा सुभेदार व बागलाणचा फौजदार नजाबतखान याजकडे होशंगाबादची फौजदारी पण सोपविण्यात आली.

**एक फेब्रुवारी १७०३**

बहादुरगड ते औरंगाबाद या मार्गाचा रक्षक (राहदार) याणे पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली: "अब्दुलजब्बारचा मुलगा सय्यदअली हा माझ्यापाशी तैनात आहे. त्याच्याकडे माणिकदोंद्यांची ठाणेदारी देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

शेख अजमतुल्ला अहमदनगरी यांची अब्दुल अली (ठाणेदार तनमावलर?) व मुहंमद अली ठाणेदार माणिक दोंदा यांच्याकडून ठाणी काढून घेण्यात आली. त्यांची मनसब कमी करण्यात आली आणि त्यांना अहमदनगर येथे तैनात करण्यात आले.

**कोंडाणा**

बादशहाना कळविण्यात आले की, गौतम हजारी हा पायदळाचा (प्यादा) ठाणेदार असून कोंडाणा भोवतालच्या चौकीवर ठाणेदार होता. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मनसब होती. किल्ल्याभोवतीच्या चकमकीत तो मारला गेला. हे एकून बादशहानी त्याच्या मुलाला चारशे जात व शंभर स्वार अशी मनसब दिली.

**दोन फेब्रुवारी १७०३**

आज बादशहानी दोन्ही दिवाण (खास व आम) चे काम बंद ठेवले.

काल रात्री हेरांनी पुढील बातमी आणली.— "जुल्फिकारखान बहादुर नुस्रतजंग हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) पाठलागावर होता. आज्ञेप्रमाणे तो छावणीकडे आला. कोंडाणा किल्याभोवती जेथे मन्सूरखानाचे ठाणे आहे तेथून दीड कोसावर तो येऊन उतरला आहे." बादशहानी त्याच्यासाठी खास खिलातीची वस्त्रे वेगळी काढून ठेवली.

उम्दतुल्मुल्क खान फीरोजजंग याच्या फौजेत सरअंदाजखान हा तैनात होता. विजापूरच्या सुभ्यावर तो फीरोजजंगातर्फे नायब सुभेदार म्हणून काम करीत होता. त्याला तेथून बदलण्यात येऊन फीरोजजंगाचा वऱ्हाड सुभ्याचा नायब सुभेदार म्हणून त्याची नेमणूक करण्यात आली. त्याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. तीत पांचशे (जात) ची वाढ करण्यात आली.

मिहदी आबादचा बदलेला ठाणेदार अब्दूलरसूलखान हा येऊन बादशहाना भेटला. त्याच्याकडे अहमदनगर सरकार (जिल्ह्यातील) मधील निंब बहरा (?) व माणिक दोंदा ही ठाणी देण्यात आली.

मुहमद अमीन गुर्जबर्दार हा फीरोजजंगाच्या नावे बादशहाचे फर्मान घेऊन गेला होता. त्याचे उत्तर घेऊन तो बादशहाकडे परत आला.

यापूर्वी बादशहाच्या शय्यागृहाभोवती वीस हिंदू बंदूकची तैनात असत. बादशहानी आज्ञा केली की, यापुढे हिंदू बंदूक यांच्या ऐवजी मुसलमानाना शय्यागृहाभोवतालच्या चौकी पहाऱ्यावर नेमण्यात यावे.

मोर्च्यावर काम करणारे कहार व हमाल, यांचा दरोगा कलालखान उर्फ दूला हा चांगली मेहनत घेत आहे असे कळले. त्यांची मनसब वाढविण्यात आली. संगरामखान याला त्याच्या मरहूम बापाची जहागीर (तनखा) देण्यात आली.

**तीन फेब्रुवारी १७०३**

काजी अकरमखान याच्या मुलीचे मुलगे महमंद इसहाक वगैरे व भाचा यांना मनसबी देण्यात आल्या.

**तळकोकण**

तळकोकणचा दिवाण महमंद मुहसिन याने पुढीलप्रमाणे वृत्तांत लिहून पाठविला:

मराठा सरदार खंडेराम (?) यांने तळकोकणचा फौजदार हसन कुलीखान याला पकडून कैद केले. त्याने मर्दनगड (कोंड्याजवळ) किल्ल्याला वेढा घातला आहे. सैफखान (बेळगावचा किल्लेदार व फौजदार) आणि किल्ल्यातील शिबंदीचे सहकार्य घेऊनही किल्ला तीन महिन्याच्यावर टिकाव धरील असे वाटत नाही. कोणी फौजदार नेमण्यात यावा अगर कुमक पाठविण्यात यावी. किल्ल्यात अन्नधान्याची सामग्री नाही, लवकर पाठवावी."

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: "रूहुल्लाखान (बख्शी) याने फत्तेहुल्लाखान बहादुर (हा विशाळगडकडे होता). याला लिहावे की, फत्तेहुल्लाखानाने आज़मनगर बेळगावला जावे. तेथील किल्लेदार व फौजदार सैफखान याला तळकोकणची फौजदारी पण देण्यात येत आहे. त्याला त्याने तळकोकणात पाठवावे.

**चार फेब्रुवारी १७०३**

एक प्रहर व चार घटिका दिवस आला असताना बादशहा अदालत कचेरीत आले. दिवाण (कचेरी) मध्ये विनंती करण्यात आली की, जुल्फिकारखान हे आपल्या सहकाऱ्यांसह, मन्सूरखान यांच्या ठाण्याजवळून (कडून) भेटण्यासाठी आले आहेत. त्यांनी सेवेत हजर व्हावे अशी आज्ञा झाली. नुस्रतजंग जुल्फिकारखान यांनी एक हजार अश्रफ्या व दोन हजार रुपये निसार (ओवाळून) दाखल केले. त्यांना खास खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहा रूहुल्लाखान बख्शी यांना म्हणाले तुम्ही जुल्फिकारखानाला वस्त्रे द्या, त्यांच्याकडून दरबारी शिष्टाचाराप्रमाणे मुजरा (तसलीमात) करवून घ्या व मीर बख्शीगिरीचा हुद्दा सुपूर्द करा. कचेरी संपल्यावर जुल्फिकारखान यांनी जुम्लतुल्मुल्क अमीरूलउमरा (पंतप्रधान असदखान व जुल्फिकारखानाचा बाप) याला भेटण्यास जावे अशी बादशहानी आज्ञा केली.

महमंद हुसेनचा मुलगा सय्यद नासिर याची बंगालच्या वयूतात (सार्वजनिक सरकारी मालमत्ता) चा मुख्याधिकारी म्हणून कोहीर (सध्या आंध्र प्रदेश) चा फौजदार सय्यद मुजफ्फरखान यांच्या हैद्राबादचा सुभेदार म्हणून नेमणुका करण्यात आल्या.

जुल्फिकारखानाच्या सहकाऱ्यांपैकी पुढील मंडळी बादशहासमोर हजर झाली. त्यांनी नजरा दिल्याः—

(१) इस्माईल खान मका, (२) कान्होजी शिर्के, (३) राव दलपत बुंदेला, (४) रामसिंग हाडा, (५) मरहूम मरहमत खान याचा मुलगा मुहमंद बाकर, (६) अनुपसिंगांचा मुलगा सुजानसिंग, (७) राव दलपतची मुले भारतीचंद वगैरे, (७) रणदुल्लाखान, (८) हिफजुल्लाखान, (९) इस्फिदारचा मुलगा अल्लाहयार.

तरबियतखान (तोफखान्याचा प्रमुख) याने पुढीलप्रमाणे विनंती केली: ——

"माझ्या जहागिरीचा कारभारी (आमिल) यांने हुंडी (मध्ये बदलून घेण्यासाठी) बारा हजार रुपये बऱ्हाणपुरास पाठविले होते. अल्लाहयारबेग हा तेथे (बऱ्हाणपूर) कोतवाल आहे. गनिमांच्या (मराठ्यांच्या) सैनिकांनी पैसे लुबाडले आणि ते फरार झाले, ही गोष्ट बऱ्हाणपूरच्या वारदात (घटनावृत्त) मध्ये नोंदली गेली आहे. मरहूम फाजिलखान याचा मुलगा अब्दुरहीमखान, याला या गोष्टीची माहिती आहे. इनायतुल्लाखान याला आज्ञा व्हावी की, त्याने अल्लाहयारबेगाकडून मला माझी रक्कम देववावी."

अदालत (न्यायकचेरी) चा दारोगा आजारी असल्याचे कळले. त्याच्या जागी अदालतचा मुशरफ मुहंमद मजहर याने दाबेदारांचे अर्ज घेत जावे अशी आज्ञा झाली. तरबियतखानाच्या विनंतीवरून शेख यार मुंहमद याचा मुलगा मुंहमद आबिद याला नव्याने दीडशेची मनसब देण्यात आली. दंडा राजपुरीचा किल्लेदार व फौजदार याने सिरका (औषधी) व गुलाब (काही गुलाबाचे काही औषधी पदार्थ) याचे दोन बंगी (पार्सले) पाठविले ते बादशहानी पाहिले. ते हकीम हाजिफरखान यांजकडे पाठवावे अशी आज्ञा झाली. गुलाबाचा (अत्तर किंवा अन्य पदार्थ) काही भाग तरबियतखानाकडे पाठविण्यात यावा, अशी आज्ञा झाली.

दिवाण (कचेरी) संपल्यावर बादशहाना कळविण्यात आले, ते असे. ——

ख्वाजाखान हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेतून सुटून काल रोजी मुहंमद अमीनखान बहादुर यांच्या तंबूवर आला मुहंमद अमीन खान यांने त्याला आपल्याबरोबर येथे आणले आहे. बादशहानी आज्ञा केली की, त्यांना कचेरीच्या मशिदीत आणा. त्याप्रमाणे हमीदुद्दीन खान बहादुर याने त्यांना बादशहासमोर आणले. बादशहांनी ख्वाजाखान यास खिलातीची वस्त्रे, एक खंजीर आणि फळांचे ताट ही दिली.

बादशहांनी आज्ञा केली की, बहिरामदखानाच्या वहिवाटीप्रमाणे जुल्फिकारखान याने गुलालबारांत पालखीतून येत जावे.

अनुक्रमणिका

मतलबखानाचा मुलगा असदुला याला चारशेची मनसब होती. ती वाढविण्यात आली.

शिकाकोल (आंध्र प्रदेश) चा फौजदार रूस्तदिलखान याची नेमणूक फकीरूल्लाखानाच्या ऐवजी मुस्ताफानगर (कोंडापल्ली आंध्र) च्या फौजदारीवर करण्यात आली. त्यांची मनसब वाढविण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की, बेलदारांनी दौलतखान्यापासून (बादशहांचे निवासस्थान) मोर्च्यापर्यंत (सिंहगडच्या) चा रस्ता नीट करावा.

**पाच फेब्रुवारी १७०३**

आज दिवाण (कचेरी) बंद होते. काल बादशहानी जुल्फिकारखान नुस्रतजग याला एक चश्मा बक्षीस दिला.

नेमणुका व मनसबी—मरहूम अब्दुलरज्ञाकखान याचा मुलगा मुबारक मुहियुद्दीन याची बनारसचा अमीन म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

मुलतानचा दिवाण मुंहमद काजमखान याची मुले मीर इस्माईल, मुहमंद याकूब वगैरेना मनसबी फत्तेह दौलत कौल याने जुल्फिकारकानाकडे बादशांही भोजन नेले होते. त्याबद्दल त्याने दौलतकौल याला तीन वस्त्रे व एक हजार रुपये बक्षीस म्हणून दिले. बादशाहानी ते माफ केले (म्हणजे सरकारात न देता ते ठेवून घेण्याची परवानगी दौलत कौल याला दिली.)

औरंगाबाद खुजस्ताबुनियाद येथील बक्षी व वाकियानिगार एतिमादखान याच्या नावे रूहुल्लाखान याच्या मोहरेनिशी (शिक्क्याने) बादशहाचे आज्ञापत्र डाकचौकीने रवाना झाले.

**सहा फेब्रुवारी १७०३**

आज दिवाण (बादशहाची कचेरी) बंद.

बादशहाजादा आज्ञम याचा विनंती अर्ज सुलतान नजर वकील याच्याद्वारे आला.

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:

"कोंडाणा (सिहगड) किल्ल्याजवळ दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा मन्सुरखान याचे ठाणे आहे. तेथे जुल्फिकारखानाने जाऊन आपले मोर्चे कायम करावे. पलीकडे अमानुल्लाखान वगैरेचे ठाणे आहे. तेथे जुल्फिकारखानाचे सहकारी इस्माईलखान वगैरे राहतील. मन्सूरखान याने आपले ठाणे सोडून सरफराजखानाच्या ठाण्यावर जावे आणि ते ठाणे हुशारीने सांभाळावे. सरफराजखानाने आपल्या ठाण्याहून यावे आणि बादशाही लष्करच्या चंदावल (पिछाडी) मध्ये राहावे. आणि सावधगिरीने काम करावे

अनुक्रमणिका

### सात फेब्रुवारी १७०३

### शव्वाल सत्तेचाळीस रमजान नंतरचा शव्वाल

आज ईद. बादशहानी दिवाण (न्यायदानाचे कामकाज) बंद ठेवले. ईदच्या अभिनंदनाची पत्रे पुढील मंडळीकडून आली.:——

(१) बादशहाजादा आझम, (२) शहाजादाबेदारबख्त, (३) शहाजादा वालाजाह, (४) जहांजेबबानू बेगम, शहाजादा कामबख्श आपल्या मुलासहित बादशहाकडे आला. असदखान, जुल्फिकारखान, वगैरे ईद निमिद्द हजेरी लावून गेले. जीनतुन्निसाबेगम, उदेपूरी बेगम इत्यादींची पत्रे आली. विजापूरच्या हरकाऱ्याच्या पत्रावरून कळले की, विजापूर-कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान याने एक हजार स्वार व एक हजार पायदळ नव्याने भरती केले आणि तो तेरा (१३) रमजानला विजापूराहून आपल्या इलाख्याकडे (दक्षिण कर्नाटक) रवाना झाला.

### आठ फेब्रुवारी १७०३

आज दिवाण (बादशहाच्या आज्ञेने) बंद होते. खेळणा (विशाळगड) चे नाव सकरलना ठेवले होते ते आता सखरलना करावे अशी आज्ञा झाली. जुल्फिकारखान याने मागे एक हजार अश्रफ्या व दोन हजार रुपये निसार व नजर म्हणून दिले होते. त्यापैकी बादशहानी फक्त शंभर अश्रफ्या ठेवून घेतल्या बाकीचे माफ केले.

उम्दतुलमुल्क खान फीरोजजंग याचा दिवाण मुहंमद जाफर याला त्या जागेवरून काढण्यात आले होते. त्याला बादशाहाच्या हुजुरात बोलावण्यात आले. पण तो आला नाही. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

मोर्च्यासाठी लागणाऱ्या कापड-चोपडासाठी सर्फराजखान याला त्रास देण्यात येऊ नये, अशी आज्ञा झाली. हाजी चोराघाशीचा मुलगा मुहंमद यूसफ यास नव्याने मनसब देण्यात आली. मुजफ्फर हुसेनचा मुलगा मुहंमद अमीन हा शहाजहानाबाद (दिल्ली) येथील दिवाणापाशी तैनात होता. त्याला अलाहाबादचा दिवाण मुहंमद अहसन याजपाशी तैनात करण्यात आले.

बुणग्याहून (ब्रह्मपुरी) हरकाऱ्याने लिहून कळविले की, खान फिरोजजंग याने सरअंदाजखान याला तीन वस्त्रे व एक घोडा ही दिली आहेत. वऱ्हाडच्या नायब सुभेदारीवर त्याची (सरंदाजखान) तैनात करण्यात आली आहे (बादशहाच्या आज्ञेप्रमाणे खजिन्याचा दारोगा हिफजुल्ला याला अब्दासबेगच्या जागी माळव्याचे कागदपत्र नेण्या-आणण्याच्या कामावर नेमण्यात आले.

### नऊ फेब्रुवारी १७०३

अनुक्रमणिका

आज बादशहानी दिवाणाचे (कचेरीचे) काम बंद ठेवले. सकाळी बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली.——हमीदुद्दीनखान बहादुर यानी तरबियतखानाच्या मोर्च्यावर जावे व शिवारपूरपर्यंत जाऊन अंतर (साखळीने) मोजून यावे.

हैद्राबादचा माजी फौजदार व कोतवाल व आता वरंगलवर असलेला फौजदार असदुल्लाखान शहाबाजखानी याची मनसब कमी करण्यात आली.

पुढीलप्रमाणे नेमणुका करण्यात आल्या:——

परंड्याचा फौजदार व किल्लेदार इज्ञतखान याला औशाच्या (लातूर जिल्हा, मराठवाडा) फौजदारीवर, हैद्राबादच्या परिसराच्या फौजदारीवर मुहंमद इवी, मरहूम हमजाखान याचा मुलगा असदुल्ला हा औशाचा किल्लेदार व फौजदार होता. त्याला कंधारच्या किल्लेदारीवर (नांदेड जिल्हा, मराठवाडा) नेमण्यात आले. मुफ्तखरखानाचा मुलगा जहूरुल्ला याला दारोगा म्हणून नेमण्यात आले. मरहूम किलेदारखान याचा नातू मुहंमद हुसेन याला त्र्यंबकच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. अब्दुल्नबी याला हैद्राबादची कोतवाली देण्यात आली.

बादशहाचे कुटुंब औरंगाबादेस पाठविण्याची आज्ञा.—— बादशहानी खिदमतगारखानाच्या नावे फर्मान पाठविले, मजकूर असा——

बादशहाची कन्या जीनतुन्निसा बेगम व पत्नी उदेपुरी बेगम यांना आज्ञा झाली की, त्यांनी इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) हून खुजिस्ताबुनियाद औरंगाबादेस जावे. खिदमतगारखान नाझर याने सर्व लवाजमा व सरंजाम घेऊन त्यांच्या बरोबर जावे.

बादशहानी आज्ञा केली की, उम्दउल्मुल्क फीरोजजंग यांना पुढीलप्रमाणे लिहिण्यात यावे:——

तुम्ही जीनतुन्निसा बेगम आणि उदेपुरी महल यांच्याबरोबर शहागड (जालना जिल्हा, मराठवाडा) पर्यंत यावे. तेथून पुढे शहाजादा बेदारबख्त हा त्यांना घेऊन जाईल. जीनतुन्निसा बेगम आणि उदेपुरी महल यांना लागणाऱ्या सर्व सामानाची व्यवस्था करण्याची आज्ञा इस्लामपुरी (ब्रह्मपुरीचा तळ) येथील खानसाम्याचा (पुरवठा अधिकारी) अधिकारी फजलुल्ला याच्या नावे देण्यात आली.

खुजिस्ताबुनियाद (औरंगाबाद) येथील बयूतात (सरकारी मालमत्तेचा अधिकारी) मीरसय्यद मुहंमद याला आज्ञा करण्यात आली की, औरंगाबाद येथे जीनतुन्निसा बेगम वगैरेसाठी वाडा, महाल आणि इतर सरंजाम यांची (मागील आज्ञेप्रमाणे) व्यवस्था करावी.

**दहा फेब्रुवारी १७०३**

आज दिवाण (कचेरी) झाले नाही. पुढील मंडळीच्या नावे आज्ञापत्रे (हस्बुल्हुकुम) रवाना झाली.

इस्लामपुरी उर्फ ब्रह्मपुरीचा किल्लेदार मुरीदखान याचे नावे "जीनतुन्निसा बेगम, उदेपुरी महल याच्याबरोबर जे जे औरंगाबादेस जाऊ इच्छीत असतील त्यांना किल्ल्यातून (ब्रह्मपुरीच्या) बाहेर जाऊ द्यावे. त्यांना हरकत करू नये."

ब्रह्मपुरीचा नायब कोतवाल जैनुद्दीन याने किरकट (?) च्या ठाणेदारीवर जावे अशी आज्ञा झाली. बादशहाजादा कामबक्ष याची लहान मुलगी आज बादशहाकडे आली. बादशहानी तिला बाजूबंद वगैरे पाच अलंकार (किंमत सात हजार रुपये) दिले.

शहाजहानाबाद दिल्लीच्या बातम्यावरून तेथील व सहारणपूरचा फौजदार शाकिरखान याने रस्त्यावर वाटमारी करणाऱ्यांचे पारिपत्य केले असे कळले.

कंधार (जिल्हा नांदेड) चा बदललेला किल्लेदार व फौजदार व अबदालबेग याचा मुलगा मुहंमद हुसेन याची मनसब कमी करण्यात आली. तसेच हरनेक (त्र्यंबक?) चा बदललेला किल्लेदार मुहंमद सलीम याच्या बाबतीत करण्यात आले.

हमीदुद्दीन खानबहादुर हा आज्ञेप्रमाणे अंतर मोजण्याची साखळी घेऊन तरबियतखानाचे मोर्चे आणि शिवापूर येथे गेला होता. तो परत आला आणि त्याने आपला वृत्तांत सादर केला. बादशहा म्हणाले, आम्ही स्वार होऊन मोर्चे पाहाण्यास जाऊ इच्छितो. रस्ता कसा काय आहे? चौकशी करून बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:——

> बक्षीउल्मुल्क नुस्रतजंग जुल्फिकारखान यांनी आठवड्यातून दोनदा यावे आणि बक्षीगिरीची प्रकरणे सांगावी. इतर दिवशी काम असेल ते हुजुरात लिहून पाठवीत जावे.

**सत्तेचाळिसावे वर्ष**

**शव्वाल पाच, अकरा फेब्रुवारी**

दिवसाचा एक प्रहर चार घटका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरीत) मध्ये आले.

बऱ्हाणपूरच्या बातमीपत्रावरून पुढीलप्रमाणे कळले. —— दुष्टांचे (मराठ्यांचे) मोठे सैन्य याने नर्मदा ओलांडली असून ते धामधूम करण्याच्या उद्देशाने माळव्यात पसरले आहे.

बादशहानी जुल्फिकारखान नुस्रतजंग यास एक रत्नजडित अलंकार (एक हजार रुपये किंमतीचा) बक्षीस दिला. व त्याला काही आज्ञा देऊन त्याला त्याच्याबरोबर असलेल्या पथकासहित शत्रूच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी (नर्मदेकडे) जाण्यास निरोप दिला.

बादशहाजादा कामबक्ष याचा मुलगा सुल्तानमुही याला सात हजारी मनसब व नगारे, नौबतीचा मानही देण्यात आला.

जुम्लतुल्मुल्क अमीरुलउमरा (पंत प्रधान असदखान) बक्षी उल्मुल्क जुल्फिकारखान, नुस्रतजंग, बख्शी उल्मुल्क रुहुल्लाखान, अमीन खानबहादुर (निजाममुलउल्काचा चुलत चुलता आणि १७२१ मधे पंत प्रधान) इत्यादींनीं ईदुल्फित्र सणाबद्दल बादशहाना अभिवादन केले.

मीर सद्रुद्दीन मुहंमदखान हा आजारी होता. तो बादशहाना भेटला. गुर्जबर्दारांचा मुश्रफ मीर अब्दुलरहमान हाहि भेटला. राव दलपत बुंदेला याच्या मनसबीत वाढ करण्यात येऊन त्याला जुल्फिकारखानाबरोबर पाठविण्यात आले. (सुप्रसिद्ध इतिहासकार भीमसेन सक्सेना हा दलपत बुंदेल्याचा चिटणीस).

उजबेकखान हा धारुर फत्तेहाबाद (बीड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार व फौजदार होता. धारुरला त्याने आपला नायब ठेवून स्वतः लष्करात यावे अशी त्याला आज्ञा झाली होती. तो येऊन बादशहाना भेटला. त्याने पाच अश्रफ्या निसार म्हणून दिल्या. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

मुलतानचा सुभेदार शहाजादा मुहंमद मुईजुद्दीन याने पेशकश पाठविली ती बादशहाच्या नजरेखालून गेली. मुहंमद मुअज्जम हा मध्य आशियातून नुकताच आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. खासगीच्या खात्याचा दारोगा शेख सैफुल्ला याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. नवीन मनसब मिळविणाऱ्यात पुढील मंडळी होती:——

खानचंद याचा नातू, किशौरसिंगाची शिवसिंग वगैरे मुलें, आनंदसिंग.

## बारा फेब्रुवारी १७०३

आज बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवले. त्यानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:——

कोंडाणा (सिंहगड) किल्ल्याच्या पलीकडे जुल्फिकारखानाचे मोर्चे होते. तिकडे बक्षी उल्मुल्क रूहुल्लाखान याने जाऊन नवीन व्यवस्था सुचवावी. रूहुल्लाखानाने त्याप्रमाणे केले. बादशहानी ठाण्याची व्यवस्था पुढीलप्रमाणे केली:——

जुल्फिारखानाच्या मोर्च्याच्या जागेवर मन्सूरखान, सर्फराजखानाच्या जागेवर ख्वाजाखान, अमानुल्लाखानाच्या ठाण्यावर उजबेगखान.

दौलताबादेचा फौजदार मुबारकखान यांस घोड्यांना डाग देण्याच्या बाबतीत सूट देण्यात आली.

## तेरा फेब्रुवारी १७०३

जुल्फिकारखान यास चार हत्ती व सोळा घोडे देण्यात यावे (सहाय्य म्हणून) अशी आज्ञा झाली.

मुहंमद याकुब यास नव्याने मनसब देण्यात आली.

अनुक्रमणिका

बादशहाजादा कामबक्ष याचा मुलगा सुलतान मुहीउल्ला याला यापुढे पत्र लिहिताना कोणत्या शब्दांनी गौरवावे हे ठरविण्यात आले. मुहंमद अमीन याला खिलाती वस्त्र व तीन हजार रुपये बक्षीस ही कामबक्षाच्या मुलाकडून देण्यात आली. मुहीउल्ला हा स्वतः बादशहाच्या हुजुरात आला आणि त्याने मुजरा (तसलीमात) केला.

सादातखानाचा नातू आणि अहमदअलीखानाचा मुलगा मुहंमद रजा याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. ख्वाजा निजामुद्दीन याजकडे त्याच्या भावाच्या जागी घोड्यांना डाग देण्याचे दप्तर देण्यात आले. छत्रसिंग शिवदार याला जुल्फिकारखानाच्या सैन्यात पाठविण्यात आले. त्याला दक्षिण प्रांतात जहागीर देण्यात यावी अशी बादशहानी आज्ञा केली.

**चौदा फेब्रुवारी १७०३**

शिवनेरीचा किल्लेदार नस्त्रुल्ला हा होता. त्याचा नायब कुतुबुद्दीन हा तेथे काम पहात होता. त्याला बदलण्यात आले आणि त्याची मनसब कमी करण्यात आली.

कल्याण-भिवंडीचा अधिकारी मातबरखान याच्यापाशी कृष्णाजीचा मुलगा रामाजी हा तैनात होता. त्याला दीड हजार (जात) व एक हजार स्वार अशी मनसब होती. आणि आज्ञा करूनही तो नियमाप्रमाणे पथके बाळगीत नाही अशी तक्रार आली. रुहुल्लाखान याने ताकीद पाठवावी अशी बादशहानी आज्ञा केली.

**पंधरा फेब्रुवारी १७०३**

बादशहानी आज्ञा केली की, जुल्फिकारखानाच्या फौजेच्या पगार वाटपासाठी (थकलेला पगार) त्याच्याकडे एक लाख एकोणीस हजार रुपये पाठविण्यात यावे.

बादशहाने आज दिवाण (कचेरी) केले नाही. सय्यदनुरुल्ला याला नूरखान ही पदवी होती. त्याला जफराबादचा किल्लेदार जलालुद्दीनखान याजबरोबर तैनात करण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहानी आज्ञा केली की, औरंगाबादच्या तोफखान्याच्या सरंजामातून जुल्फिकारखानाला पुढीलप्रमाणे पुरवठा करण्यात यावा:——

नाळ——पचाशे, शुतरनाळ——वीस, दारू——चाळीस मण, शिसे——साठ मण.

**सोळा फेब्रुवारी १७०३**

आज दिवाण बंद होते. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: ——

आजमनगर (बेळगाव) चा किल्लेदार व फौजदार सैफखान याचा नायब मुहंमद मुजीमजबरचा मुलगा मुहंमद सिद्दीक हा होता. त्याला त्या जागेवरुन बदलण्यात आले आणि

त्याला दरबारात हजर राहाण्याविषयी सांगण्यात आले. तो काही हजर झाला नाही. त्याची जहागीर काढून घेण्यात यावी अशी आज्ञा झाली. त्याला अडीचशे (जात) ची मनसब आहे.

शहजादा बेदारबख्त याच्या शिफारशीवरुन शहाअलीचा नातू सय्यद शाहअली याला नव्याने मनसब देण्यात आली.

आजमगड उर्फ पूना (पुरंदर) चा किल्लेदार व फौजदार खानचंद हा हुजुरात आला होता. त्याला आज्ञा झाली ती अशी——खानचंदने आपले निम्मे पथक आपला मुलगा दलसिंग याच्याबरोबर बादशाही छावणीत ठेवून स्वतः परत आपल्या जागेवर (पुरंदर) जावे.

मरहूम सय्यद नजाबतचा मुलगा सय्यद मुहंमदअली याच्या जमातीचे (बिरादरी) हिदायतुल्ला, सय्यद खुदाबख्श यांना मनसबी देण्यात आल्या. मरहूम अमीरखान याचा मुलगा मुहंमद इसहाक याची मनसब काढून घेण्यात आली होती. थोडी कमी करुन ती पुन्हा बहाल करण्यात आली.

बादशहानी आज्ञा केली की, श्रेष्ठ अमीरांच्या बाजारात निषिद्ध व नव्याने (बिद्दत) गोष्टी केल्या जात आहेत. पंच हजारीपैकी कोणीही झेंडा उभा करू नये. याबाबतीत छावणीचा कोतवाल सरबराहखान याने ताकीद करावी अशी आज्ञा झाली.

बादशहानी मरहूम ख्वाजा मुईजुद्दीन याचा भाऊ रफीउद्दीन आणि ख्वाजा मतलब यांच्या मनसबी वाढविल्या.

आपण उद्या किल्ला (सिंहगड) व मोर्चे पाहाण्यास जाऊ असे बादशहानी सांगितले.

मुगलखान याजकडे पुढील कामे देण्यात आली होती. ——चांभारगोंदा व आनंदापूर (इंदापूर) ची फौजदारी, बहादूरगडची किल्लेदारी व फौजदारी, बहादूरगड ते औरंगाबादच्या मार्गांचे रक्षण त्याने लिहून पाठविले की, बहादूरगड किल्ल्याच्या बाहेरच्या भागाचा बंदोबस्त माझ्या पथकातील (बिरादरी) मनसबदार सय्यदअली हा राखीत आहे. त्याच्यावर कृपा व्हावी. बादशहानी त्याची मनसब वाढविली.

## सतरा फेब्रुवारी १७०३

आज बादशहानी दिवाण बंद ठेवले.

## अठरा फेब्रुवारी १७०३

आज किल्ल्याची पाहणी करण्यासाठी बादशहा निघाले ते तख्तेखां (वाहून नेण्याचे सिंहासन) वर स्वार झाले. अमीरुलउमरा (पंतप्रधान) याच्याजवळ त्यांनी आपल्या बरोबरीची जास्तीची माणसे सोडली. त्यांनी आज्ञा केली की——"माझ्या बरोबर पुढील मंडळी राहावी——(१) बादशहाजादा मुहंमद कामबक्ष व त्याचा मुलगा, (२) बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान, (३) हमीदुद्दीन खानबहादूर, (४) मुहंमद अमीन खानबहादूर, (५) मतलबखान, (६) खानाजादखान, (७) सियादतखान.

अनुक्रमणिका

यानंतर बादशहा हे मेण्यात स्वार झाले. ते अमीरुल उमराच्या पथकाची ठाणी होती तिकडे गेले. तेथून त्यांनी किल्ला व मोर्चे यांची पाहणी केली.

दृष्टांनी (मराठ्यांनी) किल्ल्यावरुन बादशहाच्या स्वारीच्या दिशेने तोफांचे दोन गोळे मारले. एक गोळा मतलबखानाच्या शिरपेचाला चाटून पुढे गेला. शिरपेचाचे तुकडे झाले. दुसरा गोळा बादशहाच्या स्वारीच्या मागे पडला.

यानंतर बादशहा मेण्यातून परतले. वाटेत ते तख्तेखांवर स्वार झाले. आणि निवासस्थानी दाखल झाले. त्यावेळी दुपार (दोन प्रहर) झाली होती. जाऊन येऊन एकंदर प्रवास सव्वादोन कोसाचा झाला. आज बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवले. मुहंमद कामबक्ष, अमीरुल उमरा (पंतप्रधान), मुहंमद अमीनखान बहादूर यांनी तलवारी, अश्रफ्या व रुपये यांच्या नजरा दिल्या. तोफखान्याचा प्रमुख (मीर अतिश) तरबियतखान याने मोर्च्यातून दोन तलवारी पाठविल्या.

काल बादशहा हे खानाजादखानला म्हणाले: ——

> "खानसामा (पुरवठा मंत्री) चा नायब व बयूतात (सरकारी मालमत्तेचा संचालक) फाजिलखान हा आजारी आहे, चौकशी करून या. त्याने चौकशी करून कळविले की, फाजिलखानाला दानधर्म करावयाच्या आहे पण त्याला पैशाची अडचण आहे. बादशहानी दोन हजार रुपये द्यावेत अशी आज्ञा केली.

शहाजादा मुहंमद आज्ञम याच्या शिफारशीवरुन सय्यद इब्राहिमची मुले, मुहंमद इस्माईल आणि मुहंमद जलील यांना मनसबी देण्यात आल्या. मुहंमद अमीन गंधी याने तीन विविध अत्तराच्या बाटल्या पेश केल्या. बादशहानी त्याला बक्षीस देऊन दरबारात येण्या-जाण्याची परवानगी दली. बादशहाच्या आज्ञेने इनायतुल्लाखान याच्या सहीने बादशहाजादा आज्ञम (गुजरातचा सुभेदार) याजकडे आज्ञापत्र रवाना झाले.

**एकोणवीस फेब्रुवारी १७०३**

तरबियतखान मीर आतिश (तोफखान्याचा प्रमुख) हा मोर्च्यात होता. त्याला बादशहानी एक हजार रुपये किंमतीचा शिरपेच बहाल केला. बादशहानी हमीदुद्दीन खानबहादूर याला म्हटले, "तुम्ही मोर्च्यात जाऊन तरबियतखानाला शिरपेच द्या आणि तेथे तैनात असलेल्यामध्ये देण्यासाठी एक हजार अश्रफ्या घेऊन जा. हे काम करुन परत या." हमीदुद्दीनने त्याप्रमाणे केले.

**वीस फेब्रुवारी १७०३**

आज शहाजादा आज्ञम याची पत्रे आली. खानजहानी पथकाचा प्रमुख अमानुल्लाखान हा आजारी होता. बरा झाल्यावर तो येऊन बादशहाना भेटला.

बाहशाहानी पुढीलप्रमाणे बदल्या केल्या: ——

अनुक्रमणिका

(१) मुहतशमखान हा करबेगीच्या हुद्द्यावर होता. त्याला नळदुर्गची किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली.

(२) नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार कासिमखान याला इम्तियाजगड अधोनीची फौजदारी देण्यात आली. अधोनीची फौजदारी चीन कुलीजखान बहादूर याजकडे होती. ती त्याच्याकडून काढून घेण्यात आली.

(३) शरीफखानाला पूर्वीप्रमाणेच अधोनीच्या किल्लेदारीवर कायम ठेवण्यात आले.

मुहंमद इखलास याला हबीबुल्लाच्या जागी दिवाण (कचेरी) चा वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. मोर्च्यात असलेल्या पुढील मंडळीच्या मनसबी वाढविण्यात आल्या: ——

(१) मुनीमखान, (२) कामयाबखान, (तरबियतखान याचा भाऊ), (३) मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम.

कोतवाली चबुत्र्याचा अमीन व खाशांच्या खिलातखान्याचा मुश्रफ मुहंमद इब्राहीम हा आजारी होता. तो बरा होऊन येऊन बादशहाना भेटला.

**एकवीस फेब्रुवारी १७०३**

आज दिवाण (कचेरी) झाले नाही.

फाजलखान हा आजारी असल्यामुळे त्याचा मुलगा मुहंमद इब्राहीम याने आपल्या बापाचा नायब म्हणून काम पाहावे अशी आज्ञा झाली. शेख गुलाम मुहंमद याला पूर्वीप्रमाणेच खानसाम्याच्या खात्याचा वाकेनवीस म्हणून कामावर बहाल ठेवण्यात आले.

काफरांचे (मराठ्यांचे) सैन्य बादशाही छावणीभोवती घिरट्या घालीत आहे, असे कळले, बादशहानी आज्ञा केली की, बख्शी उल्मुल्क रूहुल्लाखान आणि हमीदुद्दीन खानबहादुर यांची पथके तयार ठेवावीत. आणि छावणीचा कोतवाल सरबराहखान याने (पूर्वी आज्ञा केल्याप्रमाणे) छावणी भोवती भिंती उभाराव्या.

शहाजादा बेदारबख्त (औरंगाबादचा सुभेदार) याच्यापाशी तैनात असलेल्या हरकाऱ्याकडून पुढील बातमी कळली. बऱ्हाणपूरकडे काफिला (उत्तरेकडे जाणाऱ्यांचा थवा) पाठवून तिकडून खजिना आणविण्यासाठी शहाजाद्याने जानेआलम (खानेआलम) व मुनव्वरखान यांना बरोबर सैन्य देऊन बऱ्हाणपूरकडे रवाना केले आहे.

**बावीस फेब्रुवारी १७०३**

अनुक्रमणिका

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरीत) आले. पुढील मंडळीच्या बढत्या, बदल्या करण्यात आल्या: ——

(१) मीर अलीखान यास अली अकबरच्या जागी बऱ्हाणपूरचा बख्शी व वाकेनवीस म्हणून मनसब वाढून देण्यात आली, (२) मुहंमद हुसेन हा बहादुरगडला बक्षी व वाकेनवीस होता. त्याला तेथून बदलून त्र्यंबकच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले, मन्सब वाढविण्यात आली, (३) मतलबखान यांस दोनशे रुपये किंमतीचा शिरपेच देण्यात आला, (४) हकीम इनायततुल्ला यास खिलातीची वस्त्रे देण्यात आली, (५) मुहतशमखान यांस खिलातीची वस्त्रे व दोनशे मोहराच्या किंमतीचा घोडाही देऊन त्याला नळदुर्गच्या किल्लेदारीवर पाठविण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली, (६) अबुल्कासिमच्या आज्याला मुतकदखान ही पदवी होती. अबुल्कासिमला मुखलिसखान ही पदवी देण्यात आली, (७) काजीइकराम याचा मुलगा निजामुद्दीन याला मुहंमद अस्लमच्या मृत्यूमुळे रिकाम्या झालेल्या जागेवर औरंगाबादचा सद्र (न्यायाधीश) म्हणून नेमण्यात आले. तो पूर्वी ब्रह्मपुरीच्या तळावर काजी होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

हनमंतगडचा किल्लेदार व मरहूम (दिवंगत) कदीमकुलीखानाचा मुलगा हीदीकुली याला नेर (?) ची ठाणदारी देण्यात आली. त्याला मातबरखानाच्या अखत्यारात देण्यात आले.

घासदाणा आणण्यासाठी छावणीतून पथके जात. चोर (मराठे) त्यांच्यावर आक्रमण करतात अशी बातमी आली. शमशेरबेग वगैरेनी त्यांच्यापैकी अकरा माणसे पकडली त्यांच्याबद्दल काय आज्ञा म्हणून विचारता बादशहानी आज्ञा केली की, “कोतवाली चबुत्र्यावर घेऊन जा आणि गर्दन मारा.”

## तेवीस फेब्रुवारी १७०३

दाऊदखान (पन्नी) च्या बिरादरीत (भाऊबंदात) सुलेमानखान हा होतो. त्याला बादशहानी हुजुरात बोलाविले होते. त्याला चीनकुलीजखान (भावी निजामउल्मुल्क—विजापूरचा सुभेदार) याजपाशी तैनात करण्यात आले.

## चोवीस फेब्रुवारी १७०३

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान (भावी निजामऊल्मुल्क) याजकडे इम्तियाजगड (अधोनी) ची फौजदारी पण होती. फौजदारी त्याच्याकडून काढून घेण्यात आली. त्याला मनसब चार हजारी जात व चार हजार स्वार अशी होती. त्यापैकी पाचशे स्वार दो अस्पा (दोघोडी) होते. अधोनीची फौजदारी काढून घेतल्यावर त्याचे पाचशे स्वार कमी करण्यात आले.

उजबेकखान याची नेमणूक अमानुल्ला खानाच्या जागी शिवापूर (सिंहगडच्या मोहिमेत) च्या ठाणेदारीवर करण्यात आली होती. त्याने विनंती केली की, (१) तोफांची सामग्री पुरविण्यात यावी, (२) अमानुल्लाखान याजबरोबर जितकी पथके दिली होती तितकीं देण्यात यावी, (३) माझ्या जहागिरी बदलल्या होत्या त्या परत बहाल करण्यात याव्या. या विनंत्या मान्य करण्यात आल्या.

अनुक्रमणिका

पुढील मंडळींना मनसबी देण्यात आल्या: ——

(१) मुहंमद दरवेश, (२) सय्यदमखदूम, (३) नाहरखानाचा पुतण्या मुहंमद कासम, (४) मीर मिहदी. शहजादा बेदारबख्त याने आपला मुलगा सुल्तान मुहंमद बेदारदिल याच्या खुतन्या (सुंता) निमित्त भेट म्हणून रत्नखचित अलंकार पाठविला. बादशहानी त्याच्याकडे फर्मान आणि खिलातीची वस्त्रे पाठविली. कामबख्शाचा मुलगा सुल्तान मुहियुल्ला याच्या सरंजामाच्या व्यवस्थेसाठी पुढील नेमणुका करण्यात आल्या व त्यांना बक्षिसी देण्यात आल्या—— (१) मुहंमद गुलबक्षी, (२) आका मुहंमद मीरसामान, मिहयीखान याची मनसब बहाल करण्यात येऊन त्याला चीन कुलीजखानाकडे तैनात करण्यात आले. दत्ताजी (जगदेवराय जाधव यांचा मुलगा) याला त्याचा भाऊ राव मानसिंग जाधव याचा नायब म्हणून हदभीमरा (?) चा ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. दत्ताजीला दोनशे जात, पन्नास स्वार अशी मनसब होती. तीत पन्नास स्वारांची वाढ करण्यात आली.

रणदूल्लाखान याचा भाऊ मुहंमद लतीफ याला खान ही पदवी देण्यात आली. अब्दुल्ला बेग याला बहादुरगडचा बख्शी, वाकेनवीस व बागांचा व्यवस्थापक म्हणून नेमण्यात आले.

विमरा (भीमा) च्या घाटावर नावा तयार ठेवण्यात याव्यात, अशी आज्ञा करण्यात आली. चीन कुलीजखान बहादूर यांनी संरक्षक पथक मोगलखानाबरोबर देऊन हुजुरात पाठवावे अशी आज्ञा झाली.

बादशहानी आज्ञा केली की, शाकिरूल्ला, (मेमार बांधकामाचा तज्ञ) याने बहादुरगडला जाऊन तेथील महाल आणि वाडे दुरुस्त आणि सिद्ध करावे.

**पंचवीस फेब्रुवारी १७०३**

बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवले. काल उम्दतुल्मुल्क गाजिउद्दीन खान बहादूर फीरोजजंग याच्या नावे पुढील मजकुराचे पत्र रवाना झाले: ——

"जीनतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) यांना आज्ञा करण्यात आली आहे की, त्यांनी बहादुरगडला यावे. तुम्ही (गाजिउद्दीन फीरोजजंग) त्यांना (जीनतुन्निसा बेगम) इस्लामपुरीहून (ब्रह्मपुरीहून) बहादुरगडापर्यंत आणून पोहोचवावे आणि नंतर दुष्टांच्या (मराठ्यांच्या) पाठलागावर जावे."

खिदमतगारखान हा बुणग्यावर (ब्रह्मपुरीच्या तळावर नाजर) निरीक्षक अधिकारी होता. त्याला पत्र गेले की, "नवाब जीनतुन्निसाबेगम या अंतःपुरांतील इतर स्त्रियांच्याबरोबर बहादुरगडला जाऊ इच्छित असतील तर तुम्ही त्यांच्याबरोबर जावे."

शहाजादा बेदारबख्त (औरंगाबादचा सुभेदार) याला बऱ्हाणपूर (खानदेश) चा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. खानदेशचा पूर्वीचा सुभेदार नजाबतखान याला तेथून बदलण्यात आले.

अनुक्रमणिका

नळदुर्गचा किल्लेदार कासिमखान यास अधोनीचा फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला आता शरीफखानाच्या जागी अधोनी किल्ल्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. शरीफखानाची बदली कंधार (नांदेड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार म्हणून करण्यात आली.

## सव्वीस फेब्रुवारी १७०३

बादशहानी आज दिवाण बंद ठेवले. त्यांनी आज्ञा केली की, "जीनतुन्निसा बेगम यांचे सामान-सुमान व लवाजमा ब्रम्हपुरीहून वाहून नेण्यासाठी मुहंमद अमीनखान बहादुर यांनी पन्नास हत्ती व उंट घेऊन जावे आणि जीनतुन्निसा बेगम यांना बहादुरगडला घेऊन यावे."

ओरिसाच्या सुभेदाराची वस्त्रे बंगालच्या दिवाण मुर्शदकुलीखान याच्याकडे पाठवावी, अशी आज्ञा झाली (ओरिसाच्या सुभेदारीवर त्याची नेमणूक झाली असावी असे दिसते.)

ब्रम्हपुरी जाण्यासाठी बादशहानी मुहंमद अमीन खानबहादुर याजबरोबर तीन हजार स्वार द्यावे, असे ठरविले.

## सत्तावीस फेब्रुवारी १७०३

दिवसाचा एक प्रहर व चार घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले.

शहाजादा बेदारबख्त याला बऱ्हाणपूरचा सुभेदार म्हणून नेमताना त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली होती. आता तीत पूर्वीच्या सुभेदाराच्या मुखलीसखान उर्फ मोतकिदखान याच्या काळातील अंमलाप्रमाणे एक हजार पायदळ शिबंदीची भर घालण्यात आली.

## अठ्ठावीस फेब्रुवारी १७०३

बादशहानी सकाळचे दिवाण (कचेरी) केले नाही. पण दुपारचे अदालत (न्यायकचेरी) केले.

गाविलगडचा (अमरावती जिल्हा) दिलावरखान मरहूम याचा मुलगा दिलेरहिंमत हा होता. त्याच्या जागी मीर अब्दुस्सलाम याची नेमणूक करण्यात आली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: ——

जनकोजी मराठा हा चारशे पायदळ सैनिकासहित पालीगडच्या (रोह्याजवळ) परिसरात धामधूम करण्याच्या उद्देशाने आला. पालीगडचा किल्लेदार आणि फौजदार सेनापत याने त्याच्या विरुद्ध सैन्य पाठविले आणि त्याचे पारिपत्य करुन त्याला जिवंत पकडले. बादशहानी आज्ञा केली की, की सेनापतने एक पथक बरोबर देऊन बंडखोराला (जनकोजीला) हुजुरात पाठवावे.

नेमणुका, बढत्या व बदल्या.—

अनुक्रमणिका

रणदुल्लाखान याचा भाऊ लतीफखान याच्या मनसबीत वाढ.

मेवात (हरयाना) चा फौजदार शुक्रुल्ला याचा मुलगा ह्यातुल्ला——मनसबीत वाढ.

फरासखान्याचा मुश्रफ मीरहादी याला नारायणदास याच्या ऐवजी हत्ती खान्याचा मुश्रफ म्हणूनही नेमण्यात आले. नारायणदास याला दिवाणी व खानसामानी या खात्यात जागा देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

मीरबुरहाणुद्दीन याला पन्हाळगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. त्याला दोनशे जात व तीस स्वार अशी मनसब होती. तीत पन्नास स्वार अशी वाढ देण्यात आली.

फत्तेउल्लाखानाच्या फौजेतील बाबरखान (नाहरखान) हा कोल्हापूरला ठाणेदार होता. त्याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. तीत वाढ करण्यात आली इखलासखान हा पाच हजारी मनसबदार होता, त्याची मनसब कमी करण्यात आली.

### एक मार्च १७०३

खालशाचा दिवाण इनायतुल्लाखान (औरंगजेबची पत्रे, अहकामे आलमगिरी याचा लेखक व संपादक) हा आजारी होता. तो येऊन बादशहाना भेटला.

मीर नूरुद्दीन याला नलगोंड्याचा किल्लेदार नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. हिदायत केश वाकेनवीस याला खानसाम्याच्या खात्याची पण वाकेनवीस देण्यात आली. माळ्यांचा मुख्य व गौतमचा मुलगा वीरमल याला खिलातीची वस्त्रे मुहतसब (नीतिमत्ते वर देखरेख ठेवणारा अधिकारी) ख्वाजा मुहंमदशहा यास खिलातीची वस्त्रे.

**मनसबीत वाढ**. ——तोफखान्याचा मुश्रफ मुहंमद आकिल, इनायतुल्लाचा मुलगा आणि शहागंज (छावणीचा बाजार) चा अमीनजियाउल्ला, मुहंमद अमीन खानबहादूर याच्या पथकातील (बिरादरी——भाऊबंद) एमन बेग याच्या मनसबीत वाढ.

बऱ्हाणपूर (खानदेश) चा माजी सुभेदार नजाबतखान याला बागलाणा (सुभे खानदेश) चा फौजदार नेमण्यात आले.

बेंगळूरचा फौजदार व मरहूम सालारखान याचा मुलगा नुरूल्ला याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

रुहुल्लाखान बख्शी याने अर्ज केली की, “इखलासखान हा कोल्हापूरचा ठाणेदार होता. त्याच्या जागी नाहरखानाला नेमण्यात आले होते. फत्तेउल्लाखानापाशी इखलासखानास तैनात करण्यात आले पण फत्तेउल्लाखान त्याच्याशी फार वाईट वागला”. इखलासखानाचे म्हणणे आहे की, “मला हुजुरात बोलावून

अनुक्रमणिका

घ्यावे अगर सेवानिवृत्त करावे." बादशहानी आज्ञा केली की, "इखलासखानाने हुजुरात यावे अगर चीन कुलीजखानाच्या सैन्यात तैनात व्हावे."

गुजरातचा सुभेदार शहाजादा आज्ञम याच्या शिफारशीवरून बादशहानी आजमाबादचा फौजदार ताजुद्दीन याला बढती (मनसबीत) दिली. तसेच चांदोलचा फौजदार फकीरुल्ला याचीहि मनसब वाढविण्यात आली.

अहमदनगरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले––"दुष्ट (मराठे सरदार) नारो व संता हे मोठे सैन्य बरोबर घेऊन अहमदनगरपासून बारा कोसावर असलेल्या कहूर (घोर, केशूर, कनूर, खोर?) या गावाकडे पसरले आहेत. त्यांचा हेतु शेख रमजानच्या रोज्याकडे (दर्ग्याकडे) जावे असा दिसतो. [कानिफनाथाची समाधी असलेले मढी (तिसगाव) गाव असावे. कानिफनाथाच्या समाधीच्या दारावर शेख रमजान अशी अक्षरे आहेत. मराठे सरदार तिसगाव मढी भागात पसरलेले दिसतात]. भोवतालच्या गावातील रयत घाबरून आणि पळून अहमदनगरकडे येऊ लागली आहे. याबाबतीत मुगलखान याला ताकीद पत्र पाठविण्यात यावे, अशी बादशहानी आज्ञा केली.

मुहंमद बेगचा मुलगा अमानुल्ला याला माळव्यात काकरोनचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. नलगोंड्याच्या किल्लेदारीवरून बदललेला केशवदास (रामसिंग राठोड याचा मुलगा) याची मनसब कमी करण्यात आली. बादशहाना कळविण्यात आले की, दिलेरखानची मुले औरंगाबादेत तैनात होती. दोन वर्षापासून ती अवधमधील आपल्या जहागिरीत बसून जवळपासच्या खेड्यात लुटालूट करीत आहेत. त्याच्या जहागिरी काढून घ्याव्या अशी आज्ञा झाली.

अबदुस्समदखान व तरबियतखानाचा मुलगा महंमद इसहाक यास मनसबीत सूट देण्यात आली. जम्मू (सुभे लाहोर) चा जमिनदार (राजा) केशवदेव याचा मुलगा गोपाळदेव याची मनसब काढून घेण्यात आली.

**दोन मार्च १७०३**

दिवसाच्या एक प्रहर चार घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरीत) आले.

नावा दुरुस्त करण्यासाठी पुढील इसमांना बक्षिसे देऊन पूर (पंढरपूर असावे) च्या घाटाकडे पाठविण्यात आले. गुलाम अली, अब्दुल जलील.

कामबक्षच्या जवाहरखान्याचा मुश्रफ प्रल्हाददास याला सुल्तान मुहियुल्ला याच्या मालमत्तेचा बयूतात याचा कारभारी म्हणूनहि नेमण्यात आले.

माळव्याचा सुभेदार शायस्ताखान याला बंडखोरांच्या पारिपत्यासाठी म्हणून एक हजार पायदळ शिबंदी ठेवण्याचा अधिकार देण्यात आला.

खेडचा फौजदार रणमस्तखान याला होशंगाबादचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

मरहूम इलहामुल्लाखान याचा मुलगा सादतुल्ला हा फीरोजजंग गाजिउद्दीनपाशी तैनात होता. त्याची पूर्वीची जहागीर बहाल ठेवावी अशी आज्ञा झाली. फत्तेउल्लाचा मुलगा नस्रुला याला खान जहानी पथकाच्या घोड्यांचा डाग देण्याच्या तपासणी कामावर नेमण्यात येऊन त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशाहानी आज्ञा केली की, औरंगाबाद व इतर प्रांत येथील बयूतात (पुरवठा खाते) यांना लिहिण्यात यावे की, त्यांनी पुढीलप्रमाणे रकमा खर्च करून ऊंट विकत घ्यावे आणि हुजुरात पाठवावे. औरंगाबाद व अजमीर तीनशे, काबुल आठशे पन्नास, बादशहानी आज्ञा केली की, सहाय्य म्हणून मुहंमद अमीनखान बहादूर (निजामऊल्मुल्काचा चुलत चुलता हा पुढे १७२१-२२ मध्ये मोगल साम्राज्याचा मुख्य प्रधान झाला) यास दोन हत्ती देण्यात यावे.

**तीन मार्च १७०३**

बऱ्हाणपूरवर मुहंमद कुली हा सवानेह निगार (घडलेल्या हकीकती लिहून पाठविणारा) होता. त्याला सुल्तानपूर नंदुरबारचे सबानेह निगारीचे पण काम देण्यात आले.

राजा (सवाई) जयसिंग हा शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी तैनात होता. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार (दुघोडी) अशी मनसब होती. हलकट गनीम (मराठे) बऱ्हाणपूरवर चाल करून आले असता त्याने त्यांचे पारिपत्य केले नाही. यामुळे बादशहानी त्याची मनसब पाचशेनी कमी केली.

खंजरखान हा उम्दतुल्मुल्क खान फीरोजजंग याचा नायब होता, त्याला दीड हजार जात व चारशे स्वार अशी मनसब होती. बीड (मराठवाडा) च्या भागात हलकट गनिमांनी (मराठ्यांनी) आक्रमणे केली, यामुळे खंजरखान याची जात मनसब पाचशेनी कमी करण्यात आली.

मिहदीखानाचा मुलगा मिर्जा मुहंमद याची मनसब फतेउल्लाखान याच्या विनंतीवरून वाढविण्यात आली.

शरीफखान याला इम्तियाजगड अधोनी येथील किल्लेदारीवरून कंधार (मराठवाडा) च्या किल्लेदारीवर बदलण्यात आले होते. त्याची मनसब पूर्वीप्रमाणे व पूर्वीच्या अटीवर बहाल ठेवण्यात आली. कंधारचा पूर्वीचा किल्लेदार व फौजदार आणि सय्यद अबदालचा मुलगा सय्यद हुसेन याची मनसब कमी करण्यात आली.

ग्वाल्हेरचा फौजदार जानसिपारखान (जाननिसारखान) याला पुढीलप्रमाणे लिहिण्यात यावे अशी आज्ञा झाली: ——

> तुम्ही आपल्या मोठ्या मुलाला पाचशे स्वार व पाचशे पायदळ सैनिक बरोबर देऊन माळव्याचा सुभेदार शायस्ताखान याजकडे दुष्टांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी पाठवावे.

अनुक्रमणिका

**चार मार्च १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. खेळणा (सकरलना-विशालगडचा माजी किल्लेदार)जाबिताखान याने एक मोहोर नजर दिली.

खिदमतगारखान याने इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) हून पुढीलप्रमाणे लिहून पाठविले:——

> मला व मुरीदखान यांना आज्ञा झाली होती की, प्रवासाचा (बारबरदारी —सामानाची ने-आण) सगळा सरंजाम करावा आणि जीनतुन्निसा बेगम आणि उदेपुरी महाल यांच्या बरोबर बहादुरगडला यावे. पण वाहने आली नाहीत आणि सामान बरेच आहेत, काय आज्ञा.

बादशहानी आज्ञा केली की, रुहुल्लाखानाने फीरोजजंग व नायबखानसामा यांना लिहावे—— “हत्ती, ऊंट, गाड्या जे काही लागेल ते घेऊन जास्तीच्या सामानाची व्यवस्था करावी. सरकारातून वाहने येण्याची वाट न पाहता ही बदली व्यवस्था करावी.”

बहरामखाना (मरहूम) चा मुलगा जुल्फिकारअली याची मनसब वाढविण्यात आली. खानजहान (बहादुरखान) याचा मुलगा अबुल्फतह याला दिल्ली येथे तैनात करण्यात आले.

अजीजुल्लाखान याला एक हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब असून तो शहाजानाबाद (दिल्ली) येथे तैनात होता. त्याने विनंती लिहून पाठविली की, “मी औरंगाबादेस आलो आहे. माझी आर्थिक परिस्थिती समाधानकारक नाही. मला एक योग्य नोकरी (खिदमते जानी) मिळावी अगर मला औरंगाबादेत दोन वर्षे राहू द्यावे. विनंती मान्य झाली नाही. (अजीजुल्ला हा रुहुल्लाखानाचा भाऊ असावा.)

मुहंमद युनूस काशगरी हा काबुल सुभ्यात तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घेऊन मुहंमद अमीन खानबहादुर याजपाशी तैनात करण्यात आले. त्याला एक घोडा बक्षीस देण्यात आला.

सुरत बंदरचा मुत्सद्दी (कारभारी) एतिबारखान याने चांगली कामगिरी बजावली म्हणून त्याची मनसब वाढविण्यात आली.

मुहंमद नसीर (मुहंमद मुरादचा मुलगा), मुनीम बेग, सय्यदहमिद, व मदिन्याचा रहिवासी मुहंमद बाकर इत्यादींना नव्याने मनसबी देण्यात आल्या. अफरासियाबखानाचे नातू (मुलीची मुले) शजी व अफरासियाब यांना मनसबी देण्यात आल्या. शजीला बादशहानी पाच अश्रफ्या दहा होन इत्यादि बक्षीस म्हणून दिले.

नलगोंडा (आंध्रप्रदेश) चा किल्लेदार नुरुद्दीनखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले: ——

दिलेरखान विजापुरी याने माझ्या जहागिरीतून रकमा वसूल केल्या आहेत. त्यांना मिळणाऱ्या रकमेतून वजा करून मला देण्यात यावे. दिलेरखान, चोवीस हजार आठशे दहा होन, अलफखान, दोन हजार तीनशे पन्नास;

जुन्नर (शिवनेरी) चा किल्लेदार व फौजदार आणि अबुलखैरखानाचा मुलगा अब्दुसत्तार याला चारशे जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. बादशहानी तीत शंभर स्वारांची वाढ केली.

**पाच मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवले.

**सहा मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवले. कामबक्षाच्या मुलाला रोख रक्कमेच्या ऐवजी चाळीस घोडे देण्याची व्यवस्था करावी अशी बादशहानी आज्ञा केली. मरहूम फिदवीखान (बहादुरखानाचा भाऊ असावा) याचा जावई मुहंमद अस्करी, इतर सहकारी नजमुद्दीन, मुहंमद सदिक वगैरेना मनसबी देण्यात आल्या. अदिलखानाचा मुलगा मुहंमद सालेह याला मनसब देण्यात आली. मुस्ताफानगर (कोंडा पल्ली, आंध्रप्रदेश) चा माजी फौजदार नसरूल्लाखान याला हुजुरात बोलावण्यात आले.

शिवसिंग (रायगडचा किल्लेदार) याचा मावसभाऊ अगर मामेभाऊ (खालूजाद) आणि गोपलसिंग कछवा ह्याचा मुलगा बिशनसिंग मनसबदार हा मरण पावला.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: ——

मुहंमद यूसूफ नावाचा मनसबदार आणि एक इसम यांनी मनसबीचे खोटे कागदपत्र तयार केले. त्यांना पकडण्यात आले. त्यांना कोतवालाकडे देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बहादुरगड ते औरंगाबाद या मार्गाचा रक्षक मुघलखान याच्या सैन्यातून पुढील बातमी कळविण्यात आली: ——

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे हिंदूना पालखीतून फिरणे मना आहे (बमोजिब हुकुमे मुअल्ला सवारी पालकीब मर्दुमे हुनूद मना अस्त) अहमदनगरचा देशमुख मोरया (मोरे अगर सूर्या, असेही असू शकेल) हा वरील आज्ञेचा भंग करीत आहे. तो पालकीतून फिरतो. बादशहानी आज्ञा केली की, मुघलखानाने त्याला मना करावे.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## ७ मार्च इ. स. १७०३ ते २१ सप्टेंबर १७०३

### सात मार्च १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. बहादुरगडचा किल्लेदार, आनंदापूर (इंदापूर) चा ठाणेदार व बहादुरगड-औरंगाबाद या मार्गाचा रक्षक मुघलखान याने काफिला (प्रवाशांचा थवा) औरंगाबादेस नेऊन पोहोचविला होता. तो येऊन बादशहाना भेटला. त्याने दोन मोहोरा (निसार) ओवाळणी म्हणून पेश केल्या. बादशहानी पुढील मंडळींना बक्षिसे दिली:—

(१) सियादतखान याला मुहतशमखानाच्या जागी कोरबेग या हुद्यावर नेमण्यात आले होते,

(२) खान जहान (बहादूरखान) याचा मुलगा अबुल्फतेहखान याला शहाजहानाबाद (दिल्ली) ला जाण्यास निरोप देण्यात आला,

(३) शमशेरबेगच्या पथकातील शादमानबेग घोड्याची किंमत म्हणून साठ मोहोरा,

(४) खैरूल्ला मनसबदार याने शहाजादा आज़म यांजकडून अहमदाबादेहून डाळिंबाची करंडी आणली होती, त्याला बक्षीस,

(५) मुहंमद शजी व अफरासियाब यांना खिलातीची वस्त्रे देऊन त्यांना औरंगाबादेस त्याचे वडील मुहंमद शुजा याजकडे पाठविले,

(६) जाहिदबेग आदि दोन गुर्जबर्दार शाहाजादा बेदारबख्त याजकडे खिलातीची वस्त्रे घेऊन गेले होते. शहाजादाने त्यांना बक्षिसी दिली व बादशहाकडे देण्यासाठी पत्र दिले, त्यांना बक्षीस.

(७) बहादुरगडला (जीनतुन्निसा व उदेपुरी महाल यांच्यासाठी वाडे नीट तयार ठेवण्यासाठी) मेमार (बांधकामाची माणसे) घेऊन जाण्यासाठी करावलीचा कारभारी फकीर महंमद वैगैरेंनी जावे. त्यांच्या बदली तुर्कताजखान याने काम पाहावे.

मरहुम बख्शी बहरामंदखान यांच्या पत्नीला औरंगाबादेस पोहोचवून अर्सलाखना हा परत आला आणि बादशहाला भेटला.

बादशहानी आज्ञा केली की, दुष्टांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी, विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान याजकडे विजापूरच्या किल्ल्यातून दोन तोफा आणि दोनशे बाण पाठविण्यात यावे.

अनुक्रमणिका

मुहंमद रफीचा मामेभाऊ मुहंमद कासिम व पुतण्या मुहंमद हुसेन यांना मनसबी देण्यात आल्या. खुशखबरखान याच्या पथकात (बिरादरी) पन्नास मनसबदार देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**आठ मार्च १७०३**

बादशहानी दिवाण बंद ठेवले. आज दुपारी ख्वाजा मुहंमद आदिलखान याला शहाजहानाबादेश (दिल्ली) जाण्यास निरोप देण्यात आला. गुल्शनाबाद (नाशिक) चा चौधरी हैदर (मुहंमदचा मुलगा) हा मनसब वाढवून घेण्याच्या आशेने बादशहाना भेटला.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: —

कोंडाणा किल्ल्याच्याभोवती ठाणी व चौक्या बसल्या आहेत. पण तेथे असलेले सैनिक व अधिकारी ठाणी व चौक्या किल्ल्याच्या दिशेने पुढे सरकवीत नाहीत. बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली: —

"उद्या सकाळी हमीदुद्दीन खानबहादूर व मतलबखान यांनी मन्सूरखानाच्या ठाण्यावर जावे. तेथील पहाणी करावी आणि ठाणेदार व चौकीवरील सैनिक यांना ताकीद करावी.

पुढील मंडळीच्या मनसबी वाढविण्यात आल्या:—

(१) खुस्रोखानाचा मुलगा फरीदून बेग, (२) सय्यदकायमचा मुलगा सय्यद मुहंमद, (३) फजलुल्ला, (४) शरीफचा मुलगा निसार, (५) मुहंमद बेगचा मुलगा मुहंमदअली, (६) नजीबचा मुलगा मुहीयुद्दीन अहमद (मरहूम निहारखान याच्या मुलीचा मुलगा). (७) हैदरचा मुलगा मुहंमद हुसेन, तोफखान्याचा बदललेला दारोगा (अधिकारी) मक्सूदबेग संगमनेरचा बदललेला वाकेनीस शेखमुनिम, हैद्राबादचा कोतवाल हाजी अब्दुल्गनी, मुगलखानाच्या फौजेचा बख्शी व वाकेनिसार, आगा बहाउद्दीन ही मंडळी बादशहाना भेटली. कर्नूलचा किल्लेदार आणि फौजदार युसूफखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

अहमदनगरचा किल्लेदार व फौजदार अब्दुलगफूर याने तेथे आपला नायब ठेवून स्वतः हुजुरात यावे, अशी आज्ञा झाली.

कीरतसिंगाचा नातू महीसिंग हा चैतसिंगाच्या बरोबर तैनात होता. त्याला मनसबीत सवलती देण्यात आल्या.

फीरोजजंगाच्या सैन्यात शहा मुहंमदचा मुलगा नेमतुल्ला हा तैनात होता. त्याने पुढीलप्रमाणे अर्ज लिहून पाठविला—"मी मेलो असे हुजुरात लिहून कळविण्यात आले. मी आहे. जिवंत आहे. माझी काढून घेण्यात आलेली ही मनसब बहाल करण्यात यावी." बादशहानी विनंती मान्य केली.

**गुलबर्ग्याची बातमी**

अहसनाबाद उर्फ गुलबर्गा येथील हरकाऱ्याच्या वृत्त निवेदना (रिपोर्ट) वरून पुढील हकीकत कळली——

**धनाजी जाधव**

धनाजी जाधवापासी पंधरा हजार स्वारांचे सैन्य होते. त्याला बादशहाचा मुलगा कामबख्श याने निशान (पत्र) पाठविले. ते पत्र घेऊन कामबख्शाकडे सुल्तान हुसेन, तीस स्वार व वेंकट (हा कोण) हे धनाजी जाधवाकडे गेले. धनाजी जाधवाने कामबख्शाचे पत्र घेतले व तो आळंद (गुलबर्गा जिल्हा) परगण्याकडे गेला. वरील (सुल्तान हुसेन वगैरे) मंडळी त्याच्याबरोबर आहेत. धनाजी जाधव हा आळंदकडे सोळा शव्वाल रोजी (बावीस फेब्रुवारी, १७०३) गेला.

**बेदारबख्त जुल्फिकार भेट**

औरंगाबादच्या बातम्यावरून कळले की, तेवीस शव्वाल (एक मार्च १७०३) रोजी जुल्फिकारखान बहादूर नुस्रतजंग बक्षी उल्मुल्क याने शहाजादा बेदारबख्त याची भेट घेतली. शहाजाद्याने त्याला खिलातीची वस्त्रे दिली.

दुसऱ्या दिवशी शहाजाद्याने जुल्फिकारखानाला बोलावून त्यांच्याशी खलबते केली. त्याला अत्तर व फळफळावळे देऊन त्याला निरोप दिला. पंचवीस शव्वालला (तीन मार्च १७०३) जुल्फिकारखान हा हलकट गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी रवाना झाला. जुल्फिकारखानाबरोबर इस्माईलखान (मका) वगैरे मंडळी होती. त्यांना शहजाद्याने खिलातीची वस्त्रे दिली.

**नऊ मार्च १७०३**

आज दिवाण बंद होते. बादशहा दुपारी न्याय कचेरीत आले. मुहंमद इस्माईल यास बेनीशाहादुर्ग (पन्हाळगड) ची वाकेनवीसी देण्यात आली. खुशहालचंदचा पुतण्या अमरसिंग यांस खानजहानी पथकात घोड्यांना डाग देण्याच्या दप्तरावर मुश्रफ म्हणून नेमण्यात आले.

तोडरमलचा पुतण्या बाबू हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

सरफराजखान याला रेहेकलाबारीत (शस्त्र ठेवण्याचा तळ) पालखीतून ये-जा करण्याची परवानगी देण्यात आली.

अरसलानखान बहरामंदखानी याला कौलार वर्ग खात्यात नेमण्यात आले. कासमखानाने नको म्हटल्यामुळे अधोनीची फौजदारी खुद्दाबंदाखान (विजापूर-कर्नाटकचा फौजदार) याजकडे देण्यात आली. अधोनिची किल्लेदारी शरीफखानाकडे ठेवण्यात आली. अहमदनगरचा किल्लेदार अब्दुलगफूर याला हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

अनुक्रमणिका

इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) चा किल्लेदार मुरीदखान हा होता. त्याच्या जागेवर नूरमहंमदखान उर्फ मुहंमद दाराई याची नेमणूक करण्यात आली. अजीजुल्ला (रूहुल्लाखानाचा भाऊ) याला दोन हजार जात व तीनशे स्वार अशी मनसब होती. त्याची तैनाती शहाजहानाबादेश (दिल्ली) झाली होती. पण तो औरंगाबादेस जाऊन बसला, पुढे जाईना. बादशहानी त्याची मनसब काढून घेतली. त्याला वर्षाला तीस हजार रूपये असे वर्षासन देण्यात आले.

पाच मराठे चाकरीच्या आशेने मुहंमद अमीनखान बहादूर याजकडे आले. त्याने त्यांना बादशहाच्या हुजुरात पाठविले. त्यांना खिलातीची वस्त्रे देण्यात यावी अशी बादशहानी आज्ञा केली.

पूर्ण खात्याचा वाकेनवीस हिदायतकेश याला बोलावून बादशहांनी त्याला विचारले: "आपल्या फौजा दिल्लीहून दक्षिणेकडे आल्या त्याला किती वर्षे झाली? हिदायत केशने सांगितले, चोवीस वर्षे झाली, पंचविसावे चालू आहे."

## दहा मार्च १७०३

दिवाण (कचेरी) बंद ठेवण्यात आले. शहाजादा आज़म याचा बक्षी जुसवीखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

बादशहानी मुहंमद अमीनखान बहादूर व मुघलखान यांना बोलाविले आणि फातेहा पढून त्यांना निरोप दिला. मुहंमद अमीनखान बहादूर याला पुढीलप्रमाणे आज्ञा करण्यात आली——जीनतुन्निसा बेगम व अतःपुरांतील स्त्रिया यांच्याकडे वाहने आदि सामान घेऊन इक्बाल आणि इतर इसम ब्रह्मपूरी (इस्लामपुरी) ला जात आहेत. तुम्ही त्यांना (जीनतुन्निसा वगैरेना) बहादूरकडपर्यत घेऊन जावे. त्यांच्यासाठी लागणारा सरंजाम फिरोजजंगाची पथके (ब्रह्मपूरीच्या) तळापर्यंत पोहोचवतील.

"मुघलखान यास आज्ञा करण्यात आली की, तुम्ही सरकारी घोडे अहमदनगरपर्यंत पोहोचवावे."

## सिंहगडचा वेढा

तरबियतखानाच्या मोर्चात असलेल्या हरकाऱ्याने चिठ्ठी पाठविली. ती यार अलीबेग याने बादशहासमोर ठेवली. चिठ्ठीत पुढील मजकूर होता: ——

"किल्ल्यावर (सिंहगड) असलेले शत्रू म्हणत आहेत की, "हा किल्ला बादशाही आहे. तोफा चालवून तुम्ही काय म्हणून किल्ल्याच्या तटांची नासाडी करीत आहात."

बादशहानी चिठ्ठी वाचून ती हमीदुद्दीनखान बहादूर याजकडे दिली.

मध्य आशियातून नव्याने आलेले मीर हिदायतुल्ला वगैरेना मनसबी देण्यात आल्या. मरहूम मुइनुद्दीनची मुले व इतर यांना मनसबी देण्यात आल्या.

अनुक्रमणिका

**पेडगाव**

बहादुरगड (पेडगाव) चा माजी किल्लेदार फखरूद्दीनखान याला जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. त्याला पाचशे जात व शंभर स्वार अशी मनसब आहे.

**मोहीम**
**अकरा मार्च १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, "सुमारे दोनशे पायदळ चोर (मराठे) शिवापूर नजीक वाटमारी करीत आहेत." बादशहानी आज्ञा केली की, "तेथील फौजदार खानचंद याला त्याचे पारिपत्य करण्याबद्दल लिहा."

**अकरा मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाण (कचेरी) केले नाही.

**बारा मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाण (कचेरी) केले नाही. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:

**जंजिरा**

सुरत बंदराचा मुत्सद्दी (कारभारी) एतिबारखान याने बादशहाकडे पेशकश म्हणून पाठविण्यासाठी चवदा अरबी घोडे आणि इतर वस्तू जमविल्या. त्या त्याने समुद्रमार्गे दंडराजपुरीचा किल्लेदार आणि फौजदार सिद्दी याकूत याजकडे पाठविल्या. सिद्दी याकुतखानाने आपली पथके बरोबर देऊन त्या वस्तू (घोडे वगैरे) बादशहाकडे पाठविल्या आहेत. बादशहानी त्या वस्तू आपल्या समोर आणाव्या अशी आज्ञा केली.

**कोंडाणा (सिंहगड)**

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—

कोंडाणा किल्ल्यात एक सरदार वारला. त्यावरून काही माणसे किल्ल्यातून बाहेर पडली आणि मन्सुरखानाच्या ठाण्याच्या दिशेने गेली. त्यापैकी दोघांना पकडण्यात आले. माहिती मिळाली ती अशी——"किल्ल्यावर रोगाची साथ जोरात आहे. पाण्याची टंचाई फार आहे. किल्ल्यावरील लोक फार हैराण आहेत. आम्ही किल्ला देण्यास तयार आहोत. तोफा चालवून किल्ल्याची नासाडी कां करता."

अनुक्रमणिका

बादशहानी आज्ञा केली की, "बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान, हमीदुद्दीन खानबहादुर व मतलबखान यांनी मन्सुरखानाचे ठाणे व तोफखान्याच्या प्रमुख तरबियतखान याचे मोर्चे आहेत तेथे जावे आणि किल्ल्याच्या परिस्थितीची चौकशी करुन परत यावे. रुहुल्लाखान व हमीदुद्दीनखान हे बादशहाच्या आज्ञेने शिवापूरकडे गेले. मन्सुरखानाच्या मोर्च्यासाठी त्यानी जागा निवडली. तेथे त्याची नेमणूक केली. उजबेगखानाचे ठाणे किल्ल्याच्या दरवाज्यासमोर होते, ते ठाणे पाहून ते परत आले.

**तेरा मार्च १७०३**

बहादुरगड (पेडगाव) चा बदललेला किल्लेदार फकरुद्दीनखान याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला: "पगारबाकीसाठी सैनिक मला अतिशय त्रास देत आहेत. मला खान नुस्रतजंग याजपाशी तैनात करण्यात यावे." विनंती मान्य करण्यात आली.

बादशहा फत्तेहदौलत कौल याला म्हणाले "रुहुल्लाखान याला माझा हुकुम सुनवा "बादशहाजादा कामबक्ष याचे आणि श्रेष्ठ उमरावांचे बेलदार वगैरे माणसे गोळा करा आणि मन्सूरखानाच्या ठाण्याकडे पाठवा.

मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याने मोर्च्यातून तरबितखानाकडून पत्र आणले. पत्रातील मजकूर पुढीलप्रमाणे होता: ——

> "कोंडाणा किल्ल्यातील मराठे म्हणत आहेत की, 'सरकारचे तीन हत्ती' किल्ल्यात आहेत. त्याना उपास घडत आहेत. आम्हाला जिवाचे अभय मिळाल्यास आम्ही किल्ला बादशहाच्या ताब्यात देण्यास तयार आहोत. किल्याच्या भोवती असलेल्या ठाणेदारांना आज्ञा व्हावी की, किल्यातून बाहेर पडण्याच्या वाटेवर उपद्रव होऊ नये."

बाहशहानी विनंती मान्य केली आणि पुढीलप्रमाणे आज्ञा केली: ——

> "हमीदुद्दीन खान बहादुर, सुल्तान बुलंदअख्तर याचा नाझर (अधीक्षक) ख्वाजा अरब आणि हाजी मुहंमदअली यानी किल्ल्याच्या दरवाज्यावर जावे. तेथील इसमांना जीवदानाचा कौल द्यावा आणि त्यांना म्हणावे की, किल्ला रिकामा करून द्या."

आज दिवाण (कचेरी) बादशहानी घेतले नाही. फत्तेहदौलत कौल याला बादशहानी आज्ञा केली की, "बेलदारांना बरोबर घेऊन जा आणि तरबितखानाच्या मोर्च्याकडे जाण्याचा रस्ता नीट करा."

सैय्यद शहामतखान याचा नातू, सय्यद मीरान याचा मुलगा सय्यद फत्तेमुहंमद हा हुजुरात नोकर होता. आजारामुळे त्याला एक वर्षाची रजा देण्यात आली.

सय्यद फाजिलखान याच्याकडील पुढील हुद्दे होते: ——

(१) मीरमुन्शी बयूतात, (२) दारोगा किताबखाना (ग्रंथपाल), (३) खानेसामान (पुरवठा व बांधकाम मंत्री) याचा नायब तो आजारी होता. त्यातच तो वारला. त्याचे शव अकबराबाद (आग्रा) येथे घेऊन जाण्यास त्याच्या वारसांना परवानगी देण्यात आली. शेखसद्रुद्दीन ख्वाजा सालेह, मुहंमद अताऊल्ला वगैरेंना मनसबी देण्यात आल्या.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: ——

"उत्तर हिंदुस्थानातून सरकारी डाकेची एकशेसहासष्ट नळकांडी (कागदपत्र सुरळीकरून नळकांड्यात ठेऊन पाठवीत) हुजुरात येत होती. तसेच हुजुरात तेरा नळकांडी सुभ्याकडे पाठविण्यात आली होती. नर्मदेच्या पलीकडे अब्बास अफगाण याने बंड केले आहे. त्याने डाक लुटली आणि पत्रे हस्तगत केली.

हे एकून बादशहा गप्प बसले. (खामोश मांदंद).

## सिंहगड

बादशहाना कळविण्यात आले की, "किल्ल्यावरची माणसे म्हणत आहेत की, आम्हाला जिवाचे अभय मिळावे, तसा कौल मिळावा." आम्ही पेशकश म्हणून तीन हत्ती देतो. किल्ल्यावर ते (हत्ती) तयार आहेत. ते किल्ल्यावरील लोकांनी दाखविले.

तरबियतखानाने बादशहाना पत्र लिहिले. मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याने ते पत्र आणून बादशहाना दिले.

बादशहानी हमीदुद्दीनबहादुर व मुहरमखान याना काही सूचना देऊन याना मोर्च्याकडे पाठविले.

## चवदा मार्च १७०३

बादशहाना काल कळविण्यात आले ते असे, — किल्ल्यातील (सिंहगड) इसमानी दोन हत्ती देऊ केले होते. तरबियतखानाने हत्ती आणण्यासाठी मुजफ्फरला पाठविले. तो किल्ल्याच्या दरवाज्यावर गेला आणि तेथील लोकानी दिलेले हत्ती त्याने घेतले आणि मोर्च्यात आणले.

दुपारच्या नमाजानंतर बादशहानी आपल्या निवासस्थानाच्या तंबुची खिडकी उघडली. सुरतेहून चवदा घोडे एतिबारखान याने पाठविले होते ते हमीदुद्दीनखान बहादुर याने बादशहाला दाखविले. बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान याला खाने सामान हा हुद्दा पण देण्यात आला.

## बऱ्हाणपूर

मरहून अमीरखान याचा मुलगा अकीदतखान याने पुढीलप्रमाणे विनंती पत्र पाठविले: ——

अमीरखानाच्या बायकोचे थडगे व घुमट (मकबरा) ही बांधायची होती. त्यासाठी एक भाग एक हजार रुपयाला विकत घेतली. ही बाग सरकारी बागेला (आहूखाना) लागून असून फाजरखानाच्या मकबऱ्याजवळ आहे. मुहरमखान (सरकारी बागांचा व्यवस्थापक) याने इकडे येऊन हुजुरात निवेदन केले की, सरकारी बागेला अगदी भिडून या बागा बांधण्यात आल्या आहेत. त्यावरुन या बागा जप्त करण्यात आल्या. त्यात मी विकत घेतलेली बागहि जप्त झाली. ती मोकळी करण्यात यावी.

बादशहानी आज्ञा केली की, "बऱ्हाणपूरच्या बयूतात (सरकारी मालमत्तेचा अधिकारी) याने चौकशी केली आहे. बहुतेक बागा सरकारी आहूखानाच्या जमिनीवर बांधण्यात आल्या आहेत. ज्याने रुपये घेऊन तुम्हाला जमीन विकली त्याच्याकडून रक्कम परत घ्या. पुन्हा असे घडू नये. म्हणून वस्तुस्थिति कळवावी आणि सरकारी बागेच्या जवळपास सदर जमिनीचा नकाशा (ती जमीन सरकारी बागेपासून किती अंतरावर आहे) या तपशिलासहित पाठवावा.

**पंधरा मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाण (कचेरी) बंद ठेवली.

उम्दतुल्मुल्कखान फीरोजजंग याने पुढील प्रमाणे लिहून पाठविले: ——

"शेडगांव वगैरेचा नायब फौजदार रामाजी हा भिल्लांशी लढताना मारला गला. त्याचा मुलगा शामराव हा बापाच्या जागी काम करीत आहे. मनसब मिळेल अशी आशा बाळगून आहे." त्याला दीडशे जात व शंभर स्वार अशी मनसब देण्यात आली.

खानाजादखान याने सुरतच्या कारभाऱ्याकडून (एतिबारखान) व अहमदाबादचा काजी अबुल्फरह यांजकडून आलेल्या वस्तू बादशहासमोर ठेवल्या. (दोन तलवारी, दोन धनुष्ये, चार बंदुका, एक पुस्तक, व चार बरण्या मुरंबा इत्यादि).

मरहूम (ग्रंथपाल) फाजलखान याची मुले व नातू मीर जैनुल आबिदीन व मुहंमद इब्राहीम वगैरेंना हकीम हाजकखान याने सुतकातून (पित्याच्या शोकातून) बाहेर काढून आज्ञेप्रमाणे बादशहाकडे आणले. त्यांना उद्या हजर करा, अशी आज्ञा झाली.

**औरंगाबाद**

औरंगाबादचा किल्लेदार जफरखान वारला, असे बादशहाना कळविण्यात आले.

बादशहानी आज्ञा केली की, "अमानुल्लाखानाचा भाऊ व इंडी (विजापूरचा जिल्हा) चा ठाणेदार अताउल्लाखान याने आपल्या ठाण्यावर अर्धे पथक ठेवावे आणि अर्धे पथक घेऊन हुजुरात यावे.

अनुक्रमणिका

इनायतुल्ला मनसबदार याला शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात तैनात करण्यात आले. फाजलखानाची सर्व मालमत्ता त्याच्या वारसांना बहाल करण्यात आली.

अकबराबाद आग्रयाचा सुभेदार मुखतारखान याने घोलपूर परगण्यात नूर अफगाण याने पुंडावा केला तो तेथील फौजदार राजा कल्याणसिंग याने कसा मोडला ही हकीकत लिहून पाठविली. कल्याणसिंगचा मुलगा उदयराजे याची मनसब वाढविण्यात आली.

**सोळा मार्च १७०३**

मरहूम ग्रंथपाल फाजलखान याचा मुलगा मीर इब्राहीम याला बापाच्या जागी ग्रंथपाल नेमण्यात आले. बादशहानी आपल्या विश्रांती स्थानाची (आरामगाह) खिडकी (तंबुची) उघडून फाजलखानाच्या वारसास (भाऊ, मुले, जावई, मुलीची मुले) यांना बोलावले आणि त्यांना बक्षिसे व मनसबी दिल्या.

**खुदाबंदाखान**

विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान (शायस्ताखानाचा मुलगा) हा होता. त्याला इम्तियाजगड (अधोनी) ची फौजदारी पण देण्यात आली.

**जुन्नरचे आंबे**

मुहरमखान हा फळफळावळांचा आणि सरकारी बागांचा दारोगा (व्यवस्था पाहाणारा) होता. त्याने बादशहाना पुढीलप्रमाणे कळविले ——जुन्नरचा वाकियानिगार (वाकेनवीस) इमामअली याने मला पुढीलप्रमाणे लिहिले आहे: ——

> "जुन्नर परगाण्याजवळ इरसाली आंब्याची साडेतीनशे झाडे आहेत. आता झाडांना मोहर आला आहे. या झाडांची निगा राखण्यासाठी कुणाची तरी नेमणूक व्हावी." मेवादार (म्हणजे मुहरमखान) याने लिहिले की, (काळजीपूर्वक) आंबे तयार झाल्यावर पाठवावे. बादशाहानी आज्ञा केली की, सदर आंब्यांच्या झाडांचा दारोगा (व्यवस्था पाहाणारा) म्हणून पीर मुहंमदचा मुलगा रहमतुल्ला याला नेमण्यात आले आहे. मेवादारने त्याला पाठवावे.

**सतरा मार्च १७०३**

बादशहानी दुपारी अदालतमध्ये येऊन काम केले. खालसाचा दिवाण इनायतुल्ला आजारी होता. तो बरा होऊन आला आणि बादशहाना भेटला. सुरतेचा मुत्सद्दी एतिबारखान याजकडे बक्षीस म्हणून एक हत्ती पाठविण्याची आज्ञा झाली.

**औरंगाबाद**

अनुक्रमणिका

औरंगाबादचा किल्लेदार जफरखान हा वारला होता. त्याच्या जागेवर मतलबखानाचा भाऊ मुहमंद अहसन याची नेमणूक करण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली. मरहूम फाजलखानाच्या जागी अब्दुर्रहीमखान याची बयूतात म्हणून नेमणूक झाली. मुहमद बेग (दोस्त बेगचा मुलगा) याला गंजीकोटचा वाकेनिगार व बक्षी म्हणून नेमण्यात आले.

नवलाख उंबऱ्याचा ठाणेदार अदलसिंग याने अर्ज केला की, करडे निमोणे येथील माझी ठाणेदारी विनाकारण काढून घेण्यात आली, चौकशी व्हावी.

तोफा व इतर सामान बरोबर घेऊन शिवापूर कडेचे मोर्चे सुरू करावे अशी सद्रुद्दीन खान व अमानुल्लाखान यांना आज्ञा करण्यात आली.

उजबेगखान हा कोंडाण्याच्या भोवतालच्या भागाचा ठाणेदार होता. त्याला मुहमंद अमीनखान बहादुरच्या जागी त्याचे ठाणे किल्ल्याभोवती जेथे होते तेथे नेमण्यात आले. त्याच्या पूर्वीच्या ठाण्यावर अमानुल्लाखान याची नेमणूक करण्यात आली, मरहूम खानजहान याची पथके अमीनखानाच्या ऐवजी अमानुल्लाखान याजपाशी तैनात करण्यात आली. मुहमंद अमीनखान याजपाशी अब्दुर्रसूलखान, जाबिताखान व दिवंगत भीम (उदयपूरचा राजपुत्र) याचा नातू जोरावरसिंग यांना तैनात करण्यात आले.

ख्वाजा बसंत हा मक्केच्या यात्रेहून परत आला होता. तो बादशहाना भेटला. त्याला पाच अश्रफ्या, बारा चवण्णी व आठ होन ही बक्षीस देण्यात आली.

अबुल्फतह याला नस्रुल्ला ककड याच्या जागी बहावल (?) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

बाहशहाना कळविण्यात आले की,——

**मुधोजीचा मुलगा बजाजी मराठ्यांकडे**

मुधोजीचा मुलगा सजाजी (बजाजी) याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. तो बादशहाना सोडून हलकट शत्रूकडे (मराठ्यांकडे) निघून गेला.

अब्दुर रहीमखान (बयूतात खान्याचा अधिकारी) याचा भाचा मुहमंद मुहसिन हा नुकताच विलायतेहून (मध्य आशिया) आला होता. त्याला मनसब देण्यात आली.

बादशहाचा मुलगा मुहमंद अकबर याची मुलगी रजीयतुन्निसा ही शहाजादा रफीउकलदर याची बायको. तिला महिन्याला सातशे रुपये खाजगी खर्चासाठी देण्यात येत. बादशहानी त्या रकमेत तीनशेनी वाढ केली. (तिचा मासिक तनखा एक हजार झाला).

गुर्जबर्दार अताउल्ला याला आज्ञा झाली की, "अजमीरला जा आणि तेथून ऊंट घेऊन या."

औरंगाबादच्या बातम्यावरून पुढील हकीकत कळली——खानेआलम व जयसिंग यांनी खजिना बुऱ्हाणपुराहून औरंगाबादेस आणला.

शहाजादा बेदारबख्त हा औरंगाबादेहून बऱ्हाणपूरकडे रवाना झाला.

शुक्रुल्ला मेमार (बांधकाम तज्ञ) याला बहादुरगडातील महालांची दुरुस्ती व डागडुजी करण्यासाठी पाठविण्यात आले होते. बादशहानी आज्ञा केली की, बहादुरगडचे काम आटोपल्यावर शुक्रुल्लाने अहमदनगरला जावे आणि तेथील महालांची दुरुस्ती करावी.

अहमदनगरचा किल्लेदार अब्दुल्गफूर खान याने वरील कामासाठी शुक्रुल्ला यास दोन हजार रुपये द्यावेत अशी आज्ञा झाली.

**बेळगाव**

सैफखान हा आज़मनगर (बेळगाव) चा किल्लेदार व फौजदार होता. त्याला तळकोकणची फौजदारी पण देण्यात आली. त्याची मनसब पाचशेनी वाढविण्यात आली.

**सिंहगड**

सकाळी बादशहानी हमीदुद्दीन खानबहादूर यास आज्ञा केली की, “तुम्ही मन्सूरखानाच्या ठाण्यावर जा” जेथे दुसरा मोर्चा कायम करावा असे ठरले आहे. ती जागा पाहून या म्हणजे तिकडे मोर्चे बांधण्याचे काम चालू करण्यात येईल.

**अठरा मार्च १७०३**

आज बादशहानी दिवाणी (कचेरी) केले नाही. कामबक्षाच्या मुलाचा (सुल्तान मुहीयुल्ला) बक्षी मुसाहबखान याला कामबक्षाने खिलातीची वस्त्रे दिली. रसूलपूर (शिवापूर) कडची मोर्च्याची जागा पाहून हमीदुद्दीन खान परत आला.

**एकोणीस मार्च १७०३**

मन्सूरखानाच्या ठाण्यात आणखी एक मोर्चा कायम करण्यासाठी योग्य जागा पाहून यावे म्हणून बादशहानी काल हमीदुद्दीनखान बहादूर याला पाठविले होते.

आज्ञेप्रमाणे हमीदुद्दीन हा नवीन मोर्च्याची जागा पक्की करून आला. हा मोर्चा मन्सूर खानाच्या ठाण्याच्या परिसरात कायम करण्यात आला. तो हमीदुद्दीन खान याजकडे देण्यात आला. मोर्चा सांभाळण्याच्या कामावर सर्फराजखान वगैरेची नेमणूक करण्यात आली. त्या इसमांना पुढीलप्रमाणे बक्षिसे देण्यात आली:——

अनुक्रमणिका

(१) सर्फराज खान आणि त्याची मुले सर्फराजखान, मोती जडविलेली व (स्फटिक) बिल्वरची मूठ असलेला खंजीर.

(२) अब्दुल्कादर–पन्नास स्वार.

(३) मुर्तजा–वीस स्वार.

वरील माणसांना मोर्च्यावर जाण्यास निरोप देण्यात आला.

खानजहानी पथकाचा अधिकारी अमानुल्लाखान यालाहि बिल्लोर (स्फटिक) च्या मुठीचा खंजीर देण्यात आला. त्याने याबद्दल दोन मोहरा निसार म्हणून पेश केले.

अब्दुर्रहीमखान याच्या जागी दागे नसीह (घोड्यांना डाग देण्याच्या कामाचे खाते) मुहमंद जाफर दबीर याला नेमण्यात आले.

शेख अजमतुल्ला दरवेश याची मुले मुहमंदअली व असदुल्ला हे अहमदनगरहून आले होते. त्यांना खिलातीची वस्त्रे देण्यात येऊन त्यांना निरोप देण्यात आला.

मरहूम फाजिलखान याचा भाऊ मीर जैनुल आबिदिन याची मनसब वाढविण्यात आली.

बेनीशहादुर्गचा (पन्हाळा) बक्षी सय्यद इस्माईल याची मनसब वाढविण्यात आली.

खास चौकीचा ख्वाजा खिरद याची मनसब वाढविण्यात आली.

मुहंमद अमीनखान याच्या मध्यस्थीने सेना व अंकी (सेनाजी किंवा संताजी, अँकोजी) वगैरे पाच मराठे चाकरीच्या उद्देशाने आले होते. त्यांना खिलातीची वस्त्रें देण्यात आली.

उम्दउल्मुल्क खानफीरोजजंग याच्या सैन्यांत मुहंमद काजम हा दिवाण होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

चाकणचा किल्लेदार सय्यद जाफर मरहूम जानबाजखान याचा मुलगा सय्यद जाफर हा चाकणचा किल्लेदार होता. तो येऊन बादशहाना भेटला. त्याने एक मोहर निसार म्हणून पेश केली. बादशहानी त्याला जानबाजखान ही पदवी दिली. त्याला चारशे जात व दोनशे स्वार अशी मनसब आहे.

नळ दुर्गचा किल्लेदार मुहतशमखान नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मुहतशमखान याने विनंती लिहून पाठविली की, मला नळदुर्ग येथे मनसब जहागीर आहे. तीहि कोणतीही अट न लावता तनखा म्हणून देण्यात आली आहे. पूर्वीचा किल्लेदार कासिमखान याने माझ्या जहागिरीतून पैसे वसूल केले आहेत. विशेष अधिकारी नेमण्यात येऊन त्यांच्याकडून मला रकम देवविण्यात यावी. बादशहानी या कामावर अब्दालबेग याचा मुलगा बहादुरदिल गुर्जबर्दार याची नेमणूक केली.

अनुक्रमणिका

शहाजादा आज्ञम याच्या पदरी मुहंमदबेग याचा मुलगा मुहंमदअली हा होता. त्याला कामबक्षपाशी तैनात करण्यात आले.

### वीस मार्च १७०३

विजापूरचा सुभेदार चीन किलीजखान याला चार हजारी मनसब होती. त्याच्या मनसबीत त्याला फायदेशीर असे बदल करण्यात आले. चाकणच्या किल्लेदाराच्या (जाफर जानबाजखान) याच्या मनसबीतहि अशीच सूट देण्यात आली. खेडचा फौजदार मुबारिज यालाहि जानबाज ही पदवी होती. ती पदवी काढून घेऊन त्याला नबीखान (?) ही नवी पदवी देण्यात आली. (चाकण उर्फ इस्लामगडाचा किल्लेदाराला जानबाजखान ही पदवी देण्यात आल्यामुळे हा बदल करण्यात आला.)

दौलताबादचा किल्लेदार मुबारक खान किल्ल्यात रात्रीची गस्त घालण्यात सय्यद जैनुल आबिदीन वगैरे सहकारी उपयुक्त कामगिरी बजावीत आहेत, असे कळविल्यावरून बादशहानी त्याच्या मनसबी वाढविल्या, ही विनंती दौलताबादचा किल्लेदार मुबारकखान याने लिहून पाठविली होती.

सय्यदखान उर्फ सय्यदलाल याने चाकरीसाठी माणसे आणली होती. त्यांना मनसबी देण्यात आल्या.

बादशाही छावणीचा कोतवाल सरबराहखान याला बादशहानी बोलावून त्याला दोनशे रुपये किमतीचा झगा दिला.

### सिंहगड

किल्ल्याभोवती हमीदुद्दीनखान बहादूर याने दुसरा मोर्चा कायम केला होता. त्याला सामग्री सामान वगैरे पुरविण्यासाठी सरबराहखान (बादशाही छावणीचा कोतवाल) याला पाठविण्यात आले.

सातारा व कऱ्हाड येथील फौजदार यासीनखान, बादशहाना कळविण्यात आले ते असे, आज्ञमतारा (सातारा) चा फौजदार व कऱ्हाड वगैरेचा ठाणेदार यासीनखान याने तोफा बहादुरगडला पोहोचविल्या असून तो इकडे आला आहे. रेहेकलाबार (शस्त्रागार) मध्ये प्रवेशासाठी त्याला दस्तक (प्रवेश पत्र) पाहिजे——द्यावे अशी आज्ञा झाली.

### एकवीस मार्च १७०३

बादशहाना कळविण्यात आले की, पुढील फौजदार हे व्यापाऱ्यांकडून सक्तीने राहदारपट्टी (मार्ग रक्षणासाठी) वसूल करीत आहेत:——

(१) ग्वाल्हेर व शहाबाद येथील फौजदार जान निसारखान,

अनुक्रमणिका

(२) इटावा व धामोणी येथील फौजदार खैर अंदेशखान,

(३) रणोदा (बुंदेलखंड) येथील फौजदार शेर अफगनखान.

बादशहानी शंभर-शंभर स्वारांनी त्यांच्या मनसबी कमी केल्या.

इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) चा माजी किल्लेदार मुरीदखान याला आज्ञा झाली की, त्याने बेगम साहेबा (जीनतुन्निसा) बरोबर यावे.

ख्वाजा आदिलखान याला दिल्लीकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

मरहूम लुत्फुल्लान याचा नोकर ख्वाजा अन्वर याला मनसब देण्यात आली.

**बावीस मार्च १७०३**

दिघस एक प्रहर दोन घाटिका आला असता बादशहा अदालत (न्याय कचेरी) मध्ये आले.

बादशहाजादा आज्ञम व शहाजादा मुहजुद्दीन मुलतानचा सुभेदार यांची पत्रे आली. बंडखोर बख्त्यारला मारून आपण त्याचा किल्ला जिंकल्याचे मुहजुद्दीन याने कळविले होते.

पुढील मंडळी बादशहाना भेटली आणि त्यांनी निसार (ओवाळणी) पेश केली:—

(१) सातार्‍याचा फौजदार यासीन खान,

(२) कादर दादखान, (३) नेमत, (४) कलालखान, (५) मुहंमदशहा मुहतसिब (सार्वजनिक नीतिमते वर देखरेख ठेवणारा) याची मनसब वाढविण्यात आली. दारोगा मुहंमद जाफर याला रजातलबखान ही पदवी देण्यात आली.

तोफखान्याचा कोतवाल बुद्धूचंद हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बख्शी उल्मुल्क मिर्जासद्रुद्दीन मुहंमदखान याच्या मार्फतीने आलेल्या पुढील मंडळींना मनसबी देण्यात आल्या:——

(१) मुहंमद सादिक, (२) अली अकबर, (३) अली मुल्ला कमाल.

औरंगाबाद सुभ्यात तैनात असलेला हरकारा केशव याने लिहून कळविले की, उम्दतुल्मुल्कखान फीरोजजंग यांच्या सन्यातील मनसबदार हे परवानगी वाचून आले असून ते दरवाज्यावर (औरंगाबादच्या वेशी) बसून आहेत. त्यांना रुहुल्लाखान याने ताकीद लिहून पाठवावी, अशी आज्ञा झाली.

**सिंहगड**

अनुक्रमणिका

जासूदांच्या तोंडून पुढील हकीकत कळली—दुसरा मोर्चा किल्ल्यासमोर कायम करण्यात आला होता. तेथे काल अमानुल्लाखान, सरबराहखान आणि हमीदुद्दीन खानाचे अधिकारी हे संध्याकाळपर्यंत होते. कल्याण दरवाजापासून बंदुकीच्या टप्प्यापर्यंत पोहोचून त्यांनी तेथे मोर्चे कायम केले आहेत.

मरहूम फाजलखान याच्या जहागिरी आता मोकळ्या आहेत. त्या आपल्याला मिळाव्या आणि फाजलखानाच्या वारसांना तनखा ठरविण्यात यावा, अशी विनंती मुनीमखान (हा पुढे पंतप्रधान झाला) याने केली. इनायतुल्लाखान याने चौकशी करून कळवावे, अशी बादशहाने आज्ञा केली.

**तेवीस मार्च१७०३**

बादशहानी दुपारी अदालत (न्याय कचेरी) चे काम केले. बादशहानी आज्ञा केली की, “खान फीरोजजंग आणि चीन किलीजखान यांनी बेगम जिऊ (जीनतुन्निसा बेगम) आणि अंतःपुरातील स्त्रिया यांच्याबरोबर यावे. यासाठी जाहिदबेग गुर्जबर्दार याला पाठविण्यात आले. बादशहाजादा कामबक्ष याने वाटेत बेगम जिऊ (जीनतुन्निसा) यांना जाऊन मिळावे आणि चीन किलीजखान याला विजापूरकडे पाठवावे आणि मग परत यावे.

**तळ कोकणचा दिवाण**

जाबिताखान हा तळ कोकणचा दिवाण होता. त्याच्या जागी मुहंमद हुसेन याचा मुलगा अब्दुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

इस्लामगड उर्फ चाकण येथील फौजदार व किल्लेदार मुहंमद जाफर उर्फ जानबाजखान याला निरोप देण्यात आला.

**मलिक जब्त तोफ**

बादशहानी आज्ञा केली की, “कोल्हापूरचा ठाणेदार नाहरखान याने मलिकजब्त तोफ कोल्हापुराहून बहादूरगडला पोहोचवावी.

हकीम हाजकखान याचा भाऊ मुहंमद हुसेन याला सात मोहराच्या किंमतीचा घोडा बक्षीस देण्यात आला.

बादशहांनी काल रात्री बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान याला बोलावून घेतले. अर्ध्या घटकेनंतर त्याला आपल्या डेऱ्याकडे परत जाण्यास निरोप देण्यात आला.

**एकवीस मार्च १७०३**
**[मागील नोंदीच्या पूर्वीचे]**

अनुक्रमणिका

चाकणच्या किल्लेदारीवरून जान बाजखान याला बदलण्यात आले. त्याच्या जागी कामयाबखान याची नेमणूक करण्यात आली. (कामयाबखान हा तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याचा भाऊ.)

### सिंहगडचा नियोजित किल्लेदार

सय्यदजानबाजखान याला कोंडाणा उर्फ बख्शिंदाबख्शचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

### दिवाण किफायतखान

सुभे मुहंमदाबाद उर्फ बेदर येथील दिवाण किफायतखान हा मरण पावला. त्याच्या जागेवर दियानतखानाचा मुलगा अलीनकी याची नेमणूक करण्यात आली.

### मंगळ वेढा

मंगळवेढ्याचा किल्लेदार मुजफ्फर हुसेन हा होता. त्याला तेथून बदलण्यात आले होते. त्याने विनंती केली की, "आपल्याला कोंडाणा उर्फ बख्शिंदाबख्शची किल्लेदारी देण्यात यावी. बादशहानी विनंती मान्य केली नाही.

सुभे अजमीरचा दिवाण सय्यदअली याने खालशाचा दिवाण इनायतुल्लाखान याला पुढीलप्रमाणे लिहून पाठविले:—

"रणखंभोरच्या तोफखान्याचा दारोगा बख्शी व वाकेनिशी या हुद्यावर असलेला मीर सिकंदर याने खालशाच्या महालातून रकमा करून वापरल्या आहेत. जाब मागितला तर समाधानकारक उत्तर देत नाही" त्याला बदलून दुसऱ्यास नेमावे, अशी आज्ञा झाली. अहमदनगरचा किल्लेदार अब्दुलगफूरखान याला हुजुरात बोलावण्यात आले होते. त्याला आता अहमदनगरमध्येच राहाण्यास सांगण्यात आले.

अब्दुल्ला यास तळ कोकणच्या दिवाणीवर नेमण्यात आले.

### चोवीस मार्च १७०३

आज शुक्रवार, कचेऱ्या बंद होत्या.

### पंचवीस मार्च १७०३

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली—पाऊस सुरु झाला होता. अशा वेळी किल्ल्यातून (कोंडाणा) दीड हजार सैनिक बाहेर पडले. त्यांनी उजबेकखानाच्या ठाण्यावर चाल केली. उजबेकखानाने त्यांचा प्रतिकार केला. बंदुकीची गोळा गोळी झाली. शत्रूपैकी (मराठे) अनेक जण मारले गेले. अनेक जण जखमी झाले. शत्रूचा पराभव झाला. आपल्या कडील काही माणसे मारली गेली आणि चार-पाच जखमी झाली, दोघांना दगडाचा मार बसला. यानंतर शत्रू (मराठे) किल्ल्यात पळून गेले.

अनुक्रमणिका

काल हमीदुद्दीन खानबहादूर याचकडे वकील म्हणून शत्रूची (मराठ्यांची) पाच माणसे किल्ल्यावरून आली. हमीदुद्दीनखान याने आज्ञेप्रमाणे त्यांना शहाजदा कामबक्ष याजकडे पाठविले. "शहाजादाने त्यांना एकंदर हकीकतीची चौकशी केली. त्यांना अभयदान दिले. त्यांच्यापैकी एकाला खिलातीची वस्त्रे आणि इतर चौघांना शाली दिल्या. आणि त्यांना हमीउद्दीनखान याजकडे पाठविले. त्यानेही आज्ञाप्रमाणे त्यांना खिलातीची वस्त्रे व शाली दिल्या. बादशहानी तरबियतखानाला आज्ञा केली की, जुल्फिकारखानाकडे सैन्याचा तीन महिन्याचा पगार द्यावा.

बक्षीउल्मुल्क मिर्जासद्रुद्दीन याला शहाजादा कामबक्ष पाशी तैनात करण्यात आले. कामबक्षाच्या सैन्यात असे अनेकांना तैनात करण्यात आंले. कामबक्षाच्या सैन्यात अघाडीला मुहंमद अईजा व सर्फराजखान, उजव्या फळीवर सद्रुद्दीन मुहंमदखान, डाव्या फळीवर नेकनामखान, मुहतशमखान पिछाडीला अशा नेमणुका झाल्या. शंभर वर्कदाज दोनशे बंदोबस्तासाठी, पाचशे बाण, सरब तेवीस मण, बंदुकीची दारू वीसमण अशी सामग्री देण्यात आली. आंज शहाजादा कामबक्ष तळाकडे (ब्रह्मपुरी) जाणार अशी बातमी होती.

सिद्दीयाकूत (दंडराजपुरीला) कामबक्ष बागेवर जाण्यास निरोप देण्यात आला.

**बागलाण्याचा फौजदार**

बादशहाच्या फर्मानाच्या उत्तरात बागलाणचा फौजदार अलीखान याचा अर्ज आला तो बादशहाच्या नगरेखालून गेला.

**सत्तावीस मार्च १७०३**

अब्दुल्रसूलखान रोजबहानी याचा मुलगा नफसबूबेग याला कामबक्षाच्या फौजेच्या तोफखान्याचा अधिकारी नेमण्यात आले.

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली——गुर्जबर्दारला औरंगाबादेस पाठवा तेथून मुघलखान खजिना आणीत आहे. मरहूम लुत्फुल्लाखान याचा भाऊ इनायतखान (निजामाउल्मुल्काचा मामा) पण औरंगाबादला आहे. खजिना संरक्षक पथकासह आणावा आणि इनायतखानाला चीन किलीजखानाच्या फौजेत नेऊन पोहोचवावे.

फतेउल्लाखान याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला——"पन्हाळगडचा किल्लेदार रावतमल झाला. याने नियमाहूनहि जास्त माणसे बाळगली आहेत. त्याने उत्कट बंदोबस्त राखला आहे. त्याने मनसबीत वाढ व्हावी अशी आशा व्यक्त केली आहे. विनंती मान्य व्हावी. रुहुल्लाखान याने त्याचा हुद्दा काय आहे तो कळवावा अशी आज्ञा झाली.

काजी अकरमखानाचा मुलगा व ब्रम्हपुरीच्या तळाचा काजी निजामुद्दीन हा मरण पावला अशी बातमी आली.

## अठ्ठावीस मार्च १७०३

बेळगावचा किल्लेदार व फौजदार व तळ कोकणचाही फौजदार सैफखान याला चीन किलीजखानाच्या बदलीमुळे पुन्हा वरील जागावर कायम करण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

मुहंमद अमीन हैद्राबादी याचा मुलगा मुहंमद सालेह याने पुढीलप्रमाणे विनंती केली. —“आपण पूर्वी वऱ्हाडचे सुभेदार अलीमर्दानखान याजपाशी तैनात होतो. आता अलीमर्दाखान हे स्वतः शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात आहेत. मला वऱ्हाडात तैनात करण्यात यावे” विनंती मान्य करण्यात आली.

## एकोणतीस मार्च १७०३

दिवसाचे एक प्रहर चार घटका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरीत) मध्ये आले. हमीदुद्दीन खानबहादूर याची नेमणूक दुसऱ्या मोर्च्यावर झाली होती. पण हमीदुद्दीनखान याने हुजुरात राहावे आणि त्याचा नायब अमानुल्लाखान याने मोर्चा सांभाळावा अशी पण आज्ञा होती. आता बादशहानी हमीदुद्दीनखान याला दिवाण (कचेरी) पूर्वी बोलाविले. त्याला पन्नास (५०) रुपये किमतीची ऊंची कट्यार दिली आणि त्याला आज्ञा केली की “तुम्ही मोर्च्यावर जाऊन तो सावधगिरीने सांभाळावा.”

अदालत (न्यायकचेरी) चा दारोगा (व्यवस्था पाहाणारा) रशीदखान याला त्याच्या हुद्याला जोडून तिसरा बक्षी मिर्जा सद्रुद्दीन मुहंमदखान याचा नायब म्हणून नेमण्यात आला.

मरहूम फाजलखान याच्या मालमत्तेपैकी दोन हत्ती बादशहानी नजरेखालून घातले.

छावणीचा मुख्यकाजी अक्रमखान आणि त्याचा मुलगा सादुद्दीन यांना निजामुद्दीनच्या सुतकातून (मातम-शोक) काढून, बादशहानी त्यांना प्रत्येकी एक बालाबंद (अलंकार) दिला.

सफराजखान हा सहाहजारी मनसबदार, बादशहाजादा कामबक्ष याजपाशी तैनात होता. आपल्या आर्थिक दुस्थितीचे तो रडगाणे करु लागला. बादशहानी त्याची मनसब एक हजारांनी कमी केली. सर्फराजखान याला कामबक्षापाशी राहाण्यास नको होते. अब्दुल्र्सूलखान याचा मुलगा मकसूदबेग हा कामबक्षाच्या फौजेच्या तोफखान्याचा दारोगा होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

खजिना खात्याचा मुश्रफ (हिशेब ठेवणारा) आणि नंदरामचा मुलगा रामसिंग याला एक शाल बक्षीस देण्यात आली.

जाबितखानाच्या जागी अब्दुल्ला याची दाभोळ बंदराचा दिवाण व राजापूरचा अमीन म्हणून नेमणूक करण्यात आली.

दिवसाच्या चार घटिका झाल्या तेव्हा बादशहानी हमोदुद्दीनखान याला आपल्या शय्यागृहात बोलाविले आणि त्याला रसूलपूरच्या (शिवापूरच्या) मोर्च्यावर जाण्यासाठी निरोप दिला. निरोपाच्या वेळी बादशहा म्हणाले. “कोंडाण्यातील गनीम हे किल्ला रिकामा करुन देतील, तर बरे, नाही तर किल्ल्यावर हल्ला चढवून सर्वांची कत्तल करा. हमीदुद्दीनखानाबरोबर कुमक नगारे, नगारची ही देण्यात आली.

विजापूर सुभ्याचा देशपांडे (कानून गो) रुद्राजी पंडित याचा भाऊ मल्हारी याला हुजुरात घेऊन यावे म्हणून एक गुर्जबर्दाराला नेमण्यात आले.

मिफताहगडचा किल्लेदार (बदललेला) किशोरसिंग याची मनसब कमी करुन त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

**तीस मार्च १७०३**

मुहतशमखान हा नळदुर्गचा किल्लेदार आणि फौजदार होता. बादशहानी त्याला वरील हुद्याच्या जोडीला अक्कलकोट व ढोकी या दोन्ही परगण्यांची फौजदारीहि दिली. त्याची मनसबीत वाढ करण्यात आली. [त्याच्या पूर्वीचा किल्लेदार कासमखान याला कोहीर (आंध्र) चा फौजदार नेमण्यात आले.]

मुखलिसखान मरहूम याच्या मुलाचा पालक हाजी अब्दुल्ला याला शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेच्या तोफखान्याचा प्रमुख, औरंगाबाद सुभ्याचा बख्शि व वाकेनवीसी या हुद्यावर नेमण्यात आले. त्याच्या पूर्वी या हुद्यावर बेदरबख्ताकडे असलेल्या एतिमादखान ऊर्फ मुहंमद मुहसीन याला हुजुरात बोलावण्यात आले.

दिल्लीहून कळविण्यात आले की, अबुल्हसन (गोवळकोंड्याचा शेवटचा राजा) याचा मानलेला मुलगा अबु मुहंमद याने एकाचा खून केला आहे. काय आज्ञा! बादशहानी त्याला कैद करुन कोतवालाच्या ताब्यात देण्याची आज्ञा केली, त्याची मनसब काढून घेतली आणि त्याला रोजीना खर्चासाठी पाच-सहा रुपये देण्यात यावे अशी आज्ञा केली.

हमजाखान याचा मुलगा असदुल्ला याला कंधार (जिल्हा नांदेड) चा किल्लेदार व फौजदार नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याने लिहून पाठविले की, पुरदिलखान हा दीडहजारी मनसबदार आहे. माणूस कामाचा आहे. त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहानी आज्ञा केली की, अब्दुलकादरचा जावई आणि सर्फराजखानाचा मुलगा असदुल्लाखान याचा मुलगा सय्यदअली व सर्फराजखानाची इतर मुले यांनी कामबक्षाच्या ऐवजी हुजुरात चाकरी पत्करावी.

सखरलना (विशाळगड) च्या हरकाऱ्याने पुढील बातमी कळविली. :——

“गनिमाचे सुमारे पाचशे स्वार टेकडीवर चढून आले. किल्लेदार राजा उदितसिंग याचा नायब भवानीदास हा होता. त्याने धावून जाऊन अनेक शत्रूंना ठार मारले आणि पुन्हा ठाणी कायम राखली.

**एकतीस मार्च १७०३**

बख्शी उल्मुल्क रूहुल्लाखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला:——

“पुण्याचा किल्लेदार व फौजदार खानचंद याने शत्रूचे वीस घोडे आणि एक कापलेले शीर ताब्यात घेतली आहेत. बादशहानी आज्ञा केली की, घोडे (खानचंदाला) माफ करण्यात यावेत. शिर मात्र कोतवालाकडे देण्यात यावे.”

बादशहानी आज्ञा केली की, अहदियानचा तनबख्शी बाकरखान याने आपले अहदी (शिलेदार) घेऊन मुहंमद अमीन खानबहादूर याचे ठाण्यावर जावे आणि ते काम सांभाळावे.

**एक एप्रिल १७०३**

बादशहाला पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: —

कोंडाणा (सिंहगड) किल्ल्यातील गनीम (मराठे) यांनी पुढीलप्रमाणे विनंती केली आहे: —

“आम्हाला एक महिन्याची मुदत मिळावी आणि किल्ल्यात असलेल्या सामग्रीची किंमत मिळावी.”

बादशहानी ही विनंती फेटाळून लावली. त्यांनी मतलबखान यास बोलावून त्याला म्हटले:

तुम्ही तरबियतखानाकडे (सिंहगडासमोरचा मोगलांचा सेनापती) जा. त्याला म्हणावे, “या गनिमात (मराठ्यात) मातब्बर माणसे नाहीत. त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवू नये. सरळ किल्ल्यावर चढाई करून सर्वांची कत्तल करावी.”

बादशहाच्या आज्ञेने इनायतुल्लाखान याने बादशहाजादा आज्रम याला लिहिलेले आज्ञापत्र, बख्शिशबेग गुर्जबर्दार हा आज्रम (गुजारतचा सुभेदार) कडे पोहोचवून उत्तर घेऊन आला. ते बादशहानी नजरेखालून घातले.

**दोन एप्रिल १७०३**

जुल्फिकारखानाचा नायब दाऊतखान हा हैद्राबाद-कर्नाटकचा फौजदार होता. त्याचा भाऊ सुलेमानखान हा दाऊदकानाबरोबर येऊन बादशहाला भेटला. त्याने अठरा अश्रफ्या निसार म्हणून पेश केले व दोन समशेरी दिल्या. बादशहानी एक समशेर ठेवून घेतली. सुलेमानखानाला तीनशे रुपये

किंमतीची समशेर व खिलातीची वस्त्रे दिली. सुलेमान खानाची मनसब वाढविण्यात आली. बादशहानी रूहुल्लाखानास आज्ञा केली की, “तुम्ही सुलेमानखानाला आपल्याबरोबर घेऊन जा आणि त्याला कोंडाणा किल्ल्यासमोर जो दुसरा मोर्चा उघडला आहे तेथे नेमा.

बादशहानी काहीच्या मनसबी वाढविल्या. काहीच्या कमी केल्या.

इरादतखान (आत्मचरित्रकार) पुण्याच्या ठाण्याच्या खाली असलेल्या मार्गाच्या संरक्षणाचे काम देण्यात आले. मिफ्ताहगड (चंदनगड) ची किल्लेदारी केशवसिंगच्या जागेवर मिया दाऊत रजातबराई याला देण्यात येऊन त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

मरहूम दिलेरखान याचा मुलगा कमालुद्दीन हा अडीच हजारी मनसबदार होता. तो वारला, असे शहाजादा मुअज्ञम बहादूरशहाकडे आलेल्या बातम्यावरून कळले. कमालुद्दीनच्या मुलाचा हुद्दा कळवावा, अशी आज्ञा झाली.

मुनीमखानाचा (हा पुढे बहादुरशहाच्या काळात मोगल साम्राज्याचा पंतप्रधान झाला) मुलगा मुहंमद काजम याला दुसऱ्या मोर्च्याच्या तोफखान्याचा दारोगा नेमण्यात आले. बादशहानी त्याला बालाबंद बक्षीस दिला.

कचेरीचा दारोगा यारअलीबेग याने आपल्या कामाचा राजीनाम देत असून त्या जागेवर इतर कुणाची तरी नेमणूक करावी, अशी विनंती केली.

## तीन एप्रिल १७०३

यारअलीबेग याच्या जागेवर बादशहानी फत्तेहदौलत कौल याची नेमणूक केली. त्याचे पूर्वीचे हुद्दे (१) खाशाचा दारोगा, (२) महालाच्या आतील खजिन्याचा फौजदार, (३) पालखीखान्याचा दारोगा याला जोडण्यात आले. त्याची मुले फतेहनुस्रत व फतेहमुबारक यांना बादशहानी वेगळ्या जागा दिल्या.

कमालुद्दीन (दिलेरखानाचा मुलगा) याचा मुलगा रूस्तम याची मनसब वाढविण्यात आली.

मरहूम अब्दुल रज्ज़ाकखान (रायगडचा फौजदार) याचा दत्तक मुलगा मुहंमद जाफर याची मनसब वाढविण्यात आली.

सर्फराजखान यास अजीजखानाच्या पथकाबरोबर हमीदुद्दीनच्या मोर्च्यावर पाठवावे, अशी बादशहाने आज्ञा केली.

काल बादशहानी मुनीमखान याचा मुलगा मुहंमद काजम याची हमीदुद्दीनच्या मोर्च्याचा दारोगा म्हणून नेमणूक केली.

अनुक्रमणिका

वऱ्हाडच्या जिजियाकराचा अमीन (अधिकारी) याला बदलण्यात आले होते. त्याची मनसब कमी करण्यात आली. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की, इखलासखान हा चीन कुलीजखानाच्या फौजेज तैनात होण्यासाठी विजापूरकडे रवाना झाला आहे. रूहुल्लाखान याने अर्ज केला की, मिहदखान हा मोर्च्यात कामगिरी बजावीत आहे. त्याला काम करू द्यावे. त्याच्याकडे काही सरकारी बाकी असल्यास तो देणे देण्यास तयार आहे. विनंती मान्य करण्यात आली आणि त्याची दीड हजाराची मनसब बहाल ठेवण्यास आली. चाकणचा किल्लेदार जानबाजखान याच्या शिफारशीवरून त्याच्या पदरच्या लोकांना मनसबी देण्यात आल्या.

हरकाऱ्याच्या तोंडून कळले ते असे:—

> अब्दुल करीम हा मन्सूरखानाच्या ठाण्यात तैनात होता. मावळे त्याच्या पथकात होते. त्यानी कोंडाणा किल्ल्यावर दोर लावले आणि त्यांच्या सहाय्याने ते वर चढले. किल्ल्यावरील मराठे हे जागे झाले आणि त्यांनी हल्ला चढविला. चकमकी झाल्या. मोगलाची चार माणसे किल्ल्यावर चढली होती आणि आणखी दहाजण त्यांच्या पाठोपाठ गेले होते. चकमकीत मोगलांची चार माणसे ठार व दहा माणसे जखमी झाली.

खान फिरोजजंग याने विनंती केली की, एक हजारपर्यंत माणसे मी आपल्या पथकात अधिक बाळगली. आतापर्यंत तीनशेवीस माणसे आली आहेत. नाहरखानची सर्व मुले माझ्या पथकात घेण्याची आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

काजी महमूद यांची मुले व नातू यांना राहिरी (रायगड) येथे तैनात करण्यात आले.

ख्वाजा हबीबुल्ला हा मुर्तजानगर (कोहीर) चा किल्लेदार होता. किल्ला शत्रूंच्या ताब्यात गेला. हबीबुल्लाची मनसब काढून घेण्यात आली पण आता त्याला हुजुरात बोलावण्यात आले आणि त्याची मनसब बहाल करण्यात आली. कारण तोपर्यंत किल्ला पुन्हा ताब्यात आला होता. किल्लेदाराची मनसब कमी करण्यात आली.

अळंगचा किल्लेदार किशोरसिंग याने लिहून पाठविले की, किल्ला जागजागी मोडकळीस आला आहे, काय आज्ञा? बादशहानी आज्ञा केली की, "दुरूस्त करा."

किल्लेदाराची दुसरी विनंती अशी की, "किल्ल्यात रसद, धान्य आदि सामग्री नाही." बादशहानी आज्ञा केली की, "खानसामान (पुरवठा अधिकारी) वरील सामग्रीचा पुरवठा करतील."

मन्सूरखानाने मोर्च्यातून लिहून पाठविले की, "आज्ञा झाल्यास मुजऱ्यासाठी हुजुरात येईन म्हणतो":—

बादशहानी आज्ञा केली की, "येथे काय काम आहे. तुम्ही तेथेच रहा."

सुलेमानखानाचा नातू मुहंमद फाजिल हा मनसबदार होता. त्याने बादशहाची भेट घेतली.

अनुक्रमणिका

कामबक्षाचे पत्र आले ते बादशहानी नजरेखालून घातले. बादशहानी दिवाणात (कचेरी) रुहुल्लाखान याची आठवण काढली. तो सुलेमानखानाला मोर्च्यावर पोहोचविण्यास गेला आहे, असे कळले.

तरबियतखानाच्या विनंतीवरून गुलाम मुहंमद रफीअली याला मोर्च्यात तैनात करण्यात आले.

काजी महमूद हा इस्लामगड (रायगड) येथे तैनात होता. त्याचा मुलगा मुहंमद इब्राहीम व बिरादरीचे शेख अहमद व मुहंमद फाजिल यांना मनसबी देण्यात आल्या.

मुस्ताफानगर (कोंडापल्ली, सुभे हैद्राबाद) चा किल्लेदार ख्वाजा हबीबुल्ला याला हुजुरात बोलविण्यात आले.

बादशहानी सोन्याची दहा कडी तरबियत खानाचा मुलगा मुहंमद इसहाक याजपाशी दिली आणि म्हटले ही तरबियतखानाला द्या. त्याला सांगावे की, किल्ल्यावर हल्ला होईल त्यावेळी (आपल्या चाकरीतील) मावळ्यांना ही कडी देण्यात यावी.

**चार एप्रिल १७०४**

हैद्राबादचा सुभेदार रुस्तमदिलखान याने गनिमाकडून मुस्ताफानगरचा किल्ला घेतला होता. तेथे मुहंमद हाशम याची किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. बुणग्याच्या (ब्रम्हपुरीच्या हरकाऱ्या) कडून कळले की, जीनतुन्निसा बेगम वगैरे मंडळी तेथून बावीस तारखेस (एकोणीस मार्च १७०३) बहादुरगड (पेडगाव) कडे रवाना झाली. छावणीचा मुख्य काजी अक्रमखान याचा नातू आणि निजामुद्दीनचा मुलगा नसीरुद्दीन याला बापाच्या मृत्यूनंतर मनसब देण्यात आली.

रुहुल्लाखान याने बादशहाच्या आज्ञेप्रमाणे सुलेमानखान याची नेमणूक मोर्च्यात मिहदीखान याच्या ठाण्याच्या खाली केली आणि तो परत आला.

अळंगचा किल्लेदार किशोरसिंगचा अर्ज–किल्ल्याच्या तटाची व बुरुजांची डागडुजी होणे आवश्यक आहे. आज्ञा झाली की, डागडुजी करावी. दुसरी विनंती अशी, की किल्ल्यात सामग्री नाही. आज्ञा झाली की खानेसामान (पुरवठा अधिकारी) सरंजामाची व्यवस्था करावी.

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दीयाकूत याने कलिंगडाची पंचवीस करंडी पाठविली होती. ती मेवाखान्यात पाठविण्याची आज्ञा झाली.

**पाच एप्रिल १७०५**

मुलतान सुभ्यात कामगिरी केल्याबद्दल शहाजादा मुइजुद्दीन याला खिलातीची वस्त्रे, नऊ हजार पयांची कट्यार, व एक लाख रुपयेही देण्यात आली. पंतप्रधान असदखान आजारातून उठला होता. तो बादशहाना भेटला.

अनुक्रमणिका

## धनाजीचा मुलगा

हेरांनी पुढील बातमी आणली:

धनाजीचा मुलगा शंभा (शंभूसिंग) व मल्हार व खंडोजीचा मुलगा हे सरदार चार हजार स्वारांच्या सैन्यासहित बादशाही छावणीपासून चार कोसावर आले असून इरादतखानाच्या ठाण्याला त्यांनी वेढा घातला आहे. इरादतखानाशी त्यांची लढाई चालू आहे. बादशहानी सियादतखानाला इरादतखानाच्या मदतीस पाठविले.

सकाळी हमीदुद्दीनखान हा मोर्च्यातून येऊन बादशहाना भेटला. दिवसाचा एक प्रहर आणि सहा घटिका झाल्या असता हेरांनी बातमी आणली की, युद्ध अजून चालू आहे. ख्वाजाखान व सुलेमान खान हे इरादतखानाच्या मदतीला धाऊन गेले आहेत. त्यांच्या पथकांपैकी काही कामबक्षाच्या डेऱ्याभोवती आहेत. बादशहानी हमीदुद्दीनखान, रुहुल्लाखान, व मतलबखान यांनी एकत्र होऊन गनिमांचे पारिपत्य करावे म्हणून त्यांना जाण्याची आज्ञा केली.

या हल्ल्याचा अधिक तपशील हरकऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली:—

> पुणे गावातील गुरे पळविली. शहाजादा कामबक्ष याच्या कारखान्यावर (पागा, उंटखाने इत्यादि) यांच्यावर आणि बादशाही छावणीतील लोकांवर हल्ला चढविला. हे लष्कर आणि कारखाने खडक या गावाच्या गढीबाहेर पसरले होते. तेथे इरादतखानाचे ठाणे होते. मराठ्यांनी त्याला वेढा घातला आणि ते इरादतखानाशी युद्ध करू लागले. या बाबतीत हरकऱ्यांनी सांगितले की, खैरखान हा इरादतखानाच्या मदतीला गेला होता. पण तो व त्याचे बादशाही पथकातील सोबती हे जखमी झाले. खैरखानाने फरीदूनला आपल्याकडून पाठविले होते. तो हुजूरात आला.

बादशहाना कळविण्यात आले की, “कोंडाणा किल्ल्याभोवती आपली ठाणी आहेत. त्या ठाण्यावर सुलेमानखान व ख्वाजाखान हे होते. बादशहाच्या आज्ञेविना आपापल्या ठाण्याहून बाहेर पडले आणि मराठ्यांच्या पाठलागावर निघाले.

बादशहानी सादतखान यास बोलावून त्याला मराठ्यांच्या पारिपत्त्यासाठी रवाना केले. बादशहा हे फतेहदौलत कौल याला म्हणाले:

> “बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान यांना म्हणावे की, मराठ्यांच्या पारिपत्यावर रवाना व्हा” रुहुल्लाखानाने निरोप धाडला की, “माझ्याजवळ पथके नाहीत.” यावर बादशहानी आज्ञा केली की, “तुम्ही व हमीदुद्दीन यानी मिळून मराठ्यांचे पारिपत्य होईल., असे करावे.” मनसबखान व सर्फराजखान यांना रुहुल्लाखानाबरोबर जाण्याची व तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक यांस तोफखान्याचा सरंजाम पुरविण्याची आज्ञा करण्यात आली.”

अनुक्रमणिका

ब्रम्हपुरीच्या तळावरुन बातमी आली की, जीनतुन्निसाबेगम (औरंगजेबाची मुलगी) ही चालू महिन्याच्या बावीस तारखेस बहादुरगडकडे रवाना झाली.

खानाजादखान याने बादशहाना कळविले ते असे––“इरादतखान याने आपल्याला पुढीलप्रमाणे कळविले आहे:––

“लढाईत खंडोजीचा बिरादरीचा (?) मुलगा याला बंदुकीची गोळी लागून तो नरकाला गेला. लढाई चालूच आहे. बक्षी उल्मुल्क यांना रवाना करावे अशी आज्ञा झाली. जैनुलाबिदीनखान हा मातब्बरखानापाशी तैनात होता. त्याला अहमदअलीखान ही पदवी देण्यात आली. त्याच्या जवळचा सरंजाम सामग्रीही किल्ल्यावर (माहुली?) पोहोचवावी, अशी आज्ञा झाली. या कामासाठी एक गुर्जबर्दार अंमलबजावणी अधिकारी म्हणून नेमण्यात आला. शागीर्द बक्षी जैनुलबिदीनखान याला बक्षी उल्मुल्काच्याबरोबर शत्रूच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी रवाना करण्यात आले.

**सात एप्रिल १७०३**

सर्फराजखान यांस हमीदुद्दीन खानबहादुर याच्या मोर्च्यावर ठेवले होते. आता बादशहानी त्याला पूर्वीप्रमाणे त्याच्या स्वतःच्या ठाण्यावर नेमले. हमीदुद्दीन खानबहादुर यांस दुसऱ्या मोर्च्याचे प्रमुख, हमीदुद्दीनखान यास पन्नास धनुष्ये आणि बाणाचे शंभर भात्ते देण्यात आले.

जुहरच्या नमाजानंतर नाशिक, कल्याण व भिवंडी येथील पीरजादे कुतुबुद्दीन व नुरुद्दीन हे यारअलीबेगच्या द्वारे बादशहाना भेटले. ही भेट मशिदीत झाली. त्यांनी कुराणाची प्रत आणि इतर धार्मिक ग्रंथाचे दोन खंड भेट म्हणून दिले. बादशहानेहि त्यांना काही वस्तू दिल्या आणि छावणीत आहात तोपर्यंत नमाजाच्या वेळी माझ्याकडे येत जा असे त्यांना सांगितले.

**इरादत खान**

बक्षी उल्मुल्क हा रुहुल्लाखान, हमीदुद्दीनखान बहादुर आणि मतलब खान हे गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी गेले होते. ते बादशहाना भेटले. रुहुल्लाखान म्हणाला, “इरादतखानाचे ठाणे बादशाही छावणी आणि पुणे याच्यामध्ये होते. आम्ही पोहोचण्याच्या पूर्वीच शत्रूचे पारिपत्य होऊन ते पळून गेले होते. काल त्यांनी इरादतखानाच्या ठाण्याला वेढले होते. इरादतखानापाशी माणसे कमी होती. असे असूनहि त्याने निर्धाराने ठाणे राखले आणि शत्रूचे पारिपत्य करून त्याचा पराजय केला. इरादतखानाला अहसनाबाद, गुलबर्गा येथील किल्लेदारी होती. त्याला एक हजार जात आणि सातशे स्वार अशी मनसब होती. किल्लेदारीला जोडून काही स्वार शिबंदीसहित देण्यात आली होती, ती अट काढून टाकण्यात आली. इरादतखानाचा मुलगा मीरहिदायतुल्ला हा गुलबर्ग्याच्या किल्लेदारीवर आपल्या बापातर्फे नायब म्हणून काम करीत होता. त्याला चारशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती. ती शंभरने वाढविण्यात आली. सियादतखान दारोगा हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला.’’ तो म्हणाला, “मी, ख्वाजाखान आणि सुलेमानखान हे त्वरेने पुण्याच्या पलीकडे गेलो. गनिमांशी (मराठ्यांशी) युद्ध प्रसंग आला. शत्रूपैकी ठार मारण्यात आले व काहीना जखमी करण्यात आले. शत्रूचा पराजय झाला.” बादशहानी धन्य धन्य असे उद्‌गार काढले.

अनुक्रमणिका

बादशहाना कळविण्यात आले ते असे––काल खुसरौखान याचे गनिमांशी युद्ध झाले त्यात खुसरौखानाला भाल्याची एक जखम झाली. दगडाचाही त्याला मार बसला. बादशहाने त्याला मलमाचा एक डब्बा दिला. (मूमियाई) या शिवाय खुसरौखानाच्या पथकाची पगाराची तीन महिन्याची थकबाकी देण्यात यावी अशी आज्ञा केली. छावणीचा मुख्य काजी अकरमखान यांचा मुलगा निजाम हा वारला होता. निजामच्या मुलांना रोजचा मुशाहिरा देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

**आठ एप्रिल १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याच्या मोर्च्यात किल्ल्यावर हल्ला चढविण्यासाठी बादशहाचे सैन्य तयार होते. परंतु त्यांना संधीच मिळाली नाही.

**नऊ एप्रिल १७०३**

बादशहाने आज हमीदोद्दीन खानबहादुर, तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान आणि मन्सूरखान यांच्याकडे फत्तेदौलत याच्या द्वारे फळफळावळे पाठविली. ही फळे मोर्च्यात त्यांना नेऊन द्यावी, अशी आज्ञा झाली.

**सिंहगड**
**दहा एप्रिल १७०३**

आज बादशहानी दोन्ही दिवाण (कचेऱ्या) बंद ठेवले. बादशहानी मुहंमद अमीनखान यास आपल्या विश्रांतिगृहात (आरामगाह) बोलविले आणि त्याला पुढीलप्रमाणे सूचना दिल्या:– "तुम्ही बुणगे, काफिला व तबेले हे घेऊन जाण्यासाठी नंदगावपर्यंत जा. तेथून खान फीरोजजंग हे घेऊन जातील." बादशहानी मुघलअलीखानाला बोलावून म्हटले "तुम्ही तबेले (सरकारचे) आणि काफिला हे अहमदनगरपर्यंत पोहोचवा. या कामात तुम्ही व खानबहादूर (अमीनखान) यांनी मिळून काम करावे."

यार अलीबेगने अर्ज केला की, "तरबियतखानाच्या मोर्च्यातून हरकाऱ्याने पुढील बातमी आणली– "कोंडाण्याचा किल्लेदार नरकाला गेला (मेला) किल्ल्यातील माणसे तरबियतखानाला म्हणत आहेत की, किल्ला आलमगीर बादशहाचा आहे. तुम्ही कशाला त्याची मोडतोड करता. आम्हाला जिवाचे अभय मिळाले तर आम्ही किल्ला देऊन टाकतो.' बादशहानी ते वृत्त वाचले आणि बादशहाजादा कामबक्ष याजकडे पाठविले."

हरकाऱ्याकडून पुढीलप्रमाणे कळले––"सय्यद यासीनखान, ठाणेदार पाईन घाट, याने धान्याची रसद व काफिला ही पाठविली. संरक्षणासाठी सात स्वार व पायदळ पथक होते. ते हुजुरात येत होते. अखरापूर जवळ शत्रूच्या तीनशे स्वारानी हल्ला केला. त्यांनी रसद लुटली आणि प्यादे व स्वार याना ठार मारले."

अनुक्रमणिका

जुन्नरच्या बक्षी व वाकेनवीस इमामकुली याने लिहून पाठविले की, आंब्याला मोहर आला आहे. मला जुन्नरच्या सरकारी बागांची दारोगागिरी दिली तर मी आंबे व्यवस्थितपणे पाठविण्याचे करीन. बादशहांनी त्या जागेवर रहमतुल्ला याची नेमणूक केली. एल गंदल (आंध्र) च्या किल्ल्यावर अमानबेगच्या जागी अजीजबेगची नेमणूक करण्यात आली.

**अकरा एप्रिल १७०३**

गनिमांच्या (मराठ्यांच्या) युद्धात कामगिरी बजावल्याबद्दल इरादतखान, त्याचा मुलगा मेहुणे नस्त्रुल्ला व रुहुल्ला व नसरुल्लाची मुले फजलुल्ला व कलमतुल्ला यांना मनसबी देण्यात आल्या अगर दिलेल्या वाढविण्यात आल्या.

शहाजादा कामबक्ष याच्या कारखान्यासाठी सुरतेहून तीस अरबी घोडे विकत घेण्याच्या कामावर मुहंमद सादिक याची नेमणूक झाली.

बाळू पंडित (बाळाजी विश्वनाथ तर नव्हे) आणि इतर दोघे हे तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी किल्यातून बाहेर पडून तरबियतखानाकडे आले. तरबियत खानाने त्यांना म्हटले “तुमच्यावर माझा विश्वास नाही. कोण्या विश्वासू आणि मातब्बर माणसांना येऊ द्या.” मिहदीखान हा एक हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब बाळगून होता. ही मनसब काढून घेण्यात आली होती. त्याला आता एक हजार जात व तिनशे स्वार अशी मनसब बहाल करण्यात आली.

अहमदनगरच्या बातम्यावरून पुढील गोष्टी कळल्या. हिंदुराव व खंडोबा हे सरदार चार हजाराचे सैन्य घेऊन त्या जिल्ह्यात पसरले आहेत. बक्षी उल्मुल्क जुल्फिकारखान बहादूर याने त्यांचा पाठलाग केला. हलकट गनीम (मराठे) सुरतेच्या दिशेने पळून गेले. बादशहाने आज्ञा केली की, जुल्फिकारखानाने हुजुरात यावे.

बादशहाने आज्ञा केली की, सिंहगडच्यासमोर शिवापूरच्या वाटेवर दुसरा मोर्चा कायम केला आहे, तेथे चोरांचा (मराठ्यांचा) सुळसुळाट झाला आहे. सरफराजखानने त्या दिशेने चाल करून जावे आणि दुष्टांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करावे.

**बारा एप्रिल १७०३**

बादशहाने आज्ञा केली की, फत्तेदौलत कौल याचा मुलगा फत्तेनुसरत याने अजीजखान यास तरबिअतखानाच्या मोर्च्यावर न्यावे आणि कोंडाणा किल्लावर हल्ला करण्यासाठी जो मार्ग ठरविला आहे तो त्याला दाखवावा. बादशहाच्या आज्ञेने पुढील मंडळींना रुहुल्लाखानाच्या शिक्यानिशीं पत्रे पाठविण्याची व्यवस्था करण्यात आली. एक पत्र जुल्फिकारखानाने हुजुरात यावे म्हणून, दुसरे पत्र खान फिरोजजंग (भावी निजामउल्मुल्काचा बाप) च्या नावे, त्याने हलकट गनिमांचा (मराठे) यांचा पाठलाग करावा म्हणून.

बादशहाना कळविण्यात आले की, जुल्फिकारखान हा हलकट गनिमांचा (मराठ्यांचा) पाठलाग करीत पुण्याच्या दिशेने गेला आहे.

कोंडाणा (सिंहगड) किल्ल्यावर हल्ला करावयाचे ठरले. रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग हा हुजुरात हजर होता. त्याने ही कामगिरी कबूल केली. त्यावरून बादशहाने आज्ञा केली की, फत्तेदौलत कौल याने शिवसिंग याला तरबियतखानाच्या मोर्च्यात पोहोचवून यावे.

## तेरा एप्रिल १७०३

दुपारच्यानंतर यारअलीबेग याने खानमहंमद कौल याच्याद्वारे हुजुरात पत्र पाठविले. त्यातील मजकूर असा होता——"हेरांनी पुढील बातमी आणली आहे. तरबिअतखानाचा भाऊ कामयाबखान (तरबिअतखान हा तोफखान्याचा प्रमुख आणि वेढा घालणाऱ्या मोगल सैन्याचा सेनापती) हा मोगल सैन्याच्या निशानाकडील (ध्वजाकडील) दीडशे माणसे घेऊन कोंडाण्याच्या किल्ल्यात दाखल झाला आणि त्याने किल्ला घेतला. किल्ल्यातील माणसे बाहेर पडू लागली आहेत व किल्ला रिकामा करीत आहेत."

बादशहाने ते पत्र स्वतः वाचले. खान महंमद कौल यांस त्याबाबत बक्षीस म्हणून पन्नास रुपये दिले. यानंतर हमीदुद्दीनखान बहादुर हा तरबियतखानाच्या मोर्च्यावरून दरबारात आला. नंतर तो आपल्या तंबूत (शस्त्रागाराच्या तळावर असलेला) गेला.

मुहरमखान हा हुजुरात येऊन म्हणाला, "कामयाबखान हा झेंडा घेऊन किल्ल्यात दाखल झाला. किल्ला बादशहाच्या ताब्यात आला आहे. किल्ल्यातील माणसे बाहेर निघून चालली आहेत. किल्ला रिकामा होत आहे." बादशहानी मुहरमखानाला आज्ञा केली की "आज संध्याकाळी तुम्ही, मुनीमखान, मनसूरखान आणि खानसामान यांचा कारभारी यांनी किल्ल्यात जावे आणि किल्ल्यात असलेल्या सर्व वस्तू जप्त कराव्या."

बादशहानी आज्ञा केली की, "आम्ही कोंडाण्याचा किल्ला पाहाण्यासाठी जाणार आहोत. रस्ता नीट करण्यात यावा." बादशहाना कळविण्यात आले की, जुल्फिकारखानाला हुजुरात बोलाविण्यात आले होते. पण तो धनाजी जाधवाचा मुलगा शंभू (सिंग) याच्या पाठलागावर पुण्याच्या (सुपे असू शकेल) दिशेने गेला आहे.

मुहरमखान याने पुढीलप्रणाणे कळविले——"काबुलचे सुभेदार शहाजादे मुआज्ञम यांनी दोन हजार डाळिंबे आणि पाच घोडे हुजुरात पाठविले होते. वाटेत एक घोडा मेला. डाळिंबापैकी फक्त चारशें डाळिंबे चांगल्या स्थितीत पोहोचली. बाकीची जाया झाली. मुहरमखानाने या वस्तू बादशहाच्या नजरेखालून घातल्या. शहाजादा बेदराबख्त यास बादशहाच्या आज्ञेने रूहुल्लाखान याच्या शिक्याने पत्र रवाना झाले. दिलेरखान मरहूम याचा मुलगा हामिद हा औरंगाबादेत तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले. उम्दतुलमुल्कखान फिरोजजंग याच्या नावे पत्र पाठविण्यात आले.

## चवदा एप्रिल १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटिका झाल्या असता बख्तावर महली याने बादशहाना पुढीलप्रमाणे कळविले——"शत्रूंची माणसे किल्ल्यातून बाहेर पडली. किल्ला रिकामा झाला. मन्सूरखान

वगैरे बादशाही अधिकारी, किल्ल्यात दाखल झाले. तरबियतखान याने किल्ला घेतल्याचा वृत्तांत लिहून काढला आणि कोंडाण्याच्या दरवाज्याच्या सोन्याच्या किल्या व ओवाळणीची नजर ही आपला भाचा मोहमंद बाकर याच्याबरोबर हुजुरात पाठविली. त्याप्रमाणे तरबियतखानाचा मुलगा मोहम्मद इसहाक आणि भाचा मोहम्मद बाकर यानी पत्र आणि किल्ल्या हीं दोन्ही दिवाणे खास मध्ये आणिली. बादशहाने आज्ञा केली की "ती मला बघू द्या" त्याप्रमाणे त्या दोघांनी त्या वस्तू बादशहाच्या नजरेखालून घातल्या. पूर्वी जेव्हा सातारा, विशाळगड व पन्हाळगड हे किल्ले हाती आले होते तेव्हा अर्धा घटिका नौबती वाजविल्या जाव्यात अशी आज्ञा झाली होती. या खेपेस कोंडाणा हाती पडला म्हणून दोन घटिका नौबती वाजवाव्या अशी आज्ञा झाली. बादशहाने तरबियतखानाचा मुलगा मोहम्मद इसहाक याला खिलातीची वस्त्रे दिली, बादशहाने आज्ञा केली की, तरबियतखान याचा मुलगा आणि भाचा यांचे हुद्दे कळविण्यात यावेत मुहम्मद इसाहकने आपल्या बापाकडे कोंडाणा किल्ल्यावर जावे अशी आज्ञा झाली, यानंतर बादशहाने दिवाण (कचेरी) चे काम तहकूब केले. दुपारी न्याय कचेरीचे काम चालू झाले तेव्हा बक्षी उल्मुल्क रूहुल्लाखान, हमीदोद्दीनखान बहादूर, अमीर उल्उमरा (असद्खान पंतप्रधान), मतलबखान, खानाजादखान, सियाहतखान वगैरे मंडळी सभागृहात आली आणि कोंडाणा फत्ते झाल्याबद्दल त्यांनी बादशहाचे अभिनंदन करून त्याला मुजरे केले. असद्खानाने एक हजार अश्रफ्या, मतलबखानाने शंभर अश्रफ्या नजर केल्या त्या बादशहाने माफ केल्या, बादशहाने अनेकांना इनामे दिली आणि खिलातीची वस्त्रे दिली.

सुभे महंमदाबादचा दिवाण किफायतखान हा मरण पावला.

शहाजादा मोअज्जम याच्याकडून आलेली डाळिंबे बादशहानी काल रात्री पुढील सरदार मंडळींना पाठवली. पंतप्रधान असद्खान, रूहुलुल्लाखान, मतलबखान तरबिअतखान, हमीदोद्दीन खान बहाद्दूर, खाना जादखान आणि सिआदतखान.

खान फिरोजजंग आणि चिनकुलीजखान यांना आज्ञापत्रे देऊन आणि चिन कुलीजखानाला विजापूरला पोहोचवून जाहिदबेग परत आला.

**पंधरा एप्रिल १७०३**

कोंडाणा किल्ला जिंकून घेण्यात आला होता. बादशहानी त्याचे नाव बख्शिंदाबख्श (ईश्वर दत्त) असे ठेवले.

बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याच्या नावे आज्ञा पत्र पाठविण्यात आले.

**चकमक**

बादशहाना कळविण्यात आले ते असे——

दुष्टशत्रू (मराठे) हे छावणीच्या समोर चालून आले होते. तुर्कताजखान व करावल (आघाडीचे सैनिक) याचे व शत्रूंचे युद्ध झाले. सात शत्रूसैनिकांची डोकी कापून आणण्यात आली.

अनुक्रमणिका

बादशहानी शेख मखदूम, असदुल्ला, औरंगाबाद येथील घोड्यांना डाग देण्याच्या खात्याचा दारोगा कासमा (याच्याकडे बेगम पुऱ्याच्या दप्तराचेहि काम देण्यात आले) इत्यादींच्या मनसबी वाढविल्या.

कोकलबेग याला काकरोन (माळवा) ची किल्लेदारी देण्यात आली.

नुल्शनाबाद (नाशिक) चे कुतुबुद्दीन, नुरुद्दीन या नबीर जाद्यांचा (पीरजादे असावे) सत्कार करून व वस्त्रे, बक्षिसे देण्यात येऊन निरोप देण्यात आला.

हत्ती, सात घोडे, पाच तलवारी, दोन खंजीर, दोन लहान तोफा, पाच बंदुका, आणि इतर वस्तू बादशहानी माफ केल्या (त्याला त्या वस्तू ठेवण्याची परवानगी दिली). बादशहानी तरबियतखान याचा मुलगा मुहंमद इसहाक, भाचा मुहंमद बाकर, व शेख अजमतुल्ला इत्यादींच्या मनसबी वाढविल्या.

**मोर्च्यातील मंडळी**

प्रत्यक्ष किल्ल्यासमोरील मोर्च्यात काम करणारी पुढील मंडळी बादशहाना भेटली आणि त्यांनी निसार व नजरा दिल्या—

(१) अमानुल्लाखान, (२) उजबेकखान, (३) कामयाबखान, (४) मुहंमद काजम, (५) मुहमद शफी.

सामान नेणारी वाहने, साधने इत्यादि बादशहाजादा जीनतुन्निसा बेगम हिच्याबरोबर गेली आहेत असे कळले. बादशहानी कलालखानाला निरोप दिला आणि त्याला म्हटले "तुम्ही दोन गुजबर्दार घेऊन जा व सामान वाहून नेणारी साधने (बारबर्दार) घेऊन या, आम्ही येथून तळ हलवणार आहोत.

कोंडाणा फत्ते झाल्याबद्दल हमीदुद्दीन खान बहादूर याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

सय्यद जैनुलाबिदीन याला दाऊदखानाच्या फौजेचा वाकेनवीस (सवानेह निगार) नेमण्यात आले.

**सोलापूर**

सोलापूरच्या किल्लेदारीवर रहमानच्या ऐवजी शंभूराम याला नेमण्यात आले. त्याला शंभर (जात) ची मनसब होती. तीत पन्नासची वाढ करण्यात आली, सुरतेचा मुस्तद्दी (कारभारी) तिबार खान याचे पत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

**सतरा एप्रिल १७०३**

आज बादशहानी दोन्ही दिवाण (कचेऱ्या) चे काम केले नाही. हैद्राबादचा नायब सुभेदार सय्यद मुजफ्फर याच्याकडे पूर्ववत कोहीरची फौजदारी ठेवण्यात आली. तेथे झालेली कासमखानाची नेमणूक रद्द करण्यात आली.

अनुक्रमणिका

विजापूरच्या हरकाऱ्याने पाठविलेल्या बातम्यांवरून कळले ते असे.––"विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान हा एकोणतीस जिल्काद (पाच एप्रिल १७०३) रोजी विजापुराहून निघून आला. विजापूरच्या किल्ल्यापासून एक कोसावर असलेल्या मौजे भोमळी (?) येथे त्याने तळ दिला. विजापूरच्या परिसरात पसरलेल्या चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी त्याने फौज पाठविली आहे.

बादशहानी आज्ञा केली की, बादशाही (म्हणजे सरकारी) अधिकारी व नोकर हे कोंडाणा उर्फ बख्शिदाबख्श या किल्ल्याच्या भोवतालच्या ठाण्यातूनही त्यांनी आता परत यावे.

इफ्तिखारखान मरहूम याचा मुलगा मुहंमद जाफर याला मीर कायमा व मुल्तफतखान यांच्या जागी बेदारबख्ताच्या सैन्यात तोफखान्याचा दारोगा आणि बक्षी म्हणून नेमण्यात आले. मरहूम मामूरखान याचा जावई सय्यद मन्सूर याजकडे फर्दापूरपासून औरंगाबादपर्यंतच्या रस्त्याच्या रक्षणाचे काम देण्यात आले. त्याच्याबरोबर दोनशे स्वार व साठ पायदळाची शिबंदी देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**अठरा एप्रिल १७०३**

तोफखानाचा प्रमुख (मीर आतिश) तरबियतखान हा कोंडाणा फत्ते झाल्यावर येऊन बादशहाना भेटला. त्याचप्रमाणे नगद, निसार व पेशकश दिली.

**एकोणीस एप्रिल १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटका झाल्या असता बादशहानी आपल्या शय्यागृहाचा (आरामगाह) पडदा सरकविला.

**कमानीचा किल्ला**

त्यांनी तोफखान्याचा प्रमुख (मीर आतिश) तरबियतखान व हमीदुद्दीनखान बहादूर यांना बोलाविले. दोघांनी बादशहाना कोंडाण्याजवळ असलेला कमानी (?) नावाच्या किल्ल्याचा नकाशा दाखविला. बादशहानी तो नकाशा पाहिला आणि त्यांनी उभयतांना काही सूचना दिल्या.

तरबियतखानाला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मतलबखान याने त्याला खिलातीची वस्त्रे मिळाल्याबद्दल बादशहाना मुजरा (तसलीमात) केला.

यानंतर बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. त्यांनी तीन घटिका काम केले. नंतर ते कचेरीतून गेले.

पुढील मंडळी येऊन बादशहाना भेटली आणि त्यांनी पेशकश (नजररूपाने भेटी) दिली:–

अनुक्रमणिका

(१) हमीदुद्दीनखान बहादूर, (२) मुनीमखान (हा पुढे बहादुरशहाच्या काळात पंतप्रधान झाला) हा बख्शिंदाबख्श (सिंहगड) वरुन आला होता, (३) बाकीखान, अहदियान (शिलेदार) च्या पगार वाटपाचा बख्शी-तन बख्शी (तनखा बख्शी).

## नेकनामच्या बहिणीचा मृत्यू

बादशहाना कळविण्यात आले की, नेकनामखानाची (गोंडराजा) बहीण मोमयानीबाई (मोहन बाई?) हिचा मृत्यू बहादूरगड उर्फ पेडगाव येथे झाला. बादशहानी, नेकनामखानाला शोक निदर्शक (मातमी) वस्त्रे दिली.

बादशहानी एका विशेष कामगिरीवर तरबियतखानाचा भाऊ कामयाबखान याची नेमणूक केली. त्याच्याबरोबर दोनशे स्वार बर्कंदाज (बंदूकची) व एक हजार पायदळ इतके सैन्य देऊन त्याला निरोप देण्यात आला.

नळदूर्गचा माजी किल्लेदार कासमखान याला कोहीर (आंध्र) च्या फौजदारीवर नेमण्यात आले होते. ते स्थगित करून त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

मीर अताउल्लाचा मुलगा मीर रहमतुल्ला हा पूर्वी शहाजादा खुजिस्ताअख्तर (काबुलचा सुभेदार मुअज्ज़म याचा मुलगा) याचा मीर सामान (कारभारी) होता. त्याची नेमणूक काबुल सुभ्यात करण्यात आली.

दिल्लीहून आलेल्या बातम्यावरून कळले की, मरहूम दिलावरखान याचा मुलगा निजामुद्दीन अहमद हा तेथे (दिल्ली) तैनात होता. त्याला वेड लागले आहे. त्याची मनसब काढून घेण्यात आली.

खानाजादखान व मुहरमखान यांना बक्षिसे देण्यात आली. दिल्लीचा सुभेदार मुहंमद यारखान याची बहीण फातमाखानम ही वारली (छावणीत) होती. तिचे शव दिल्लीला घेऊन जाण्यासाठी मुहियुद्दीन कुली गुर्जबर्दार याची नेमणूक झाली.

अबुल्हसन (गोवळकोंड्याचा माजी बादशहा) याचा मुलगा अबुमुहंमद (दत्तक) हा खुनाच्या आरोपावरुन (छावणीत) निर्बंधात होता. त्यालाहि सदर गुर्जबर्दाराने आपल्याबरोबर दिल्लीला घेऊन जावे अशी आज्ञा झाली.

गोरखपूर (मुअज्ज़माबाद) कडे व्यापाऱ्यांना लुबाडण्याच्या बातम्या आल्या. अधिकाऱ्यांना ताकीद पत्रे पाठवावीत अशी आज्ञा झाली.

बादशहाजादा कामबक्ष याने जीनतुन्निसा बेगम, उदेपुरी बेगम इत्यादींना बहादुरगडला पोहोचवून हुजुरात यावे अशी आज्ञा झाली. सर्फराजखान व शिवसिंग यांनी खान जहानी पथकाचे दोनशे स्वार बरोबर घेऊन कामबक्षाच्या स्वागतास जावे, अशी आज्ञा झाली.

अनुक्रमणिका

## वीस एप्रिल १७०३

बादशहाना कळविण्यात आले ते असे—

जुल्फिकारखान नुस्रतजंग हा चोरांचा (मराठ्यांचा) पाठलाग करीत येथे आला आहे. येथून तो पुढे त्यांच्या पारिपत्यासाठी जाणार आहे. बादशहानी आज्ञा केली की, “आपल्या जवळचे सैन्य तेथेच ठेवून त्याने भेटीसाठी हुजुरात यावे.”

आज्ञेप्रमाणे जुल्फिकारखान हा फौज मागे ठेवून सड्यास्वारीने आला आहे. काय आज्ञा, बादशहानी आज्ञा केली की, त्याला बोलवावे. त्याप्रमाणे जुल्फिकारखान हा येऊन बादशहाना भेटला. त्याने बादशहाना पाचशे अश्रफ्या निसार म्हणून पेश केल्या. बादशहानी त्याला खास खिलातीची वस्त्रे दिली. दिवाण (कचेरी) संपल्यावर बादशहा हे मेवाखान्याचा अधिकारी मुहरमखान याला म्हणाले “जुल्फिकारखानाकडे मेव्याची (फळांची) दोन ताटे पाठवून द्या.” मिहदीखान हा बडतर्फ झाला होता. त्याची मनसब बहाल करण्यात आली. त्याने बादशहाना कुराणाची प्रत दिली.

## संगमनेरचा फौजदार

संगमनेर व गंगापूर येथील फौजदार व अमीन अमानतखान याची मनसब वाढविण्यात आली.

उस्मानखान करावल यास मोजणीची सांखळी देऊन बादशहानी त्याला आज्ञा केली की, “तुम्ही जाऊन पुणे व लोहगाव यांच्या दरम्यान छावणी योग्य जागा पाहावी आणि इकडून तिकडे जाण्यासाठी किती मजला कराव्या लागतील, हे ठरवावे. उस्मानखानाबरोबर मुहंमद काजम व खुदामानखान आणि बेलदार व ओझी वाहाणारे हे देण्यात आले. रस्ता नीट करावा, अशी त्यांना आज्ञा होती.

बादशहानी तुर्कताजखानाला आज्ञा केली की, बहादुरगडाहून नावा हुजुरात आणाव्या.

## एकवीस एप्रिल १७०३

आज बादशहानी दिवाण (कचेरी) चे काम बंद ठेवले. बादशहानी सकाळी मतलबखानाला आज्ञा केली की, “तुम्ही पुढे जा आणि आमच्या प्रवासाचा पहिला टप्पा कुठे राहील तो ठरवून या.”

बादशहानी कित्येकांच्या मनसबी वाढविल्या, बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली.— “या महिन्याच्या अठरा तारखेस म्हणजे शनिवारी येथून आम्ही कूच करणार. त्यासाठी सोळा तारखेस म्हणजे गुरुवारी (बावीस एप्रिल १७०३) पेशखान्याचे (पुढील मुक्कामासाठी पाठवावयाचे तंबू आदि सामान) वाहनांवर लादून पुण्याच्या दिशेने रवाना करा.” बादशहानी आज्ञा केली की, पहिल्या पेशखान्याबरोबर सियादतखान हा जाईल, सातशेसत्तर स्वारांचे पथक राहील. दुसऱ्या पेशखान्याबरोबर अहदियानचा बख्शी बाकरखान हा राहील. त्याच्याबरोबर साडेतीनशे स्वारांचे पथक राहील.

## शाहूराजे

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली. –

जल्लूकदीम बादशहाच्या निकट असणारे जुने सेवक आणि खास चौकीची माणसे यांनी सिकंदर आदिलखान (विजापूरचा शेवटचा बादशहा) याची मुले आणि राजा शाहू यांच्याबरोबर येत जात असावे.

बादशहानी आज्ञा केली की, आपण स्वारीवर निघू त्यावेळी अमीरुलउमरा (पंतप्रधान असदखान) यांनी उजव्या फळीकडून आणि हमीदुद्दीनखान बहादूर यांनी डाव्या फळीकडून येत जावे.

तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान यास तीन हजार स्वारासहित सैन्याची चंदावल (पिछाडी) सांभाळण्याचे काम देण्यात आले.

इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) च्या किल्लेदारीवर मुरीदखानाच्या जागेवर शुकूरखान विजापुरी याची नेमणूक करण्यात आली.

**बावीस एप्रिल १७०३**

आज सकाळी बादशहानी फरासखान्याचा मुश्रफ मुहंमद हादी यास म्हटले "पेशखाना लादून पुढे पाठवा. सियादतखान हा पेशखान्याच्या बरोबर राहील.

**जुल्फिकारखान**

दिवाणात (कचेरीत) जुल्फिकारखान हा येऊन बादशहाना भेटला. बादशहानी त्याला एक नीमचा (शस्त्र) व मरहूम बहारामंदखान याची तलवार (तीनशे रुपये किंमतीची) बक्षीस म्हणून दिली. जीनतुन्निसाच्या सामानाचे रक्षण करण्यासाठी त्याला बहादुरगडकडे जाण्यास निरोप देण्यात आला. बादशहाजादा कामबक्ष याजकडे पत्रे पाठविण्यात आली होती. त्याची उत्तरे घेऊन जाहिदबेग गुर्जबर्दार परत आला. माळव्याचा सुभेदार शायस्ताखान (प्रसिद्ध शायिस्ताखान याचा मुलगा) याची मुलगी ही तकीखान (बक्षी बहरामंदखानाच्या मुलीचा मुलगा) याची वधू म्हणून नियोजित केली होती. तिला औरंगाबादपर्यंत घेऊन यावी म्हणून शमशेर बहादूर गुर्जबर्दार याला नेमण्यात आले.

दख्खनच्या सैनिकांचा दारोगा मुनीमखान याची मनसब फिरून बहाल करण्यात आली.

**नेमणुका**

मुहंमद कासिम यास बख्शिंदाबख्श (सिंहगड) किल्ल्याच्या तोफखान्याचा आणि शिवापूरच्या बागांचा दारोगा (अधिकारी) म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

बक्षिंदाबक्ष किल्ल्याच्या बक्षिगिरी आणि वाकेनविशीवर मलिक बर्खुर्दार याची नेमणूक करण्यात आली.

बादशहा मुहरमखान यांस म्हणाले "आमची स्वारी इकडून निघाल्यावर तुम्ही मागे रहावे. आणि इतर (सामान-सुमान) कारखाने वगैरे पुढे घालून घेऊन यावे.

चाकण ऊर्फ इस्लामगडचा किल्लेदार आणि फौजदार सय्यद जानबाजखान हा होता. बादशहाने त्याच्या ऐवजी कामयाबखान याची त्या जागेवर नेमणूक करून त्याची मनसब वाढविली. (तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याचा कामियाखान हा भाऊ होय.)

**तेवीस एप्रिल १७०३**

बादशहाने आज दिवाण (कचेऱ्या) बंद ठेवले. खान फिरोजजंग याने कोंडाणा (सिंहगड) किल्ला फत्ते झाल्याबद्दल अभिनंदनाचे पत्र आणि ओवाळणी (निसार) म्हणून एक हजार अश्रफ्या पाठवल्या.

**चोवीस एप्रिल १७०३**

आज सकाळी एक प्रहर दिवस आला असता बादशहा कोंडाणा किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या आपल्या मुक्कामातून बाहेर पडले. ते तख्तेरवां (वाहून न्यावयाचे सिंहासन) वर स्वार होते. सव्वा दोन कोसा (जरेबी—म्हणजे साखळीने मोजलेला) चे अंतर पार करून ते एक प्रहर पाच घटीका दिवस आला असता किल्ल्याच्या पलिकडे असलेल्या निवासस्थानात दाखल झाले. त्यांनी आज कचेरीचे काम केले नाही. आघाडीचे अधिकारी उस्मानखान व मोहम्मदकाजीम हे छावणीची जागा निवडण्यासाठी पुढे गेले होते. पुण्याच्या जवळ मौजे मुहियाबाद ही जागा त्यांनी पाहिली. दोन्ही वाटा एकाच अंतरावर म्हणजे सव्वा कोसावर होत्या.

मतलबखानाने विनंती केली की, उद्या येथून कूच आहे किंवा कसे आज्ञा व्हावी. बादशहा म्हणाले उद्या येथे मुक्काम आहे. आघाडीचे तंबू (पेशखाना) मात्र पुढे रवाना करा. बादशहाने अधिकारी आणि त्यांच्या पथकाची योजना पुढीलप्रमाणे केली——(१) सुलेमानखान याने बादशहाचे निवासस्थान आणि मागचा टप्पा त्या दोन्हींच्या मध्ये बादशाही लष्कराचे सैनिक येईपर्यंत ठाण मांडून राहावे. त्याचप्रमाणे अमानुल्लाखान व मोहम्मद काजिम यांनी बादशहाचे निवासस्थान व पुढचा टप्पा यांच्याकडे राहावे.

तोफखान्याचा प्रमुख तरबिअतखान याने कळविले की, यासीनखान (सातारा-कऱ्हाडचा फौजदार) यास हुजुरात येण्याविषयी कळविण्यात आले होते पण तो येण्यास विलंब लावीत आहे. बादशहा म्हणाले "दुसरा एक गुर्जबर्दार (वेत्रधारी) पाठवून त्याला बोलावून घ्या.

पुढील लोकांनी प्रवासात बादशहाना भेटून त्यांना निसार आणि पेशकशी दिल्या:——

(१) मरहमतखान, (२) कर्नाटक (हैद्राबादी) चा बदललेला दिवाण शफीखान, (३) वलीबेग, (४) सय्यद अमजद, (५) सुल्तान बेग, (६) मुहम्मद सईद व मुहम्मद मसऊद, (७)

अनुक्रमणिका

दलाराम बंजारा, (८) सवारी बंजारा, (९) आकाबग, (१०) शुक्रउल्ला, (११) मोर्चाच्या तोफखान्यावरील नीलकंठ हजारी.

**पंचवीस एप्रिल १७०३**

बादशहाचा मुक्काम किल्ल्याच्या पलिकडे. फरासखान्याचा मुशरफ मोहम्मद हादी याने विचारले "पेशखाना पुढे पाठविण्यासंबंधी आज्ञा व्हावी" बादशहा म्हणाले "रवाना करा."

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की, या महिन्याच्या सोळा तारखेस शहाजादा मोहम्मद कामबख्श आणि बादशहाची मुलगी झिनतउन्नीसा बेगम ही सामानसुमानासहित बहादुरगडला पोहोचली. फत्तेआबाद धारूर (बीड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार आणि फौजदार उजबेगखान याच्या भाऊबंदापैकी महम्मद अब्बास यांस देण्यात आली.

इस्लामगड उर्फ रायरी (रायगड) च्या अधिकाऱ्याने केवड्याची कणसे व इतर वस्तूच्या करंड्या पाठविल्या. त्या बादशहाने नजरेखालून घातल्या आणि त्यातील काही वस्तू बादशहाने रूहुल्लाखान यास बक्षीस म्हणून दिल्या.

**सव्वीस एप्रिल १७०३**

बादशहाने आज दिवाण (कचेऱ्या) चे काम केले नाही. इस्लामपूर उर्फ राजापूर येथील वाकेनवीस आणि शेख रहमतुल्लाचा मुलगा शेख शहाबाज हा बादशहाना येऊन भेटला. बादशहाने त्याची मनसब कमी केली आणि त्याला हुजुरात तैनात केले. इस्लामपूर उर्फ राजापूरची बक्षीगिरी आणि वाकेनवीशी ही सकरलना उर्फ खेळणा उर्फ विशालगड येथील वाकेनवीस सय्यद इनायतउल्ला याच्या कामाशी जोडण्यात आली.

कामयाबखान याची नेमणूक चाकण उर्फ इस्लामगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून झाली होती. त्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला—पहिली विनंती ही की, पगारात वाढ व्हावी, त्याप्रमाणे माहवारात वाढ करण्यात आली. दुसरी विनंती ही की, माझी आर्थिक परिस्थिती चांगली नाही, दोन हजार रूपयांची मदत करावी, विनंती मान्य करण्यात आली. तिसरी विनंती ही की, माझ्या भाऊबंधापैकी दहाजणांना नव्याने मनसबी मिळाव्या, ही विनंती पण मान्य करण्यात आली.

**सत्तावीस एप्रिल १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते. मरहूम एतिकादखान याचा मुलगा सालेहखान याची मनसब वाढविण्यात आली.

**अठ्ठावीस एप्रिल १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवसाच्या सहा घटिका झाल्या असता बादशहा आपल्या निवासस्थानातून बाहेर पडले. ते तेख्तेरवांवर स्वार होते. सव्वा कोसाचा प्रवास करून ते सिरका वडेगाव या गावी मुक्कामाला आले. त्यावेळी दिवसाचा एक प्रहर झाला होता.

काल शहाजादा कामबक्ष याचे पत्र आले, त्यात म्हटले होते——"मी बहादुरगडाहून निघालो आहे, गुरुवारी आपल्याला भेटेन. अमीरुलउमरा (असदखान पंतप्रधान) यांनी पुढे जाऊन याचे स्वागत करावे, अशी आज्ञा झाली.

बादशहाच्या स्वारीत पुढील मंडळीनी निसार आणि पेशकशी दिल्या: ——

(१) तरबियतखान, (२) पैजुल्लाखान, (३) लोधीखान, (४) लोधीखानाचा भाऊ ताज, (५) अबदालखान याने विशाळगडहून तोफा आणल्या होत्या, (६) ख्वाजा अरब, (७) जन्नतुल्ला.

बादशहानी आज्ञा केली की, उद्या आमचा मुक्काम येथेच राहील. मागे राहिलेले पेशखान्याचे सामान आले की, ते पुढे रवाना करा.

बोलाराम बंजारा याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

## एकोणतीस एप्रिल १७०३

मुक्काम वडगाव दिवसाचे एक प्रहर आणि दोन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले.

हकीम हाजिकखान हा आज्ञेप्रमाणे लोहगावला गेला. तेथे त्याने आपल्या देखरेखीखाली शहाजादा कामबक्ष याच्या भोजनाची व्यवस्था केली. नंतर तो परत आला.

## पट्ट्याचा किल्लेदार लोदीखान

पट्ट्याचा किल्लेदार लोदीखान हा किल्ल्यावर आपला नायब ठेवून हुजुरात (सिंहगडच्या वेढ्यासाठी) आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

सय्यद हातमचा मुलगा आणि सालगड किल्ल्याचा अधिकारी मीर रहमतुल्ला याला साजरा आणि गोजरा किल्ल्याच्या तोफखान्याचा अधिकारी नेमण्यात आले.

कुंजमनचा मुलगा साहेबराम हा औरंगाबाद येथे घोड्याला डाग देण्याच्या दप्तरात मुश्रफ होता. त्याने विनंती केली की, आज्ञा असेल तर येथे मी आपल्या तर्फे नायब ठेवून हुजुराच्या सेवेत येईन, विनंती मान्य करण्यात आली.

अनुक्रमणिका

बंगालचा सुभेदार शहाजादा अजीमुश्शान याचे इदुज्जुहा सणानिमित्त बादशहाला अभिनंदनाचे पत्र आले. अजिमुश्शान हा मोअज्ज़मचा मुलगा आणि औरंगजेबाचा नातु होय. पुढील मंडळीची पत्रे आली.— (१) रावदलपत बुंदेला, (२) किशोरसिंग किल्लेदार, (३) आळंगचा किल्लेदार शिवसिंग, (४) गुलशनाबाद (नाशिक) वगैरेचा ठाणेदार मातबरखान.

कामकाज संपल्यानंतर बादशहाना विश्रांतीगृहात कळविण्यात आले की, आज्ञेप्रमाणे अमीरूलउमरा (असदखान पंतप्रधान) आणि शिष्टाचाराचा प्रमुख मीर तुजकमुनीमखान हे शहाजादा कामबख्श याच्या स्वागतासाठी गेले होते, ते त्याला घेऊन आले आहेत. बादशहाने म्हटले——"शहादाजा कामबख्श आणि त्याची मुले यांना विश्रामगृहात येऊ द्या. इतर दोघांनी आपापल्या तंबूत जावे. कामबख्शाने एक हजार अश्रफ्या, दोन हजार रुपये आणि एक कट्यार या वस्तू समोर ठेवल्या. त्याचा मुलगा मुहीउल्ला याने शंभर अश्रफ्या आणि दुसरा मुलगा सुल्तान फिरोजमंद याने ५० अश्रफ्या ठेवल्या. बादशहाने फक्त एक कट्यार घेतली व बाकीचे पैसे त्याने घेतले नाहीत (माफ केले). बादशहने कामबख्शाला दीड हजार रुपये किंमतीचा एक भरजरी कमरेचा शेला दिला आणि मग कामबख्शाला स्वतःच्या डेऱ्याकडे जाण्यास निरोप दिला.

बादशहा म्हणाले "शहाजादा कामबख्श्याकडे शाही भोजनालयातून पक्वानांची दोन ताटे पाठवा."

**तीस एप्रिल १७०३**

इस्लामपुरी उर्फ ब्रह्मपुरी (जिल्हा सोलापूर) येथील किल्लेदार मुरीदखान हा होता. बादशहाने त्याला तेथून बदलला. त्याची नेमणूक बहादुरगडच्या किल्लेदारीवर करण्यात आली त्यापूर्वी बहादुरगडवर मुगलखान हा किल्लेदार होता. झिनतउन्निसा (औरंगजेबाची मुलगी) गेली सातवर्षे ब्रह्मपुरीला होती. येथून ती नुकतीच बहादुरगडला राहण्यास आली. कदाचित तिच्या सूचनेवरूनच ब्रह्मपुरीच्या किल्लेदाराची बदली झाली असावी.

**एक मे १७०३**

दिवसाच्या सहा घटका झाल्या असता बादशहा हे आपल्या वडगाव जवळील मुक्कामावरून निघाले. ते तख्तेरवांवर स्वार होते, सव्वा दोन कोसाची मजल मारून ते दिवसाचा एक प्रहर व तीन घटिका झाल्या असता पुण्याच्या ईदग्याजवळील आपल्या मुक्कामावर दाखल झाले. आज दिवाणाचे (कचेरी) काम बंद ठेवण्यात आले. प्रवासात असताना बादशहाना पुढील मंडळीनी निसार आणि पेशकशी दिल्या— (१) बक्षी उल्मुल्क सदरुद्दीन मोहम्मद खान, हा कामबख्श्याच्या बरोबर गेला होता, (२) सरकारचा बक्षी नुस्रतखान, (३) अमानुल्लाखान, (४) खंडूजी देशपांडे, (५) मनोहरपूरचा जमिनदार जगतसिंग वगैरे सणानिमित्त्य शहाजादा मोअज़्म यांचे पत्र आले. इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) चा किल्लेदार शुकूरखान याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. नीलकण्ठ हजारी याने पेशकश दिली. हा तोफखान्यावर अधिकारी होता. हरकाऱ्यांचा प्रमुख भास्करराव याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

**दोन मे १७०३**

पुण्यात ईदग्याजवळ मुक्काम, आज बादशहा अदालत (न्याय कचेरी) मध्ये आले. शहाजादा कामबख्श याने झुल्फिकारखान येऊन पोहोचेपर्यंत मुहम्मद अमीनखान बहादूर याने बहादूरगड येथे झिनतउन्निसा बेगम ह्यांच्याबरोबर राहावे, असे ठरविले होते. तो येऊन बादशहाना भेटला आणि त्याने पेशकश आणि निसार बादशहासमोर ठेवली. औरंगाबादेत तैनात असलेल्या हरकाऱ्यांच्या लिहिण्यावरुन पुढील हकीगत कळली:—

> "मैको सुदरी (नाव नीट लागत नाही)". हा मराठी सरदार दोन हजार स्वारासहित फुलंब्री परगण्यात राजमार्गाच्या पलीकडे हालचाली करीत आहे, ही गोष्ट राजा जयसिंग (सवाई जयसिंग) याच्या कानावर आली. त्याने आपला प्रधान बुधासींग याच्या बरोबर सैन्य देऊन त्याला शत्रुच्या विरुद्ध पाठविले. लढाई झाली. त्यात शत्रूचे काही लोक जखमी झाले आणि काही मारले गेले. सरकारी अधिकारी या महिन्याच्या अठरा तारखेस सरकारी खजिना आणि काफिला घेऊन हुजुरात रवाना झाले.

विजापूरच्या हरकऱ्यांनी लिहिलेल्या बातमीवरुन पुढील हकीकत कळली:—

> "विजापूरचा सुभेदार चीनकुलीज खानबहाद्दूर (भावी निजाम उल्मुल्क) याने चारशे स्वार व एक हजार पायदळ शिपाई असे सैन्य इखलासखान व अखोजी मनसबदार याज बरोबर देऊन त्यांना हलकट गनिमांच्या (मराठे) पारिपत्यासाठी पाठवले. हे मराठे स्थानिक जमिनदारांना मिळून धामधूम करीत होते.

बादशहाने काहीना नव्याने मनसबी दिल्या व काहीच्या मनसबी वाढवल्या. त्यात नव्याने मुसलमान झालेला नामदार हा एक होता. दिलेरखान विजापुरी याचा धाकटा भाऊ अबदुल कुद्दुस याला स्वतःच्या लग्नासाठी गावी जाण्यासाठी रजा देण्यात आली. त्याला एक हजार जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब होती. पुण्याचा देशपांडे खंडोजी ह्याला एक शाल बक्षीस देण्यात आली. तरबियतखानाचा भाचा महंमद बाकर याला त्याचा दुसरा मामा आणि चाकणचा किल्लेदार कामियाबखान याच्याबरोबर ठेवण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, चबुतरा कोतवालीचा कर्मचारीवर्ग जो बहादुरगडला आहे तो सरबराहखान याने बहादुरगडाहून बोलावून घ्यावा.

## तीन मे १७०३

बादशहाने आज दिवाण (कचेरी) चे काम केले नाही. बादशहाना कळविण्यात आले की, मुगलखान हा खजिना व काफिला घेऊन या महिन्याच्या चोवीस तारखेस (३० एप्रिल १७०३) रोजी अहमदनगरच्या अलीकडे चार कोसावर आला आहे.

## चार मे १७०३

अनुक्रमणिका

आज बादशहाने स्नान केले. (हमाम) यामुळे त्यानी आज दिवाणचे काम बंद केले. काल रात्री हेरांच्या तोंडून पुढील बातमी कळली—“धना जाधवचा मुलगा शंभा (शंभूसिंग जाधव) हा बादशाही लष्करापासून दहा-बारा कोसावर जेजुरी आणि रसूलाबाद (शिवापूर) येथे चाल करून आला आहे. दोन-तीनशे स्वाराचे टोळके छावणीच्या जवळ पसरले आहे, हे कळल्यावर बादशहाने आज्ञा केली की, महंमद अमीनखान बहाद्दूर याने तीन हजार सातशेस्वार बरोबर घेऊन शत्रूच्या पारिपत्यासाठी जेजुरीकडे जावे. रूहुल्लाखान याने बादशाही लष्कराच्या भोवती फिरून टेहळणी करून यावे. रूहुल्लाखानानें विचारले ओझे वाहून नेणाऱ्या जनावरांना ठेवावयाचे किंवा कसे, बादशहा म्हणाले—– “भाड्याने ठरवलेली ही जनावरें आता नकोत ती काढून टाका. बादशहाने आज्ञा केली की, इस्लामगड उर्फ चाकणचा किल्लेदार व फौजदार कामयाबखान याच्याबरोबर ७०० स्वार तैनात करण्यात यावेत. झिनतउन्नीसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिने पत्र पाठवून कळविले की, प्रवासात मीरसामान (पुरवठा अधिकारी) हिदायतउल्ला ह्याने चोख व्यवस्था ठेवली. त्याला एखादी पदवी देण्यात यावी आणि मनसब वाढवावी. बादशहाने पदवीच्या सूचनेवर संमतीदर्शक चिन्ह केले. कामियाबखान याने (चाकणचा किल्लेदार) पुढीलप्रमाणे विनंती केली—–

“बहिर्जी पांढरे हा मुगलखान याजपाशी तैनात आहे. विनंती अशी की, त्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे”, विनंती मान्य करण्यात आली. बहिर्जी पांढरे यांस एक हजार जात आणि तीनशे स्वार अशी मनसब आहे. येसाची वगैरेच्या मनसबी वाढविण्यात आल्या. येसाजीला दीडशेची मनसब होती तीत पन्नासची भर घालण्यात आली. खानोजी याला नव्याने शंभर जात अशी मनसब देण्यात आली.

**पाच मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि सहा घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. काल रात्री बादशहाने बक्षी रूहुल्लाखान याला बोलाविले. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे त्याने बादशाही छावणीपासून जवळ आणि अंतरावर असलेल्या छावणीची पहाणी केली. तो म्हणाला येथून पाच कोसाच्या अंतरावर खातगाव (खादगाव?) आणि लोणी ही ठाणी आहेत. बारागाव हे ठाणे ७ कोसावर आहे. रूहुल्लाखानाने विनंती केल्यावरून बादशहाने पुढील मंडळींना पुढीलप्रमाणे नेमले: —–

(१) यक्काताजखान याची नेमणूक लोणीच्या ठाणेदारीवर करण्यात आली. त्याला एक हजार जात आणि चारशे स्वारांची मनसब होती तीत शंभर स्वारांची वाढ करण्यात आली;

(२) खानचंदचा मुलगा दलसिंग याची नेमणूक घातगावचा ठाणेदार म्हणून करण्यात आली. त्याला चारशे जात आणि शंभर स्वार अशी मनसब होती तीत पन्नास स्वाराची भर घालण्यात आली;

(३) पाटसगावचा ठाणेदार अमरसिंग याला बारागावचा ठाणेदार म्हणून पण नेमण्यात आले. त्याला तीनशे जात व एकशेपन्नास स्वार अशी मनसब होती. त्यात पंचावन स्वारांची भर घालण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, शंभर बेलदार आणि वीस पाणी वाहणारे यांना बादशाही छावणीपासून बहादुरगडापर्यंत असलेली ठाणी दुरुस्त करण्यासाठी इरादत खानापाशी तैनात करण्यात यावी. खानाने गढ्या नीट करुन, बांधून, ठाणी कायम करुन हुजुरात परत यावे.

अनुक्रमणिका

काल रात्री बादशहाने आज्ञा केली की, अमानुल्लाखान याने रसुलाबाद (शिवापूर) चा घाट नीट करण्यासाठी जावे.

बक्षी रूहुल्लाखान याने आज्ञेप्रमाणे सरफराजखान याच्याबरोबर देण्यात येणाऱ्या सैन्याची व्यवस्था केली. एकंदर सैनिकांची संख्या चार हजार तीनशे स्वार अशी भरली. ती यादी (तूमार) बादशहाच्या नजरेखालून घालण्यात आली. फळफळावळ खात्याचा दारोगा मोहरमखान यास पाच हजार रुपये किंमतीचा हत्ती बक्षीस देण्यात आला. बादशहाने बक्षी रूहुल्लाखान यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग हा हुजुरात आला आहे. बक्षिंदाबक्ष (सिंहगड) या किल्ल्यापासून इस्लामगड (रायगड) पर्यंत हे अंतर, रस्त्याची परिस्थिती आणि ठाणी ह्यांच्या संबंधीचा तपशीलवार वृत्तांत ह्याच्याकडून लिहून घेऊन माझ्यापाशी पेश करा. काल मतलबखानास आज्ञा झाली होती की "पावसाळा आहे. निवासस्थानात पाणी येण्याची शक्यता आहे. निवासस्थानाजवळ असलेला ओढा आणि निवासस्थानात पाणी येण्याची शक्यता याची चौकशी करुन वृत्तांत करावा." मतलबखानाने चौकशी केली आणि बादशहाना कळविले की, पाणी बादशहाच्या निवासस्थानापर्यंत येण्याची भिती नाही. छावणीचा कोतवाल सरबराहखान याने विनंती केंली की, बादशाही लष्करातील माणसे बेशिस्तपणे (आपल्या पथकातून न येता) वेगळी वेगळी छावणीत येत आहेत. छावणीच्याभोवती संरक्षण नाही. बादशहाने आज्ञा केली कीं, हमीदोद्दीन खानबहादूर याने बक्षी यांना सांगावे कीं, बादशाही लष्करात मोर्चा बंदीची योजना (मोर्चाप्रमाणे) करावी.

**सहा मे १७०३**

बादशहाने हमीदोद्दीनखानाला आज्ञा केली की, बादशाही छावणीच्या भोवती साखळीने अंतर मोजावे, त्याप्रमाणे करण्यात आले. बादशहाना कळविण्यात आले कीं, छावणीचा एकंदर घेर सव्वा कोसाचा आहे. बादशहाने आज्ञा केली कीं, या छावणीच्या भोवती (अहाता) कम्पाउन्ड——घेरा करवावा.

**सात मे १७०३**

आज सकाळी दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. शहाजादा बेदारबख्त (औरंगाबादचा सुभेदार) याचे पत्र आले ते नजरेखालून गेले.

बादशहाना कळविण्यात आले की, बादशाही छावणीपासून तीन कोसावर चोर (मराठे) हे पसरले असून ते छावणीतील बैल, ऊंट, इत्यादी पळवून नेत आहेत. बादशहाने सरफराजखान यास आज्ञा केली कीं, "गस्त घालण्यासाठी तुम्ही जा."

बादशहाकडे त्यांचे नातू मुहंमद मुइजोद्दीन (मुल्तानचा सुभेदार) आणि मुहंमद अजीमुश्शान (बंगालचा सुभेदार) यांची पत्रे आली.

**खंडोजी उर्फ दौलतमंदखान**

बादशहाने दौलतमंदखान उर्फ खंडोजी याला खिलातीची वस्त्रे दिली आणि त्याला चाकणचा किल्लेदार कामयाबखान याच्यापाशी तैनात करुन, त्याला जाण्यासाठी निरोप दिला. खरगोणचा अमीन व फौजदार अजीजबेग याला औरंगाबादेतील हत्तीखान्याचा अमीन म्हणून नेमण्यात आले. सफीखान यांस हुजुरात बोलावून घेण्यात आले. गढीबेगा (?) येथील ठाणेदार यांस आज्ञा करण्यात आली की, हुजुरात यावे. तो आपला नायब मागे ठेवून येऊन बादशहास भेटला. त्याला रसुलाबाद उर्फ शिवापूरचा घाट आणि रस्ता हे नीट करण्यासाठी अमानुल्लाखान यांजबरोबर तैनात करुन पाठविण्यात आले. रूहुलुल्लाखान याने विनंती केली ती अशी—दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा बरमोजखान याने कळविले की, मावळ्याचा दारोगा अबदुलकरीम यास शंभर जात आणि वीस हजार स्वार अशी मनसब होती. जोधनचा किल्ला फत्ते केल्याबद्दल त्याला शंभर जात आणि दहा स्वार अशी मनसब देण्यात आली. काय आज्ञा? बादशहाने म्हटले शंभर जात याचे दोनशे केले व दहा स्वार पुरे आहेत.

**आठ मे १७०३**

बादशहाने कचेरीचे काम आज केले नाही. आज सकाळी हमीदोद्दीनखान बहादूर हा तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान वगैरे यांच्या तंबूत गेला. त्याने तरबिअतखानाचे समाधान केले आणि तो त्याला बादशहाकडे घेऊन आला. बादशाहच्या विश्रामगृहाचा (आरामगाह) पडदा उघडला. तरबियतखानाने बादशहाची भेट घेतली. बादशाहाने कृपाकरुन त्याचे समाधान केले. याला एक रत्नजडीत पट्टा (पटका) बक्षीस दिला. त्याला फळफळावळे देण्यात आली. त्याला पुढील बढतीची आश्वासने देऊन त्याला परत जाण्यास निरोप देण्यात आला.

**नऊ मे १७०३**

पंतप्रधान असदखान अमीरउल्‌उमरा याचा मुलगा महंमद इसहाक उर्फ इनायतखान हा दिल्लीत होता. त्याला दरवर्षी दहाहजार रुपये वर्षासन होते, तो वारला. बादशहाने हमीदोद्दीन खानबहादूर आणि महंमद अमीनखान यांना आज्ञा केली कीं, तुम्ही पंतप्रधानाच्या डेऱ्यांवर जावे आणि त्यांना ही बातमी कळवावी. त्यांना म्हणावे “परमेश्वरी इच्छेसमोर काही चालत नाही. पंतप्रधान बादशहाकडे आल्यावर त्यांनी त्यांचे समाधान केले आणि त्याला आपल्या तंबूकडे परत पाठवले.

बादशहाने घासदाणा आणि रसद आणण्यासाठी दोन सैन्य तयार केली. त्याच्यावर रूहुल्लाखान बक्षी आणि हमीदोद्दीनखान बहादूर यांस नेमले. बादशहा म्हणाले “उद्या बक्षी रूहुल्लाखान, अजीजखान आणि मुनीमखान वगैरेंनी घासदाणा आणण्यासाठी जावे.

बादशहाने आज्ञा केली कीं, छावणीत हुजुरापासी असलेल्या लहान मोठ्या मनसबदारापैकी सर्वांनी प्रत्येकी चार बेलदार द्यावेत. छावणींच्याभोवती घेरा (आहाता), कम्पांऊड करण्यासाठी हे आवश्यक होते.

**अकरा मे १७०३**

अनुक्रमणिका

बादशहाने तरबिअतखानास आज्ञा केली कीं, तुम्ही अमीरउल्‌उमरा (पंतप्रधान असद्‌खान) यांना म्हणावे “तुमचे दुसरे तंबू आहेत. तेथे तुमची माणसे उतरली आहेत तेथेच राहावे.” काही दिवसापासून तुम्ही दिवाणीच्या कागदावर सह्या करीत नाही. त्या आता करु लागाव्या. तरबिअतखानाने हा निरोप असदखानाकडे पोहोचविला. असदखानाने हुकुम मानून सह्या करण्यास सुरुवात केली.

## एलिचपूरवर मराठ्यांचे आक्रमण

उम्‌दतुल्मुल्कखान फिरोजजंग (भावी निजामउल्मुल्काचा बाप) हा वऱ्हाडचा सुभेदार होता. तेथे त्याचा नायब म्हणून सरअंदाजखान हा काम करीत असे. वऱ्हाडच्या बातम्यावरून कळले की, शत्रूंचे (मराठ्यांचे) प्रचंड सैन्य दुष्ट हेतुने एलिचपूर (अचलपूर वऱ्हाडची राजधानी) येथे चाल करुन आले. त्यांना सरअंदाजखानाकडे चौथाईची मागणी केली.

चीन कुलीजखान (विजापूरचा सुभेदार भावी निजामउल्‌मुल्क) याच्या भाऊबंधापैकी कादिल मुहम्मद वगैरे दोन मनसबदार येऊन बादशहांना भेटले. त्यांच्या मनसबी काढून घेण्यात आल्या.

सरफराजखान हा सहा हजार जात आणि पाच हजार स्वार अशी मनसब बाळगून होता. त्याच्या मनसबीत सवलत देण्यात आली.

## बारा मे १७०३

बादशहाने आज दुपारी न्याय कचेरी केली. कोहिर (आन्ध्र) चा फौजदार सय्यद मुजफ्फरखान याला सुभे हैद्राबादचा नायब सुभेदार म्हणून नेमण्यात आले होते, त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. मरहूम मुहंमद शफी याचा पुतण्या मुहंमद शरीफ हा गुलशानाबाद (नाशिक) चा नायब ठाणेदार म्हणून नेमण्यात आला. त्याची मनसब वाढविण्यात आली. हबीबुल्लाचा मुलगा नेमतउल्ला याला जुन्नरचा वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले काहीना नव्याने मनसबी देण्यात आल्या.

दख्खनचा दिवाण मोतिमदखान याची मनसब वाढविण्यात आली. शेख गुलाममुहंमद याला अब्दुलरसूल याच्या जागी बावल (बादल?) ची ठाणेदारी देण्यात आली. असदखान पंत प्रधान यांचे नातू आणि असदखानाचा मुलगा मरहूम मुहंमद इसहाक यांची मुले, मुहंमद सालेह आणि मुहंमद काजिम यांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली व त्यांची मनसब वाढविण्यात आली. अब्दुलरसूलखान याला गढ नमूना (करडे-निमोणे) येथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला एक तलवार बक्षीस देण्यात आली व त्याची मनसब शंभरने वाढविण्यात आली.

## तेरा मे १७०३

आज दिवाणचे काम झाले नाही. बादशहाने पूर्वी आज्ञा केली होती की, श्रेष्ठ अमीर उमराव यांच्याकडून बेलदार मागून घेऊन छावणीभोवती घेऱ्याची भिंत (अहाता) बांधावी. आता बादशहाने आज्ञा केली की, असे बेलदार घेण्याची आवश्यकता नाही. हे काम सरकारकडूनच पार पाडण्यात यावे.

अनुक्रमणिका

मीर इस्माईल आणि दुसरा गुर्जबर्दार (वेत्रधारी) हे बादशहाचे फर्मान घेऊन शहाजादा मोअज्ज्म (काबूलचा सुभेदार) याजकडे गेले. बादशहाचे आज्ञापत्र पोहोचवून ते परत येत होते. वाटेत ब-हाणपूरजवळ बंडखोरांनी (मराठ्यांनी) ह्यांच्यावर हल्ला केला. मीर इस्माईल सही सलामत सुटला. दुसरा गुर्जबर्दार मारला गेला. शहाजाद्याने या गुर्जबर्दाराला पाचशे रुपये बक्षीस दिले होते, बादशहाने त्याला माफ केले.

**चौदा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर अन् चार घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आला. बक्षी रूहुल्लाखान हा घास-दाणा आणण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाला भेटला.

पुढील मंडळींनी बादशहाना भेटून निसार (ओवाळणीचे द्रव्य) पेश केले: ——

(१) मुगलखान याने औरंगबादेहून खजीना आणि काफिला सुरक्षित आणला होता;

(२) संगमनेर वगैरेचा फौजदार अमानतखान उर्फ ख्वाजामुहंमद अमीन (हाच पुढे मुबारज खान) या नावाने हैद्राबादचा सुभेदार होऊन निजामउल्मुल्काशी लढताना सन १७२४ मध्ये मारला गेला;

(३) इस्माईलखान मखा हा जुल्फिकारखानापाशी तैनात होता. त्याच्याबरोबर तो अहमदनगरला गेला आणि सरकारी खजिन्याबरोबर परत आला. (जींजीच्या वेढ्यात यालाच धनाजी जाधवाने कैद केले होते);

(४) इस्लामगड उर्फ चाकणचा (माजी किल्लेदार) सय्यद जानबाजखान,

(५) ब्रह्मदेवाचा मुलगा देवीसिंग हा फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीरशाही याच्यापाशी तैनात होता. तोही येऊन बादशहाना भेटला.

फळफळावळ खाते आणि हत्तीखान्याचा प्रमुख मोहरमखान याच्या मनसबीत वाढ करण्यात येऊन सरकारचे हत्ती औरंगाबादेश पाठविण्याचे काम त्याला देण्यात आले.

शेख कमाल मुहंमदचा मुलगा मुहंमद अफजल याला मुगलखानाच्या फौजेची दिवाणगीरी देण्यात आली. नेमतउल्ला यास जुन्नरचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले होते. त्याला एक शाल देण्यात आली. अब्दुल रहमान याला पूर्वी विजारतखान अशी पदवी होती. त्याने लिहून कळविले की, मी औरंगाबाद येथे औषधोपचार करून घेत आहे. सवड सापडल्यास आज्ञा झाली की, हुजूरात येईन. बादशहाने आज्ञा केली की, तेथील वाकेनवीस याने याच्याबद्दल चौकशी करून कळवावे.

आजमतारा (सातारा) येथील फौजदार अमीनखान (कदाचित यासीनखान पाहिजे) याने लिहून पाठविले की, "मला हुजुरात आणण्यासाठी यादगारबेग गुर्जबर्दार याला नेमण्यात आले आहे." या प्रदेशात

अनुक्रमणिका

शत्रू (मराठे) ठिकठिकाणी पसरले आहेत. या वेळी मला हुजुरात येण्याचे माफ करावे. बादशहाने विनंती मान्य केली.

### पंधरा मे १७०३

आज मोहरमचा दिवस. आज शेख सईफुल्लाबेग याने चार अनाथ पोरे बादशहासमोर आणली. बादशहानी त्यांच्या डोक्यावर हात ठेवला. त्यांना एकेक ताट (फळांनी भरलेले) आणि काही सोने व चांदी प्रत्येकाला दिली. आज दिवाणचे काम बंद होते.

### सोळा मे १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरी) मध्ये आले. त्यांनी काल हमोदोउद्दीन खानबहादूर यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—– "तुम्ही खालसा दिवाण (खाते) च्या तनख्याचा मुख्य अधिकारी इनायतउल्लाखान (अहकामे आलमगिरी या औरंगजेबाच्या पत्रांचा संपादक) यास आपल्याबरोबर घेऊन पंतप्रधान अमीरउल्लउमरा (असदखान) याच्याकडे घेऊन जा. अमीरउल्उमराला म्हणाले की, त्यांनी इनायतउल्लाखान याच्या अपराधांची क्षमा करावी. त्याप्रमाणे हमीदोउद्दीनखान याने घडवून आणले.

आज अमीरउल्उमरा (पंत प्रधान) बादशहाच्या हुजुरात कचेरी संपण्यापूर्वी त्यांना परत जाण्यास निरोप देण्यात आला. बादशहाने हमीदोउद्दीनखान यास आज्ञा केली की, "तुम्ही अमीरउल्उमरा याला सांगावे की, त्यांनी आपल्या कचेरीत (कार्यालय) बसून कामाला लागावे." त्याप्रमाणे अमीरउल्उमरा हे जाऊन कार्यालयात बसले. त्यानंतर ते आपल्या तळावर गेले. मोगलखान यास बादशाही हत्ती औरंगाबादेस घेऊन जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीर शाही याला राजगड आणि तोरणा या किल्ल्याची पाहाणी करण्यासाठी पाठविण्यात आले.

### पुरंदराचा नवीन किल्लेदार

सय्यद जानबाजखान (चाकणचा माजी किल्लेदार) यास आजमगड उर्फ पुरंदर याचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

बुंदीचा जमिनदार (राजा) राव बुधसिंग याच्या पथकाचा नेता (जमादार) संग्रामसिंग हा राव बुधसिंग याच्या पथकाबरोबर झुल्फिकारखानाच्या सैन्यात होता. या सुमारास तो येऊन बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहाने ऊंटखान्याचा दारोगा महंमद अमान आणि त्या खात्यातील कर्मचारी यांना औरंगाबादेश पाठविले. त्यांच्याबरोबर ऊंटखाना व गावखाना ही खाती पण गेली.

### कोंडाण्याचा किल्लेदार

अनुक्रमणिका

पुरंदरच्या किल्ल्यावर जानबाजखान याची नेमणूक झाल्यामुळे येथील माजी किल्लेदार खानचंद हा रिकामा आहे त्याला बक्षिंदाबक्ष उर्फ कोंडाणा या किल्ल्याचा किल्लेदार आणि फौजदार नेमण्यात आले.

ख्वाजाखान (याच्याच घराण्यात पुढे नगरचा शेवटच्या किल्लेदार कविजंग हा झाला) याची आई वारल्याचे बादशहाना कळविण्यात आले. त्याला आईच्या शोकातून बाहेर काढून नेकनामखान याने हुजुरात आणावे, अशी आज्ञा करण्यात आली.

**सतरा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरी) मध्ये आले. काल रात्री बादशहाना कळविण्यात आले की, तुफान, वादळ आणि पाऊस याच्यामुळे काल दिवाणखासमध्ये असलेला लहान तंबू कोसळला. बादशहाने आज्ञा केली की, “पुन्हा उभा करा.” कालच्या वादळी पाऊस-पाण्यात इनायतउल्लाखान याच्या डोक्यास मार बसला होता. त्याच्यावर उपचार करण्यासाठी हकीम असजाक याला आज्ञा करण्यात आली.

इस्माईलखान मका हा झुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. खजिन्याच्याबरोबर तो हुजुरात आला होता. त्याला पाच हजार जात आणि चार हजार पाचशे स्वार अशी मनसब होती. बादशहाने ती वाढविली. इस्माईलखानाचा मुलगा परवरीशखान हा हुजुरात होता. इस्माईलखानाच्या विनंतीवरून परवरीशखानाला बादशहाने आपल्या बापापाशी म्हणजे, “इस्माईलखानापाशी नासिरखान काशगरीचा मुलगा अब्दुल वाहिद हा नोकरीसाठी मध्य आशियातून आला होता, त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मुनीमखानाच्या विनंतीवरून पुढील गोष्ट कळली——इनायतउल्लाखान याने (कुरुक्षेत्र) ठाणेश्वरचा परगणा जागीरीत होता तो आपल्यासाठी सोडला आहे, तो आपल्याला तनखा जागीर म्हणून मिळावा.” विनंती मान्य करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी उल्मुल्कसदरूद्दीन मोहंमदखान हे आजारी आहेत.

बादशहाने हिदायतकेश वाकेनवीस याला विचारले, “गेल्यावर्षी कोणच्या तारखेला पावसाला सुरवात झाली बरे.” त्याने सांगितले “गेल्या वर्षी मोहरमच्या महिन्याच्या सुरूवातीपासूनच पाऊस पडू लागला होता.” सतराशे तीन मध्ये मात्र बातमी पत्रात पुण्यातील पावसाचा पहिला उल्लेख त्यावर्षी मोहरमची अकरा तारीख म्हणजे १६ मे असा आहे.

मरहूम लुत्फुल्लाखान (निजामउल्मुल्काचा मामा) याचा मुलगा इनायतखान हा येऊन बादशहाला भेटला.

**अठरा मे १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम केले नाही. केशवदास जवाहिऱ्या याचा मुलगा भगवानदास याने आपल्या विवाहाच्या प्रित्यर्थ एक रत्नजडित शिरपेच, एक आंगठी, आणखी एक अलंकार ही नजर केली.

अनुक्रमणिका

त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. भगवानदासाच्या बापाच्या विनंतीवरून बादशहाने आज्ञा केली की, त्याला (विवाहप्रसंगी) नगारे व कर्णे वाजविण्याची परवानगी देण्यात यावी.

पुरंदरहून बदललेला फौजदार व किल्लेदार याच्याकडे बक्षिंदाबक्ष (कोंडाणा) ची किल्लेदारी आणि शिवापूरची ठाणेदारी देण्यात आली होती. याची मनसब वाढविण्यात आली. बादशहाला मन्सूरखान याचे पत्र आले. तो दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा (अधिकारी) होता. यावेळी तो कोंडाणा किल्ल्यात होता. त्याच्या पत्रावरून कळले की, किल्ल्याच्या तटावर वीज कोसळली. चौदाहात लांबीचा तट उध्वस्त झाला.

**एकोणीस मे १७०३**

बादशहाने आज दिवाणचे काम केले नाही. बादशहाने आज्ञा केली की, एक गुर्जबर्दार नेमा आणि मरहूम अमीरखान (काबुलचा सुभेदार) याची मुले मुहंमद हुसेन वगैरेना दिल्लीहून हुजुरात बोलावून घ्या. मुहमद अमीनखान बहादूर (निजाम उल्मुल्काचा चुलत चुलता आणि इ.स. १७२२ मध्ये मुगल साम्राज्याचा पंतप्रधान) यांस बादशहाने आज्ञा केली की, “घास-दाणा आणण्यासाठी तुम्ही जा.” त्याच्याबरोबर सुलेमानखान व उजबेगखान यांना तैनात करण्यात आले.

सुलेमानखान यांने विनंती केली की, माझ्या माहवारात काही वाढ करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. दुसरी विनंती अशी की, कुटुंबाची परिस्थिती चांगली नाही. खुराकाची रक्कम माफ करण्यात यावी. बादशहाने आज्ञा केली की, दोन वर्षासाठी माफ.

फत्तेउल्लाखान आलमगीर शाही आणि उस्मानखान करावल हे दोघे राजगड आणि तोरणा या किल्ल्यांची टेहेळणी करण्यास गेले होते, ते लष्करात परत आले. उस्मानखानाने लिहून पाठविले की, “मी व खानबहादूर असे दोघे आपल्या आज्ञेप्रमाणे किल्ल्याचा परिसर पाहून आलो. मोर्चाची ठिकाणे आम्ही निवडली आहेत. नकाशा नीट तयार केला आहे, तो आम्ही घेऊन आलो आहोत. किल्ल्याची टेहळणी करून आम्ही जेव्हा परत येऊ लागलो तेव्हा किल्ल्यातून शत्रूंचे (मराठे) दोन हजार पायदळ बाहेर पडले, लढाई झाली. अनेक लोकांना (शत्रूंच्या) ठार मारण्यात किंवा जखमी करण्यात आले.

**वीस मे १७०३**

बादशहाने आज दिवाणचे काम बंद ठेवले. शहजादा मुहंमद बेदारबख्त बहादूर (औरंगजेबाचा नातू, औरंगजेबाचा दुसरा मुलगा आजम याचा मुलगा आणि औरंगाबादचा सुभेदार) याच्या लष्करातील बातम्यावरून कळले की, बेदारबख्ताची मुलगी सालेहतुन्नीसा ही वारली.

**एकवीस मे १७०३**

पुरंदरचा (आजमगड) माजी किल्लेदार याने विनंती अर्ज पाठविला की, मला बक्षिंदाबख्श उर्फ कोंडाणा या किल्ल्यातील किल्लेदारी देण्यात आली आहे. पण ती मला नको आहे. बादशहाने मला हुजुरात बोलावून घ्यावे आणि सेवा घ्यावी. बादशहाने विनंती मान्य केली आणि आज्ञा केली की, बक्षिंदाबक्ष उर्फ कोंडाणा येथे किल्लेदार म्हणून दुसरा कोणी नेमावा.

अनुक्रमणिका

**बावीस मे १७०३**

काल रात्रीचा एक प्रहर आणि पाच घटिका झाल्या असता बादशहाने बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान याला हुजुरात बोलावले. रुहुल्लाखानाने येऊन बादशहाना काबुल शहर आणि त्या शहराचा आणि आसपासच्या ठाण्याचा नकाशा दाखविला, तो पाहून बादशहाने रुहुल्लाखान यास परत जाण्यास निरोप दिला.

**अहमदनगरचा नवीन किल्लेदार**

अहमदनगरच्या किल्लेदारी आणि फौजदारीवर अब्दुल गफूरखान हा होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर तोफखान्याचा प्रमुख तरबिअतखान याची नेमणूक करण्यात आली. प्रत्यक्ष काम मात्र तरबिअतखान याची नेमणूक करण्यात आली. प्रत्यक्ष काम मात्र तरबिअतखान याचा मुलगा मुहमद इसहाक याने आपल्या बापाचा नायब म्हणून (डेप्युटी) पहावे अशी आज्ञा झाली. बाप आणि मुलगा यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. मोहरमखान हा हत्तीखान्याबरोबर औरंगाबादेस गेला होता. त्याने विनंती केली की, औरंगाबाद आणि दौलताबाद या किल्ल्यातील सरकारी बागांची मी पाहणी करणार आहे. या दोन्ही ठिकाणच्या किल्लेदारांनी मला बागा दाखवाव्या अशी आज्ञा करण्यात यावी, विनंती मान्य करण्यात आली.

मुहमद अलीचा मुलगा मुहमद हलीम याला इस्लामगड उर्फ चाकण येथील बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याला एक शाल देण्यात आली. घनःश्यामसिंग हा दीड हजार जात आणि पाचशे स्वार यांचा मनसबदार होता, तो वारला. त्याचा मुलगा जसवंतसिंग याला दोनशे जात आणि वीस स्वार अशी मनसब देण्यात आली.

**तेवीस मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्यायकचेरी) मध्ये आले. पुढील मंडळी बादशहाना भेटली:——

(१) मतलबखान करावल वेगी——हा आजारातून उठला होता;

(२) मिर्झा सदरुद्दीन मुहमदखान हाही नुकताच आजारातून उठला होता;

(३) अहदियान (शिलेदार) चा बक्षी नेकनामखान हाही आजारातून उठला होता;

(४) अबदुल्लाखानाची अबदुल्ला वगैरे मुलें ही आग्र्याहून आली होती.

अनुक्रमणिका

खाजा मुहंमद अमीन उर्फ अमानतखान (भावी मुबारिजखान) हा संगमेश्वर व गंडापूरचा फौजदार होता. तो खजीना आणि काफीला यांच्याबरोबर हुजुरात आला होता. त्याला आता निरोप देण्यात आला. त्याला एक हत्ती बक्षीस देण्यात आला.

तुर्कताजखान याची आई वारली होती यासाठी त्याला शोकवस्त्रे देण्यात आली.

**सिंहगडचा नवीन किल्लेदार**

बक्षिंदाबक्ष उर्फ कोंडाणा या किल्ल्यावर किल्लेदार म्हणून ब्रम्हदेव याचा मुलगा देवीसिंग याची नेमणूक करण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**बहादूरगडचा नवीन किल्लेदार**

अहमदनगरचा माजी किल्लेदार व फौजदार अब्दुल गफूरखान याला बहादूरगड उर्फ पेडगाव या किल्ल्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली– मरहूम रुहुल्लाखान (पहिला), मन्सूरखानाची आई, मरहूम मुखलिस खान यांच्या कबरीच्या खर्चासाठी म्हणून जी खेडी लावून देण्यात आली आहेत ती त्यांची मुले आणि नातवंडे यांच्या खर्चासाठी देण्यात यावी. कबरीच्या खर्चासाठी सरकारातून खर्च केला जातो. असे होता कामा नये. ज्याअर्थी एतिमादुदौला (नूरजाहांचा बाप) आणि आसफखान (नूरजहांचा भाऊ आणि मुमताज महलचा बाप) यांच्या कबरीसाठी खर्चाची तजवीज नाही तर इतरांसाठी कां? वर सांगितलेली ही जी तीन माणसे आहेत, त्यांच्याकडून पैसे वसूल करण्यात यावे. (रुहूल्लाखान इत्यादिंच्या वारसाकडून).

राजा मनोहरदास गौड याचा नातू उत्तमराव हा गाजिउद्दीन फिरोजजंग याच्या सैन्यात होता (तैनात), तो येऊन बादशहाना भेटला.

**चोवीस मे १७०३**

आजही दिवाणचे काम बादशहाने केले नाही. अहमदनगरवर पूर्वी सिद्दी मिसबहा हा प्रशासक (हारिस) होता. बादशहाने त्याची मनसब कमी केली आणि आज्ञा केली की, एक गुर्जबर्दार पाठवून त्याला हुजुरात आणावे. मुगलखानाला पत्र लिहून त्याच्या (सिद्दी मिसबाहच्या) आजाराचा तपशील मागावा. राजा मनोहरदास गौडचा नातू उत्तमराम याला बादशहाने गाजिउद्दीन फिरोजजंग याच्या तैनातीतून काढून विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याजपाशी तैनात केले. गुर्जबर्दाराने उत्तमरामला चीन कुलीजखानाकडे पोहोचवावे अशी बादशहाने आज्ञा केली. उत्तमरावला एक हजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब आहे. इस्माइलखान मखा आणि मोहरमखान याने हत्तीखाना पोहोचविल्यानंतर इस्माइलखानाला चीन कुलीजखानाकडे अशाप्रकारे पोहोचविण्यात यावे, अशी आज्ञा केली.

**नवलाख ऊंबरेचा ठाणेदार**

अनुक्रमणिका

नवलाख ऊंबऱ्याचा ठाणेदार आनंदसिंग हा होता. याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागी मन्सूरखानाचा मुलगा आतिषखान याला नेमण्यात आले. त्याला पाचशे जात आणि शंभर स्वार अशी मनसब होती, तीत पन्नास स्वारांची भर घालण्यात आली.

**बंगलोर**

हबीशखान याचा नातू आणि सिद्दी अहमद याचा मुलगा सिद्दी अबदुल्ला (बंगलोरचा माजी फौजदार) याला दोनशे पन्नास जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. दख्खनमध्ये तैनात होण्याच्या अटीवर तीत पन्नास स्वारांची भर घालण्यात आली.

बादशहाने कोडाणा किल्ला जिंकून घेतल्याबद्दल पुढील मंडळीनी पत्रे व भेटी पाठविल्या: —

(१) शहाजादा मुहमद आजम बाराशे अश्रफ्या;

(२) त्याची बायको, औरंगजेबाची सून आणि दारा शिकोहची मुलगी, जहांजेबबानू शंभर मोहरा;

(३) आजमचा मुलगा मुहंमद वालाजाह शंभर मोहरा आणि एक हजार रुपये.

**पंचवीस मे १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते. डाक चौकी आणि हरकारे यांचा दरोगा (अधिकारी) यारअलीबेग हा आजारी होता, तो बरा होऊन बादशहाना भेटला. मुहंमदअली हा चाकरीच्या आशेने नुकताच मध्य आशियातून आला होता, तो बादशहाला भेटला. त्याने बादशहाना दोन घोडे नजर केले. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे आणि दोन हजार रुपये दिले. तोफखान्याचा प्रमुख आणि कौसबेगी या हुद्यावर असलेला करबियतखान याने दोन बंदुकी बादशहाना नजर केल्या.

ब्रह्मदेव शिसोदियाचा मुलगा देवीसिंग याला बक्षिंदाबक्ष उर्फ कोंडाणा येथील किल्लेदारीवर नेमण्यात आले होते. त्याला तिकडे जाण्यास निरोप देण्यात आला. औरंगाबादचा माजी कोतवाल अमानुल्ला याची लाहोर प्रांतात नेमणूक करण्यात आली. कल्याण (बीदर जिल्हा, कर्नाटक) येथे अहसनखान हा किल्लेदार व फौजदार होता. त्याला येथून बदलण्यात आले आणि त्याच्या जागी मिहदीखान याचा मुलगा मिर्जा मुहंमद याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, फिरोजजंगाच्या सैन्यातून जी मंडळी हुजुरात आलेली आहेत त्यांना शिष्टाचाराचा प्रमुख अमानुल्लाखान याने मुद्दाम माणसे नेमून परत पाठवावे. त्याप्रमाणे झुल्फिकारखानाच्या सैन्यातून आलेल्या मंडळींना नुस्रतखान मीरतुजक (शिष्टाचाराचा दुसरा अधिकारी) यानेही असेच पाठवावे.

मरहूम अतिकुल्लाखान याचा मुलगा नसीरोद्दीन हा वऱ्हाड सुभ्याचा बक्षी व वाकेनवीस होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले होते, पण तो हुजुरात आला नाही. फरारी म्हणून त्याची नोंद करण्यात यावी,

अनुक्रमणिका

अशी आज्ञा झाली. बर्कंदाजांच्या (बंदूकधाऱ्यांच्या) चौकीवरील कारकून, आणि दालचंद्र याचा मुलगा सुंदरलाल याची मनसब वाढविण्यात आली.

**सव्वीस मे १७०३**

दिवाणचे काम झाले नाही. काल रात्रीचा एक प्रहर अन् सहा घटिका झाल्या असता बक्षी रूहुल्लाखान यास बादशहाने आपल्या हुजुरात बोलाविले. दोन प्रहरपर्यंत बक्षी रूहुल्लाखान बादशहाला काही प्रकरणे सांगत होता. त्यानंतर त्याला परत जाण्यास निरोप देण्यात आला.

**सत्तावीस मे १७०३**

आज दिवाणचे काम झाले नाही.

**अठ्ठावीस मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटिका झाल्या असता बादशहा अदालत (न्याय कचेरी) मध्ये आले. फतेउल्लाखान बहादूर आलगमीर शाही याला काबुलचा सुभेदार शहाजादा मोअज्ज़म याच्या विनंतीवरून शहाजाद्याकडे काबुल सुभ्यात तैनात करण्यात आले. (विशाळगडच्या वेढ्यात फत्तेउल्लाखान हा जबर जखमी झाला होता). त्याला काबुलकडे जाण्यास निरोप देण्यात आला. त्याची मनसब वाढविण्यात आली. खालश्याचा दिवाण इनायतउल्लाखान हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहाना भेटला. तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याला अबदुल गफूरखान याच्या जागी अहमदनगरी किल्लेदारी आणि फौजदारी देण्यात आली होती. बादशहाने त्याला खास खिलातीची वस्त्रे दिली.

**एकतीस मे १७०३**

आजमगड (पुरंदर) येथील माजी किल्लेदार खानचंद याला आजमनगर उर्फ बेळगाव येथे किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. बेळगावचा माजी किल्लेदार सैफखान आणि फौजदार याला हुजुरात बोलावण्यात आले. बेळगावच्या फौजदारीसाठी रूहुल्लाखान याने इतर कुणाचे तरी नाव सूचवावे अशी आज्ञा करण्यात आली.

मुहंमद कुली हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला एक खंजीर बक्षीस देण्यात आला. त्याला एक हजार जात आणि दोनशे स्वार अशी मनसब नव्याने देण्यात आली.

मुनीमखान याने विनंती केली की, मराठा सरदारांना मनसबी देण्याच्या पद्धतीचे जे खाते आहे त्यावर आपण अधिकारी (दारोगा) आहोत. माझी ही नोकरी माझा मुलगा मुहंमद काजिम याला देण्यात यावी.

अमीरउल्‌उमरा (पंतप्रधान असदखान) हा मुजरा करण्यासाठी दिवाणमध्ये आला. दिवाण संपण्यापूर्वी निरोप घेऊन तो आपल्या तंबूकडे बादशहाच्या आज्ञेने गेला.

अनुक्रमणिका

**मराठ्यांचा हल्ला आणि कुमकेची मागणी**

जबलुल्लइस्लाम (महादेवाचा डोंगर) येथील ठाणेदार यासीनखान याच्यापाशी तैनात असलेला कादरदादखान याने कळविले कीं, गनिमांचे (मराठे) प्रचंड सैन्य दुष्ट हेतूने महादेवाच्या डोंगराच्या भोवती पसरले आहे. लवकर कुमक मिळेल अशी आज्ञा आहे. बादशहाने आज्ञा केली की, यासीनखान याने लौकर कादरदादखान याची कुमक करावी, असे त्याला लिहिण्यात यावे.

**एकोणतीस मे १७०३**

[मागील पानावर ३१ मे चा मजकूर लिहिल्यानंतर पुढील पानावर एकोणतीस मे चा मजकूर आढळला, तो पुढे देत आहे]

आज दिवाणचे काम झाले नाही. दिवसाचा एक प्रहर व पाच घटिका झाल्या असता बादशहाने आपल्या विश्रांतीगृहाचा पडदा बाजूला सारला आणि हमीदोद्दीनखान यास आज्ञा केली की, "अरबी आणि इराकी घोडे माझ्यासमोर आणा. बादशहासमोर नऊ घोडे आणण्यात आले. बादशहाने त्यापैकी तीन अरबी आणि दोन इराकी घोडे शाहजादा मुअज्ज़म याच्याकडे, (काबुल येथे नेऊन) देण्यासाठी फत्तेउल्लाखान याच्यापाशी दिले.

शाहजादा बेदारबख्त याच्या सैन्यातील बातमीवरून समजले कीं, त्याच्या सैन्यात सय्यद मुहम्मद इत्यादी अहदींचे मनसबदार शहाजादाच्या हुजुरात हजर नसतात. बादशहाने आज्ञा केली कीं, फरारी म्हणून त्यांची नोंद करण्यात यावी. त्यांची नावे पुढीलप्रमाणे––सय्यद मुहम्मद, निसारबेग, आणि बकाबेग. बादशाही छावणीतील मुख्य काजी आक्रमखान याने विनंती केली कीं, सखरलना उर्फ खेळणा (विशाळगड) या किल्ल्यातील मुल्ला मुहंमद गौस इत्यादि तैनात असलेले मनसबदार हे आर्थिक दृष्ट्या अतिशय अड़चणीत आहेत. त्यांच्यावर काही कृपा व्हावी. याप्रमाणे पुढील लोकांना इनामे (बक्षीसे) देण्यात आली–– मुल्ला महंमदगौस, मुल्ला मुहंमद वासे, मुल्ला जिकरूल्ला, मुल्ला रहमतउल्ला, मुल्ला मुहंमद रहीम.

[**संपादकीय टीप**–बातमीपत्रांचे कागदपत्र ज्या स्वरूपात आले त्यात मागील तारखांचे पुढे अनपेक्षितपणें यावेंत असे अनेकदा घडले. जेथे जमले तेथे व्यवस्थितपणें क्रमांक लावण्याचा प्रयत्न केला पण जमले नाही तेथे मजकूर महत्त्वाचा असल्यामुळे ते जेथे आणि जसे आढळले तसे देणे भाग पडले. प्रत्येक बातमीपत्राच्यावर तारखेची नोंद केली असल्यामुळे अभ्यासकांची विशेष गैरसोय होणार नाही अशी आशा]

**पंचवीस मार्च १७०३**

आज दिवाणचे काम झाले नाही. बादशहाना कळविण्यात आले की, शहाजादा कामबख्श याजपाशी तैनात असलेला सर्फराजखान हा फार आर्थिक अडचणीत आहे. काही सहाय्य मिळेल अशी आशा बाळगून आहे. बादशहाने आज्ञा केली कीं, सहाय्य म्हणून सर्फराजखानाला एक हजार अश्रफ्या देण्यात याव्या, आणि तहव्वुरखानाने त्याला कोंडाणा किल्ल्याच्या भोवती (मोर्चावर) नेऊन पोहोचवावे.

अनुक्रमणिका

कोंडाणा किल्ल्यातील मराठ्यांचे एक शिष्टमंडळ आपल्या काही विनंत्या घेऊन मुहंमद कामबक्ष याजकडे आले होते. बादशहाच्या आज्ञेनेच त्यांना कामबख्शकडे पाठविण्यात आले. या शिष्टमंडळाचा प्रमुख बाळुजी पंडित (बाळाजी विश्वनाथ, पेशवाईचा संस्थापक) हा होता. त्याच्याबरोबर आणखी पाच माणसे होती. कामबख्शाची भेट घडवून आणण्यात आली. या शिष्टमंडळाला कामबक्षाकडे घेऊन जाणारे, बादशहाचे सेवक फत्तेदौलत कौल, व सय्यद गजनफर हे होत. ही भेट आटोपल्यानंतर, हमीदोद्दीनखान याने शिष्टमंडळाला आपल्याकडे आणले याने बाळोजी पंडित (येथे चुकुन बाजी पंडित लिहिले आहे.) यांचे समाधान केले. त्याला तीन वस्त्रें भेट म्हणून दिली व त्याच्या सोबत त्यांना प्रत्येकी एक शाल दिली. या भेटी त्याने आपल्याकडून दिल्या. यानंतर त्यांना निरोप देण्यात आला. मग बाळोजी पंडित हा आपल्या सोबत्यांच्या बरोबर किल्ल्यात परतला.

बादशहाने आज्ञा केली की, शहाजादा कामबख्श याच्या सैन्याची आघाडी सर्फराजखान याने आणि पिछाडी यासीनखान याने सांभाळावी.

बादशहाने आज्ञा केली कीं, शहाजादा कामबख्श याला वीस घोडे देण्यात यावे.

**सव्वीस मार्च १७०३**

शाहजादा मुहंमद कामबख्श याच्याकडे पुढील वस्तू पुरविण्याची आज्ञा करण्यात आली:—

(१) शंभर बर्कदाज (बंदूकची),

(२) दोनशे पायदळ शिपाई,

(३) पाच बाणदार,

(४) पाचशे बाण, (५) चाळीस मण सरब व दारू (बंदुकीची),

(६) दहा रेहकले (लहान तोफा).

मुहंमद कामबख्श याच्या सरकारचा दिवाण वजारतखान याला कामबख्शच्या सैन्याचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

**सत्तावीस मार्च १७०३**

बादशहाने आज दिवाणचे काम केले नाही.

अनुक्रमणिका

बादशहाना कळविण्यात आले की, तरबियतखानाचे दिवाण सय्यद गजनफर व आनंद रामचंद हे कोंडाणा (सिंहगड) किल्ल्याच्या दरवाज्यासमोर बसले असून, किल्ला मोगलांच्या हवाली करण्याची बोलणी चालू आहेत.

मिर्झा सदरूद्दीन मुहंमदखान याच्याकडे चौथ्या चौकी पाहाऱ्याच्या नेतृत्वाचे काम होते. तो मुहंमद कामबख्शबरोबर गेला त्याच्या ऐवजी तरबियतखानाची नेमणूक करण्यात आली.

बागलाण्याचा फौजदार नजाबतखान याचे विनंती पत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

**अठ्ठावीस मार्च १७०३**

मिफताह अल फतुहचा (बहुदा चंदनवंदन) किल्लेदार कुंवरसिंग (किशोरसिंग?) याची मनसब वाढविण्यात आली. मुहंमद अबदुल्ला हा गुलामअली खानाचा मामेभाऊ याच्याकडे दाभोळ बंदराचा दारोगा व अमीन ही कामे होती. आता त्याच्याकडे——

**चोवीस फेब्रुवारी १७०३**

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे अमीरउल्उमरा (मुख्य प्रधान असद्खान) यांच्याकडून झीनतउन्नीसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) इच्या नावे पत्र लिहिले की, "या पूर्वी तुम्ही औरंगाबादेस जावे असे लिहिले होते पण आता तुम्हाला मान्य असल्यास तुम्ही बहादुरगडास जावे असे ठरले आहे. त्याची तयारी असल्यास तुम्ही उदेपुरी महाल व अंतःपुरातील इतर स्त्रिया यांनी बहादुरगडास यावे.

बादशहाना कळविण्यात आले की, मराठे गनिमाची आठ हजार घोडेस्वारांची फौज बऱ्हाणपुरच्या भोवती पसरली आहे आणि ते बादशाही मुलुख उध्वस्त करीत आहेत आणि चौथ गोळा करीत आहेत. त्यांनी बऱ्हाणपुरचे, बहादुरपुरा आदिपुरे लुटून फस्त केले आहेत. तेथील पीडीत माणसे आश्रयासाठी किल्ल्यात आली आहेत. शहाजादा मुहंमद बेदारबख्श याने बऱ्हाणपुरच्या कुमकेसाठी खाने आलम व तहबुरखान इत्यादिंना पाठविले आहे.

**राजगड व तोरणा**

शिवापूर येथील हरकाऱ्यांनी पुढील माहिती लिहून पाठवली——"राजगडच्या किल्ल्यात धान्य इत्यादिची सामुग्री नाही. तोरणा किल्ल्यात आहे पण कमी आहे. त्यामुळे, मराठ्यांचे पायदळ शिपाई किल्ल्यात ये-जा करतात आणि सामग्रीचा सरंजाम बंडखोर रामचंद (रामचंद्रपंत अमात्य) हा करीत असतो. नसरापुरखेड्याच्या परिसरात शिवापूर परगण्यापासून सोंदन या खेड्यापर्यंत ठाणे कायम करण्यात आले तर मराठे गनिमाची ये-जा बंद पडण्यासारखी आहे. सर्बराहखान व नेकनामखान यांनी लष्करातील माणसे ये-जा करतात ती सावधगिरीने आणावी अशी आज्ञा करण्यात आली. रूहुल्लाखान याने रात्री तळावर येत जावे अशी आज्ञा झाली.

अनुक्रमणिका

कंधार (जिल्हा नांदेड, मराठवाडा) येथील माजी किल्लेदार मुहंमद हुसेन याला हुजुरात बोलावून घेण्यात आले. त्याला ५०० जात व २०० स्वार अशी मनसब होती. एकशेचाळीस स्वारांनी त्याची मनसब कमी करण्यात आली.

**सहा जून १७०३**

सय्यद जानबाजखान याने बादशहापाशी पुढीलप्रमाणे विनंती केली:——

(१) माझी आर्थिक परिस्थिती अडचणीची आहे. मदत म्हणून दहा हजार रुपये देण्यात यावे. बादशहाने आज्ञा केली की पाच हजार रुपये देण्यात यावे;

(२) सशर्त जागीर वाढवावी आणि आमच्या पथकातील लोकांची पगारातील थकबाकी द्यावी. थकबाकी पुरते द्यावे अशी आज्ञा देण्यात आली;

(३) पावसाळ्याचे दिवस आहेत. रात्रीचा गस्त घालण्यासाठी दिवाबत्तीची आवश्यकता असते त्याच्या खर्चासाठी काही रक्कम मिळावी. बादशहाने आज्ञा केली की, दोन हजार रुपये देण्यात यावे;

(४) लष्करातील माणसे पुण्यात येऊन बसू लागली आहेत; त्यांना तेथून काढून लावावे, अशी आज्ञा झाली.

**सात जून १७०३**

यारअली बेग याने बादशहाकडे एक पत्र लिहून पाठविले. पत्रात पुढील मजकूर होता: "दोन हजार चोर घोडेस्वार (मराठे) हे अमीरउल्‌उमरा (मुख्य प्रधान असद्‌खान—) याच्या डेऱ्याच्या दिशेने गेले. चौकीपहाऱ्याच्या आसपास ते पसरले. बादशाही छावणीतील काही ऊंट आणि बैल तिकडे होते. त्यांना ते घेऊन गेले." बादशहाने ते पत्र पाहिले आणि ते पत्र त्याने बक्षी रूहुल्लाखान याजकडे पाठविले.

इनायत उल्लाखानाचा मुलगा हिदायतउल्ला हा झीनतउन्नीसा बेगम ह्यांच्या चाकरीत मीरे सामान ह्या हुद्यावर होता. तो बहादुरगडाहून येऊन बादशहाला भेटला. त्याला हिदायतउल्लाखान अशी पदवी देण्यात आली. बादशहाना दिवाणमध्ये (सभागृह) कळविण्यात आले की, दोन हजार चोर स्वार (मराठे) चौकीपहाऱ्यावर हल्ला करून लष्करातील ऊंट आणि बैल पळवून, बोली (लोणी?) या ठाण्याकडे पोहोचले. माझ्याबरोबर पथक फार थोडे होते. चोरांनी मला कोंडले आहे. ही बातमी ऐकून बादशहानी त्याचवेळी दिवाणमध्ये आलेल्या बक्षी रूहुल्लाखान याला अजीजखान, सुलेमानखान, मुनीमखान वगैरेच्याबरोबर चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी जावे म्हणून आज्ञा करून निरोप दिला. बादशहाने तहवुरखान मीरतुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) याला आज्ञा केली की, बक्षी रूहुल्लाखान याच्या तैनातीतील माणसांना मुद्दाम माणसे नेमून कामगीरीवर रवाना करावे. न्याय खात्याचा प्रमुख मुहंमद अमीनखानबहादूर याचा मुलगा मुहंमद फाजळ याने कुराण पठण पूर्ण केले होते. त्याने बादशहाना भेटून त्यांना काही वस्तू नजर केल्या. त्याला एक लहान हत्ती बक्षीस मिळून देण्यात यावा, अशी आज्ञा झाली.

अनुक्रमणिका

अहमदनगरचा बदललेला संरक्षक सिद्दी मिफताह हारिस (संरक्षक) हा येऊन बादशहाना भेटला. रामरायचा मुलगा कृपासिंग याला दक्षिणी रीतीप्रमाणे (जाबिता) नेमलेल्या पथकांच्या मुश्रफ (हिशोब वगैरेचा अधिकारी) म्हणून नेमण्यात आले. विजापूरच्या कोतवालीत तैनात असलेला आणि सय्यद लतीफ याचा मुलगा सय्यद बुऱ्हाण याला अहमदनगर येथे तैनात करण्यात आले.

शिवाजी डफळे (सटवाजी?) याचा मुलगा संभाजी याला स्वतःच्या लग्नासाठी दोन महिन्याची रजा देण्यात आली. त्याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब हाती. बादामीचा किल्लेदार अल् सैदखान याची मुले बादशहाने नजरेखालून घातली आणि त्यांच्या मनसबी वाढविल्या.

**एक जून १७०३**

कामगारखान (माजी पंतप्रधान मुहंमद जाफर याचा मुलगा नामदारखानाचा भाऊ, औरंगजेबाचा मावस भाऊ) हा बंगालहून बादशहाच्या हुजुरात येत होता. कामगारखान हा औरंगाबाद जवळ आला त्याने बादशहाला विनंती पत्र लिहून विचारले की, येथे शहाजादे मुहंमद बेदारबख्श हे सुभेदार आहेत, त्यांना मी जाऊन भेटण्यासाठी आपली काय आज्ञा आहे. बादशहाने आज्ञा केली की, 'भेटा.' त्याप्रमाणे कामगारखान भेटला. शहाजादा बेदारबख्त याने त्याच्याबरोबर संरक्षक पथक देऊन त्याला हुजुरात रवाना केले. औरंगाबादेचा सदर (धर्म आणि न्याय खात्याचा मुख्य) निजामउद्दीन हा होता, तो वारला. त्याच्या जागेवर ख्वाजा अबदुल अजीज याची नेमणूक करण्यात आली. फत्तेउल्ला खानबहादूर आलमगीरशाही (विशाळगडाच्या वेढ्यात याने मोंगलाच्या बाजुने मोठी कामगिरी बजावली होती.) याला काबुल सुभ्यात शहाजादा मोअज्जम याच्यापाशी तैनात करण्यात आले. त्याला निरोप देण्यात आला.

**दोन जून १७०३**

बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती करण्यात आली. नरकवाशी शिवा (शिवाजी महाराज) याचा पुतण्या (बिरादर जादा) रायभान याला शहाजादा मुहंमद कामबख्श याच्या मध्यस्थीने सात हजार जात अशी मनसब देण्यात आली. पण त्याने जामीन दिला नाही. जामिनाशिवाय आज्ञापत्र त्याला द्यावे किंवा नाही त्यासंबंधी काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की तूर्त मनसब जागीरीचे पत्र (याददास्त) द्यावे. हुजुराची भेट झाल्यावर तो स्वतः जामीन देईल.

बादशहाना कळविण्यात आले की, हसनअलीखान हा आदिलखानी तळ कोंकणचा फौजदार (दाभोळपासून गोव्यापर्यंत) होता. तो गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेत होता. त्याची आता सुटका झाली आहे. त्याच्यासंबंधी काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, हसनअलीखानाची मनसब जी पूर्वी तीन हजार जात आणि दोन हजार स्वार अशी होती, ती बहाल करण्यात येत आहे आणि त्याला चीन कुलीजखान (भावी निजामउल्मुल्क, विजापूरचा सुभेदार) याच्या सैन्यात तैनात करण्यात येत आहे. मोगलखान याचा भाचा सय्यद खाजासय्यद आणि इतर यांची तैनाती काबुल सुभ्यात करण्यात आली.

**तीन जून १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

अनुक्रमणिका

**चार जून १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. सुभे माळव्याच्या हकीकतीवरून कळले की, तेथील जमिनदार राजा इस्लामखान (गोपाळसिंग चंद्रावतचा मुसलमान झालेला मुलगा आणि त्यामुळे बापाची रामपुरची जहागीर बळकावून बसलेला) याच्या माहितीप्रमाणे छत्रसिंग मनसबदारच्या भाऊबंधापैकी हृदयराम आणि उदयकरण यांना परगणे बछावरमध्ये जहागिरी होत्या. छत्रसिंग वारला. बादशहाने आज्ञा केली की, जहागिरी काढून घेण्यात याव्या.

**पाच जून १७०३**

खरगोणचा माजी फौजदार याला ख्वाजा इनायतउल्लाच्या जागी आनंदपूर नेमकल याचा अमीन व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

काल रात्री दोन प्रहर झाले असता बादशहाने बक्षी रूहुल्लाखान यास बोलाविले आणि त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली––"तीन फौजा तयार करा, एक तुमच्या बरोबर राहील, दुसरी सदरुद्दीनखान बरोबर राहील व तिसरी मुहंमद अमीनखान बहादूर बरोबर राहील." रात्री दोन प्रहर झाले असता बक्षी रुहुल्लाखान यास आपल्या डेऱ्याकडे परत जाण्यास निरोप देण्यात आला.

काल रात्री जासुदांच्या तोंडून पुढील हकीकत कळली. ––"शहाजादा मुहंमद कामबख्श याने बादशहाच्या आज्ञेने काही कामगिरी बजावण्यासाठी मुहंमद मुरादखान याचा भाचा मुहंमद हुसेन आणि हरकाऱ्यांपैकी एक व्यंकट वगैरेना पाठविले होते. या सुमारास नरकवासी शिवा (शिवाजी मराहाज) यांचा पुतण्या आणि व्यंको (व्यंकोजीराजे) यांचा मुलगा रायभान याला घेऊन ते बादशाही छावणीकडे येत होते. लोहगाव मुक्कामी काफिला वगैरे घेऊन जेव्हा ते पोहोचले तेव्हा चोरांनी (मराठ्यांनी) ह्यांची संख्या तीस असावी, काफिल्यावर हल्ला केला. मुहंमद हुसेन वगैरेनी काहीना ठार मारून नरकात पाठविले व काहीना जखमी केले. चोरांनी (मराठ्यांनी) काफिल्यातील लोकांवर हल्ला केला आणि ते पळून गेले."

बादशहांना कळविण्यात आले की, काफिल्याच्या बरोबर नौरोजबेगखान वगैरेंचे संरक्षक पथक झुल्फिकारखान याने पाठविले होते. बादशहाने आज्ञा केली की, त्याने आम्हाला भेटण्याची आवश्यकता नाही. त्यांनी (नौरोजबेगखान वगैरे) झुल्फिकारखानाच्या फौजेत परत जावे.

बादशहाना कळविण्यात आले की, दण्डराजपुरीचा किल्लेदार याकूबखान याने डाळिंबाच्या दोन करंड्या आणि आंब्याच्या चौऱ्याण्णव करंड्या पाठविल्या आहेत. त्या मेवाखान्यात (फळागारात) ठेवण्यात याव्यात.

खान फिरोजजंग याच्या फौजेत तैनात असलेला, मुकुंदसिंगाचा मुलगा जगत्सिंग हा येऊन भेटला.

**सहा जून १७०३**

माळव्याचा सुभेदार शाईस्ताखान (सुप्रसिद्ध शाईस्ताखान याचा मुलगा) याचे पत्र बादशहाने नजरेखालून घातले.

आजमगढ (पुरंदर) वरील बातम्यावरून पुढील हकीकत कळली. ——"मौजे कोंडवा खुर्द येथील अधिकाऱ्यांनी लिहून पाठविले कीं, धनाजी जाधव व हणमंत (हणमंतराव) यांचे अधिकाऱ्यांपैकी चोकू (?) वगैरेंनी या भागात धामधूम चालविलेली आहे आणि बादशाही लष्कराकडे ३ हजार स्वारासहित जाण्याचा त्याचा इरादा आहे." बादशहाने आज्ञा केली कीं, या बातमीच्या नकला रूहुल्लाखान आणि मोहंमद अमीनखान बहादूर यांच्या सैन्यात पाठविण्यात याव्या.

रामजी वगैरे जासुदांच्याकडून पुढील हकीकत कळली. ——"खंडू (खंडोजी) वगैरे गनीम हे चार हजार स्वार घेऊन सोलर (?) या गावाकडून पुण्याच्या दिशेने पसरत आहेत. त्यांचा हेतु दुष्ट आहे. तो असा की, धनाजी जाधवच्या आघाडीवर राहून——तिकडून परतून बादशाही लष्कराच्या छावणीकडे चाल करून यावे."

बादशहाने आज्ञा केली की, या बातमीच्या नकला बहादुरगडमध्ये असलेल्या झुल्फिकारखानाकडे आणि बक्षी रूहुल्लाखान याजकडे पाठविण्यात याव्या.

मरहूम अब्दुलअजीज याचा मुलगा आणि धोडप (नाशिक जिल्हा) चा किल्लेदार अब्दुलहसन याची मनसब वाढविण्यात आली.

राजा नेकनाम याला देवी निघाल्या होत्या. (नागपूरचा गोंड राजा) या सुमारास बरा होऊन तो बादशहाला भेटला. मुल्ला अब्दुलगफूर हा आर्थिक अडचणीत होता. त्याला बादशहाने पाच अश्रफ्या आणि पंधरा होन इत्यादी सहाय्य म्हणून दिल्या.

सय्यद जानबाजखान याला पुरंदरचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्यानी काही बाबतीत विनंती केली होती, ती बादशहाच्या नजरेखालून गेली.

[**संपादकीय टिप्पण**. ——या पुढील काही नोंदी मागील तारखांच्या आहेत. हे वाचकांनी लक्षात घ्यावे.]

### आठ जानेवारी १७०३

आज शुक्रवार, रमजान, बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले. काल पीलखाना (हत्तीखाना) चा अधिकारी (दारोगा) हमीदोद्दीनखान बहादूर याने सैफुल्लाखान याला बक्षीस म्हणून देण्यासाठी ठरविलेला चार हजार रुपये किंमतीचा हत्ती बादशहासमोर आणला. बादशहाने आज्ञा केली की हा हत्ती मुहंमद अमीनखान बहादुरला द्यावा. सैफुल्लाखानासाठी दुसरा हत्ती द्यावा.

अनुक्रमणिका

रमजानचा महिना सुरू झाला. बादशहाच्या कारभाराचे सत्तेचाळीसावे वर्ष सुरू झाले. या निमित्ताने शुभेच्छेची पत्रे शाहाजादा आजम, वाला गुहर बेदारबख्त, शाहजादा वालाजाह इत्यादिंची पत्रे आली.

बादशहाने आज्ञा केली की, मन्सूरखानाच्या पथकातील दोनशे पायदळ शिपाई यांना कोंडाणा किल्ल्याभोवतीचा ठाणेदार अमानुल्लाखान याजपाशी तैनात करण्यात यावे. बादशहाने ऐवजबेग वगैरे दोन गुर्जबर्दार नेमले व आज्ञा केली की त्यांनी इस्लामपूर उर्फ रामपूर याचा जमिनदार राजा इस्लामयारखान याला आणि मांडवगडचा फौजदार नवाजिसखान याला त्यांच्या अर्ध्या-अर्ध्या पथकासहित माळव्याचा सुभेदार शाइस्ताखान याजकडे पोहोचवावे.

बादशहाने आज्ञा केली की, फत्तेउल्लाखान बहादूर याला शत्रूच्या परिपत्यासाठी आणि सखरलना (खेळणा, विशालगड) किल्ल्यावरून तोफा आणण्यासाठी पाठविण्यात आले होते. त्याने हुजुरात यावे. तोफा आणण्याचे काम कऱ्हाडचा ठाणेदार यासीनखान याने करावे.

हमीदोद्दीनखान याच्या तैनातीतील सय्यदजान, त्याचा मुलगा, भाऊबंध व पन्नास स्वार यांना, कोंडाणा, किल्ल्यासमोरील मोर्च्यात तरबियतखानापाशी तैनात करण्यात आले. जंगल तोडणारे पन्नास तबरदार (परशुधारी) यांना मुहंमद अमीनखान बहादूर या कोंडाणा किल्ल्याभोवतालच्या ठाणेदारापाशी तैनात करण्यात आले.

## तीस एप्रिल १७०३

बादशहाने आज दिवाणचे काम बंद ठेवले. बक्षी रूहुल्लाखान याच्या शिक्क्याने पुढील मंडळींना पत्रे रवाना झाली. खान फिरोजजंग व विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान. मरहूम मुफख्खरखान याचा मुलगा जैनुल्आबिदीन याला तरबियतखानाच्या मोर्च्याचा वाक्निस म्हणून नेमण्यात आले.

दिवाण कचेरीचा अधिकारी (दारोगा) यार अलीबेग याचा मुख्य कारकून तुळशीमल् हा वारला असे बादशहाना कळविण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, सुरतेचा कारभारी (मुत्सद्दी) याने यापुढे पेशकश पाठवू नये. त्या ऐवजी वर्षातून उत्तमातील उत्तम अशे एक दोन घोडे पाठवावेत. तसेच सुगंधी द्रव्ये पाठवीत जावी.

## एकोणतीस एप्रिल १७०३

दिवाणेखासच्या मुश्रफला (अधिकारी) मुहंमद अलीखान ही पदवी देण्यात आली. त्याचे मूळनाव हाजी मुहंमदअली होते.

बादशहाने आज्ञा केली की, सर्फराजखान, त्याचा मुलगा व एक जावई हे शाहजादा कामबक्ष याच्या फौजेतून निघून आपल्या हुजुरात राहतील. त्याच्या भाऊबंधापैकी शेख निनहाज वगैरे फौजेत तैनात होतील.

नळदुर्गचा किल्लेदार आणि फौजदार मुहतशमखान याची मनसब वाढविण्यात आली.

"इनायतउल्लाखान याने विनंती केली की, राज्यातील प्रजेकडून सरकारला कराची बाकी वसूल होणे आहे. पण प्रत्येकी काही जण मेले, काही फरार झाले आणि काहीतर नादार आहेत त्यामुळे ही रक्कम वसूल होऊ शकत नाही. पण अमीन आणि दिवाण या खात्यातील नोकरवर्ग प्रजेवर सक्ती करीत आहे तर यांना प्रजेला बादशहाच्या राज्य कारभाराच्या पंचेचाळीसाव्या वर्षापर्यंतची बाकी माफ करण्यात यावी."

बादशहाने विनंती मान्य केली.

**चोवीस मार्च १७०३**

आज सकाळी बादशहाने खाजा इज्जत याच्या बरोबर शाहजादा कामबख्श याच्या डेऱ्यावर मूल्यवान अशी खिलातीची वस्त्रे पाठविली. ती वस्त्रे अंगावर घालून——मुलांना बरोबर घेऊन शाहजादा कामबख्श हा मुजरा करण्यासाठी बादशहाच्या विश्रांतीस्थळी (आरामगाह) आला. त्यानंतर त्याला एक शिरपेच व एक हिऱ्याचा अलंकार, पंधरा हजार सातशे रुपये किंमतीचा देण्यात आला. दोन हजार रुपयांची मौल्यवान (संगेयशम) म्हणजे हिरव्या रंगाची पण स्फटिकाप्रमाणे असलेले पात्र किंवा असाच एक प्रकारही कामबख्शाचा मुलगा सुल्तान मोहिऊसुन्नात याला देण्यात आले. असाच एक पात्र आणि पाचूचा एक अलंकार चौदाशे रुपयाचा कामबख्शाचा दुसरा मुलगा सुल्तान फिरोजमंद याला देण्यात आला. त्यानंतर बादशहाने झिनतउन्नीसा बेगम इत्यादिंना घेऊन येण्यासाठी कामबख्श याला ब्रह्मपुरीच्या तळावर जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याच्याबरोबर पुढील मंडळींना तैनात करण्यात आले: –

(१) बक्षीउल्मुल्क सदरूद्दीन मुहंमदखान,

(२) सातारा (आजमतारा) वगैरेचा फौजदार यासीनखान,

(३) अहदियानचा बक्षी नेकनामखान,

(४) वझारतखान, कामबक्षाचा दिवाण,

(५) नुसरतखान, कामबक्षाचा बक्षी,

(६) मुसाहिबखान, कामबक्षाच्या मुलाचा बक्षी,

(७) हकीम मुहंमद मोहसीन,

(८) सिद्दी बलालखान,

(९) सिद्दी फरादखान,

अनुक्रमणिका

(१०) मुहंमद आक्रम,

कामबक्षाला सात हजार अश्रफ्या आणि सात हत्ती देण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, सरफराजखानाने कामबक्षाच्या तैनातीत जावे. त्याच्या जागेवर (मोर्च्यावर) उजबेगखान याने खबरदारी बाळगावी. हमीदोद्दीन खानबहादूर याने कळविले की, "किल्ल्यावरून बाळोजी पंडित (बाळाजी विश्वनाथ) आणि पाच इतर हे तहाची बोलणी करण्यासाठी मीर आतिश (तोफखान्याचा प्रमुख) तरबिअतखान याच्याकडे आले होते. तरबिअतखानाने त्यांना सय्यद गजनफर यास बरोबर देऊन आपल्याकडे पाठविले आहे."

बादशहाने हमीदोद्दीनखानला बोलाविले. त्यास काही सूचना केल्या आणि आज्ञा केली की, त्या मंडळींना शाहजादा कामबक्षाकडे पाठवावे.

मतलबखानाने बक्षी रूहुल्लाखान याच्या मध्यस्थीने विनंती अर्ज केला की, माळवा सुभ्यांतील अष्टा वगैरे परगणे आपल्या तनखा जहागिरीत आहेत. बंडखोर अब्बास अफगाण याने परगण्यातील खेडी लुटून फस्त केली आहेत. एक मनुष्य मुद्दाम नेमून त्याला माळव्याच्या सुभेदाराकडे पाठवावे आणि सुभेदाराला त्या जागी घेऊन बंडखोरांनी बांधलेली गढी पाडावी व परगणा त्याच्या ताब्यातून सोडवावा. बादशहाने आज्ञा केली कीं, एक गुर्जबर्दार नेमावा आणि माळव्याच्या सुभेदाराला रूहुल्लाखानाने लिहावे.

**तीस मे १७०३**

बादशहाने आज दोन्ही दिवाण बंद ठेवले. बादशहाने आज्ञा केली की, झुल्फिकारखानाच्या सैन्यात एक बेलदार आणि एक पाणी वाहणारा (सक्का) तैनात करण्यात यावे. लोधी याच्या मुलीचा मुलगा मुहंमद खलील आणि डोंगरसिंग हाडा यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या. बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी रुहुल्लाखान हे कही (घासदाणा वगैरे सामग्री) आणण्यासाठीं गेले आहेत.

चौल बंदरचा मुत्सद्दी (कारभारी) मोमीनखान याची मनसब वाढविण्यात आली. ब्रह्मदेव शिसोदिया याचा मुलगा देवीसिंग याला बक्षिंदाबख्श (सिंहगड) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याची मनसब वाढविण्यात आली होती. त्यापैकी तीनशे स्वार कमी करण्यात आले.

**एकतीस मे १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. शाहजादा बेदारबख्त याजकडे इनायतउल्लाखानाच्या सहीने बादशहाचा हुकूम असलेले पत्र गेले होते. त्याचे उत्तर घेऊन अलमबेग गुर्जबर्दार हा परत आला. त्याला मिळालेली बक्षिसाचे शंभर रुपये त्याला आपल्यापाशीच ठेवून घेण्याची आज्ञा झाली.

हैद्राबाद-कर्नाटकचा फौजदार नुस्रतजंग झुल्फिकारखान याचा नायब दाऊदखान (पन्नी) याच्या पत्रावरून पुढील हकीकत कळली:——

अनुक्रमणिका

“येथील दिवाण सादतउल्लाखान याने अंबूरचा किल्ला जिंकून घेण्यात उत्कृष्ट कामगीरी केली आहे. त्याच्यावर कृपा व्हावी.” त्याची मनसब वाढविण्यात आली.

**एक जून १७०३**

बादशहा आज दिवसाचा एक प्रहर आणि चार घटिका झाल्या असता न्याय कचेरीत आले. तरबिअतखान याची नेमणूक अहमदनगराचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून करण्यात आली होती. प्रत्यक्षात त्याचा मुलगा मुहंमद इसहाक हा अहमदनायब म्हणून बापाच्या जागी काम करणार होता. त्याला स्फटिकाच्या मुठीचा एक खंजीर बक्षीस देण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला.

शमशुद्दीन मुहंमदखान शहीद (कंधारचा किल्लेदार, मिरजेच्या लढाईत मारला गेला) याचा मुलगा सय्यद गुलामकादरी याला त्याच्या लग्नासाठीं रजा देण्यात आली व त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

**चौदा जून १७०३**

मातबरखान (कल्याण-भिवंडीचा प्रशासक) याच्याकडून मरहूम फत्तेजंगखानाचा मुलगा मुबारक आणि मुबारकचा पुतण्या इनायत हे येऊन बादशहाना भेटले. त्यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. मरहूम शरीफखान याचा मुलगा सय्यद इमामउद्दीन याला महमंद अमीनखान बहादूर याच्या गस्त घालणाऱ्या फौजेचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

पुढील मंडळींना मुहंमद अमीनखान बहादूरच्या गस्त घालण्याच्या पथकातून वेगळे करण्यात आले:—

(१) लुत्फुल्लाखानाचा मुलगा इनायतखान आणि त्याचे पथक आणि (२) शागीर्दपेशाचा बक्षी जैनुल्आबिदीन.

मरहूम इरादतखान काशगरी याचा मुलगा शाकीरउल्ला आणि रूपसिंगाचा मुलगा अनूपसिंग यांना बादशहाने काल तरबियतखानापाशी तैनात करून त्यांना मोर्च्यावर जाण्यास निरोप दिला.

बादशहाना कळविण्यात आले की, सियादतखानाचा नायब ख्वाजा होशमंद हा सियादतखानाच्या सामान-सुमानांचा व्यवस्थापक होता. सियादतखानाच्या नेवाती नौकरांनी होशमंदवर हल्ला करून पुणे मुक्कामी त्याला आणि इतर एका माणसाला ठार मारले. हल्लेखोरांपैकी तिघांना पकडण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, कोतवालाने इतरानाही पकडून ठार मारावे.

रतन राठोडचा मुलगा सत्रसाल हा तरबियतखानापाशीं तैनात होता. त्याला तेथून काढून विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याजपाशी तैनात करण्यात आले.

अनुक्रमणिका

**वीस सप्टेंबर १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले.

**एकवीस सप्टेंबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर अन् चार घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी भरविली.

आज्ञेप्रमाणे सुलेमानखान हा अतिशखानाकडून बादशहाना भेटण्यासाठी आला. किल्ले अमानगड ऊर्फ तिकोना घेतल्याच्या प्रसंगानिमित्त त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. रशीदखान याचा आप्त मोहंमद अश्रफ हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला दोनशेची मनसब देण्यात आली आणि नव्याने जिंकलेल्या मुलखात त्याला खान फिरोजजंग व झुल्फिकारखान यांना योग्य वाटेल तेथे त्याला जहागीर देण्यात यावी, अशी आज्ञा झाली. शाहजादा बेदारबख्त याचा जमादार अल्लाहदादबेग हा शाहजादा मुहंमद आजम याने पाठविलेले जडजवाहिर घेऊन आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. किशोरसिंग याला अमानगड उर्फ तिकोना याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

**छावणीतील सैन्य**

बादशाही छावणीत आणि भोवती गस्त घालण्यासाठी खालील माणसे आणि सैन्य नेमण्यात आली:——

(१) बक्षी उल्मुल्क रूहुल्लाखान—पाच हजार तिनशेछत्तीस घोडेस्वार,

(२) बक्षी उल्मुल्क मिर्जासदरुद्दीन मुहंमदखान—तीन हजार घोडेस्वार.

(३) मुहंमद अमीनखान बहादूर—तीन हजार घोडेस्वार.

रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग हा बादशहाच्या हुजुरात होता. त्याने अर्ज केली की, यापूर्वी माझ्या विनंत्या——माझ्याकडून यार अलीबेग हा हुजुरात मांडीत असे, ती पद्धतही यापुढे चालू राहावी. बादशहाने आज्ञा केली की, दिवाणीशी संबंधीत तुमची प्रकरणे असली तर ती दिवाण कचेरीच्या मार्फतीने येतील. बक्षीगीरीची प्रकरणे असली तर बक्षांच्या मार्फतीने येतील.

बादशहाने चौथ्या चौकीचा मुख्य म्हणून मुहंमद अमीनखान बहादूर आणि पाचव्या चौकीचा मुख्य म्हणून मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान यांची नेमणूक केली.

बादशहाने मोहंमद अमीन बेग गुर्जबर्दार याला मुगलखान याजपाशी तैनात केले. त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा देण्यात आली:—

"ठाणी बसविण्यासाठी मुगलखानाला आसपासच्या फौजदारांची आवश्यकता वाटेल त्या वेळेला तुम्ही जाऊन फौजदार आणि त्यांची पथके यांना मुगलखानापाशी आणून ठाणी बसवून द्यावी."

बादशहाच्या आज्ञेने खालश्याचा दिवाण इनायतउल्लाखान याच्या शिक्क्याने शहाजादा बेदारबख्त याच्या नावे एक पत्र रवाना झाले. इनायतउल्ला याच्या मुलीला डोळ्याचे औषध आणि एक हजार रुपये किंमतीचा एक अलंकार (जहागिरी) या वस्तू बक्षीस म्हणून दिल्यात.

मरी अब्दुल लतीफचा मुलगा मीर अबुलहसन याला औरंगाबादची बक्षीगिरी, वाक्निशी आणि घोड्यांच्या डागाचे रजिस्टर नीट ठेवण्याचे व करण्याचे कामही देण्यात आली.

बक्षी रूहुल्लाखान व अबदुस्समदखान वगैरेनी मुहंमद अमीनखान याच्याबरोबर देण्यासाठी तीन हजार आठशे पंधरा स्वारांची यादी तयार केली. बक्षींनी चौकशीवरून प्रमाणित करून आपल्याला दाखवावे अशी आज्ञा झाली. नंतर आज्ञा झाली की, त्या सर्वांना आम्ही नजरेखालून घालू इच्छितो. राजा शाहू याचा दिवाण म्हणून शेख गुलाम मुहंमद याची नेमणूक करण्यात आली. बक्षी सदरुद्दीन याच्या फौजेचा बक्षी म्हणून मुहंमद अमीर व बक्षी रूहुल्लाखानाचा बक्षी म्हणून शफीखान यांच्या नेमणुका करण्यात आल्या.

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## २२ सप्टेंबर इ. स. १७०३ ते १ नोव्हेंबर १७०३

### बावीस सप्टेंबर १७०३

बादशहाने आज दिवाणचे काम बंद ठेवले.

बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी रूहुल्लाखान हा गस्त आणि टेहळणी यासाठी गेला आहे. काल बादशहाने बक्षी रूहुल्लाखान याला बोलावून पुढीलप्रमाणे आज्ञा केली——हमीदोद्दीनखान बहादूर यांच्यासाठी फौज तयार करावी. हमीदोद्दीनचे सहकारी सलमानखान, कामियाबखान व सैफुल्लाखान वगैरे राहतील. स्वारांची संख्या एक हजार आठशे अडुसष्ट राहील. त्यांच्याबरोबर पुढील सामग्री देण्यात यावी—— (१) प्यादे बारा, (२) सुतरनाळ (लांब पल्याच्या हलक्या तोफा) दाह, (३) रेहकले (हलक्या तोफा) दोन, (४) बारूद (बंदुकीची दारु) वीस (मण१), (५) सरब (कृष्णमृत्तिका) २० (मण १), (६) बाण तीनशे, (७) बाणदार.

लोहगावच्या ठाणेदारीवर असलसिंग (?) याला पूर्ववत कायम करण्यात आले. मध्ये त्या गावच्या ठाणेदारीवर फकीर मुहंमद अईज याची नेमणूक करण्यात आली होती. ती रद्द करण्यात आली.

अमानगड (तिकोना) ची किल्लेदारी गोपाळसिंगचा मुलगा किशोरसिंग याला देण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली. अब्दुल रसूलखान हा कर्डे निमोण्याचा ठाणेदार होता. त्या ठाण्याला जोडूनच जुन्नर तालुक्यात असलेल्या कांजीसोन (?) या ठाण्याची ठाणेदारीपण त्याला देण्यात आली.

### तेवीस सप्टेंबर १७०३

आज दिवाणचे काम बंद होते.

### चोवीस सप्टेंबर १७०३

मीर सुलेमान वगैरे मध्य आशियातून आले होते. त्यापैकी मीर सुलेमानला शंभर जात अशी मनसब देण्यात आली. खोरा अलाहबादचा फौजदार दिलावरखान याने पुढीलप्रमाणे वृत्तांत लिहून कळविला.—— बंडखोर सत्रसाल तर आहेत. अनेक जमिदारांनी (बसंत वगैरे) चार किल्ले मजबूत असे बांधून आपल्या ताब्यात ठेवले आहेत. एकही तोफ आमच्यापाशी नसतांना हे किल्ले पाडण्याची गोष्ट आम्ही काय करावी. न सांगता ही ती गोष्ट उघड आहे. अलाहबाद सुभ्यातून मदत देण्यात येईल आणि त्यामुळे जमिनदारांनी बांधलेले किल्ले पाडून टाकता येतील, अशी आशा आहे. अलाहबादच्या सुभेदाराच्या नावे आज्ञापत्र सादर करण्यात यावे.

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, तोफखान्याच्या मुख्याच्या नायबने वृत्तांत सादर करावा की, अलाहबाद, रोहतासगड, कालंजरगड आणि चुनारगड या किल्यातून असलेल्या तोफांची काय स्थिती आहे.——तेथे जर फार मोठ्या तोफा असल्या तर, राजधानीतून तोफा देण्यात याव्या.

अमानगड उर्फ तिकोण्याचा किल्लेदार किशोरसिंग याला खिलातीची वस्त्रे देऊन किल्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. सुरत बंदरचा सबानेह निगार (घटनांचा वृत्तांत लिहून पाठविणारा मुहंमद बाकर), याला तेथून बदलण्यात आले होते. त्याला आता श्रीरंगपट्टणच्या पेशकशगिरी या हुद्यावर नेमण्यात आले. त्या जागेवर पूर्वी अब्दुल रहमान हा काम करीत होता. मुहंमद बाकरीची मनसब वाढविण्यात आली.

**पंचवीस सप्टेंबर १७०३**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली——"गुर्जबर्दार नेमा, त्यांना औरंगाबादेकडे पाठवा. औरंगाबादेहून वंझारी लोकांना इकडे आणण्यात येत आहे. त्यांना हैद्राबादला पाठवावे. तेथून मुबलक धान्य गोळा करून त्यांनी हुजुरात यावे. ("त्यावर्षी म्हणजे १७०३ मध्ये पाऊस नसल्यामुळे पुण्यात विलक्षण दुष्काळ पडला होता. त्यावेळी पुण्याच्या छावणीत असलेला औरंगजेबाचा स्वतःचा कारकून साकी मुस्तैदखान म्हणतो" बादशहा पुण्यात सहा महिने आणि अठरा दिवस होता. आवर्षणामुळे धान्याचा दुष्काळ पडला. अनेक गरीब लोक त्यामुळे मृत्युमुखी पडले. अनेक दुबळी माणसे शोक करु लागली. चणे, गहू आणि तांदूळ फार कष्टाने मिळत. बादशाही लष्करांतील धान्याचा बाजार शहागंज तर गोरगरीबांच्या आक्रोशांनी भरुन गेला. पण एकवेळ काळ आपला बेत बदलेल पण बादशहा आपल्या निर्धारापासून हटणार नाही").

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठवले.——"माझ्या तैनातीत असलेले माझ्या भाऊबंधापैकी माझ्या पथकातील लोक चाकरी सोडून गेले. अंमलबजावणीच्या अधिकाऱ्यांनी त्यांचा पगार आणि मालमत्ता ही विजापूरच्या खजिन्यात ठेवली आहे." बादशहाने आज्ञा केली की, ती तहवुरखान याजपाशी पाठविण्यात यावी.

**सव्वीस सप्टेंबर १७०३**

ग्वालेरचा फौजदार जान निसारखान याच्या नावे बक्षी रूहुल्लाखान याच्या शिक्क्याने बादशहाचे आज्ञापत्र रवाना झाले.

**सतावीस सप्टेंबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर अन् पाच घटिका झाल्या असता बादशाहा न्याय कचेरीत आले. मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याला हमीदोद्दीनखानबहादूर बरोबर तैनात करण्यात आले.

बादशहाला कळविण्यात आले की, मिर्झा सदरुद्दीन मुहंमदखान हा कही (घास-दाणा) आणण्यासाठी आणि लष्कराभोवती गस्त व टेहळणी घालण्यासाठी गेला आहे.

अनुक्रमणिका

औरंगाबादेचा, घोड्यांना डाग देण्याच्या आणि तपासणीचा अधिकारी कुंजमन याचा मुलगा साहेबराम याला बक्षी सदरुदीनचा दुय्यम कारकून म्हणून नेमण्यात आले. त्या जागेवर पूर्वी शेख मेहरुल्ला (अफरातफरीतून वाचण्यासाठी वाटलेला निहरचंद) हा होता. कुंजमनचा जावई उत्तमराम याला घोड्यांना डाग देणे आणि त्याचे दप्तर तपासणे या कामावर नेमण्यात आले.

मिर्झा सदरुद्दीन मुहंमदखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली.——"विजापूरहून जी बातमी आली आहे ती वरुन असे दिसते की, मुद्‌गलचा (किल्ले रायचूर कर्नाटक) किल्लेदार व फौजदार कामिलखान याच्याने काम होत नाही व त्याला अधिकार चालविता येत नाही, चीन कुलीजखानाच्या फौजेत तैनात असलेला मीर अब्दुल मोमीना हा त्या जागेसाठी उपयुक्त आहे."

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली, "चीन कुलीजखानाला लिहा—मीर अबदुल मोमीन याचे नाव किल्लेदारीसाठी लिहून पाठवा, असे त्याला सांगण्यात आले."

## अठ्ठावीस सप्टेंबर १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—"दोन गुर्जबर्दार नेमा. जुन्नर (शिवनेरी) चा किल्लेदार व फौजदार अबुल खैरखान याला बक्षी रूहुल्लाखानाच्या शिक्क्याने पुढील अर्थाचे आज्ञापत्र (हसबुलहुकुम) पाठविण्यात यावे. शहाजादा मुहंमद आजम याने काश्याची भांडी हुजुरात पाठवली होती. वाटेत कांजीसुराचे ठाणे जुन्नरजवळ असून जुन्नर परगण्यात आहे (ते कोरी नदीच्या काठावर आहे.) ज्याअर्थी तुमच्या फौजदारी क्षेत्रात हे ठाणे आहे आणि तेथूनच चोरांनी (मराठ्यांनी) माल लूटून नेला आहे तर तुम्ही तो माल मिळवून छावणीत आणावा.

हमीदोद्दीनखान बहादूर हा टेहळणी करण्यासाठी राजगड किल्ल्याच्या दिशेने चालला होता. बादशहाने आज्ञा केली की, यक्काताजखान वगैरे तीनशे स्वार हे हमीदोद्दीनखानच्याबरोबर राहतील ते पुढीलप्रमाणे——(१) यक्काताजखान——हजार जात व पाचशे स्वार, (२) शेख जमाल-पाचशे जात व शंभर स्वार, (३) हातमखानाचा मुलगा मुहंमद बाकर——चारशे जात व एकशेवीस स्वार, (४) शिकारखान करावल——दोनशेवीस जात व पन्नास स्वार, (५) खान मुहंमद करावल वरीलप्रमाणेच.

मीर अबदुल लतीफ गुर्जबर्दार हा मरहूम मौलवी अबदुल्ला याचा मुलगा मीर अबदुल हफीज याला सोडविण्यासाठी सियालकोटकडे चालला होता. औरंगाबादजवळ त्याच्यावर चोरांनी (मराठ्यानी) हल्ला करून त्याला जखमी केले, त्याच अवस्थेत तो औरंगाबादेस पोहोचला हे कळल्यावर बादशहाने त्याला बदलले. नवीन गुर्जबर्दाराला आज्ञा करण्यात आली की, एक महिन्याच्या आंत मीरअबदुल हफीजला सोडवून यावे.

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याच्या पत्रावरुन पुढीलप्रमाणे कळले— "रायबाग हुकेरी भागात इस्माइलखान मका, बीरखान मुहंमद, ऐकोजी घोरपडे (मुधोळचे) वगैरे बत्तीस माणसे यांनी

अनुक्रमणिका

मराठ्याच्या विरुध्द लढताना उत्कृष्ट कामगीरी बजावली. कृपेची आशा बाळगून आहेत." बादशाहाने आज्ञा केली की, बक्षी रूहुल्लाखान यांनी हे प्रकरण मांडावे. बादशाहाने आज्ञा केली की, टेहळणीचे काम बंद करावे. यापुढे मुहंमद अमीन खानबहादुर आणि मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान यांनी पाळीपाळीने कही (घास-दाना) आणण्यासाठी जात असावे.

**एकोणतीस सप्टेंबर १७०३**

आज दिवानचे काम बंद होते. काल रात्री एक प्रहर अन तीन घटिका उलटून गेल्यानंतर बक्षी रूहुल्ला खान हा आज्ञेप्रमाणे हुजुरात आला. बादशाहाने त्याच्याबरोबर एकांतात खलबते केली. आज बादशहाने हमीदोद्दीनखान बहादुर व बक्षी सदुल्ला यांच्याशी खलबते केली. दुपारी त्यांना आपल्या तंबूकडे परतण्यासाठी निरोप देण्यात आला. बादशाहा म्हणाले बक्षी रूहुल्लाखान याने दिवानचे कामकाज सुरु होण्यापूर्वी आपल्याकडे मुजऱ्यासाठी येत जावे.

**तीस सप्टेंबर १७०३**

अहमदाबादचे सुभेदार शहाजादा आजम याने पत्र पाठविले होते ते बादशहाने नजरेखालून घातले.

**एक ऑक्टोबर १७०३**

बादशहाने दोन्ही दिवाण (दिवाणेखास व आम ) चे काम बंद ठेवले. दिवसाचा एक प्रहर व चार घाटिका झाल्या असता त्याने आपल्या विश्रांतीगृहाची (आरामगाह) खिडकी उघडली. बक्षी रूहुल्ला व हमीदोद्दीन खान बहादुर यांना त्यानी हुजुरात बोलाविले. त्याप्रमाणे ते दोघे आले. त्यांनी बादशहाना मुजरे केले. बादशहाने त्यांना काही सूचना दिल्या बादशहाने रूहुल्लाखानाच्या मुलांना रत्नजाडीत शिरपेच, कमरेचा पट्टा व हमीदोद्दीनखान यास एक ढाल शंभर रुपयांची ही बक्षीस म्हणून दिली आणि योगक्षेमाची प्रार्थना पढून त्या दोघांना राजगड व तोरणा या किल्ल्यांच्या जवळ छावणी योग्य जागा पाहावी आणि टेहळणी करावी यासाठी निरोप दिला.

बक्षिसाबद्दल त्यांनी मुजरे केल्यावर बादशहा म्हणाले—हमीदोद्दीन खान बहादुर, बक्षीउल्मुल्क रूहुल्लाखान या दोघांनी परस्परांशी सहकार्य करावे आणि बादशाही काम तडीस न्यावे. बंडखोर (मराठे) चाल करुन आले तर त्यांना ठार मारावे.

**दोन ऑक्टोबर १७०३**

बादशहा आज न्याय कचेरीत आले. हमीदोद्दीन खानच्या जागेवर दिवाणेखासच्या दारोग्याच्या हुद्यावर खानाजादखान याची नायब म्हणून नेमणूक करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, मिर्झा सहरुद्दीन मुहंमदखान यांनी अंमलबजावणीचे अधिकारी नेमावे. त्या अधिकाऱ्यांनी हमीदोद्दीन खान बहादूर आणि बक्षी रूहुल्लाखान यांच्या सैन्यातील अधिकाऱ्यांना आणि माणसांना जागेवरुन हलवून त्या दोघांच्या तळावर नेऊन पोहोचवावे.

अनुक्रमणिका

सुलेभानखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. मीरअलीखान याला हमीदोद्दीन खानाच्या फौजेचा दिवाण करण्यात आले. काल रात्री बादशहाने मुनीमखान व तहबुरखान, कामयाबखान यांना बोलावून पुढील प्रमाणे आज्ञा केली—"अमंलबजावणीचे अधिकारी (सजावली) नेमा आणि हमीदोद्दीन खान आणि रूहुल्लाखान यांच्या पथकातील लोकांना त्यांच्याकडे पोहोचविण्याची व्यवस्था करा" मुनीमखानाला रूहुल्लाखानाच्या तैनातीतून काढले आणि बादशहाने त्याला आपल्या हुजुरात ठेवून घेतले. त्याच्या जागी फहाकखान याला नाहुल्लाखानापाशी तैनात करण्यात आले. बादहशानें अकीदतखान याला आपल्या हुजूरात घेतले.

**तीन ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

आज मुख्य प्रधान अमीरउलउमरा (असदखान) याच्या शिक्क्याने बादशहाने आज्ञापत्र झुल्फिकारखानाच्या नावे गेले. बादशहाने त्याला हुजूरात बोलावले. त्याच्यासाठी खास खिलातीची वस्त्रे काढून ठेवण्यात यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

करावलपेश या हुद्यावर यक्काताज खानाच्या जागी फहाकखान याची नेमणूक करण्यात आली. मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याच्या फौजेचा बक्षी आणि वाकनीस म्हणून मरहूम अबदुर रहीमखान याचा मुलगा मीण नौमान याची नेमणूक करण्यात आली.

**चार ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

**पाच ऑक्टोबर १७०३**

बादशहाने दुपारच्या नमाजानंतर न्याय कचेरी केली. बादशहाना कळविण्यात आले की, आज्ञेप्रमाणे झुल्फिकारखान हा बादशाही छावणीच्या चौकीवर आला असून त्याला प्रवेशपत्र (दस्तक) देण्यात यावे. बादशहाने आज्ञा केली की, ते देण्यात यावे. मरहूम अमानतखान याचा मावसभाऊ मुहंमद जमान याला बऱ्हाणपूर सुभ्याचा दारोगा म्हणून नेमण्यात आले. लोहगांवच्या ठाणेदारीवर अटलसिंग याच्या जागी फकीर मुहंमद अईज याला नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, गोपाळसिंग चंद्रावत हा फरार झाला होता तो आपल्या देशातून आला त्याला लष्करात (छावणी) येऊन शस्त्रे ठेवण्याच्या तळावर (रेहकलाबार) उतरण्यासाठी प्रवेशपत्र (दस्तक) हवे आहे. बादशहाने दस्तक द्यावे अशी आज्ञा केली.

बादशहाने आज्ञा केली की, हैद्राबाद सुभ्यातील खालसा इलाख्याचे अधिकारी ह्यांनी आपापल्या कार्यक्षेत्रातील फौजदार आणि किल्लेदार यांच्या संबंधीची माहिती शहाजादा कामबख्श याच्याकडे पाठवीत जावी यापुढे त्या सुभ्यातील अधिकाऱ्यांच्या बदल्या वगैरेंची माहिती शहाजाद्याला देत जावी.

## सहा ऑक्टोबर १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि पाच घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. बादशहाना कळविण्यात आले की, झुल्फिकारखान बहादुर नुस्रतजंग हा आपले सहकारी राव दलपत (बुंदेला) रामसिंग हाडा वगैरे सोबत्यांच्या बरोबर आला असून दिवाणे आमच्या जाळीत (प्रतिक्षालय) शामियान्यात बसला आहे. हुजुरांच्या भेटीची आशा बाळगून आहे. बादशहाने त्यांना भेटीला बोलावले. खान नुस्रतजंग याने बादशहाची भेट घेऊन पाचशे अश्रफ्या आणि दोन हजार रूपये नजर आणि निसार म्हणून बादशहासमोर ठेवले. बादशहाने त्याला खास खिलातीची वस्त्रे दिली. अमीरउल्‌उमरा (मुख्य प्रधान) असद्‌खान व बक्षी उल्‌मुल्क रुहुल्लाखान याने झुल्फिकारखानाला काही गोष्टी सांगितल्या. दिवाणचे काम संपण्यापूर्वी बादशहाने झुल्फिकारखानाला आपल्या तंबूकडे जाण्यास निरोप दिला. बादशहाने झुल्फिकारखानाला म्हटले की, “राजा शाहू याला तुम्ही आपल्या तंबूवर स्वतःच्या बरोबर घेऊन जा.” यावेळी शाहूराजे दिवाणमध्ये हजर होते. बादशहाने त्यांना साठ रुपये किंमतीची एक ढाल दिली आणि आज्ञा केली की, “तुम्ही झुल्फिकारखानाच्या बरोबर जाणे आणि त्यांनी तुम्हाला काही वस्तू भेटी दिल्या तर त्या घेणे.”

झुल्फिकारखानाच्या सोबत्यांनी म्हणजे दलपत बुंदेला व रामसिंग हाडा वगैरेंनी या वेळी बादशहाची भेट घेतली व राव दलपत बुंदेला याने पन्नास मोहरा आणि रामसिंग हाडा याने सोळा निसार मोहरा म्हणून ठेवल्या. गोपालसिंग चंद्रावत हा फरारी होऊन देशी गेला होता, यावेळी तो अमीरउल् उमरा (असदखान) याच्या मध्यस्तीने बादशहासमोर उभा राहिला. त्याचे दोन्ही हात रुमालाने बांधले होते. बादशहाने त्याच्याकडे पाहून म्हटले. “त्याचे हात मोकळे करा. या नंतर गोपालसिंगने बादशहाची भेट घेतली. त्याने नऊ अश्रफी निसार म्हणून व एक तलवार पेशकश म्हणून बादशहाना अर्पण केली. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

## सात ऑक्टोबर १७०३

काल बादशहाना कळविण्यात आले की, राजाशाहू हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे झुल्फिकारखानाच्या डेऱ्यावर गेला होता. झुल्फिकारखानाने त्याला एक घोडा व एक खंजीर या वस्तू आपल्या तर्फे भेट म्हणून दिल्या, त्यानंतर त्याने राजा शाहूला स्वतःच्या डेऱ्याकडे जाण्यासाठी निरोप दिला.

## आठ ऑक्टोबर १७०३

दिवसाचा एक प्रहर अन् पाच घटिका झाल्या असता, बादशहा न्याय कचेरीत आले. बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान व हमीदोद्दीनखान बहादूर हे राजगड आणि तोरणा या किल्ल्याच्या वाटा कसा आहेत हे पाहण्यासाठी व किल्ल्यासमोर मोर्चे आणि बादशहा छावणी यासाठी जागा निवडण्यासाठी गेले होते. अंतर

मोजण्यासाठी त्यांनी साखळ्या बरोबर नेल्या होत्या. त्यांनी दोन्ही किल्ल्याची चहू बाजूनी पहाणी केली आणि छावणी व मोर्चे यांच्या जागा निवडल्या. नंतर ते दोघे परतले. वाटेत बक्षिंदाबक्ष (सिंहगड) जवळील घाट (डोंगरातील) दुरुस्त करण्यासाठी हमीदोद्दीन खान बहादुर बक्षिंदाबक्ष जवळ थांबला. बक्षी रुहुल्लाखान हा मात्र आपल्या सहकाऱ्यांच्याबरोबर आज्ञेप्रमाणे येऊन बादशहाना भेटला. त्याने बादशहांना अठरा मोहरा निसार म्हणून पेश (अर्पण) केल्या. त्याने (रुहुल्लाखानाने) बादशहाना सांगितले की, हुजुराच्या छावणीपासून बक्षिंदाबक्षाच्या (सिंहगडाच्या) वाटेने राजगड हा नऊ कोसावर आहे. तिथे पोहोचण्यासाठी पाच टप्पे करण्यात आले होते. (टप्पे——मंजिल——मजला) रुहुल्लाखानाच्या सहकाऱ्यांपैकी अजीजखान याने पाच मोहरा, बाकरखान याने दोन मोहरा—मीर खलीलउल्ला वगैरे मुलांनी चार मोहरा अश्या बादशहांना अर्पण केल्या. राजाशाहूला देण्यासाठी एक घोडा वेगळा काढून ठेवावा, अशी आज्ञा झाली.

### दहा ऑक्टोबर १७०३

बादशहाने बक्षी उल्मुल्क झुल्फिकारखान बहादूर याला रत्नजडित बक्षिसे दिली आणि त्याचे कुशल इच्छिणारी प्रार्थना पढली आणि दुष्टांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी त्याला औरंगाबादकडे जाण्यास निरोप दिला. बादशहा त्याला म्हणाले, “ते दुष्ट (मराठे) जेथे जेथे येतील तेथे तेथे त्यांचे सपाटून पारिपत्य करा. जुल्फिकार खानाच्या सहकाऱ्यांपैकी पुढील मंडळीना बक्षीसे देण्यात आली :—

(१) राव दलपत बुंदेला—खंजीर.

(२) रामसिंग हाडा—रत्नखचित पदक.

(३) मरहूम मरहमत खानाचा मुलगा—शेरअफगत याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. मीर अतिश तरबियतखान याच्या विनंती पत्रावरून असे समजले की, सखी खानाचा मुलगा फकरुद्दीन हा कामाचा माणूस आहे. त्याची अपेक्षा आहे की, जममली (जाभळी?) या किल्ल्याची किल्लेदारी आपल्याला मिळावी. या किल्ल्यावर पूर्वी आत्माराम नावाचा किल्लेदार आहे. त्याला बदलण्यात यावे. बादशहाने विनंती मान्य केली. आणि त्याची मनसब वाढविली.

### अकरा ऑक्टोबर १७०३

आज बादशहाने न्याय कचेरी केली. रणदुल्लाखान हा झुल्फिकारखानापाशी तैनात होता. त्याने विनंती अर्ज पाठविला की, माझ्या नोकरीची जागा मला दाखवून द्यावी, अगर मला चीन कुलीजखानापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली नाही. अजीजखान रोहिला हा मुहंमद अमीनखान बहादूरच्या फौजेत तैनात होता. त्याला मदत म्हणून दहा हजार रुपये, शंभर धनुष्ये आणि बाणांचे दोनशे भाते देण्यात आले. मरहम दिलेरखान याचा मुलगा चांद हा औरंगाबाद येथे तैनात होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले होते. बादशहाना कळविण्यात आले की, तो आर्थिक अडचणीत असल्यामुळे हुजुरात येऊ शकत नाही. बादशहानी आज्ञा केली की, त्याला औरंगाबादच्या खजिन्यातून एक हजार रुपये देण्यात यावेत.

गुर्जबर्दारांचा दारोगा, मतलबखान याला बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली— "मुहंमद आकिलचा मुलगा मुहंमद मारिल गुर्जबर्दार हा औरंगाबादेत आहे. त्याच्याकडे एक दस्तक (अधिकारपत्र) पाठवा. त्याने चांद्याचा जमिंनदार (नरसिंग) (राजा बीरसिंग हे खरे नांव) याला पुढे घालून हुजुरात आणावे.

**बारा ऑक्टोबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर व घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. हमोदोद्दीन खान बहादुर हा राजगडसमोर छावणी आणि मोर्चे यासाठी योग्य जागा पाहण्यास गेला होता. त्या काळात त्याने घाटाचा रस्ता तयार करवला. आज्ञेप्रमाणे तो हुजुरात येऊन बादशहाना भेटला. निसार म्हणून त्याने बादशहाना पाच मोहरा अर्पण केल्या. त्याने विनंती केली की, सुलेमानखान, मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम यांना घाटाचा रस्ता नीट करण्यासाठी मागे सोडून आज्ञेप्रमाणे मी आलो आहे.

झुल्फिकारखानाच्या सैन्यांतील तैनात असलेल्या इसमांना पगारबाकी म्हणून एक लाख रूपये द्यावेत म्हणून आज्ञा करण्यात आली. मावळ्यांच्या पथकाचा दारोगा (अधिकारी) अब्दुलकरीम ह्याची मनसब शंभर जात व दहा स्वार अशी कमी करण्यात येऊन त्याला तोफखान्याच्या खात्यांत बदलण्यात आले. इस्लामपूर उर्फ रामपुरा येथील बदललेला जमिनदार गोपाळसिंग याला 'रावत' ही पदवी देण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, कमरनगर, उर्फ करनूल येथील किल्लेदार व फौजदार युसुफखान याने आपला नायब मिर्झाअली याला पाठवून बंडखोर जमिनदाराकडून गढी (भदान्तकोर?) ताब्यात घेतली आहे. जमिंनदार पळून गेला आहे.

शाहजागा बेदारबख्त सुभेदार बऱ्हाणपूर याचा नायब अलीमर्दानखान याच्या तक्रारीवरून तेथील घोड्यांना डाग देण्याच्या दप्तरचा अधिकारी मुहंमद रशीद यास हुजुरात बोलावून घेण्यात आले. त्याच्या जनिवर मरहूम एतीबारखानाचा भाचा मुहंमद वासे याची नेमणूक करण्यात आली.

**तेरा ऑक्टोबर १७०३**

झुल्फिकारखानाच्या नावे इनायतउल्लाच्या शिक्याचे बादशहाचे आज्ञा पत्र गेले होते. गुर्जबर्दारांनी ते पोहोचते केले. परत येताना त्याने झुल्फिकारखानाचे उत्तर (विनंती अर्ज–अर्जदस्त) आणिले. ते बादशहाच्या नजरेखालून घालण्यात आले. झुल्फिकारखाने गुर्जबर्दारांना नऊ अश्रफ्या दिल्या होत्या. त्या त्याने आपल्या जवळ ठेऊन घ्याव्या, अशी बादशहाने आज्ञा केली.

**चौदा ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**पंधरा ऑक्टोबर १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सोळा ऑक्टोबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर अन चार घटिका झाल्या असता बादशहा न्याय कचेरीत आले. मतलबखान हा आजारी होती, तो बरा होऊन बादशहाना येऊन भेटला. मरहूम शुजाअतखान याचा खानसामान हाजी मुहंमद युसुफ हा आपला मुलगा मोहंमद बदी याच्याबरोबर हुजुरात आला. त्याने स्फटिकाची एक मोठी बशी (रिकाबी) अठरा तोळे वजनाचा अंबर (एक सुगंधी द्रव्य) याचा गोळा, एक पानदान; लाकडी मोठा ट्रे, त्याच्यावर सोन्याचे काम केलेले एक गुलाबदाणी वगैरे वस्तू पेशकश म्हणून दिल्या. मुहंमद युसुफखान हा मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याच्या लष्करात तैनात होता. बादशहाने त्याला दोनशेंची आणि त्याचा मुलगा मुहंमद बदी याला पन्नासची मनसब दिली. तिब्बरचा जमिनदार राजा आकिबत महमूदखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला. किल्ले आजमगड उर्फ पुरंदर येथील बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले. चोरांनी (मराठ्यांनी) लोणी या गावाजवळ पोहोचून ते लुटून फस्त केले. बादशहाने आज्ञा केली की, तेथील फौजदाराकडून जाब मागण्यात यावा.

**सतरा ऑक्टोबर १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले. काल रात्री एक प्रहर अन् दोन घटिका झाल्या असता बादशहाने रुहुल्लाखान यास बोलावून त्याच्याशी एकांतात खलबते केली. बादशहा त्याला म्हणाले.— "मुहंमद अमीनखान बहादुर याच्याबरोबर देण्यासाठी एकहजार सातशे स्वारांची फौज तयार करा. नंदगांव येथील तळाचे संरक्षण करण्यासाठी मी त्याला गुरूवारी पाठविणार आहे. अमीनखान तेथे पोहोचला. की, तरबियतखान हुजुरात येईल. काल कमरनगर उर्फ करनूलचा फौजदार आणि किल्लेदार मुहंमद युसुफखान याने भद्र अतकुरची गढी जिंकल्याबद्दल सोन्याच्या किल्ल्या आणि विनंती अर्ज पाठवले. बादशहाने त्याना नजरेखालून घातले."

काल बादशहाना कळविण्यात आले की, बादशाही सैन्याची कूच येथून या महिन्याच्या सतरा तारखेस (जमादिस्सानी ) व्हावयाचे ठरले आहे, काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, सैन्याचे कूच करण्याची तारीख रजब महिन्याची दुसरी अगर तिसरी तारीख ठरलेली आहे.

**अठरा ऑक्टोबर १७०३**

दिवहाचा एक प्रहर अन् पाच घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. औरंगाबाद (अर्क) चा बदललेला किल्लेदार याला मनसब होती त्यात काही स्वराबद्दल अटी होत्या.—बादशहाने त्या अटी काढून घेतल्या आणि त्याची तैनाती औरंगाबादेस केली. बादशहाने कामियाब खानापाशी अडीचशे रुपये दिले, आणि त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली. "भेटीच्या वेळी आम्ही मतलब खानाला धूप (तलवार) दिली होती. तिची ही किंमत, हे पैसे मतलबखानाला द्या आणि तलवार परत घेऊन या."

**एकोणीस ऑक्टोबर १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. रुहुल्लाखानाच्या शिक्याने विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान (भावी निजामउल्मुल्क) याच्या नावे बादशहाची आज्ञापत्रे रवाना झाली.

बादशाही गंजाचा (मार्केट, बाजार) करोडी (अधिकारी) मस्तअुलीखान हा भोवतालची ठाणी पाहण्यासाठी गेला होता. बादशाही छावणीच्या भोवती असलेल्या ठाण्याचा नकाशा तयार करवून त्याने बादशहाना दाखविल्या. बादशहाने तो पाहिला आणि म्हटले.—— "अद्याप गढ्या तयार झाल्या नाहीत. शिबंदी व पथके ही दिसत नाहीत. आम्ही ही किल्ले जिंकून घेण्यासाठी निघत आहोत. नकाशा वाकेनवीस हिदायतकेश याच्याकडे द्या. त्याची एक प्रत तयार करून तो ती प्रत रुहुल्लाखान याजकडे देईल म्हणजे तो साधनसामग्रीचा सरंजाम करून देईल."

**वीस ऑक्टोबर १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. मुहंमद अमीनखान बहादूर याच्यासाठी खास खिलातीची वस्त्रे काढून ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की, या महिन्याच्या अकरा तारखेस मुहरमखान हा पीलखाना (हत्ती खाना) वगैरे काफिला घेऊन औरंगाबादेतून बाहेर पडला आणि तो काळ्या चबुतऱ्यापाशी उतरला आहे. रुहुल्लाखानाने हुजुरापाशी तैनात करण्यात येणाऱ्या फौजेची यादी (तूमार) तयार केली आणि ती हुजूरात पाठविली. बादशहाने ती यादी पाहून आपल्या सैन्याची रचना पुढीलप्रमाणे केली.——

(१) उजव्या फळीला शहाजादा कामबक्ष.

(२) डाव्या फळीला अमीरउल्उमरा (मुख्य प्रधान) असदखान.

(३) पिछाडीला (चंदावल) तरबियतखान आणि आघाडीला रुहुल्लाखान.

अब्दुलरहमानचा मुलगा सैफुल्ला याला बादशहाने बडतर्फ केले त्याने आज्ञा केली की, छावणीचा कोतवाल सरबराहखान कोतवाल याने त्याला गुलालबार मधे कैदेत ठेवावे. हत्तीखाना आणण्यासाठी मुनीमखानाने जावे. असे पूर्वी ठरले होते, ही आज्ञा मागे घेण्यात आली.

खुसरौबेगची मुले अजमीरीबेग व कुतुबबेग यांना मनसबीवरून बडतर्फ करण्यात आले. सुलेमान खानाचा भाचा मुहंमद फाजिल याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याच्या फौजेतील हरकऱ्याच्या पत्रावरून पुढील माहिती कळली.—— चीन कुलीजखान बहादुरने या महिन्याच्या चौदा तारखेस (चौदा जमादिसानी म्हणजे चौदा ऑक्टोबर १७०३). आपले सैन्य मराठ्यांच्या ठाण्यापैकी मोरगड (?) येथे आपले सैन्य पाठवले. तेथे धनाजी (जाधव) याचा मुलगा संभा (शंभूसिंग जाधवराव), आणि हणमंत (राव) निंबाळकर यांचे सैन्य होते. हे सैन्य नदीच्या (कोसान नदी) कोयना नदीच्या काठावर होते. लढाई झाली. शेवटी तर बंदूकी आणि बाण

अनुक्रमणिका

अशी हातघाईची लढाई झाली. पुष्कळ लोक जखमी झाले. बरेच मारले गेले. शास्त्रास्त्रे हाती पडली. चोर (मराठे) पळून डोंगरात गेले. एक चांगला सजविलेला घोडा हाती लागला. आमच्या (मुगल) सैन्यापैकी दीडशे माणसे जखमी झाली. बादशहा म्हणाले, सेवा मान्य झाली (मुजराशुद).

**एकवीस ऑक्टोबर १७०३**

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**बावीस ऑक्टोबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर व चार घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. सर्फराज खान हा बादशहाना भेटला. त्याने बादशहाना निसार म्हणून पाच मोहरा अर्पण केल्या. बादशहाने त्याच्या सुरक्षितेसाठी प्रार्थना (फातेहा) पढली आणि त्याला हत्तीखाना घेऊन येण्यासाठी (बालसरकडे?) जाण्यासाठी निरोप दिला.

औरंगाबाद (खुजस्ताबुनियाद) व बऱ्हाणपूर या दोन्ही प्रांताचा सुभेदार शहाजादा मोहंम्मद बेदारबख्त याने पत्र पाठवले. ते शहाजाद्याच्या छावणीतील वकील सुल्तान नजर याने बादशहासमोर ठेवले. बादशहाने हे नजरेखालून घातले. त्यांत पुढील मजकूर होता. "नेमाजी शिंदे वगैरे सरदार हे औरंगाबादेच्या भोवती पसरले होते——त्या सुमारास शहाजाद्याने औरंगाबादेहून निघून त्यांच्याशी युद्ध केले. बादशहाच्या भाग्याने शत्रूपैकी अनेकांना नरकात पाठविण्यात आले, शत्रूचा पराजय झाला. अनेकांना जखमी करण्यात आले. बादशहा म्हणाले सेवा मान्य झाली. शहाजाद्याच्या वकीलाला खिलातीची वस्त्रे द्या. बादशहाने आज्ञा केली की, दोनशे तुराणी व इराणी शिपाई सदरुद्दीन मुहंमदखान याने सरकारात भरती करावे आणि त्यांची नावे आपल्या स्वतःच्या पथकात नोंदवावी. नजाबतखान मरहूम याचा मुलगा मुहंमद खलील यास आपल्या बापाच्या मृत्यूच्या शोकातून बाहेर काढण्यात येऊन त्याचे समाधान करण्यात आले. त्याला एक बालाबंद (अलंकार) द्यावा अशी आज्ञा करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आली की, बुणगे (तळ) याचे रक्षण करण्यासाठी मुहंमद अमीनखान बहादुर याने बहादुरगडला जावे, पण हे त्याला मान्य नाही. त्याच्या जागी बक्षी उल्मुल्क मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याला पाठविण्यात आले. त्याच्या मनसबीत सोईस्कर बदल करण्यात आला. त्याला एक झेंडा देण्यात आला आणि पाच हजार रुपये रोख देण्यात आले. अशा रीतीने त्याला बहादुरगडाकडे रवाना करण्यात आले.

**तेवीस ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याने मोरगिरीचा (?) किल्ला जिंकून घेतला होता. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या त्याने खलीलबेग आदि दोन मनसबदारांच्याबरोबर बादशहाकडे पाठविल्या. रुहुल्लाखानाने त्या किल्ल्या बादशहासमोर ठेवल्या. बादशहानी त्या नजरेखालून घातल्या.

अनुक्रमणिका

**चोवीस ऑक्टोबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर अन् पाच घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली.

बसवापट्टण (दक्षिणकर्नाटक) चा किल्लेदार व फौजदार याचे विनंतीपत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

सर्फराजखानाला जेव्हा निरोप देण्यात आला तेव्हा त्याला बादशहाने साडेपाचशे रुपयाची एक वस्तू भेट दिली आणि मदत म्हणून दोन हजार अश्रफ्या दिल्या.

मुहंमद अमीनखान बहादुर याची बहादुर ही पदवी काढून घेण्यात आली. इज्ञतखान व नेमतखान यांना सदरुद्दीन मुहंमदखान याजपाशी तैनात करण्यात आले. दियानतखान याने विनंती केली कीं, मी सारखा आजारी पडतो, येथील हवापाणी मला मानवत नाही. मला सहा महिन्याची रजा देण्याचा हुकूम व्हावा. विनंती मान्य करण्यात आली.

सैफुल्लाखान व खान मुहंमद करावल यांना राजगडला जाण्याचे, घाट पाहून येण्यासाठी बादशहाने निरोप दिला.

**पंचवीस ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सव्वीस ऑक्टोबर १७०३**

दक्षिणचा दिवाण, मोतेमदखान याची मुलें मिर्जा मुहंमद आणि अबदुलरहमान हे येऊन बादशहाना भेटले. त्यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या. चांद्याचा जमिंनदार राजा नरसिंग (बीरसींग) याच्या नावाने बादशहाचे फर्मान काढण्यात आले होते. फर्मानात त्याला हुजुरात बोलावण्यात आले होते. हे फर्मान अबदुल्लाबेग गुर्जबर्दार याच्या हाती देण्यात आले. बादशहाने आज्ञा केली कीं, बीरसिंगाला हुजुरात आणण्यात यावे. सदरुद्दीन मुहंमदखानाच्या जागी नायब म्हणून खानाजादखान याची नेमणूक करण्यात आली. पण बादशहाने आज्ञा केली की, बक्षीची मोहर, इनायतउल्लाखानाचा मुलगा हिदायतउल्लाखान याच्याकडे राहील. शेख गुलाम रबीखानी याला एक तलवार आणि एक हजार रुपये देऊन सदरुद्दीन मुहंमदखानाबरोबर (बहादुरगडला) पाठविण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, रूद्राजी नावाचा सरदार होता, त्याला लोनाजी (?) हा बादशाही मार्गावरील ठाणेदार याने पकडले असून हुजुरात आणले आहे. त्याला इनायतउल्लाखान याच्या हवाली करावे अशी आज्ञा करण्यात आली. सियादतखान हा दोन हजार जात व दोन हजार स्वार असा मनसबदार होता, त्याला पाचव्या चौकीचा प्रमुख म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

राजा रायसिंग याचा मुलगा अनूपसिंग याला सदरूद्दीन मुहंमदखान याच्या फाजेत तैनात करण्यात आले. यलंगतोशखान बहादूर (हा आरंगजेबाचा दासीपुत्र होता असे मनूची म्हणतो) याने वाढविलेला मुहंमद हा खोटा निघाल्यामुळे त्याची मनसब काढून घेण्यात आली.

विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान ह्याने पुढीलप्रमाणे पत्र लिहिले. "मुहंमदीखानाजाद याने तालुके तिकोली (तिकोनी) येथील बंडखोर कसरी (केसरी?) याला त्याच्या तालुक्यातून हुसकावून लावून तेथे बादशाही अंमल त्यातील परगण्यावर (महाल) सुरू केला. कृपेची अपेक्षा बाळगून आहे. बादशहाने त्याच्या दोनशेवीस स्वाराच्या मनसबीत वीस स्वाराची भर घातली.

खान फिरोजजंग याचा वऱ्हाडमधील नायब सुभेदार याने पत्र पाठवले होते ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

विजापूरचा वाकेनवीस आणि बक्षी याने पुढीलप्रमाणे बातमी पाठविली——देवदुर्गचा (जिल्हा रायचूर) किल्लेदार गोपालसिंग याचा नायब प्रतापसिंग याला वेड लागले होते. तो आपल्या देशी चालला होता. वाटेत मरण पावला. नायब म्हणवून त्याच्या जागेवर गोपालसिंगचा मुलगा देवकरण याची नेमणूक करण्यात आली.

**सत्तावीस ऑक्टोबर १७०३**

बादशहाने आज दिवाणचे काम केले नाही. काल सय्यद जैनुल्आबिदीनखान याचा अर्ज आला. त्याने लिहिले होते कीं, फत्तेहाबाद उर्फ धारूर (बीड जिल्हा, मराठवाडा) येथील किल्लेदार व फौजदार, उजबेगखान याने आपल्या जहागिरीतील सगळा सारा वसूल करून नेला आहे.

बादशहाने आज्ञा केली कीं, एक अंमलबजावणीचा अधिकारी नेमा आणि उजबेगखानाने वसूल केलेला सगळा पैसा जैनुल्आबिदीनच्या गुमास्त्याकडे परत करायला लावा. रुहुल्लाखानाने उजहेगखानाच्या जागी दुसऱ्याची नेमणूक करावी. त्याचप्रमाणे उजबेगखानाच्या जागी मुहंमदीखान याची नेमणूक करण्यात आली.

**अठ्ठावीस ऑक्टोबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**एकोणतीस ऑक्टोबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

सैफुल्ला व खान मुहंमद करावल हे राजगडच्या वाटेवरचा घाट पाहण्यास गेले होते. ते या सुमारास परत येऊन बादशहास भेटले. ते म्हणाले— "घाटाचा थोडा भाग दुरुस्त करावयाचा राहिला आहे."

अनुक्रमणिका

मजलांचा अधिकारी मीर बहरावरद खुश मंजिल (मीर संजरचा मुलगा) हाही त्यांच्याबरोबर गेला होता. तोही येऊन बादशहाला भेटला.

सदरुद्दीन मुहंमदखान याला बुणगे (तळ) बहादुरगडचा प्रशासक म्हणून नेमण्यात आले. त्याने विनंती लिहून पाठविली की, मला धनुष्य आणि बाण यांचे सहाय्य देण्यात यावे. बादशहाने आज्ञा केली कीं, त्याला पन्नास धनुष्ये व बाणांचे शंभर भाते पुरविण्यात यावे.

बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी रूहुल्लाखान याचा मुलगा मुहंमद खलीलउल्ला हा आज्ञेप्रमाणे छावणी भोवती टेहळणी करण्यासाठी जात असतो. बादशहाने आज्ञा केली की, टेहळणी साठी रूहुल्लाखानाच्या सैन्यांत मीर आतिष (तोफखान्याचा प्रमुख) तरबियतखान याचा नायब मन्सूरखान याने जात असावे.

बादशहाना कळविण्यात आले कीं, इराणच्या बादशहाचा भाचा अलीनकी हा चाकरीच्या अपेक्षेने सुरतेच्या वाटेने हुजुरात येत आहे. बादशहाने आज्ञा केली कीं, खातमबेग गुर्जबर्दार व हयातकुली यांनी स्वागतासाठी सुरतेला जावे. औलीनकी याला प्रवास खर्चासाठी औरंगाबादच्या खजिन्यातून दोन हजार रुपये आणि सुरतेच्या खजिन्यातून चार हजार रुपये द्यावेत. सुरतेच्या कारभाऱ्यांना या प्रकरणासंबंधी सर्व सूचना देण्यात याव्या.

माळव्यात तैनात असलेला मिर्जाखान उर्फ अबूतालिब याचा जावई आणि मीर मूसाचा मुलगा तहमास्प याला मसनसबीवरून बडतर्फ करण्यात आले. त्याला चार हजार रुपयाचे वर्षासन नेमून देण्यात आले.

**तीस ऑक्टोबर १७०३**

आज दोन्ही दिवाणाचे काम बंद करण्यात आले.

**एकतीस ऑक्टोबर १७०३**

बादशहाने सदर बेग व अमानुल्लाबेग या गुर्जबर्दारांची नेमणूक केली. त्यांना आज्ञा करण्यात आली की, चीन कुलीजखानाच्या फौजेत तैनात असलेला जमशीदखान बीजापूरी याला हुजुरात आणावे. हैद्राबाद कर्नाटकचा फौजदार जुल्फिकारखान याचा नायब दाऊदखान (पन्नी) याने पुढील विनंत्या सादर केल्याः—

(१) मुहंमद युसुफ वगैरेनी अंबूरचा किल्ला जिंकून घेण्यात उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे, त्यांना मनसबी मिळाव्या, विनंती मान्य करण्यात आली. दाऊदखानाचा भाचा मुहंमद युसुफ व मरहूम बहादुरखान याचा जावई अबदुल्ला यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली, (२) इस्माइलला करनकली (?) ची किल्लेदारी देण्यात यावी, विनंती मान्य करण्यात आली, (३) मरहूम बहादुरखान याचा मुलगा उमर याला कावेरीपाक येथील किल्लेदार म्हणून नेमण्यात यावे, (४) अबदुररहीम मियाना याचा मुलगा अजमतउल्ला याच्यावर कृपा करण्यात यावी. त्याची मनसब

अनुक्रमणिका

वाढविण्यात आली, (५) रघुनाथसिंग यास माझ्यापाशी तैनात करण्यात यावे, विनंती मान्य करण्यात आली.

निसारखान हा खान फिरोजजंगपाशी तैनात होता. त्याला चीन कुलीजखानापाशी तैनात करण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, ऐवजबेगखान गुर्जबर्दार याने खान फिरोजजंग यांच्या नावे बादशहाचे आज्ञापत्र (फर्मान) घेऊन जावे आणि रूस्तमखान विजापुरी याचा मुलगा गालिबखान याला हुजुरात घेऊन यावे.

धारूरचा किल्लेदार व फौजदार याला वकीलाच्या विनंतीवरून पुन्हा बहाल करण्यात आले. गंगारामचा मुलगा मरासिंग आणि फिरोजबेगचा मुलगा ताहिरबेग यांची चौकशी करिता ते खोटे निघाले. त्यांच्या मनसबी काढून घेण्यात आल्या.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याने अर्ज करून पुढील विनंत्या केल्या—

(१) अमानगड उर्फ तिकोणा येथील किल्ल्याचा अधिकारी तुकोजी (?) याला मनसब मिळावी. विनंती मान्य करण्यात आली. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मनसब देण्यात आली. तळगाव (तळेगाव?) व अंदुरी येथील त्याची वतने होती, ती (गावे) त्याच्या जहागिरीत देण्यात आली. त्यासाठी ती पूर्वी जहागिरदार श्रीपत याला बदलण्यात आले.

(२) तुकोजीच्या भाऊबंधापैकी मलजी (?) याला मनसब मिळाली. विनंती मान्य करण्यात आली. त्याला दोनशे जात आणि पन्नास स्वार, अशी मनसब देण्यात आली. आज्ञा करण्यात आली कीं, पाबळ परगण्यातील मौजे धाररी (?) येथील रामचंद्र मराठा जहागिरदाराकडून ते गाव काढून घेण्यात येऊन मलजीच्या तनखा जहागिरीत देण्यात यावे.

(३) आमचा एक आप्त मारला गेला आहे (स्वामी कार्यात) त्यामुळे पथकाची पांगापांग होते आहे. माझा पुतण्या मुहंमद जमाल हा शहाजादा मोअज्ञम बहादुरशहा यांच्या तैनातीत होता. त्याला हुजूरात बोलावून घेण्यात आले आहे. तो राजधानीपर्यंत पोहोचला आहे. त्याला एक वर्षाची रजा देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

**एक नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. अबदुलहकीमचा मुलगा अबदुल अलीम याला नळदुर्गचा बक्षी आणि बाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याला एक शाल बक्षीस म्हणून देण्यात आली.

काल खालश्याचा दिवाण इनायतउल्लाखान याने बादशहाच्या हुजूरात एक विनंती अर्ज पाठविला, त्यांत पुढील मजकूर होता——मुहंमद आकिल हा खजीना व पाच हत्ती घेऊन आणि तेथील थानेदार यासीनखान याची पथके बरोबर घेऊन हुजुरात येण्यास निघाला होता. तो शिरवळ परगण्याच्या अलीकडे तीन कोसावर आला असता पथकाच्या जमादाराने वाटेत मुहंमद आकिलशी तक्रार केली आणि संधी साधून त्याने आपल्या कट्यारीनें मुहंमद आकिल याला ठार मारले. त्यानंतर त्याने आकिलच्या अनुयायांपैकी

अनुक्रमणिका

काहीना तलवारीने ठार मारले. त्याची मालमत्ता लुटली मुहंमद आकिलच्या संबंधितांना त्याने कोंडून ठेवले आहे.

बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रूहुल्लाखान याने स्वतः फौज घेऊन जावे. किंवा कुणाला तरी फौज घेऊन पाठवावे. आणि जमादारांना कैद करून खजाना आणि हत्ती हुजुरात घेऊन यावे. रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून यारअलीबेगच्या द्वारे विनंती आली, त्याप्रमाणे आज हमीदोद्दीनखान बहादुर याला बरोबर फौज घेऊन निरोप देण्यात आला. त्याला आज्ञा करण्यात आली की, त्यानें घटनास्थळी जावे आणि तेथून खजीना, हत्ती आणि मुहंमद आकिलचे आप्तसंबंधी आणि मुहंमद आकिलचे प्रेत हे सर्व हुजुरात आणावे. या सुमारास इनायतउल्लाखानाने विनंती केली की, पाईन घाटाच्या (वाई प्रांत) दिवाणीच्या कामावर मरहूम आकिलच्या जागी मुहंमद ताहिर हा माणूस योग्य ठरेल. बादशहाने विनंती मान्य केली. मुहंमद ताहिरची नेमणूक करण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## २ नोव्हेंबर इ. स. १७०३ ते १३ डिसेंबर १७०३

### दोन नोव्हेंबर १७०३

मरहूम सय्यद नूरखान याचा मुलगा मीर रुहुल्ला याची नेमणूक नजाबतखान याचा नायब म्हणून सुल्तानगडच्या (साल्हेर) किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

मरहूम अब्दुल्लाखान याचा मुलगा ख्वाजा अमीरउल्ला याने विनंती लिहून पाठविली, ती पुढीलप्रमाणे— "मी आजारी असल्यामुळे उपचारासाठी औरंगाबादेश जावे म्हणून रजा घेतली होती. वाटेत चोरांनी (मराठ्यांनी) माझ्यावर हल्ला केला. माझी मालमत्ता सर्व लुटून नेली. मी कसाबसा औरंगाबादेस पोहोचलो. औरंगाबादेस मी उपचार केले पण आजार बरा होत नाही. माझा आजार विकोपाला गेला आहे. अडचणीही वाढल्या आहेत. राजधानीत (दिल्ली) माझी नेमणूक करण्यात यावी." बादशहाने आज्ञा केली की, वरिष्ठ बक्षींनी त्याची नेमणूक दिल्ली येथे करावी.

इराणच्या बादशहाचा नातू (मुलीचा मुलगा) हा चाकरी करण्यासाठी येत होता. तो सुरत बंदरला पोहोचला. त्याचे स्वागत आणि पाहुणचार करण्यासाठी हयातकुली यसावल याला खिलातीची वस्त्रे देऊन सुरत बंदराकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. बादशहाने आज्ञा केली की, फर्मान (आज्ञापत्र) त्याच्याकडे (अलीनकी) याला देण्यात यावे.

रुस्तमखान विजापुरी याचा मुलगा उमर यास इलियासखान ही पदवी देण्यात आली. त्याला एक हजार जात व दोनशे स्वार अशी मनसब होती.

बादशहांना कळविण्यात आले की, गाळणा (जिल्हा नाशिक, मालेगाव जवळ) येथील किल्लेदार व फौजदार अबुलकासिम हा मरण पावला. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मनसब होती. त्या जागेवर बादशहाने दिलेरहिंमत याची नेमणूक केली.

काल, मुहंमद आरिफ कौल याने बादशहाच्या आज्ञेप्रमाणे मुहंमद इसाहाक याला गस्त आणि टेहाळणीवरून काढून हमीदोद्दीनखान बहादूर याच्याकडे पोहोचविले. नंतर त्याने हमीदोद्दीनखानाचा विनंती अर्ज आणून बादशहासमोर ठेवला.

मुफतखरखानाचा मुलगा अजीजउल्ला याने विनंती केली की, माझी आर्थिक स्थिती अडचणीची आहे. काही मदत व्हावी. बादशहाने आज्ञा केली की, त्याला एक हजार रुपये देण्यात यावे.

अनुक्रमणिका

बऱ्हाणपूर (खानदेश) वगैरेचा सुभेदार शहाजादा मुहंमद बेदारबख्त याला बादशहाने एक हजार स्वार व एक हजार पायदळ, खालील व्यवस्थेप्रमाणे दिले.—

> मुहंमद अमीनखान याच्या तैनातीतून काही मनसबदार आणि पथके वगळण्यात आली. जंजूर (जेजुरी?) चा ठाणेदार तुर्कताजखान हा होता. त्याच्यापाशी मगपूरखान (मन्सूर खान?) याची माणसे तैनात होती. त्यांना याच्याकडे (बेदारबख्ताकडे) पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**तीन नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम केले नाही. पाईन विलायत (वाई प्रांत) चा दिवाण मुहंमद आकिल याच्या बरोबर खजीना, संबंधित माणसे व हत्ती वगैरे आणण्यासाठी हमीदोद्दीनखान बहादूर व मुहंमद अमीनखान हे शिरवळला गेले होते. हमीदोद्दीनखान हा बादशहाच्या हुजुरात आला. त्याने सांगितले.— “यासीनखान हा पाईन विलायत चा ठाणेदार. मुहंमद आकिल हा त्याचा दिवाण. यासीनखानाच्या जमादाराने मुहंमद आकिलला ठार मारले आणि सगळी मालमत्ता लुटली. बादशाही फौज जमत आहे हे पाहून तो (जमादार) पळून गेला. मी हत्ती वगैरे हुजुरात आणले आहेत.”

दिवसाच्या शेवटी बादशहाना कळविण्यात आले की, मुगलखान याने आज्ञेप्रमाणे हत्ती वगैरे वाहतुकीची वाहने औरंगाबादेहून हुजुरात आणली आहेत. बादशहाच्या आज्ञेने त्याने प्रार्थनागृहात (तसबीहखाना) बादशहाची भेट घेतली. निसार म्हणून त्याने दोन मोहरा अर्पण केल्या. बादशहाने याला शंभर रुपये किंमतीची एक ढाल त्याला बक्षीस दिली आणि त्याला म्हटले, “बक्षी उल्मुल्क मिर्जा सदरूद्दीन मुहंमदखान हा बहादूरगड येथील तळाचा रक्षक आहे, त्याला लोहगावपासून बहादूरगडपर्यंत पोहोचवा.

हत्तीखान्याचा अधिकारी ख्वाजा मुहर्रमखान याने बादशहाची भेट घेतली. आणि बादशहाना एक पुस्तक भेट म्हणून दिले. बादशहाने त्याला काही फळे बक्षीस म्हणून दिली.

छावणीचा कोतवाल सरबराहखान याला बादशहाने निरोप दिला आणि म्हटले, “तुम्ही जाऊन राजगडचा घाट नीट करा.”

**चार नोव्हेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते. फरासखान्याचा मुशरफ (अधिकारी) त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा करण्यात आली.— “दिवाणेखासच्या आवारात दिवाणे आम म्हणून वापरण्यात येणारा लाकडी वाडा (बंगला चौकी) उभा आहे तो पाडण्यात यावा. त्याप्रमाणे मीर हादीने अंमलबजावणी केली.”

**पाच नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. सर्फराजखान हा हत्तीखाना आणण्यासाठी माल्हेर (?) पर्यंत गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला. मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे

अनुक्रमणिका

राजगडच्या घाटावरून येऊन भेटला. हकीम नसरूल्ला हा औरंगाबादेहून आला. खलीलउल्ला वगैरे दोन मनसबदार यांनी चीन कुलीजखान याने बंडखोरावर विजय मिळविल्याचे पत्र आणले होते. त्यांची मनसब वाढविण्यात आली.

बादशहानी कहारांचा दारोगा (अधिकारी) कलामखान याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली.— "दिवाणे आमच्या आवारात एक चबुतरा (ओटा) तयार करावा म्हणजे आम्ही हत्तीखाना नजरेखालून घालू."

**मंगळवेढ्याचा किल्लेदार**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली— "एक मनुष्य मुद्दाम नेमण्यात यावा. त्याने मंगळवेढ्याचा बदललेला किल्लेदार व फौजदार सखीखान याला पुढे घालून हुजुरात आणावे."

**सहा नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने दोन्ही दिवाणाचे काम बंद ठेवले. मसूर (जिल्हा सातारा) येथील ठाणेदारी यासीनखान याजकडे होती. बादशहाने यासीनखानाला तेथून बदलले आणि त्याच्या जागी मसूरच्या ठाणेदारीवर खटावचा (जिल्हा सातारा) ठाणेदार कृष्णराव (किशनराव) याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, कृष्णरावचा दर्जा काय हे कळविण्यात यावे. बादशाही बाजाराचा (गंज) अधिकारी (अमीन) याची मनसब वाढविण्यात आली. सियादतखान व तुर्कताजखान यांच्या पथकातील लोकांना तीन महिन्याचा पगार नगद देण्यात यावा, अशी आज्ञा देण्यात आली.

**सात नोव्हेंबर १७०३**

मुहंमद मिहदी उर्फ हादीखान याने बादशहांना एक घोडा अर्पण केला होता. त्या घोड्याचे नाव होते नूर मिहर या नूर मिहर घोड्यावर बसून बादशहा सकाळी दिवाणेखासमध्ये आले. तीन घटका ते दिवाणेखासमधे होते. हमीदोद्दीनखान बहादुर याने त्यांना एक मुल्यवान दगडाचे पात्र अर्पण केले. निजामउद्दीन याला मुलगा झाला, त्याने निसार म्हणून दोन मोहरा अर्पण केल्या. बादशहाने मुलाचे नाव बहमन ठेवले. बादशहाच्या पाहणीसाठी दल दलन हा हत्ती आणण्यात आला. त्यावेळी नौबती झडविण्यात आल्या. हत्ती सोनेरी साजात होता. बादशहाने एक हजार टंका (एक नाणे) देऊन आज्ञा केली की, या हत्तीवरून या पैशाची खैरांत करण्यात यावी. यानंतर बादशहानी पंधरा हत्ती नजरेखालून घातले.

व्यंकोजी (शिवाजी महाराजांचे बंधू व्यंकोजी राजे, तंजावर) यांचा मुलगा रायभान याला एक ढाल बक्षीस म्हणून देण्यात आली.

पाईने विलायत (वाई-कऱ्हाड प्रांत) चा ठाणेदार यासीनखान हा होता. बादशहाने त्याला तेथून काढले आणि काल त्याच्या जागेवर ख्वाजाखान याची नेमणूक केली. ख्वाजाखानाची मनसब वाढविण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात येऊन त्याला जाण्यासाठी निरोप देण्यात आला. बाकीबेग याला शिरवळच्या ठाणेदारीवरून काढण्यात आले. त्याला रजाबेगखान ही पदवी देण्यात आली.

अनुक्रमणिका

मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) या जागेवर मुनीमखानाच्या जागी इरादतखान याची नेमणूक करण्यात आली. मीर नुरुद्दीन हा चाकरीच्या आशेने मध्यआशियातून आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

**आठ नोव्हेंबर १७०३**

आज सकाळीं बादशहाने शाहजादा मुहंमद कामबख्श याला म्हटले की, तुम्हीं राखीव जंगलात (रमणाखासा) जाऊन शिकार करून या. त्याप्रमाणे त्याने जाऊन हरीण आदींची शिकार केली.

रुहुल्लाखान यान आज्ञेप्रमाणे हत्तीखान्याची पाहणी केली आणि हत्तींचा खुराक ठरवून बादशहाना त्याचप्रमाणे कळविले.

मुनीमखान याची शाहजादा मुहंमद मोअज्ञम बहादुरशहा याचा दिवाण म्हणून नेमणूक करण्यात आली. दिवसाच्या शेवटी हुजुरात बोलावण्यात आले. बादशहाने त्याला काही गोष्टी सांगितल्या आणि त्याला आपल्या तंबूकडे जाण्यास निरोप दिला.

**नऊ नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. फरासखान्याचा मुशरफ याने पेशखाना (आघाडीच्या मुक्कामावर पाठवायचे तंबू इ. सामान) वाहनावर आणला आणि विनंती केली की, पुढील टप्प्यावर (मंजिल—मजल) पाठवण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहाने सांगितले पाठवा. मतलबखान व नेकनामखान याने पेशखान्याबरोबर जावे.

शेख गुलाम मुहंमद याचा पुतण्या कृपाराम याने स्फटिकाचा एक पेला आदि वस्तू बादशहाना अर्पण केल्या. स्वतःच्या लग्नासाठी बऱ्हाणपुरला जाण्याची त्याने परवानगी मागितली. परवानगी देण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. औरंगाबादचा डाग देण्याच्या खात्याचा अधिकारी कुंजमन याचा मुलगा साहेबराव याची नेमणूक मिर्झा सदरुद्दीन मुहंमदखान बक्षी याचा कारकून म्हणून झाली होती. तो बादशहाना येऊन भेटला. त्याची मनसब वाढविण्यात आली. मुहंमद तकी याचा मुलगा मुहंमद कासिम याला औशाचा (जिल्हे लातूर, मराठवाडा) बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. मारला गेलेला पाईन विलायतचा दिवाण मुहंमद आकिल याचा पुतण्या कमाल मुहमद याला शोक निदर्शक शाल देण्यात आली. औरंगाबादचा कोतवाल रबीखान याला बऱ्हाणपुरचा कोतवाल म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

हमीदोद्दीनखान बहादुर हा हत्तीखान्याचा प्रमुख अधिकारी होता. त्याने, बादशहानी नजरेखालून घालण्यासाठी चाळीस हत्ती आणले. हत्तीखान्याचा प्रमुख व्यवस्थापक (मुशरफ) नारायणदास याने बादशहाला या प्रसंगी स्फटिकाचे पानदान अर्पण केले. पाईन विलायत व शिखळ येथून बदललेला ठाणेदार याची मनसब कमी करण्यात आली.

रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग याने विनंती अर्ज केला त्यात पुढीलप्रमाणे मागण्या केल्या होत्या:—

(१) पुण्याची फौजदारी आणि त्याला जोडून असलेली इतर कामे यावर माझी नेमणूक करण्यात यावी. त्याची मनसब वाढविण्यात आली व मनसब देण्यात आली,

(२) येथून अनेक चाकरांना हुजुरात बोलावण्यात येते. हा किल्ला सरहद्दीवर आहे. हे बोलावून घेणे, बंद करण्यांत यावें. कुणाला तरी येथून गेलेल्या चाकरांची परिस्थिती पाहण्यास पाठवावे. विनंती मान्य करण्यात आली,

(३) रायगड किल्ल्यातील नौकर लोकांचा पगार फार थकला आहे. सूरत बंदराच्या खजिन्यातून त्यांना पगार देण्यात यावा.

**दहा नोव्हेंबर १७०३**

आज दिवसाचा एक प्रहर व एक घटका झाल्या असता, बादशहा तख्तेरयां (वाहून नेण्याचे वाहन) वर बसून राजगड व तोरणा जिंकून घेण्यासाठी पुण्याहून निघाले. वाटेत बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान याने बादशहानी पाहावी म्हणून आपली पथके उभी केली होती. रुहुल्लाखानाने एक हत्ती, चार घोडे, १ ढाल व बाणाचे दोन भाते बादशहाना अर्पण केले. बादशहाने दीड कोसाचा प्रवास केला आणि ते मौजे बुधगाव येथे पोहोचले. त्याने तेथे मुक्काम केला. शाईस्तेखानाचा मुलगा अबुल खैरखान हा हुजुरात आला. बादशहाने त्याच्याकडे पाहिले आणि म्हटले दिवाणेखासच्या वाटेने मुजऱ्यासाठी येत चला. पुढील मंडळींना इनामे, बक्षिसे व चाकऱ्या देऊन निरोप देण्यात आला:——

(१) दाऊदखानाचा भाऊ सुलेमानखान याला पुढील चाकऱ्या देण्यात आल्या—— (अ) कऱ्हाडची ठाणेदारी, (ब) आजमतारागड (सातारा) व नौरसतारागड (सज्ञनगड) येथील फौजदारी, (क) पाटणची ठाणेदारी वगैरे या जागावर पूर्वी यासीनखान होता त्या जागांवर सुलेमानखानाची नेमणूक झाली. त्याला खिलातीची वस्त्रे व एक हत्ती देण्यात आला. त्याची मनसब वाढविण्यात आली. मुनीमखान याला राजपुत्र मुहंमद मुअज्ज़म याच्या दिवाणगिरीवर नेमणूक करण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला. मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजीम याला काबुल प्रांतातील शिलेदाराची बक्षीगिरी देण्यात आली. दुसरा मुलगा मुहंमद आक्रम याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवासींग याला पुण्याच्या फौजदारीवर नेमण्यात आले. याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

मुनीमखानाने विनंतीकरून पुढील मागण्या केल्या:—

(१) रामजी वगैरे मनसबदार माझ्यापाशी तैनात राहावे, विनंती मान्य करण्यात आली;

(२) जनावरांच्या खुराकाची सरकारी मागणी मान्य करण्यात यावी, विनंती मान्य झाली;

(३) आमच्या दक्षिणेतील जहागिरी वर्षभर बहाल राहाव्या, विनंती मान्य झाली;

(४) माझ्या विनंत्या ज्या असतील त्या डाकेने पाठविण्यात वाकनिसाना ताकीद करण्यात यावी, विनंती मान्य झाली;

(५) दहा गुर्जबर्दार माझ्यापाशी तैनात करण्यात यावे, विनंती मान्य झाली.

**अकरा नोव्हेंबर १७०३**

आज दिवाणाचे काम बंद होते.

**बारा नोव्हेंबर १७०३**

दिवाणचे काम बंद होते. फरासखान्याचा अधिकारी मीरहादी याने विचारले "पेशखाना पुढे पाठविण्यासंबंधी काय आज्ञा?"

आज्ञा झाली की, पाठवा. या बाबतीत हमीदोद्दीनखान बहादुर याने विनंती केली की, ओझी वाहणारी वाहने नसल्यामुळे लष्करातील माणसे अडकून पडली आहेत. दबादशहाने आज्ञा केली की, पेशखाना पाठविण्याचे तूर्त थांबवा.

**तेरा नोव्हेंबर १७०३**

बादशहाचा मुक्काम मौजे बुधगावजवळ. आज दिवाणचे काम झाले नाही. हमीदोद्दीनखान बहादुर चंदावल (पिछाडीचा सरदार) हा मागच्या टप्प्यावरुन येऊन हुजूरात आला व बादशहाना भेटला. बादशहाने पेशखाना पुढे पाठविण्याची आज्ञा केली. मुनीमखान आणि त्याची मुले यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. ख्वाजा मुहरमखान यांने पुढीलप्रमाणे विनंती केली —— "सुभे औरंगाबादचा दिवाण मोतिमदखान याचा नायब व जावई मुहंमद गयास याने ब्रऱ्हाणपुरचा खजीना अद्याप आला नसतानाही, फौजी सरंजामाची व्यवस्था करून बादशाही कारखाने वगैरे व्यवस्थीतपणे आणले. तो दिवाणीचे काम उत्तम रीतीने करीत आहे. त्याच्यावर कृपा व्हावी, मान्य करून बादशहाने त्याची मनसब वाढविली. कऱ्हाड वगैरेचा ठाणेदार आणि सातारा भागाचा फौजदार यासीनखान याची मनसब कमी करण्यात आली आणि त्याला शहाजादा मुहमंद बेदारबख्त याच्या फौजेत तैनात करण्यात आले. बादशहाने आज्ञा केली कीं, गुर्जबर्दारांनी सुलेमानखानाला नेमणुकीच्या जागेवर आणि यासीनखानाला तैनातीच्या जागेवर पोहोचवावे. मुनीनखानानें विनंती करून पुढील मागण्या केल्या:—

(१) मुहमंद अली अमीरखानी याला काबुल सुभ्याची माहिती आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करावे, विनंती मान्य झाली. तसेच मुहंमद आशिकचा मुलगा मुहंमद आरिफ याला माझ्यापाशीं तैनात करावे, विनंती मान्य. मराठ्यांच्या पथकाचा कारकून भगवंत राय याला माझ्यापाशीं तैनात करण्यात यावे, विनंती मान्य करण्यात आली.

अनुक्रमणिका

## (सोळा रज्जब) चौदा नोव्हेंबर १७०३

दिवसाचा एक प्रहर अन् दोन घटिका झाल्या, असता बादशहा तख्तेखांवर स्वार होऊन मौजे बुधगाववरील मुक्कामावरुन पुढील मजल गाठण्यासाठी निघाले, वाटेत पिछाडीचा सरदार हमीदोद्दीनखान बहादूर याने बादशहाने पाहावी म्हणून आपलीं पथके आणली होती. हमीदोद्दीनखान याने एक तलवार आणि दोन घोडे पेशकश म्हणून बादशहाना अर्पन केले. बादशहाने तरवार ठेवली व घोडे माफ (परत) केले. दोन प्रहरच्या वेळेस बादशहा मुक्कामावर आले. दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाना पुढील मंडळीनी पेशकशी (भेटी) दिल्या.—— (१) इरादतखान (सुप्रसिद्ध आत्मचरित्रकार), (२) खास चौकीचा सेवक दिलेरहिंमत, (३) शिकारखानाचा मुलगा, (४) मस्त अलीखानाचा पुतण्या, (५) कलालखानाचा मुलगा मुहंमद वारिस, (६) मुहंमद कामबक्षमा मीरसामान आकाबेग.

फरासखान्याचा मशरफ मीर अबदुलहादी याने पेशखाना (आघाडीचे तंबू) पुढ पाठविण्यासंबंधी विचारले. बादशहा म्हणाले “उद्या मुक्काम आहे थांबा.” रूहुल्लाखान याची मनसब वाढविण्यात आली.

नरकवासी संभा (संभाजी राजे) यांचा मुलगा राजा शाहू हा मुहंमद कामबख्श यांच्या शेजारी तंबूत उतरत असे. आता आज्ञा झाली की, पूर्वी पद्धतीप्रमाणे त्याने हमीदोद्दीनखान बहादुर याच्या देखरेखीखाली रहकलाबार (शस्त्रागाराचा तळ) मध्ये उतरत जावे. त्याप्रमाणे अंमलबजावणी होऊ लागली.

सुभे अहमदाबादची अकरा माणसे हुजुरात आली आणि बादशहाची नजर त्यांच्यावर पडली, त्यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

## पंधरा नोव्हेंबर १७०३

काबुलचा सुभेदार मुहंमद मुअज्ज्म् बहादुरशाह याला चाळीस हजार जात आणि चाळीस हजार स्वार अशी मनसब होती त्याला पाच कोटी दाम (४० दाम म्हणजे १ रु.) असे इनाम पण होते. त्यात बादशहाने ५ कोटी दामाची भर घातली आणि त्याच्याकडे तीस हत्ती पाठविले. मुनीम खानाच्या जागेवर दक्षिणेत रीतसर नेमलेल्या सेवकांचा अधिकारी म्हणून अमानूल्लाखान याची नेमणूक करण्यात आली. रहमतउल्ला याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

हमीदोद्दीनखान बहादूर याची मनसब वाढविण्यात आली. तो हत्तीखाना, पागा आणि दिवाणेखास या तिन्ही खात्याचा अधिकारी (दारोगा) होता. बादशहा त्याला म्हणाले – ज्यावेळी मी तुम्हाला किल्ले राजगड जिंकून घेण्यासाठी पाठवीन त्यावेळी तुम्हाला नगारे नौबतीचा मान देण्यात येईल. पेशखाना पुढे रवाना करण्याची आज्ञा देण्यात आली. फकीर मुहंमदला पुढील मजल पाहण्यासाठी रवाना करण्यात आले. हमीदोद्दीनखान बहादूर याने बादशहाच्या पाहणीसाठी वीस हत्ती आणले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली – स्वारीत दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा (अधिकारी) मन्सूरखान याने उजव्या फळीला असावे आणि डाव्या फळीला शमशीरबेग याने असावे.

अनुक्रमणिका

काल कडूस व नौलखा येथील बदललेला ठाणेदार निजामराव याने स्वारीच्या वेळी बादशहाची गाठ घेतली आणि एक मोहोर निसार म्हणून अर्पण केली. बादशहाने त्याला कडूस व नौलखा या ठाण्याची ठाणेदारी कायम ठेवली. त्याला एक हजार जात व चारशे स्वार अशी मनसब होती तीत शंभर स्वारांची मनसब वाढविण्यात आली. निजामरावला निरोप देण्यात आला. त्याला आपल्या ठाण्याकडे पोहोचविण्यासाठी एक गुर्जबर्दार नेमण्यात यावा, अशी आज्ञा करण्यात आली.

**सोळा नोव्हेंबर १७०३**

आज सकाळचा एक प्रहर झाला असता, बादशहा हे आईनेदार अशा तख्तेखांवर बसून पुढील मुक्कामाकडे निघाले आणि अडीच कोसाची मजल मारून दुपारच्या वेळी ते बक्षिंदाबक्ष किल्ल्याच्या (सिंहगड) मुक्कामावर आले. मुक्कामावर आल्यावर बादशहाने रूहुल्लाखान यांस बोलाविले. त्याला ते एकांतात म्हणाले की, मी तुम्हाला आणि हमीदोद्दीनखान बहादूर याला राजगड व तोरणा या स्थळांचे मार्गाचे घाट पाहण्यासाठी पाठवित आहे. मुहंमद अमीनखान व मतलबखान यांनी काही पक्षी शिकार करून आणले होते. ते त्यांनी बादशहाला अर्पण केले. बादशहानी यापूर्वी फकीर मुहंमद अईज व मुबारक करावल यांना पुढील मजल पाहून येण्यासाठी पाठवले होते ते पाहून परत आले. ते म्हणाले की, पुढची मजल सव्वादोन कोसांची आहे आणि मुक्कामाची जागा चांगली आहे. वाटेतील घाट दुरुस्त झाला आहे.

बादशहाने स्वारीवर असताना पुढीलप्रमाणे आज्ञा केली, “राजा शाहू याने घोड्यावर स्वार होऊन हुजुरात यावे आणि मुजरा करावा.” बादशहाच्या आज्ञेप्रमाणे राजा शाहुने केले.

पेशखाना पुढे पाठविण्यासंबंधी बादशहा म्हणाले, उद्या पाठवा. घाट दुरुस्त होईपर्यंत येथे मुक्काम करू, सोमवारी येथून निघू.

नजाबतखानाचा (ख्वैश) जावई मीर मुहंमद याला सुल्तानपूर आणि नंदुरबारची फौजदारी देण्यात आली. त्या जागेवर यापूर्वी मामूरखान हा होता. मामूरखानाला होशंगाबादवर (मध्य प्रदेश) बदलण्यात आले.

**(१९ रज्जब) सतरा नोव्हेंबर १७०३**

मुक्काम किल्ले बक्षिदाबक्ष (सिंहगड) जवळ. आज दिवाणाचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.– “अमीरउल्लउमरा (असद्‌खान–मुख्य प्रधान) यानी राजगडाच्या घाटाच्या पलीकडे जावे आणि संरक्षणाची व्यवस्था करावी.”

बादशहाना कळविण्यात आले की, तरबियखान हा बहादुरगडाहून आला आहे. त्याने हुजुरात केव्हा यावे. बादशहाने आज्ञा केली “दुपारच्या नमाजानंतर”. तरबियतखानाने तसबीहखान्यांत (प्रार्थना गृहात) बादशहाची भेट घेतली. त्याने बादशहाना निसार म्हणून अठरा मोहरा अर्पण केल्या. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

पेशखाना पुढे रवाना करण्याची आज्ञा करण्यात आली.

अनुक्रमणिका

## (२० रज्ज़ब) अठरा नोव्हेंबर १७०३

बादशहाने आज्ञा केली की, तरबिअतखान, हमीदोद्दीन खानबहादूर, मतलबखान व सरबराहखान यांनी घाटाच्या मार्गांवर जाऊन नीट व्यवस्था करावी. बादशहाना कळविण्यात आले ते असे, —— “आज्ञेप्रमाणे अमीरउल्उमरा (असदखान) हे घाटाच्या पलीकडे राजगडला गेले. तेथे त्यांनी टेहळणी केली. बादशहाच्या वास्तव्यासाठी योग्य ती जागा त्याने पाहिली व तिचे संरक्षण कसे करता येईल, म्हणून तेथे ते उतरले, तेव्हा किल्ल्यातून गनिमानी (मराठ्यांनी) तोफा चालवल्या.

## (२१ रज्ज़ब) एकोणीस नोव्हेंबर १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. रूहुल्लाकान याने पुढीलप्रमाणे विनंती केली, “सुलेमानखान याचे म्हणणे असे आहे की, आपण केलेल्या सगळ्या मागण्या अजून पूर्ण झाल्या नाहीत. एक आठवड्याची मुदत देण्यात यावी.” विनंती मान्य करण्यात आली. सुलेमान खानाचा भाचा मुहंमद फाजील हा कऱ्हाडला ठाणेदार होता. त्याला फजलुल्लाखान ही पदवी देण्यात आली आणि त्याला सुलेमान खानाबरोबर पाठविण्यात आले. शहाजादा बेदारबख्त याने आपल्या नोकरापैकीच एकाची नेमणूक औरंगाबदचा कोतवाल म्हणून करावी, अशी आज्ञा करण्यात आली. हमीदोद्दीनखान बहादूर याने आज्ञेप्रमाणे राजगड किल्ल्याचा नकाशा बादशहाच्या समोर ठेवला.

राजा शाहू (शाहू महाराज) याचा दिवाण शेख गुलाम मुहंमद याने बादशहाला पुढीलप्रमाणे विनंती केली- “राजा शाहू यांच्या पथकातील लोक हे राजांच्या अक्कलकोट परगण्याच्या जहागीर महालात तैनात आहेत. रजिस्टरमध्ये नोंदलेल्या खाणाखुणा (याला चेहरापट्टी म्हणून) आणि प्रत्यक्षात हजर असलेल्यांचे चेहेरे यात फार तफावत आहे. या लोकांना हुजुरात बोलवावे म्हणजे रजिस्टर मधील चेहेऱ्यावरून त्यांची तपासणी करण्यात येईल.” विनंती मान्य करण्यात आली.

## (२२ रज्ज़ब) वीस नोव्हेंबर १७०३

आज दिवसाचा एक प्रहर अन् एक घटिका झाले असता बादशहा हे बक्षिंदाबक्ष (सिंहगड) किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या मुक्कामावरून निघाले. ते तख्तेखांवर स्वार होते. बादशहा हमीदोद्दीनखान बहादुर यांस म्हणाले “आमचे पिछाडीचे (चंदावल) सरदार तरबिअतखान हे घाटाची व्यवस्था करण्यासाठी पुढे गेले आहेत ते परत येईपर्यंत तुम्ही येथेच रहा. संध्याकाळी मागाहून तुम्ही हुजुरात या. या नंतर बादशहाने घाट ओलांडला. तरबिअतखानाला बादशहा म्हणाले की, चंदावल (पिछाडी) सांभाळण्यासाठी तुम्ही मागे या. सरबराहखान हा घाटावर राहील. बादशहाने पावणे तीन कोसाची मजल मारून दुपारच्या वेळी घाटाच्या पलीकडे उभ्या केलेल्या तळावर मुक्काम केला. बादशहाने आज्ञा केली की, रूहुल्लाखान व मतलबखान याने जाऊन पुढील मुक्कामाची जागा पाहून परत यावे.

## एकवीस नोव्हेंबर १७०३

आज बादशहाने दिवाणाचे काम बंद ठेवले. काल सर्फराजखानाला पुढीलप्रमाणे हुकुम देण्यात आला.——"तुम्ही चंदावला (पिछाडी) च्या रक्षणासाठी मागील टप्प्यावर जा. तरबिअतखानाने हुजुरात यावे." काल रूहुल्लाखान व मतलबखान करावल बेगी यांना आज्ञा झाली की, "पुढच्या टप्प्यावर जाऊन आमच्या वास्तव्यासाठी जागा पाहून या." संध्याकाळी बादशहाने आज्ञा केली कीं, बक्षी रूहुल्लाखान, हमीदोद्दीनखान बहादूर, तरबिअतखान व मतलबखान यांनी राजगड किल्ल्याकडे जावे आणि किल्ल्याच्या भोवती ठाणे बसवण्यासाठी जागा कोण ते मोर्चे कोठे लावायचे व बादशहाच्या वास्तव्यासाठी जागा कोणती निवडायची हे पहावे.

### (२४ रज्जब) बावीस नोव्हेंबर १७०३

बादशहाना कळविण्यात आले की, वरील आज्ञेप्रमाणे ही मंडळी राजगडकडे गेली आहेत.

सुल्लातपूर नंदूरबारचा देशमुख शंभूनाथ हा कोतवाली चबुतऱ्यात कैदेत होता. तो मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याशिवाय २० होन आणि इतर बक्षीसे देण्यात आली. त्याचे नाव अब्दुल मोमीन ठेवण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, त्याला कैदेतून सोडावे.

बऱ्हाणपूर, बहादूरपूर व जैनपूर येथील बदललेला कोतवाल व फौजदार याची मनसब कमी करण्यात आली.

### तेवीस नोव्हेंबर १७०३

राजगडकडे गेलेली मंडळी परत आली. मतलबखानाने विनंतीपत्र सादर केले. त्यात म्हटले कीं, बादशहाच्या वास्तव्यासाठी तीन जागा पाहण्यात आल्या आहेत. एक जागा सव्वादोन कोसावर आहे. दुसऱ्या दोन जागा त्याच्यापुढे एक कोसावर आहे. पत्र पाहून बादशहाने आज्ञा केली की, पेशखाना पुढे पाठविण्यात यावा. त्याच्याबरोबर मुहमद अमीनखान सद्र आणि अहदियान चा मीर बक्षी नेकनामखान यांनी पेशखान्याच्या बरोबर जावे अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणे आजसकाळी फरासखान्याचा मुशरफ (अधिकारी) अब्दुल हादी याने पेशखाना तयार केला. बादशहाने आज्ञा केली कीं, तो पुढे पाठविण्यात यावा. त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

### कंधार (जिल्हा नांदेड) चा किल्लेदार

सय्यद अबदाल याचा मुलगा सय्यद हुसेन याला पूर्वीप्रमाणेच कंधार (जिल्हा नांदेड) येथे किल्लेदार व फौजदार म्हणून बहाल करण्यात आले. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

साल्पेघाट आणि इतर ठाणीं याचा बदललेला ठाणेदार यासीनखान याचा मुलगा अबदुर्रऊफखान याची मनसब कमी करण्यात येऊन त्याला शाहजादा मुहंमद बेदार बख्त याच्याकडे तैनात करण्यात आले. सग्रांमशाही हा रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग, याच्याकडे तैनात होता. त्याला उत्तर हिंदुस्तानातील स्वतःच्या जहागिरीची व्यवस्था पाहण्यासाठी म्हणून एक वर्षाची रजा देऊन पाठविण्यात आले.

अनुक्रमणिका

कऱ्हाड वगैरेचा ठाणेदार सुलेमानखान याने अर्ज करुन पुढील विनंती केली:—

(१) चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी दोन रेहकले (लहान तोफा) देण्यात याव्या. द्याव्या, अशी आज्ञा झाली.

(२) दोनशे धनुष्ये आणि बाणांचे दोनशे भाते देण्यात यावे. द्यावेत, अशी आज्ञा झाली,

(३) मागील ठाणेदाराला पगाराची जी सवलत होती तीच मलाही देण्यात यावी.

(४) मरहूम शम्शुद्दीन मुहंमदखान याचा भाचा अलीकुली याला अलवावास्ताची फौजदारी देण्यात यावी. यावर आज्ञा झाली की, चौकशी करुन इनायत उल्लाखान याने वृत्तांत सादर करावा.

**(२६ रज्जब) चोवीस नोव्हेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. काल संध्याकाळी बादशहाना कळविण्यात आले की, लष्करातील काही माणसांचा सरंजाम अद्याप घाटाच्या पलीकडे राहिला आहे आणि चंदावलचे सर्फराजखान व कोतवाल सर्बराहखान हे घाटावरुन बादशाही छावणीत येत आहेत. त्यामुळे बादशहानी आज मुक्काम केला.

सकाळी बादशहानी हमीदोद्दीनखान बहादूर व मतलबखान करावल बेगी याने पुढे जाऊन घाटावर गढी आणि ठाणेदार कायम करावे. फकीर मुहंमदला येथे ठेवून परत यावे. या सुमारास काहीच्या मनसबी वाढविण्यात आल्या व काहींना बक्षीसे देण्यात आली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

**पवनारचा फौजदार मुहंमद मुरादखान**

"कऱ्हाड वगैरेचा पूर्वीचा ठाणेदार यासीनखान हा होता. त्याला पगार म्हणून तनखा जागीर देण्यात आली होती. त्याची मनसब कमी करण्यात आली. यासीन खानाच्या जागेवर, कऱ्हाडचा ठाणेदार आणि साताऱ्याच्या परिसराचा फौजदार म्हणून यासीनखानाची सगळी तनखा जागीर सुलेमान खानाला देण्यात यावी. पण यासीनखानाची मनसब कमी केली होती. त्यामुळे जहागिरीचे सगळेच उत्पन्न सुलेमानखानाला देता येत नव्हते. त्यासाठी अशी आज्ञा देण्यात आली कीं, वरील जहागिरीच्या उत्पन्नांतून उरलेली रक्कम तनखा म्हणून पवनार (जिल्हा वर्धा) चा फौजदार मुहमद मुरादखान याला देण्यात यावी."

(इतिहासकार खाफीखान याचा मित्र हा मुरादखान १७०३ मधे हा पवनारचा फौजदार होता औरंगजेबाच्या एका आदेशात मुरादखानाच्या पत्राचा उल्लेख आहे. त्यात चांदा (चंद्रपूर) येथील राजा तरुण

अनुक्रमणिका

आणि अल्पवयी आहे, असे म्हटले आहे. यावरुन चंद्रपूरचा राजा बीरसिंग याचा मृत्यु १७०३ किंवा १७०४ मधला ठरू शकतो.)

**(२७ रज्जब) पंचवीस नोव्हेंबर**

आज दिवाणचे काम झाले नाही. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली——शिष्टाचाराचा अधिकारी (मीर तूजक) याने (Screen) जाळीपाशी उभे असावे आणि दिवाणेखासच्या मार्गे मुजऱ्यासाठी येत जावे.

**(२८ रज्जब) सव्वीस नोव्हेंबर**

आज दिवसाचा एक प्रहर व दोन घटिका झाल्या असता बादशहा घाटाच्या अलीकडील आपल्या मुक्कामावरुन निघाले, ते तख्तेखांवर स्वार होते. दोन कोसाच्यावर काही अंतर (अर्धा पाव) पार करून ते दुपारच्या वेळी राजगड किल्ल्याच्या जवळील आपल्या मुक्कामास आले. पुढील मंडळींनी वाटेत शिकार केली होती. ती शिकार बादशहांना अर्पण करण्यात आली—

(१) मरहमतखान, (२) मतलबखान, (३) मुहंमद अमीनखान, (४) कामियाबखान, (५) अबदुल्कादर, (६) इरादतखान, (७) मीर फतेउल्ला. (तोवकखान्याचा अधिकारी). मिफ्ताहुलफुतुह (चंदनवंदन) किल्ल्याचा माजी किल्लेदार कुवंरसिंग हा बादशहाना भेटला आणि त्याने निसार (ओवाळणी) म्हणून एक मोहोर बादशहाना अर्पण केली.

फकीर मुहंमद याला राजगड जवळील घाटावर ठाणेदार म्हणून नेमण्यात आले होते. तो बादशहाना भेटला. त्याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला.

बादशहाने बक्षी रूहुल्लाखान यांस पुढीलप्रमाणे आज्ञा केली——"तुम्ही आणि हमीदोद्दीनखान बहादुर याने उद्या जावे आणि किल्ले राजगडची पाहणी करुन मोर्चाच्या जागा ठरवाव्या. सैफुल्लाखान याने ही जावे. मन्सूरखान व नेकनामखान यांच्याकडे बादशहानी फळफळावळे पाठविली.

बादशहांना पुढील हकीकत कळविण्यात आली. फतेहुल्लाखान बहादुर आलमगीर शाही याची तैनाती काबुलला झाली. त्याप्रमाणे तो काबुलकडे चालला होता. प्रवास करीत तो बऱ्हाणपुरला पोहोचला. बऱ्हाणपूर, खानदेश येथे शाहजादा बेदारबख्त तर्फे अलिमर्दानखान हा नायब सुभेदार म्हणून काम पाहत होता. बऱ्हाणपूर मुक्कामी फतेहुल्लाखानाचे सैनिक आणि अलिमर्दानखान याचे सैनिक यांच्यामध्ये मोठी चकमक उडाली, उभय पक्षाची अनेक माणसे मारली गेली. फत्तेहुल्लाला तीन हजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब होती. बादशहाने त्यातून दोनशे स्वार कमी केले.

बादशहाने तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याला चंदावल (पिछाडी) कडे जाण्यासाठी निरोप दिला. बादशहा त्याला म्हणाले "तुम्ही एक दिवसाहून अधिक वेळ लावलात" खानाजाद खान याने अर्ज केला की, आज्ञा असल्यास मी शिकारीला जाईन. विनंती मान्य करण्यात आली. फरासखान्याचा अधिकारी अबदुल हादी याला आज्ञा झाली की, पेशखाना तसाच राहू द्या. गोपाळसिंग चंद्रावत (याचाच मुलगा रतनसिंग याने मुसलमान होऊन रामपुऱ्याची जहागीर बळकावली होती.) याला हैद्राबाद सुभ्यात तैनात

करण्यात आले होते. त्याने अर्ज पाठवून पुढीलप्रमाणे विनंती केली.—(१) मला पूर्वीची मनसब मिळेल असे अश्वासन मिळाले होते पण आता फक्त एक हजार जात आणि तीनशेस्वार अशी मनसब आहे—बादशहाने त्याच्या मनसबीत पाचशे जात अशी वाढ केली, (२) मला वीस लाख दाम (चाळीस दाम म्ह. १ रुपया) ची जागीर उत्तर हिंदुस्थानात देण्यात यावी म्हणजे माझ्या जमातीचा सांभाळ करीन——विनंती मान्य करण्यात आली नाही, (३) माझा कोणी वकील नाही.—जुमल्लतुल्मुक (मुख्य प्रधान) हे सुभे हैद्राबादमध्येच तुम्हाला पगार देतील, (४) आमच्या चंद्रावत जमातीचे लोक हे हुजुरांतीत येऊन मनसबीची अपेक्षा करतील, त्यांना मनसब मिळावी. विनंती मान्य झाली नाही, (५) शुभकरण चंद्रावत याची मनसब त्याच्या बापाच्या मृत्यूनंतर वाढविण्यात आली नाही. बादशहाने पन्नास स्वारांनी त्याची मनसब वाढविली.

### (२९ रज्जब) सत्तावीस नोव्हेंबर १७०३

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—"मुहरमखान हा कजावे (तटावर चढविण्यासाठी लागडाचे पाळणेवजा) तयार करीत आहे. त्यासाठी तो जंगल तोडवित आहे. शत्रुचे (मराठ्यांचे) सुमारे तीनशे लोक राजगड किल्ल्यातून बाहेर पडले. मुहरमखान आणि शत्रु यांची बाण, बंदुकी इत्यादिनी लढाई झाली. आपली दोन माणसे व एक घोडा यांना गोळ्या लागल्या. शत्रू पळून किल्ल्यावर गेले. मुहरमखान हा हुजुरात आला. बादशहा म्हणाले, तुमची सेवा मान्य झाली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—पूर्वीप्रमाणे राजा शाहू याने बादशाहजादा मुहमंद कामबख्श याच्या डेऱ्यापाशी राहात जावे. फत्तेदौलत याने गुलालबार मधून राजा शाहू याला बाहेर आणून कामबख्शाच्या डेऱ्याजवळील डेऱ्यात पोहोचवावे. बादशहाना कळविण्यात आले की, त्यांच्या आज्ञेची अंमलबजावणी करण्यात आली आहे.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—खान फिरोजजंग याने पाठविलेली रसद आणि खजीना ही घेऊन मुगलखान हा अहमदनगरहून हुजुराकडे येण्यास निघाला आहे. बादशहाने आज्ञा केली की, यासीतखान आणि पुणे वगैरेचा ठाणेदार शिवसिंग याने जाऊन खजीना हुजुरात आणावा.

### (३० रज्जब) अठ्ठावीस नोव्हेंबर १७०३

सकाळी बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

> "तरबियतखान, रूहूल्लाखान, हमीदोद्दीनखान, सैफुल्लाखान, अजिजखान वगैरे सैन्य घेऊन आज्ञेप्रमाणे राजगडच्या पलीकडे किल्ल्याचा घेर पाहण्यासाठी गेले आहेत."

यार अलीबेग याने एक विनंतीपत्र हुजुरात लिहून पाठविले. मजकूर असा होता की, 'सुरतेचा अधिकारी एतिबारखान (मुत्सद्दी) याच्याने काम होत नाही. त्याच्या जागेवर बागलाणाचा फौजदार नजाबतखान याची नेमणूक झाल्यास सुरतेचा बंदोबस्त व्यवस्थितपणे होऊ शकेल. बादशहाने विनंती मान्य केली आणि बागलाणाच्या फौजदारीच्या जोडीला सुरतेचाही कारभार नजाबतखानाला सांगितला. त्याची मनसब वाढविण्यात आली. नजाबतखानाने बागलाणात आपला एक नायब ठेवून स्वतः सुरतेच्या बंदोबस्तासाठी जावे अशी आज्ञा झाली.

अनुक्रमणिका

बादशहाने मतलबखानाला पुढीलप्रमाणे आज्ञा केली.——शाहजादा कामबख्श याचा मीर बक्षी नुस्रतखान याने कामबख्शाची पथके घेऊन जावी आणि अमीरउल्‌उमराची (मुख्यप्रधानाची) ही पथके घेवून जावी आणि राजगड व तोरणा या किल्ल्याच्या पायथ्याशी ठाणे बसवून यावे.

**(शाबान १) एकोणतीस नोव्हेंबर १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. काल मोहरमखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला— "मी व मन्सूरखान हे मोर्चाच्या कामात दिवसभर गर्क होतो. चौकी पहाऱ्यासाठी मन्सूरखान आलेला आहे. त्याला चौकी पहाऱ्याचे काम माफ करण्यात यावे." विनंती मान्य करण्यात आली.

मन्सूरखान याच्या विनंती अर्जावरुन व मोहरमखानाच्या विनंती अर्जावरुन कळले की, मोर्चामध्ये मजूर लोक कष्ट करीत आहेत त्यांना काही उत्तेजन मिळावे. बादशहाने आज्ञा केली की, फत्तेदौलतचा मुलगा फत्तेनुसरत याने त्यांच्याकडे पन्नास रुपये पोहोचवावे.

रुस्तुमरावचा मुलगा बहादुरजी (जाधव) हा मुगलखान याच्या फौजेत तैनात होता. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे तो हुजुरांत येऊन बादशहाला भेटला. त्याने निसार (ओवाळणी) म्हणून बादशहाला एक मोहोर अर्पण केली. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"बहादुरजीला एक हजार रुपये खर्चासाठी द्यावे." त्याने आपल्या गावातून आपल्या मुलीला हुजुरात आणावी म्हणजे नरकवासी संभाजीचा मुलगा राजा शाहू याच्याबरोबर तिचे लग्न लावून देण्यात येईल. त्याप्रमाणे बहादुरजीचा मुलगा आणि रुस्तुमरावचा नातू रुस्तुमराव याला एकशेवीस स्वारांची मनसब देण्यात आली होती. आपली मनसब लहान आहे या कारणाने रुस्तुमरावने नकार दिला होता. या सुमारास बादशहाने त्याला दोनशेंवीस स्वारांची मनसब दिली. बादशहाने पूर्वी पुढीलप्रमाणे आज्ञा केली होती——"शाहजादा मुहंमद कामबख्श याच्या फौजेतील शंभर सैनिक यांना राजगड जवळील घाटाचा ठाणेदार फकीर मुहंमद अईज याजपाशी तैनात करण्यात यावे. शहाजाद्याने विनंती केली की, हा हुकूम रद्द करण्यात यावा, विनंती मान्य करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, पन्नास बरकंदाज (बंदुकची) आणि पन्नास शिलेदार (अहदी) हे फकीर मुहंमदपाशी तैनात करण्यात यावेत. आज्ञेप्रमाणे राजगड किल्ल्याचा नकाशा बादशहासमोर ठेवण्यांत आला.

काल मतलबखान करावल बेगी हा आज्ञेप्रमाणे अमीरउल्‌उमरा (मुख्य प्रधान) आणि शहाजादा कामबख्श यांची पथके आणि शहाजाद्याचा मीरबक्षी नुस्रतखान यांना राजगड आणि तोरणा किल्ल्याच्या पायथ्याशी घेऊन गेला आणि तेथे ठाणी कायम केली. तो ठाण्याचे नकाशे घेऊन आला आणि ते बादशहाना दाखविले. बादशहा म्हणाले "तुम्ही पुन्हा उद्या जा आणि इतर ठाणी पण पाहून या. त्याप्रमाणे तो आज ठाणी पाहण्यास गेला. औरंगाबाद येथील हरकऱ्यांकडून आलेल्या वृत्तांतावरून पुढील बातम्या कळल्या.—— "सुल्तान बेदारदिल याच्या वाढदिवसानिमित्त शहाजादा बेदार बख्त याने फळफळावळे आणि मिठाई यांची एकूण नव्वद तबके खाने आलम आणि राजा जयसिंग याच्याकडे पाठविली. ही घटना २ रज्जब (दोन) ची आहे. एकवीस रज्जब रोजी शहाजाद्यानी मतलबखानाचा मुलगा अबुलआली याला त्याच्या विवाह प्रसंगाच्या निमित्ताने खिलातीची वस्त्रे आणि खंजीर या भेटी दिल्या.

**(२ शाबान) तीस नोव्हेंबर १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते. मतलबखानाने आज्ञेप्रमाणे मुहंमद अमीनखान यास कामबख्शाच्या पथकाच्या बरोबर राजगड आणि तोरणा या किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या ठाण्यात कायम केले. नंतर तो बादशहापाशी आला.

## (३ शाबान) एक डिसेंबर १७०३

काल रात्री रुहुल्लाखान, हमीदोद्दीनखान बहादुर, तरबियतखान हे हुजुरात आले. त्यांनी मुजरे केले आणि बादशहाना कळविले की, "राजगड किल्ल्याच्या घेराच्या पलीकडे आम्ही जाऊन आलो. ठाणी कायम करण्यासाठी आम्ही जागा पाहून आलो. आता तेथे ठाणेदार नेमण्यात यावे ही विनंती." विनंती मान्य करण्यात आली.

सखरलना (विशाळगड) किल्ल्याचा किल्लेदार उदितसिंग (ओरछाचा राजा) याची मनसब वाढविण्यात आली. छावणीतील दयानंद मिश्र याची मनसब मतलबखानाच्या विनंतीवरून वाढविण्यात आली. मुनव्वरखान (खाने आलमचा भाऊ आणि संभाजी राजांना धरणारा शेख निजाम याचा मुलगा) हा बेदारबख्ताकडे तैनात होता. त्याची मनसब पाचशेनी कमी करण्यात आली. रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार व पुण्याचा ठाणेदार शिवसिंग याची मनसब वाढविण्यात आली.

अधोनी (आन्ध्र, गुंतगल जंकशनच्या अलीकडे) येथील बातम्याप्रमाणे पुढील हकीकत कळली:—

"किल्ल्यात मुहंमद गियास व पीर मुहंमद हजारी हे अधिकारी तैनात होते. ते दारू पिऊन तोफखान्याचा अधिकारी मीर अब्दुल्ला याच्या घरावर चाल करून गेले. त्यांनी घरावर दगडांचा वर्षाव केला. मीर अब्दुल्ला आणि त्याचे काही सोबती यांनी तलवारी हातात घेऊन घराचे रक्षण केले. किल्ल्याचा किल्लेदार शराफतखान याने सबलसिंग वगैरे अधिकारी यांना मीर अब्दुल्लच्या मदतीसाठी पाठविले. त्यामुळे दंगेखोर तेथून गेले. बादशहाने आज्ञा केली की, त्यांचा दोन महिन्यांचा (दंगेखोरांचा) पगार कापून घ्यावा. आणि चौकशी करून वृत्तांत सादर करावा. रजामबेगखान हिंमतखानी (हा पूर्वी हिंमतखानाच्या पथकाखाली असावा) याला (खडकवासला तर नव्हे?) तेथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला लागणारा सरंजाम इरादतखानाला देण्यात आला तसाच देण्यात यावा अशी आज्ञा झाली. बादशहाच्या निवासस्थानाभोवती असलेल्या चौकीपहाऱ्यात दुसऱ्या चौकीचा अधिकारी मुनीमखान हा होता. (त्याची नेमणूक काबुलकडे झाल्यामुळे) त्याच्या जागेवर इरादतखान याची नेमणूक करण्यात आली."

## (४ शाबान) दोन डिसेंबर १७०३

बादशहाना कळविण्यात आले ते असे:—

"मन्सूरखान व मुहरमखान हे आज्ञेप्रमाणे राजगड किल्ल्याच्या जवळच असलेल्या टेकडीवर गेले. तेथून त्याने शत्रूला (मराठ्यांना) मार देऊन किल्ल्याच्या बुरुजाच्या पायथ्यापर्यंत रेटले. पण दगडाची फेकाफेक, बाण आणि बंदूकीचा मारा अशी ही चकमक चालू आहे."

अनुक्रमणिका

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.— "हमीदोद्दीखान बहादूर आणि तरबियतखान याने मन्सूरखान व मोहरमखान यांची मदत करण्यासाठी जावे."

संध्याकाळी बादशहाना कळविण्यात आले की, शत्रूचे (मराठ्यांचे) सैनिक हे किल्ल्यात निघून गेले. आणि बादशाही अधिकारी हे टेकडीच्या टोकावर आले आहेत.

**(५ शाबान) तीन डिसेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. खानाजादखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली.— "मन्सुरखानाचा मुलगा आतिशखान हा आजारी आहे. उपचार करून घेण्यासाठी औरंगाबादेस जाण्याकरिता त्याला रजा देण्यात यावी." बादशहाने विनंती मान्य केली आणि आज्ञा केली की, हकीम नसोरोद्दीन याने त्याच्या उपचारासाठी त्याच्याबरोबर जावे.

कालरात्री खानाजादखानाने पुढीलप्रमाणे विनंती केली—"रुहुल्लाखानाचे म्हणणे असे आहे—"मी व हमीदोद्दीनखान यांना आज्ञा झाली की, राजगड व तोरणा यांच्या पायथ्याशी मतलबखानाने जी ठाणी बसवली आहेत ती पाहावी. ती योग्य ठिकाणी असतील तर उत्तम नाहीतर दुसऱ्या जागा निवडाव्या म्हणजे चोरांची (मराठ्यांची) वर्दळ थांबेल. आम्ही ती पाहाण्यास जात आहोत, आज्ञा व्हावी." बादशहा म्हणाले, "जा." काल रात्री सय्यदीचा मुलगा अब्दुर्रहमान याने दरबारात हजर होऊन तक्रार नोंदविली ती अशी, "माझा बाप आजमतारागड (सातारा) च्या वेढ्यात कामी आला. मला कोणी दरबारात उभे करू देत नाहीत. बादशहाने त्याला आपल्या जवळ बोलविले आणि त्याला सोळा होन बक्षीस म्हणून दिले. बादशहाने आज्ञा केली. की, रशीद खान याने उद्या त्या इसमाला दरबारात उभे करावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली "सर्फराजखान, मन्सूरखान व अमानुल्लाखान यांना किल्ल्याच्या पलीकडे ठाणी सोपविण्यात आली आहेत. मंगळवारी रुहुल्लाखान याने या तिघांना आपापल्या ठाण्यात बसवून यावे.

वऱ्हाडचा सुभेदार खान फिरोजजंग हा होता. त्याच्या तर्फे रुस्तुमखान हा वऱ्हाडात नायब म्हणून काम करीत होता. त्याच्याकडे सरकारी पैसा सहा हजार सातशे सत्तर (७०) रुपये जास्त खर्च केल्याचे चौकशीत बाहेर आले. ही रक्कम वऱ्हाडातील खजिन्यात भरती करविण्यात यावी आणि त्यासाठी एक गुर्जबर्दार नेमण्यात यावा, अशी आज्ञा करण्यात आली.

**(६ शाबान) चार डिसेंबर १७०३**

काल रात्री बादशहाने हमीदोद्दीनखान बहादूर, तरबियतखान, रुहुल्लाखान आणि मोहरमखान यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केली.— "उद्या तुम्ही जा! आणि राजगड किल्यासमोर मोर्चे बांधण्यास सुरुवात करा." त्या प्रमाणे ते सगळे आज निघाले. शत्रूंचे (मराठ्यांचे) पारिपत्य करीत त्यांना किल्ल्याच्या बुरुजापर्यंत रेटले. तेथे कजावे ठेऊन किल्ल्याच्या दरवाज्याच्या दिशेने मोर्चे कायम केले.

अनुक्रमणिका

## (७ शाबान) पाच डिसेंबर १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. कचेरी सुरू होण्यापूर्वी मोहरमखान हा हुजुरांच्या भेटीस आला. त्याने पुढील बातमी दिली– “शत्रूच्या (मराठ्यांच्या) सैनिकांना रेटीत रेटीत आम्ही किल्ल्यात घातले. किल्याच्या बुरुजाजवळ आम्ही कजावे ठेवले. किल्ल्याच्या दरवाजाच्या दिशेने मोर्चाचे काम सुरू केले. दमदम्याची (तोफा चढविण्याचा लाकडी प्लॅटफॉर्म) जागा मोकळी आहे.” बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—“दमदमा तयार करवा, तेथे तोफ चढवा आणि बुरूज पाडा, व कामावर असलेल्या मजुरांना रोजी तीनशे रुपये देण्यात यावे, या शिवाय इतर कामासाठी दोनशे रुपये देण्यात यावे. रुहुल्लाखान हा रात्री मोर्च्यात होता. तो हुजुरात आला आणि त्याने बादशहांना मोर्चाचा तपशील कळविला.

मीर बक्षीचा नायब, मतलबखान याने बादशहाना पुढीलप्रमाणे कळविले– “सुरतेचा कारभारी एतिबारखान याच्या जागी नजाबतखान (बागलाणचा फौजदार) ह्याची नेमणूक करण्यात आली आहे. आमच्या खात्याच्या नेमणूक पत्रामध्ये (सियाहिया) लिहून ठेवण्यासंबंधी काय आज्ञा आहे.” बादशहा ने आज्ञा केली की, लिहिण्यात यावे. फर्मान आणि खास खिलातीची वस्त्रे ख्वाजा मुबारक वगैरे दोन गुर्दबर्दारांच्या द्वारे नजाबतखानाकडे पाठविण्यात यावी.

संगमनेर वगैरेचा फौजदार आणि अमीन अमानतखान (हाच पुढे मुबारिसखान या नावाने हैद्राबादचा सुभेदार झाला आणि निजामउल्मुल्काशी लढताना मारला गेला. सन १७२४.) याला वेरूळ परगण्याच्या (?) पायबाकी (इनाम देण्यायोग्य मोकळ्या राहिलेल्या जमिनी) चा अमीन म्हणून नेमणूक करण्यात आली. बादशहाना कळविण्यात आले की, मुगलखान हा खजीना व धान्याची रसद वगैरे घेऊन घाटाच्या पलीकडे आला आहे. खजीना घाटावरून पार करण्यासाठी हत्ती व उंट लागतील, काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, चाळीस पंचेचाळीस हत्ती व उंट हे शमशीरबेगच्या बरोबर मुगलखानाकडे पाठविण्यात यावे.

सुरतेचा माजी कारभारी एतिबारखान याची मनसब कमी करण्यात आली.

## (८ शाबान) सहा डिसेंबर १७०३

दोन्ही दिवाणची कामे बंद ठेवण्यात आली.

## (९ शाबान) सात डिसेंबर १७०३

मीरखान याचे लग्न दिवंगत बक्षी बहरामंदखान याच्या मुलीशी औरंगाबाद येथे झाले. तो बादशहाना येऊन भेटला. त्याने अठरा मोहरा अर्पण केल्या. त्याने दिवाणेखासच्या मार्गाने मुजऱ्यासाठी जात येत असावे अशी आज्ञा झाली. त्याचा भाऊ मीर मुहंमद हादी हा ही बादशहाला येऊन भेटला.

अधोनी इम्तियाजगडच्या किल्ल्यावर तोफखान्याचा अधिकारी (दारोगा) म्हणून मीर अद्बुल्लाच्या जागेवर मुहंमद काजिम याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक शाल बक्षीस देण्यात आली.

अनुक्रमणिका

मुहंमद अमीनखान सद्र याची पूर्वी चालू असलेली बहादूर ही पदवी पुढेही चालू राहावी अशी आज्ञा करण्यात आली.

कामबख्श (शहाजादा) याचा मीरबक्षी नुस्रतखान याने दोनशे पायदळ शिपाई घेऊन जावे आणि मुहंमद अमीनखानाच्या ठाण्यात राहून खबरदारी बाळगावी अशी आज्ञा देण्यात आली. त्या ठाण्यात दोन तोफा पोहोचविण्यात याव्या अशीही आज्ञा झाली.

शफीखान ह्याला राजगड किल्ल्यासमोरील मोर्चातील वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. मामूरखान यास सुल्तानपूर, नंदुरबार आणि थाळणेर येथे फौजदार म्हणून नेमण्यात आले. रणमस्तखान हा होशंगाबादचा फौजदार झाला. मरहूम नजाबतखान याचा जावई मीर मुहंमद याला औरंगगड (मुल्हेर) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. मरहूम अब्दुलरहीमखानचा मुलगा मीरनोमान हा मुहंमद अमीन बहादुरच्या ठाण्याचा वाकेनवीस झाला.

शहरपनाह दौलताबादचा किल्लेदार मुजतबाखान याची मनसब कमी करण्यात आली.

कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याच्या विनंतीप्रमाणे तेथे तैनात असलेल्या गजनी याला दोनशेची मनसब देण्यात आली.

**(१० शाबान ) आठ डिसेंबर १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**(११ शाबान) नऊ डिसेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

आज सियादतखान हा फौज हलकट गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी आजमगड (पुरंदर) वगरे भागाकडे गेला होता. छावणीतील गुरेढोरे ही घासदाणा आणण्यासाठी गेली होती. चोरांनी (मराठ्यांनी) त्यांना लुटून नेले होते. सियादतखानाने जनावरे सोडविली आणि हुजूरात आणली. बादशहा म्हणाले. "तुमची सेवा मान्य झाली. त्याची मनसब वाढविण्यास आली.

**(१२ शाबान) दहा डिसेंबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

खजीना आणि काफिला ही हुजुरात आली. मुगलखान, खुशहालबेग, नेकनामखान यानी खजीना आणि काफिला ही आणली. ही मंडळी बादशहाना भेटली. गुजरातचा सुभेदार शहाजादा आजम याला सुबेअजमीरची सुभेदारी पण सांगण्यात आली. आजमच्या तर्फे नायब म्हणून आजमचा मुलगा मुहंमद वालाजाह याने अजमीर येथे काम पहावे अशी आज्ञा झाली. फर्मान वेगैरे पोहोचविण्यासाठी आदलबेग वगैरे

दोन गुर्जबर्दार पाठविण्यात आले. आजम आणि त्याचा मुलगा वालाजाह यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. ख्वाजाखान याचा मुलगा खानख्वाजा याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

कऱ्हाडचा माजी ठाणेदार यासीनखान याला राजगड किल्ल्याच्या पलीकडील ठाण्यावर नेमण्यात आले. बक्षी रुहुल्लाखान याने यासीनखानाला घेऊन जाऊन त्या ठाण्यात कायम करावे. अशी आज्ञा करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, राजा शाहू याने गुलालबारमध्ये उतरत जावे. त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

जुन्नरचा हरकारा गोविंद याला नव्याने मनसब देण्यात आली.

**(१३ शाबान) अकरा डिसेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

दलपतकुंवरचा मुलगा गजपत याने रामगडचा अमीन फौजदार गुलाम मुहंमद कंबू ह्याला ठार मारले होते. त्याला हैद्राबाद सुभ्यातून पकडून आणण्यात आले. त्याला इनायतउल्लाखान दिवाणखालसा याच्यापाशी रुजू करावे, अशी आज्ञा झाली.

काल माळव्यांचा सुभेदार शाइस्ताखान याचा मुलगा अबुलखर हा येऊन बादशहाना भेटला.

**(१४ शाबान) बारा डिसेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते. दुपारचे नमाज झाल्यावर बादशहाने मुगलखान याला हुजुरात बोलाविले आणि त्याच्या योगक्षेमाचा फातिहा पढून हत्तीखाना वगैरे औरंगाबादेकडे पोहोचविण्यासाठी म्हणून त्याला निरोप दिला. हत्तीखान्याचा करोडी (अधिकारी) मोहरमखान यालाही निरोप देण्यात आला.

**(१५ शाबान) तेरा डिसेंबर १७०३**

काल मुनव्वरखान व फतेदौलत कौल हे दोघे बादशहाच्या आज्ञेप्रमाणे सर्फराजखान याच्या तळावर गेले आणि त्याने त्याला बादशहाची पुढील आज्ञा पोहोचविली. "तुम्हाला राजगड किल्ल्याच्या पलीकडे ठाणेदारीवर नेमले आहे तेथे तुम्ही जावे." यावर मुनव्वरखानाने पुढीलप्रमाणे अर्ज लिहून बादशहाकडे पाठविला "सर्फराजखान जाहीर करतो की, मला जागीर नसल्यामुळे माझी आर्थिक दुर्दशा झाली आहे. मला तनखा जहागीर मिळावी. जेथे जाण्याचा हुकूम होईल तेथे मी जाईन."

काल बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. वंझारी यांचे तांडे धान्याच्या गोणी भरून चाकणच्या वाटेने हुजुरांत येत होते. शत्रूंचे (मराठ्यांचे) सैनिक यांनी त्यांची वाट अडविली आहे. चाकणचा

किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान हा त्याच वेळेस जागेवर पोहोचला. त्याने चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य केले आणि धान्याची रसद हुजुरात पाठविली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १४ डिसेंबर इ. स. १७०३ या वर्षातील नोंदी व पुरवणी

### १४ डिसेंबर १७०३

कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याच्या विनंतीप्रमाणे पुढील इसमांना त्याच्यापाशी तैनात करण्यात आले:—

(१) फिरोजखानाचा मुलगा अब्दुल रसूल, (२) नुसरतचा मुलगा सादत्त, (३) आनंदरावचा मुलगा महदा (जी). अमानुल्लाखान याने फैजुल्ला यास पुढे आणले होते. त्याला शंभरची मनसब होती. बादशहाने त्याला बडतर्फ केले. सुभे अहमदाबाद (गुजरात) चा दिवाण, ख्वाजा अब्दुल हमीद याला अब्दुल हमीदखान अशी पदवी देण्यात आली. (रतनपुरच्या लढाईत हा मार खाऊन धनाजी कैदेत सापडला.)

ग्वालेरचा बक्षी आणि वाकेनवीस याने पुढील वस्तू पेशकश म्हणून पाठविल्या. त्याचे नाव इमामकुली होते. चार गालिचे, चार समया, चार मोर्चेल दांड्यासहित (लोखंडाचे पण सोन्याचे पाणी दिलेले.) या वस्तू बादशहाने नजरेखालून घातल्या.

धारूरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले:—

"तेथील (धारूर) किल्लेदार व फौजदार, अन्वरबेगखान याने बंडखोर सिद्दीहसन याच्या गढीला वेढा घातला. रज्जब महिन्याच्या एकोणतीस तारखेस गढी जिंकून घेण्यात आली. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले." मतलबखान व हमीदोद्दीनखान बहादुर हे आज्ञेप्रमाणे मन्सूरखान व यासीनखान यांना राजगड किल्ल्याच्या पलिकडे नेमलेल्या ठाण्यावर कायम करण्यासाठी गेले आहेत.

### वऱ्हाड
### (१६ शाबान) चौदा डिसेंबर १७०३

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली——"शत्रूंचा (मराठ्यांचा) सरदार नेमाजी शिंदे हा चाळीस हजार स्वार व पायदळ सैनिक घेऊन बादशाही मुलुख उध्वस्त करण्यासाठी वऱ्हाडच्या सुभ्यात पोहोचला. वऱ्हाडचा सुभेदार खान फिरोजजंग याच्या तर्फे त्याचा नायब म्हणून (डेप्युटी) रुस्तुमखान विजापुरी हा वऱ्हाडात काम पाहात होता. ही बातमी कळल्यावर तो त्वरेने निघाला. एलिचपूर (अचलपूर) जवळ त्याने शत्रूंशी (मराठ्यांशी) युद्ध केले. या युद्धात उभयपक्षांचे मिळून जवळ जवळ एक हजार स्वार मारले गेले. शेवटी रुस्तुमखान विजापुरी याला भाल्याच्या दोन जखमा झाल्या. तो जमिनीवर कोसळला. शत्रूंनी (मराठ्यांनी) त्याला उचलून नेले." बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

अनुक्रमणिका

(१) रुस्तुमखानाची जहागीर, मनसब ही पूर्वीप्रमाणे चालू राहतील. रुस्तुमखानाचा मुलगा हा गालिबखान याला हुजुरात बोलवण्यात आले. त्याला तीन हजार पाचशे जात आणि तीन हजार स्वार अशी मनसब होती. तीत पाचशे स्वारांची वाढ करण्यात आली. दुसरा मुलगा इलियासखान याला एक हजार जात आणि दोनशे स्वार अशी मनसब होती तीत पाचशे जात आणि तीनशे स्वार अशी वाढ करण्यात आली.

## (१७ शाबान) पंधरा डिसेंबर १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. राव मानसिंग (जाधव शिंदखेडकर) हा मुगलखानाच्या बरोबर येऊन बादशहाना भेटला. त्याने बादशहाना दोन मोहरा नजर केल्या. राव मानसिंग याला दीडहजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब होती. त्यात पाचशे जात आणि दोनशे स्वार अशी वाढ करण्यात आली. तहकरखान, मोहंमद सलाह, मरहुम फीदाईखान (शिवकालीन दक्षिणचा मोगल सुभेदार बहादुरखानाचा भाऊ) ह्याची मुले आणि मीर अस्करी वगैरे दोन जावई ह्याना बादशहानी सुतकातून काढून बोलाविले आणि त्याना योग्य ती बक्षीसे आणि मनसबी दिल्या. महंमद सलाहला खिलातीची वस्त्रे, मीर अस्कलीला मनसबीत वाढ, दुसऱ्या जावयाला बालाबंदचा अलंकार.

मातबरखान (कल्याण-भिवंडीचा प्रशासक) ह्याच्या सैन्यात तैनात असलेला अहमदखान ह्याला आबिदखान ही पदवी देण्यात आली.

बादशाही हरकारा केशवराव हा औरंगाबाद येथे तैनात होता. त्याने पुढील वृत्तांत लिहून पाठविला—"शहाजादा महंमद बेदारबख्त ह्याच्या तोफखान्याचा प्रमुख महंमद बाकर व सैन्यातील जमादार हाज हाजीसियादत व सैय्यद सुजा ह्यांचे मराठ्यांशी युद्ध झाले. हे युद्ध जळगाव जवळ झाले. मराठ्यांचे सैन्य तीन हजार होते. हे सैन्य जोकुवाव खडे (नाव लागत नाही) ह्या मराठा सरदाराकडे होते. ह्या युद्धात मराठ्यांचे अनेक लोक जखमी आणि अनेक लोक ठार झाले. चार जणांची डोकी कापण्यात आली, बारा घोडे लुटीत मिळाले. चार भाले हाती पडले. एक स्वार कैदी सापडला हे सगळे शहाजाद्यांच्या समोर ठेवण्यात आले.

केशवराव हरकारा ह्याच्या लेखावरून कळते की, मुनीमखान (हा पुढे मोगल साम्राज्याचा पंतप्रधान झाला. ह्या वेळी त्याची नेमणूक काबुल सुभ्यावर झाली होती.) हा मोठा काफीला घेऊन औरंगाबादेस शाबान महिन्याच्या पहिल्या तारखेस पोहोचला.

## (१८ शाबान) सोळा डिसेंबर १७०३

आज बादशहानी दिवाणचे काम केले नाही.

## (१९ शाबान) सतरा डिसेंबर १७०३

दिवसाचा एक प्रहर व चार घटिका झाल्या असताना बादशहानी न्याय कचेरीचे काम सुरू केले. राजगड किल्ल्याच्या पलीकडे ठाणी बसवण्याचे काम हमीरुद्दीनखान बहादूर, मतलबखान, करावलबेगी, मनसुरखान, आणि यासिमखान ह्याना सांगण्यात आले होते. आज्ञेप्रमाणे त्यांनी ठाणी बसवली आणि हुजुरात येऊन त्यांनी मुजरे केले.

दिवाणचे काम सुरू करण्यापूर्वी बादशहानी सरफराजखान ह्यास बोलाविले, त्याला काही सूचना दिल्या. त्याला एक ढाल बक्षीस देण्यात आली. त्याला राजगडच्या पलीकडे ठाण्यावर पाठविण्यात आले. हत्तीशाळेचा व्यवस्थापक (दारोगा) हमीरूद्दीनखान बहादूर याने दलदलन उर्फ दलबादल हत्ती बादशाहानी पहाण्यासाठी म्हणून आणला. बादशहाने हत्ती नजरेखालून घातला. बादशहानी हत्तीसाठी म्हणून बक्षीसे दिली आणि सांगितले हत्तीसाठी खैरात करा. हत्ती सोन्यानी सजवला होता आणि नोबतीच्या आवाजात त्याला आणण्यात आले. ह्याच सुमारास बादशहानी चौदा हत्ती नजरेखालून घातले.

दक्षिणच्या सुभ्याचा दिवाण मोतीमद्दखान हा आजारी होता, तो बरा होऊन बादशहाना भेटला. मरहूम इज्ञतुल्लाखान ह्याचा मुलगा आणि रसुलकुर (पुण्याजवळील शिवापूर) चा ठाणेदार मीर हशमतउल्ला हा येऊन बादशहाना भेटला. ह्याची मनसब वाढविण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन मान करण्यात आला.

**(२० शाबान) अठरा डिसेंबर १७०३**

आज दिवाणचे (कचेरी) काम झाले नाही.

**(२१ शाबान) एकोणवीस डिसेंबर १७०३**

आज बादशहानी दिवसाचा एक प्रहर आणि पाच घटिका झाले असता न्याय कचेरीचे काम चालू केले. खवाशानचा दारोगा आणि बक्षी सद्रुद्दीन ह्याचा नायब (डेप्युटी) खानाजादखान ह्याला हिवाळ्याची वस्त्रे खिलात म्हणून देण्यात आली.

हेरांच्या तोंडून समजले की, हणमंतराव वगैरे (मराठे) सरदार हे चौदा हजार स्वारांचे सैन्य घेऊन बादशाही छावणीपासून १४ कोसावर आले आहेत आणि त्यांचा हेतु कुटील आहे. बादशहा म्हणाले—– "बक्षीउरूलाखान आणि हमीदुद्दीनखान बहादूर ह्यांनी तयार व्हावे त्या बंदखोरांच्या (मराठे) पारिपत्यासाठी मी त्यांना पाठवित आहे.

बादशहाना कळविण्यात आले की, खाननुसरद्दजंग (झुल्फीकारखान) हा आज्ञेप्रमाणे आपले सैन्य घेऊन वारसत (बारनेर, पारनेर तर नसेल?) येथे पोहचला असावा. बादशहाने आज्ञा केली "खाननुसरद्दजंगला लिहा—हणमंतराव वगैरे बंडखोर बादशाही छावणीपासून १४ कोसावर आले आहेत. तुम्ही या आणि त्यांचे पारिपत्य करा."

हत्तीशाळेचा फौजदार आणि बहार ह्याचा मुलगा शाहामहंमद ह्याला गजमस्तखान अशी पदवी देण्यात आली. बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली—छावणीचा कोतवाल सरबराहखान ह्याने चारशे

अनुक्रमणिका

बेलदार बरोबर घ्यावे आणि छावणी भोवतालच्या वाटेवर भिंती बांधाव्यात आणि मोर्चे कायम करावे. छावणी भोवतालच्या चौक्याना ताकीद देण्यात यावी की, लाकूडफाटा आणि घास दाणा आणण्यासाठी छावणीतील उंट आणि बैलही कधी वापरण्यात येऊ नयेत.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—अहदीयानचा (शिलेदार) बक्षी नेकनामखान ह्याच्या पथकातील दोनशे स्वार, रायभान ह्याच्या पथकातील दोनशे स्वार, तो तीनशे वेगळे शिलेदार ह्यांनी हत्तीखाना आणि काफीला अहमदनगरपर्यंत पोचवून यावे. इरादतखान ह्याने ह्या मंडळींना पाठवावे. चाकणचा फौजदार आमानुल्लाखान हा धान्याची रसद हुजुरात घेऊन येत आहे. त्यानेही काफील्याबरोबर अहमदनगरपर्यंत जावे.

खानफीरोजजंग ह्याच्या सैन्यात तैनात असलेला कृष्णाजी ह्याचा मुलगा त्र्यंबकजी हा मध्यंतरी फरारी झाला होता. (नोकरी सोडून गेला होता) त्याला कामावर बहाल करण्यात आले (घेण्यात आले) आणि त्याची मनसब बहाल करण्यात आली (कामावर परत आलेला दिसतो.)

## (२२ शाबान) वीस डिसेंबर १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटका झाल्या असता न्याय कचेरी सुरू केली. गालीफखान वगैरे ८ हजार स्वार खान फीरोजजंग ह्याच्या सैन्यात तैनात होते. त्यांना बादशहाने बोलावले होते. बादशहाने तो आदेश रद्द केला. बादशहानी आज्ञा केली कीं, ऐवजबेखान गुर्जबर्दार हा गालीबखानाचे पथक घेऊन येण्यासाठी गेला होता. त्याने तसे न करता खान फीरोजजंग हा देईल ही रसद त्याने आपल्याबरोबर आणली.

मीरहमजा ह्याला कळंब सरकारचा (वऱ्हाड) वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

काल शहाजादा कामबक्ष याने बादशहाना सांगितले की, मुफ्तखरखानाचा मुलगा अझीझुल्ला ह्याला जहागिरी न मिळाल्यामुळे तो आर्थिक दुर्दशेत आहे. बादशहानी त्याला नऊ अश्रफ्या, काही सोने व चांदी ही बक्षीस म्हणून दिली आणि त्याला काही मनसबी आणि काही नगदी द्यावी अशी आज्ञा केली.

## (२३ शाबान) एकवीस डिसेंबर १७०३

आज दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटका झाल्या असता बादशहा तख्तेरवांवर (वाहून नेण्याचे सिंहासन) बसले आणि राजगड किल्यासमोरील मोर्चे पाहाण्यासाठी निघाले. त्यांनी मनसूरखानाच्या तंबूजवळ ज्यास्तीची माणसे ठेवली आणि डोंगराच्या पायथ्याशी जाऊन मोर्च्यांची पाहणी केली. मोर्च्यांचा प्रमुख तर्बियतखान ह्याने तोफा व रेहकले (लहान तोफा) सर केले (उडवले) ते किल्ल्याच्या दिशेने उडविण्यात आले. किल्ल्यातील लोकांनीही तोफा चालविल्या. त्यानंतर बादशहाची स्वारी परत फिरली. परत फिरतेवेळी किल्ल्यातील शत्रूंनी पुन्हा तोफा चालविल्या. बादशहाचे येण्या-जाण्याचे अंतर पावणेदोन कोसाचे होते. बादशहा दुपारच्यावेळी आपल्या निवासस्थानात दाखल झाले. खालील मंडळींनी बादशहाना नजराणे अर्पण केले:—

(पेशकश) (१) फजले आलीखान ह्याचा मुलगा फजलेअली; (२) दीलेर हींमत, (३) अजमत कराबल, (४) अब्दुल वाहीद, (५) रुस्तुमबहादूर.

मरहूम मुर्तजाखान ह्याचा मुलगा सय्यद मुस्तफा हा शाहजादा मुईजुद्दीन (मुलतानचा सुभेदार) ह्याच्या फौजेत तैनात होता. त्याला बादशहानी आपल्या स्वतःच्या छावणीत बोलावणे पाठिविले.

सर्फराजखान ह्याची नेमणूक राजगड किल्ल्याच्या पलीकडील ठाण्यावर करण्यात आली होती. तो त्या ठाण्यावर गेला नाही. बादशहाने त्याला मनसबीवरून बडतर्फ केले. त्याच्या जागी त्या ठाण्यावर आमानुल्लाखान ह्याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, हमीरुद्दीनखान बहादूर ह्याने जाऊन अमानुल्लाखान ह्यास नेमलेल्या ठाण्यावर बसवून यावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली की—बाकरखान तनबक्षी (अहबी ह्यांचा समशीरबेग, बसईद आणि रायभान ह्यांचे स्वार) ह्यांनी मोगल खानाच्यापाशी जावे आणि काफीला अहमदनगरपर्यंत पोचवावा आणि परत यावे.

बादशहाने आज्ञा केली की, चाकणचा किल्लेदार आमानुल्लाखान त्याचा नायब (डेप्युटी) म्हणून त्याचा भाऊ आताउल्लाखान याने चाकणला जाऊन काम पाहावे.

## (२४ शाबान) बावीस डिसेंबर १७०३

राजगड किल्ल्याच्या पलीकडे असलेल्या ठाण्यावरील ठाणेदार यासीनखान ह्यास आज्ञा करण्यात आली की, "तुम्ही आपले पथक ठेऊन हुजुरात यावे. बादशहाची ही आज्ञा बक्षी नुलारखान ह्यांच्या शिक्क्यानीच पाठविण्यात यावी."

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली (मराठा) "सरदार हणमंतराव ह्याला बातमी कळली की, झुल्फीकारखान बहादूर नुसरतजंग हा धान्याची रसद घेऊन हुजुरात जात आहे. हे ऐकून हणमंतराव हा पळून सालप्याचा घाट आणि शिकारपूरचा भाग ह्या दिशेने निघून गेला. काल बादशहाने आज्ञा केली की, पूर्वीप्रमाणे जुना गंज (बाजार) पुढे चालू ठेवावा व नवीन गंज रद्द करावा.

## (२५ शाबान) तेवीस डिसेंबर १७०३

आज दिवाणचे (कचेरीचे) काम झाले नाही. खान बहादूर नुस्रतजंग याने पुढीलप्रमाणे पत्र लिहून पाठविले (झुल्फीकारखान) – "बंडखोर (मराठे) ह्यांचे पारिपत्य करून धान्याची रसद घेऊन मी बादशाही छावणीपासून चार कोसावर आलो आहे. आपल्या हुजुरात येण्यासंबंधी काय आज्ञा" बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—बंडखोर (मराठे) सर्वत्र पसरले आहेत. तुम्ही जाऊन त्यांचे पारिपत्य करा आणि गुलबर्गा भागातून रसद बादशाही छावणीसाठी येत आहे ती हुजुरात पाठवा.

## (२६ शाबान) चोवीस डिसेंबर १७०३

अनुक्रमणिका

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटका झाल्या असता बादशहाने न्यायकचेरीचे काम सुरू केले. राजगड किल्ल्याच्या पलीकडच्या किल्याचा ठाणेदार यासिनखान हा आज्ञेप्रमाणे हुजुरात येऊन बादशहास भेटला. त्याने पाच मोहरा निसार (ओवाळणी) म्हणून पेश केल्या. आज्ञेप्रमाणे तो न्यायकचेरीत आला आणि कठड्याच्या आत उभे राहून त्याने मुजरे केले.

सुभे खानदेश येथील जिझीया कर वसूल करणारा अमीन (अधिकारी) शरीफखानाचा मुलगा फसिउद्दीन हा होता. त्याला तेथून बदलण्यात आले होते. तो येऊन बादशहाना भेटला आणि त्याने बादशहांना एक पुस्तक भेट म्हणून अर्पण केले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

पुणे विभागाचा ठाणेदार शिवसिंग ह्याने विनंती पत्र लिहून पुढील दोन मागण्या केल्याः—

(१) "बादशाही छावणीचा कोतवाल सरबराहखान ह्याच्यातर्फे शेख मोहमद हा येथे असून ह्या भागातील प्रजेला फार सतावीत आहे." बादशहानी आज्ञा केली की, सरबराहखानाने शेख मोहमदला बोलावून घ्यावे;

(२) "दोनशे बेलदार आणि २९ कामगार ह्यांना खडकवासल्याची गढी बांधण्यासाठी तैनात करण्यात यावी." बादशहाने आज्ञा केली की, हमीउद्दीनखान बहादूर यानी हे काम करावे. मरहूम तरीनखान ह्याचे नातू, शुजात वगैरे हे यार अलीबेगच्या मध्यस्थीने बादशहाच्या हुजुरात आले. त्यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

राजगडच्या परिसरात असलेला ठाणेदार मनसूरखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले— "ठाण्यातील लोकांचे रक्षण होणे आवश्यक आहे. गढी तयार करण्यासाठी लागणारे सामान अजून हाती लागले नाही. माणसासाठी काही शिधा (माणशी पावशेर साखर असा वाक्यांचा अर्थ दिसतो) मुकरर करावा आणि अंमलबजावणीचा एक अधिकारी माझ्याजवळ नेमण्यात यावा. बादशहा म्हणाले योजना चांगली आहे. पूर्वी अशी योजना केली होती पण अंमलात आली नाही. दोनशे बेलदार आणि अधिकारी पाठविण्यात यावेत.

### (२७ शाबान) पंचेवीस डिसेंबर १७०३

आज दिवाण (कचेरीत) काम झाले नाही. चीन कुलीजखान (भावी निजामउल्मुल्क) ह्याच्या सैन्यात तैनात असलेला हमीदउद्दीनखान ह्याला बादशहाने बोलावू पाठवले होते. पण नंतर कुलीजखानाच्या सांगण्यावरून ही आज्ञा रद्द करण्यात आली.

### (२८ शाबान) सव्वीस डिसेंबर १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटका झाल्या असता बादशहाने न्यायकचेरी सुरू केली. चांदूरच्या किल्ल्यावर महंमद बाकर हा किल्लेदार होता. त्याच्या जागेवर (हा चांदवड असावा) अबूलबरकातखान ह्याची नेमणूक करण्यात आली. हकीममुल्क (राजवैद्य) ह्याच्या आप्तापैकी मोहमद अश्रफ हा नुकताच मध्य

आशियाहून आला होता. त्याला खिलातीची (मानसन्मान) वस्त्रे देण्यात आली. राजगड किल्यासमोरील मोर्च्यात तर्बियतखानाकडे तोफा पोचवण्याचे काम रादअंदाजखान मिगबाशी ह्याजकडे देण्यात आले. अजमिरचा सुभेदार हसनअल्लीखान (भावी कालातील सैय्यद बंधूपैकी) ह्याला तेथून बदलण्यात आले. त्याची नेमणूक मांडू (मांडवगड) येथे करण्यात आली. मांडवगडचा पूर्वीचा फौजदार नवाजीतखान ह्याला शहाजादा बेदारबख्त ह्याच्या सैन्यामध्ये तैनात करण्यात आले. नेवात (दिल्लीजवळ) येथील फौजदार शुकरुल्लाखान याने आक्राम आणि इस्फींदीयात या दोन भावांची (बंडखोर) डोकी कापली होती ती बादशहाकडे पाठविण्यात आली. ती डोकी बादशहाने नजरेखालून घातली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली "दंडराजपुरीचा किल्लेदार सिद्दी याकूबखान ह्याला लिहा." त्याने आपला मुलगा सिद्दीअंबर ह्याच्या बरोबर शे-दोनशे स्वार आणि पाचशे पायदळ देऊन हुजुरात पाठवावे. खानजमानफत्तेजंग (संभीजीराजांना पकडणारा शेख निझाम मुकरबखान तो हाच) ह्याचा मुलगा अब्दुलकादर ह्याने विनंती केली की, "माझ्या मोठ्या भावाला आपल्या हुजुरात येण्याची माफी आहे. तशी माफी मला पण असावी."

विजापूर सुभ्याचा सुभेदार चीन कुलीजखान भावी निजामउल्मुल्क हा होता. तळकोकणाची फौजदारी व बेळगांव जिल्ह्याची फौजदारी व संपगावची ठाणेदारी ह्या तीनही जागा सैय्यदखानाकडे होत्या. बादशहानी त्या तीनही जागेवरून सैयदखानाला बदलले आणि ह्या तीनही जागावर विजापूरचा सूभेदार चिनकुलीजखान ह्याची नेमणूक केली. चिनकुलीजखानाच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

सैय्यदखानाला हुजुरात बोलावण्यात आले. तळकोकणवर चिनकुलीजखान त्याचा नायक फौजदार म्हणून त्यांच्यात सैन्यातील निसारखानाची नेमणूक करण्यात आली.

औरंगाबादचा कोतवाल आणि फौजदार रबीखान ह्याला बऱ्हाणपूरच्या कोतवाली आणि फौजदारीचे काम देण्यात आले.

बेनीशहादूर्ग (पन्हाळगड) चा किल्लेदार आणि फौजदार रावतमल ह्याच्याकडे बेळगाव आणि नरगाव (?) च्या ठाणेंदाऱ्या देण्यात आल्या. रावतमलची मनसब वाढविण्यात आली. त्याशिवाय बादशहानी बऱ्याच लोकांच्या मनसबी वाढविल्या. त्यात दोन नावे पुढीलप्रमाणे आहेत——कन्नूराव हरकाशी, औरंगाबाद आणि दुसरा त्याचा चुलतभाऊ रामचंद्र केशव.

### (२९ शाबान) सत्तावीस डिसेंबर १७०३

आज दिवाणचे (कचेरी) काम बंद होते. संध्याकाळच्या नमाजच्या वेळी शहाजादा कामबक्ष ह्याने बादशहाच्या राज्यकारभाराच्या ४८ व्या वर्षाच्या सुरवातीच्या प्रतिपदेच्या चंद्रोदयाच्या निमित्ताने अभिनंदन केले आणि मुजरे केले.

### अठ्ठेचाळीसाव्या वर्षाची कारकीर्द सुरू
### (१ रमजान) अठ्ठावीस डिसेंबर १७०३

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाचा मुलगा आणि गुजराथचा सुभेदार बादशहाजादा मुहंमद आजम आणि आजमचा मुलगा आणि औरंगाबाद वगैरेचा सुभेदार यांची रमजानच्या निमित्ताने अभिनंदनपर पत्रे, त्यांचा वकील सुल्ताननजर याने बादशहासमोर ठेवली. ती त्याने नजरेखालून घातली. मांडवगडचा फौजदार व किल्लेदार हसनअलीखान ह्याची मनसब वाढविण्यात आली. जाफरबेग वगैरे माणसे मध्य आशियातून आली होती, त्यांना मनसब देण्यात आल्या. मरहूम शरीफखानाचा मुलगा मीर फसीउद्दीन याला राजगड किल्ल्यासमोरील मन्सूरखानाच्या ठाण्याचा वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

पट्टा (विश्रामगड किल्ला, जिल्हा नगर) येथील किल्लेदार आणि फौजदार याने पाठविलेला विनंती अर्ज, बादशहाने नजरेखालून घातला.

मोतिमदखान दखनी याला रमजान महिन्यापुरती चौकी पहाऱ्यावरची कामगिरी माफ करण्यात आली.

## (२ रमजान) एकोणतीस डिसेंबर १७०३

(राजे) शाहू यांचा पुतण्या मानसिंग याला बादशहाने कृपाळू होऊन खिलातीची वस्त्रे दिली [हे नाव नवीनच पुढे येत आहे. हा मानसिंग कोण? कां? बिरादर म्हणजे भाऊ या ऐवजी बिरादर जादा म्हणजे पुतण्या हा शब्द दैनंदिनी लेखकाने चुकून दिला असेल काय? मराठी कागद पत्रांवरून शोध व्हावा].

मलूकचंद राकर हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली व त्याचे नाव अबदुल्ला ठेवण्यात आले.

औरंगाबाद येथे असलेला बादशाही हरकारा केशव राय याच्या लिहिण्यावरून पुढील गोष्टी कळल्या.

मुक्तारखानाचा मुलगा इफ्तिकारखान हा काफिला घेऊन औरंगाबादेत दाखल झाला. काल तो शाहजादा बेदारबख्त याच्या हुजुरात गेला. त्याने एक धर्मग्रंथ बेदारबख्ताला अर्पण केला. शहाजाद्याने त्याला खिलातीची वस्त्रे दिली.

अमीरउल्उमरा (असद्खान) बक्षी रुहुल्लाखान, मतलबखान, हमीदोद्दीनखान बहादूर वगैरे श्रेष्ठ अमीरांनी बादशहाच्या कारकीर्दीचे अठ्ठेचाळीसावे वर्ष सुरू झाले म्हणून त्याचे अभिनंदन केले व मुजरे केले.

रणथंबोरच्या किल्लेदारीवर आणि सिरपूर वगैरेच्या फौजदारीवर हातिमखान हा होता. त्याला बदलून बादशहाने गुजरात सुभ्यातील मुहंमदबेगखान याची नेमणूक केली.

खानदेशच्या सुभ्यावर बऱ्हाणपूर येथे सुभेदार शहाजादा बेदारबख्त याचा नायब (डेप्युटी) म्हणून अलीमर्दानखान हा काम पाहत होता. त्याच्या जागेवर बेदारबख्ताच्या सरकारातील दिवाण मीर अहमदखान याची बऱ्हाणपूर येथे नेमणूक करण्यात आली. हा हुद्दा त्याच्या दिवाण ह्या हुद्याला जोडून

होता. धान्याची रसद आणण्यासाठी इज्ज़तबेग गुर्जबर्दार यास अहमदनगरकडे पाठविण्यात आले. बादशहाने त्याला निरोप दिला.

## पुरवणी

[**टीप**.——हस्तलिखितातील पानावर यापुढेही इ. स. १७०३ च्या बऱ्याच नोंदी आढळतात. त्या जश्या आढळल्या त्या क्रमाने पुढे देत आहे. वाचकांनी मागील पानावरील १७०३ च्या नोंदी पाहताना पुढील नोंदी आणि त्यांच्या तारखा यांजकडे काळजीपूर्वक लक्ष द्यावे.]

### (६ रमजान) वर्ष ४७; १३ जानेवारी १७०३

आज बादशहाने दिवाण बंद ठेवले. दुपारच्या नमाजनंतर त्याने न्याय कचेरी केली. गुलबर्ग्याचा किल्लेदार आणि फौजदार इरादतखान याच्याकडे बादशाही छावणीपासून पुण्यापर्यंतच्या मार्गाच्या रक्षणाचे म्हणजे राहदारीचे काम देण्यात आले होते. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. त्याच्या मनसबीत ही सूट देण्यात आली.

बंगारपुरचा (बंकापू तर नव्हे?) बदललेला फौजदार हुजुरात होता. त्याची मनसब कमी केली होती ती बहाल करण्यात आली.

इनायतखानाचा मुलगा जियाऊल्ला याने विनंती केली की, गेल्यावर्षी रमजानमध्ये मला चौकी पहाऱ्याचे काम माफ करण्यात आले होते. यंदाही तसेच करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

वऱ्हाडकडून आलेल्या बातम्यावरून कळले की, अलीमर्दानखान ह्याच्या सैन्यात तैनात असलेला मुहमंद जाफर हा मरण पावला आहे.

तरबिअतखान (तोफखान्याचा प्रमुख) याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठवला कान्होजी सातशे जात व चारशे स्वार असलेला मनसबदार, शिवाजी सत्तर आणि पांच पांच आणि सत्तर स्वार, असा पाच मनसबदार व बाळाजी दोनशे जात चाळीस स्वार, ही मंडळी बडतर्फ झाली होती. ती बहाल करण्यात यावी. बादशहाने मान्य करून व बक्षींनी ते प्रकरण आपल्यापुढे मांडावे अशी आज्ञा केली."

बादशहाने आज्ञा केली की, दोन गुर्जबदरि नेमा आणि तोफा ओढून आणण्यासाठी एक हजार मोहरा द्या. ही रक्कम मुगलखानापाशी पोहचावी. ब्रम्हपुरीच्या तळावरून आणि अहमदनगरहून तोफा हुजुरात आणाव्यात. त्या आणताना त्यांच्याबरोबर संरक्षक पथके द्यावी.

### (७ रमजान) चवदा जानेवारी, १७०३

बादशहाने दोन्ही दिवाण बंद ठेवले. बक्षी रुहुल्लाखान याने आज्ञेप्रमाणे बादशहापाशी बऱ्हाणपुरचा सुभेदार आणि बागलाण्याचा फौजदार याची मनसब व हुद्दे याची हकीकत कळविली.

अनुक्रमणिका

बादशहाने त्यात पाचशे जात अशी भर घातली. बादशहाने मतलबखान करावल बेगी यास म्हटले—"इरादतखान याची नेमणूक बादशाही छावणीपासून पुण्यापर्यंतच्या मार्गाच्या ठाणेदारीत व राहदारीवर करण्यात आली आहे. तुम्ही जाऊन त्याला त्याच्या ठाण्यावर कायम करून या."

तरबियतखानाने कोंडाणा किल्ल्याच्या मोर्चावरून पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठवला.—

"अमानुल्लाखान येऊन मला म्हणाला की, दौलतमंदखानाची पथके शिवापुरीच्या ठाण्यांत आहेत. पण मला त्यांची खात्री वाटत नाही. आपली काय आज्ञा आहे. यावर बादशहाने ते ठाणे पण अमानुल्लाखानाच्या ताब्यात दिले."

रायबाग आणि हुकेरी येथील फौजदार आणि अमीन मुहमंद अश्रफ याला तेथून बदलण्यात आले होते. पण आता बादशहाने तेथीलच किल्लेदारी व अमीनी दिली आणि त्याची मनसब पूर्वीप्रमाणे बहाल ठेवली. शम्शुद्दीन मुहमंदखान, मरहूम (मिरजेच्या लढ्यात मारला गेलेला) याचा भाचा मीर हाशिम हा मुधोळ येथे फौजदार होता. त्याच्या मनसबीत सूट देण्यात आली. गुलाम मुहंमद हा इंदूरबोधन (आजचे निजामाबाद आन्ध्र) व बोमगल येथे फौजदार होता. तो वारला त्याच्या जागी ख्वाजा मोमीन याची नेमणूक करण्यात आली. इज्ञतखानाच्या वकीलाने विनंती केली की, दिवाणानी जागीर बदलून इज्ञत खानाच्या ऐवजी दुसऱ्या माणसाला तनखा देण्यास सुरूवात केली आहे. आपली जुनी जहागीर कायम राहावी अशी त्याची विनंती आहे. बादशहाने जागीर व मनसब या दोन्ही बहाल केल्या.

वसंतगड उर्फ किलीदफतह या किल्यावर लालराम हा किल्लेदार होता. बादशहाने त्याला तेथून बदलला. त्या किल्यावर बलराम याची नेमणूक करण्यात आली. बलराम हा खान फिरोजजंग याच्या सैन्यात तैनात होता. त्याला तेथून काढून वसंतगड किल्यावर पोहोचविण्यासाठी एक गुर्जबर्दार नेमण्यात आला. पूर्वीच्या किल्लेदाराला हुजुरात आणण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**पंधरा जानेवारी १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे बक्षी रुहुल्लाखान आणि मतलबखान हे दोघे कोंडाणा किल्ल्याच्या समोरील मोर्चात असलेल्या सरदारखानाचे ठाणे पाहण्यास गेले. ते रात्री तेथेच राहिले.

**सोळा जानवारी १७०३**

कोंडाण्याच्या पायथ्यापाशी मुहमंद जमान हा गोळी लागून ठार झाला. हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान पन्नी याने विनंती अर्ज लिहून पाठविला की, येथे तैनात असलेले बाचमदबाई (नाव लागत नाही) वगैरनी वेल्लोरचा किल्ला फत्ते केला. त्या प्रकरणात मोठी कामगिरी बजावली. बादशहाने त्याची मनसब वाढविली. हुमायू कुली बेग याचीही मनसब वाढविण्यांत आली. त्याप्रमाणे सय्यदहसन अल्लाऊद्दीन, मंजूरबेग, शेखबहादूर इत्यादीच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

**सात मे १७०३**

अनुक्रमणिका

दौलतमंदखान, त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली आणि त्याला चाकणचा किल्लेदार व फौजदार कामयाबखान याच्याबरोबर पाठविण्यात आले.

चौल बंदरचा मुत्सद्दी (कारभारी) शेख मुहंमद यास मोमीनखान अशी पदवी देण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, बादशाही छावणीत चोऱ्या फार होत आहेत. बादशहा हमीदोद्दीनखान बहादूर याला म्हणाले——“तुम्ही व छावणीचा कोतवाल सरबराहखान यांनी जावे आणि सर्व पथकांना शिस्तवार उभे करून छावणी भोवती काटेरी कुंपणे घालावी”. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे करण्यात आले. यापूर्वी अमानुल्लाखान यास आज्ञा करण्यात आली होती की, त्याने शिवापूरचा घाट नीट करण्यासाठी जावे. आता आज्ञा झाली की, त्याच्याऐवजी, अताउल्लाखान याने जावे. मतलबखान याने विनंती केली की, मावळ्यांचा दारोगा (अधिकारी) अबदुलकरीम याच्या मनसबीत दहा स्वारानी वाढ करण्यात आली. पण हा हुकूम (परवाना) मन्सूरखान्याच्या शिक्क्यानिशी आहे. तर रजिस्टर (सिया हा) मध्ये नोंद करावयाची काय? बादशहाने आज्ञा केली की, दहा स्वाराच्या वाढीची नोंद करा. हत्तीशाळेचा करोडी म्हणून, मिर्जाबेगच्या ऐवजी खाजाअरब याची नेमणूक करण्यात आली.

शाहजादे मुहंमद बेदारबख्त, मुहंमद मुईजोद्दीन व मुहंमद अजीम (औरंगजेबाचे नातू, बेदारबख्त, औरंगाबादेचा सुभेदार आणि आजमचा मुलगा. मुइजोद्दीन मुअज्ज़मचा मुलगा आणि मुल्तानचा सुभेदार, अजीम मुअज्ज़मचा मुलगा आणि बंगालचा सुभेदार) यांची पत्रे आली ती बादशहाचे नजरेखालून घातली.

मन्सूरखानाचा मुलगा आतिशखान याला कोला (कोणत स्थळ असावे समजत नाही.) येथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली. धनाजी जाधव याने गुलबर्ग्याच्या भोवतालचा प्रदेश लुटला. तेथून तो भीमेच्या काठावरील अकलूज येथे पोहोचला. मराठ्यांना ही बातमी लागली. ते धनाजीला जाऊन मिळण्यासाठी जात आहोत. धनाजी जाधवच्या सैन्यात पंधरा हजार स्वार आहेत. त्याचा (धनाजी) हेतू ह्या सैन्याच्याद्वारे धामधूम करावी असे आहेत.

अमीरउल्उमरा (असद्खान) मुजऱ्यासाठी आला. न्याय कचेरी सुरू होण्यापूर्वी बादशहाने त्याला परत जाण्यासाठी निरोप दिला. पुढीलप्रमाणे ठाणी आणि ठाणेदार या नेमणुका झाल्या:—

(१) जाबिताखान, ठाणेदार कोयंदा (?)

(२) अमानुल्लाखान, ठाणेदार कानकी (?)

(३) अबदुल रसूलखान, ठाणेदार——मानदन (?)

**आठ मे १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

**नऊ मे १७०३**

आज दिवाणचे काम बंद.

दिवाणेखासचा दारोगा (व्यवस्थापक) हमीदोद्दीनखान बहाद्दर हा बादशहाच्या आज्ञेने तरबियतखानाच्या डेऱ्यावर गेला. त्याने तरबियतखानाला बादशहाच्या विश्रांतीगृहात हुजूरात आणले. तरबिअतखानाने बादशहाना पांच मोहरा निसार (ओवाळणी) म्हणून दिल्या. बादशहाने त्याच्यावर कृपाकरून त्याला पाचशे रुपये किंमतीचा कमरबंद (शेला, पट्टा) दिला आणि त्याला आपल्या तंबूकडे परत जाण्यात निरोप दिला.

कऱ्हाडचा ठाणेदार यासीनखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठवला—“बहमनवाडीचा ठाणेदार मुहंमद वजीर हा रयतेवर जुलूम करीत आहे. तेथील ठाणेदारीवर आपला भाचा व सय्यद इब्राहिमचा मुलगा मुहंमद हुसेन याची नेमणूक करण्यात आली तर ठाण्याचा बंदोबस्त योग्यप्रकारे होऊ शकेल” बादशहाने विनंती मान्य केली.

बादशाही छावणीचा काजी अकरमखान याचा मुलगा सईद्योद्दीन याची मनसब वाढविण्यात आली.

सखरलना (विशाळगड) येथे तैनात असलेल्या हरकाऱ्याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले— “बंडखोरांचा (मराठ्यांचा) सरदार कान्होजी (आंग्रे?) याने फिरंगी लोकांचे एक जहाज, चार लाख रुपये मालमत्तेचे संपूर्णपणे लुटले.

**शाहूला मुसलमान करण्याचे प्रयत्न**

बादशहानी हमीदोद्दीनखान बहादूर यांस पुढीलप्रमाणे आज्ञा केली—“संभा (जी) चा मुलगा राजा शाहू हा गुलालबागमध्ये कैद आहे, त्याला बोलवा, आणि त्याला म्हणा की, तू मुसलमान हो.” त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान शाहूला बोलला—परंतु, शाहूने ते मान्य केले नाही. हमीदोद्दीनखान याने ही बातमी बादशहाला कळवली. बादशहाने आज्ञा केली की, शाहूवर (कडक) नजर ठेवा.

हरकऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली—“बंडखोर (मराठे) यांनी बारशीगाव लुटले. तेथे असलेल्या बादशाही खजिन्यातील चाळीस हजार रुपये त्याने लुटून नेले. त्या शिवाय त्यानी तेथील देशमुख आणि देशपांडे यांना कैद करून आपल्या बरोबर नेले. गाजिउद्दीनखान बहादुर (फिरोजजंग, भावी निजामउलमुल्काचा बाप) हा बारशी पासून सोळा कोसावर होता. त्याने मराठ्यांच्या पारिपत्यासाठी पथके पाठविली.

बादशहाच्या आज्ञेने हमीदोद्दीनखान बहादूर आणि मुहंमद अमीनखान बहादूर हे दोघे अमीरउल् उमरा (असदखान, मुख्यप्रधान) यांच्या तळावर गेले आणि त्याला घेऊन ते बादशहाकडे बादशहाच्या विश्रांतीगृहात आले. बादशहाने त्याला म्हटले “तुमचा मुलगा मुहंमद इसहाक उर्फ इनायतखान हा शहाजानाबाद येथे दहा हजार रुपये वर्षासन घेऊन राहात होता तो वारला. परमेश्वराच्या इच्छेसमोर

कुणाचाही इलाज चालत नाही. सर्वांची हीच स्थिती आहे." यानंतर असदखानाला खिलातीची शोकवस्त्रे आणि एक शिरपेचही देऊन बादशहाने त्याला आपल्या डेऱ्याकडे जाण्यास निरोप दिला. असदखानाचे भोजन व इतर खाद्य पेये ही बादशाही मुदपाकखान्यातून पाठविण्यात यावी अशी हकीम सादिकखान याला आज्ञा करण्यात आली.

बक्षी रुहुल्लाखान याला बादशहाने आज्ञा केली—"तुम्हाला कही (घासदाणा आणि रसद) घेऊन येण्यासाठी मी पाठवीत आहे. तुम्ही सात हजार आठशे स्वारांचे सैन्य बरोबर घेऊन जाण्यासाठी तयार करा.

फत्तेउल्लाखान बहादूर याच्या वकीलाने विनंती केली की, फत्तेउल्लाखान (विशाळगडच्या वेढ्यात याने बरीच मेहेनत केली) हे आज्ञेप्रमाणे बादशाही छावणी नजीक आले आहेत. त्यांना छावणीत येण्याचे परवानगी पत्र मिळावे.

सुभे वऱ्हाडात तैनात असलेला हरकारा याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"(मराठ्यांचा) सदरदारशाजी (शहाजी असू शकेल) हा तीन हजार स्वारांचे सैन्य घेऊन आला. त्याने या जिल्ह्यातील परगणे उध्वस्त केले. तो एलिचपूर जवळ (अचलपूर) आला. वऱ्हाडचा सुभेदारखान फिरोजजंग याच्या तर्फे नायब म्हणून (डेप्युटी) तीरअंदाजखान हा काम पहात होता. त्याने आपला मुलगा मीरकखान याला आघाडीवर पाठविले व स्वताः त्याच्या मागोमाग निघाला. युद्ध झाले. बादशहाच्या कृपेमुळे शत्रूंपैकी अनेकजण मारले गेले व अनेक जखमी झाले. आपल्या सैन्यात ही माणसे कामी आली. शत्रूचा पराजय झाला. मोठा विजय मिळाला. बादशहा म्हणाले" सेवेचा मजुरा झाला, सेवा मान्य झाली.

**दहा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि तीन घटका झाल्या असता बादशहा न्याय कचेरीत आले (आदालत) फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीर शाही हा बंडखोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी बिकापूर (?) वगैरे भागात गेला होता. तो बादशहाच्या आज्ञेप्रमाणे येऊन भेटला. त्याने निसार (ओवाळणी) म्हणून पाच मोहरा अर्पण केल्या. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे दिली. बादशहा त्याला म्हणाले—"तुम्ही राजगड व तोरणा ह्या भागात जा आणि मोर्च्यासाठी जागा पाहून या." पावसाळ्याचे दिवस (जवळ आलेले) ह्या साठी चंदनवंदन किल्ल्याला त्याने वेढा घातला होता, तो वेढा चालवणार होता. फत्तेउल्लाहाच्या पुढील मंडळींनी बादशाहाची भेट घेऊन त्यांना निसार दिल्या. निहदीखानाचा मुलगा मिर्झा महमद, इज्ज़तखान (?) सय्यद मिर्झा महमद.

झुल्फीकारखानाच्या छावनीत तैनात असलेला रामसिंग हाडा (ईश्वरसिंगचा मुलगा) याने बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्ते झाल्याबद्दल पन्नास मोहरा पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

चाकणचा किल्लेदार व फौजदार कामीयानखान ह्याने (आपला भाऊ) तर्बियतखान ह्याच्याद्वारे विनंती अर्ज पाठविला की, "मी येथे पोहोचलो असून येथे सावधगिरी बाळगित आहे.

बादशहानेह मीउद्दीनखान बहादूर आणि छावणीचा कोतवाल सरबराहखान ह्याला आज्ञा केली की, छावणीच्या भोवती बंदुकची तैनात करावेत. हमीरूद्दीनखान बहाद्दर ह्याने विनंती केली की, तळावरून (बम्हपुरीच्या) बंदुकी येईपर्यंत बादशाहाच्या तैनातीत असलेले एक हजार बंदुकधारी तैनात व्हावेत. बादशाहाने विनंती मान्य केली. बादशहांना कळविण्यात आले कीं, रुहुल्लाखान हा आज कही (घासदाणा) आणण्यास गेला आहे.

अबदुलरसुलखान हा छावणी भोवतीच्या मानमोर्द (?) येथे ठाणेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले आणि त्याला गडनमुना (कर्डेनिमुने) येथील ठाणेदारीवर नेमण्यात आले. कर्डेनिमुनीवर पूर्वी निझामराव हा ठाणेदार होता त्याला तेथून बदलण्यात आले. अबदुलरसुलच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, एक आधिकारी नेमण्यात यावा. चाकणचा किल्लेदार जानबाझखान ह्याची नेमणूक बक्षिंदाबक्ष (सिंहगड) येथे करण्यात आली आहे, तर सदर आधिकाऱ्याने चाकणला जाऊन जाहबाझखानाला हुजुरात घेऊन यावे.

**अकरा मे १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद होते. आज बादशहानी तोफखान्याचा प्रमुख तर्बियतखान याला बोलावून पुढीलप्रमाणे आज्ञा केली––"तुम्ही ज्युम्लतुल्मुल्क (देशाचा कारभार पहाणारा असदखान मुख्य प्रधान ) ह्यांना सांगा ह्यापुढे सरकारी कागदपत्रावर तुम्ही आपली दिवाणीची मोहोर जेथे आवश्यक असेल तेथे कामाला लावा, काम चालू ठेवा," त्याप्रमाणे तर्बियतखानानी केले आणि परत येऊन बादशहास कळविले की, मुख्यप्रधान हे आज्ञेप्रमाणे दिवाणी कागदावर शिक्के करीत आहे आणि विनंती करीत आहेत की, बादशहाची आज्ञापालन करण्यास त्यांना कोणत्याही प्रकारची हरकत नाही.

**बारा मे १७०३**

आज बादशहाने दिवाण बंद ठेवले, पण दुपारनंतर (नमाजानंतर) न्याय कचेरी केली.

कल्याण-भिवंडीचा वगैरेचा ठाणेदार मातबरखान ह्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला— "मोपत (किल्ल्याचे नाव लागत नाही) चा किल्लेदार हादीकुली ह्याला किल्ल्याचा बंदोबस्त राखता येत नाही. तो नेहमी दारूच्या धुंदीत असतो आणि रयतेवर जुलूम करीत असतो. मी, अनेकवेळा त्याला सांगून पाठविले की, किल्ल्याबद्दल खबरदारी बाळगावी पण तो मनावरच घेत नाही. विनंती अशी की, अब्दुल रहीमचा मुलगा आणि उदबेदखान ह्याचा भाचा रहीमान दाऊद ह्याला हादीकुलीच्या जागी नेमण्यात यावे. रहीमान दाऊद हा सध्या लोळा (?) किल्ल्याचा किल्लेदार आहे. लोळा किल्ल्यावर मुकुंदरामचा मुलगा शंभूराम हा तैनात आहे. हा शंभूरामला लोळाची किल्लेदारी द्यावी.

बादशहाने विनंती मान्य केली, त्या प्रमाणे नेमणुका करण्यात आल्या. सुभे महमदाबाद (बिदर) चा माजी दिवाण मीर अब्दुल रहमान उर्फ दारादखान ह्याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला—"मी औरंगाबादेस आलो, मी औषधोपचार केले आता प्रकृती बरी आहे, आज्ञा होत असेल तर मी हुजुरात येतो."

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, औरंगाबादचे बक्षी वाकेनवीस ह्यांना लिहून ह्यासंबंधी चौकशी अहवाल मागविण्यात यावा, त्यानंतर घाटाखालच्या प्रदेशाचा (कऱ्हाड वगैरे) ठाणेदार यासिनखान ह्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला मला हुजुरात घेऊन येण्यासाठी यादगारबेग गुर्जबर्दार (दंडधारी) ह्याला पाठविण्यात आले आहे. विनंती अशी की, येथे चोरांचा (मराठ्यांचा) सुळसुळाट झाला आहे. कृपाकरून गुर्जबर्दाराला परत बोलावून घेण्यात यावे. मला काही दिवस राहू देण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

ईस्लामपूर (ब्रह्मपूरी) चा किल्लेदार शुकोहखान ह्याचा विनंती अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला त्यांत पुढीलप्रमाणे मागण्या होत्याः—

मागणी (१) किल्ल्याचे एखादे चिन्ह मिळावे, बादशहाने आज्ञा केली की, फर्मान औरंगाच्या मोहोरे निशी देण्यात यावे, मागणी (२) महमद फाजलचा मुलगा अब्दुल गनीम ह्याची कमी असलेली मनसब वाढविण्यात यावी, विनंती मान्य करण्यात आली, मागणी (३) येथे चोरांनी (मराठ्यांची) ये-जा फार आहे. त्यामुळे नेमलेल्या पथकापेक्षा माणसे जास्त ठेवणे भाग पडते. घोड्यांना डाग देणे वगैरे माफ करावे, मागणी (४) दारु गोळ्यांच्या खात्यात माणसे नेमण्यात यावीत, सैनिक नेमण्यात यावे, १०० सैनिक नेमण्याची आज्ञा मान्य करण्यात आली, मागणी (५) विरादरीचे अब्दुल गनिमिंना माझ्यापाशी तैनात करण्यात यावे, मागणी (६) मोहोळ आणि करकंब ह्या परगण्यात जहागिरी मिळावी, ह्यावर महमतखानाची चौकशी करुन वृत्तांत सादर करावा, अशी आज्ञा झाली. हैद्राबादचा सुभेदार मोहंमद कामबक्ष ह्याचा नायब आणि कोहीरचा फौजदार मुजफ्फरखान ह्याचा खुराक खुबाबची करमाची दोन वर्षासाठी देण्यात आली. मुख्यप्रधान असदखान ह्यांचे नातू महमंद सालेह व महमद काझीम (आसतखानाचा मुलगा दिवंगत मोहमद इसाक उर्फ इलायतखान ह्याचे पुत्र) ह्यांना मतलबखान ह्याने बादशहाच्या आज्ञेने पित्याच्या शोकातून बाहेर आणून बादशहाकडे आणले. रितीप्रमाणे त्यांना शोकवस्त्रे देण्यात आली.

तरबियतखानाच्या विनंतीप्रमाणे तोफखान्यात चार जणांची नेमणूक करण्यात आली. त्यांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली. गढ नमूना (कर्डेनिमोणे) येथील ठाणेदार अब्दुल रसुलखान ह्याला निरोप देण्यात आला.

पुण्यात तैनात असलेले बंदुकची ह्यांनी न्याय कचेरीत (अदालत) तक्रार मांडली की, "पाच वर्षे झाली आम्हाला आमच्या पगाराची थकबाकी मिळाली नाही. सरकारातून जे देण्यात आले ते मनसूरखान (तोफखान्याचा प्रमुख) ह्याने बळकावले आहे. आमची विनंती ही की, आमची नेमणूक बादशाही तोफखान्यात करण्यात यावी (दक्षिण सुभ्याच्या तोफखान्यात नव्हे) आणि आमची पगार बाकी आम्हाला देण्यात यावी."

बादशहाने आज्ञा केली की, वरील मंडळींना कोतवालाच्या हवाली करण्यात यावे.

दक्षिण सुभ्याचा दिवाण मोतीमतखान ह्यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली. अशीच वाढ बादशाही खात्यातील इतर अधिकाऱ्यांच्या बाबतीत करण्यात आली. बऱ्हाणपूर येथील इस्लामपुरातील

अनुक्रमणिका

सरकारी बागेचा अमीन ह्याला वाढ देण्यात आली. मीरनेमतुल्ला ह्याला जुन्नरचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

**तेरा मे १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

**चौदा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटीका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी कामास सुरवात केली. (अदालत) मोगलखान ह्याच्याकडे बादशाही छावणीपासून औरंगाबादपर्यंतच्या राहदारीचे म्हणजे मार्ग रक्षणाचे काम होते. त्याने औरंगाबादेहून काफीला हुजुरात आणला होता. तो बादशहाना भेटला. ती भेट न्याय कचेरीत झाली. त्याने दोन मोहरा निसार म्हणून बादशहाना अर्पण केल्या.

ईनायतउल्लाखान (अहकामे आलमगिरी ह्या औरंगजेबाचा लेखक, संग्राहक आणि चिटणीस) ह्याचा जावई आणि संगमनेर वगैरेचा फौजदार आमानतखान उर्फ ख्वाजा महंमद (१७२४ मध्ये हा मुबारीजखान ह्या नावाने हैद्राबादचा सुभेदार होता—फत्तेखर्ड्याच्या लढाईत हा निझामाच्या हातून मारला गेला. तेव्हा पासून म्हणजे इ.स. १७२४ पासून निझामाचें राज्य स्वतंत्र झाले). हा खजिन्याबरोबर बादशाही छावणीत आला होता. तो हुजुरात आला आणि त्यांना न्याय कचेरीत बादशाहाची भेट घेतली. त्यानी दोन मोहोरा निसार म्हणून दिल्या.

खान नुस्रतजंग (झुल्फिकारखान) ह्याच्या फौजेत तैनात असलेला इस्माईलखान मकाहा खजिन्याबरोबर आला होता. तो बादशहाना भेटला. चाकणहून बदललेला आशन बक्षिंदाबक्ष (सिंहगड) येथे नव्याने नेमलेला किल्लेदार जहानबाजखान हा हुजुरात येऊन बादशहाला भेटला.

ख्वाजमपुलोखान हा मोगल खानाच्याबरोबर आला होता, तो बादशहाना भेटला. ब्रह्मदेव सिसोदीचा ह्याचा मुलगा देवीसिंग हा फत्तेखान बहादुरबरोबर आला होता, तो बादशहाना भेटला. सरफराजखान हा सहा हजारी मनसबदार होता. त्याला सहा हजार जात आणि पाच हजार स्वार अशी मनसब होती. बादशहानी ती मनसब एक हजार स्वारांनी कमी केली. छावणी भोवती असलेल्या मांदुण (?) येथील ठाणेदारीवर अब्दुल रसुलखानची नेमणूक झाली होती. आता त्याच्या जागी शेख गुलाम महंमद रसिखानी ह्याची नेमणूक करण्यात आली. राय मुकुंदचा नातू केसरीसिंग हा शेख गुलाम महंमदच्या मध्यस्थिने मुसलमान झाला. त्याला खिलाताची (मानाची) वस्त्रे देण्यात आली आणि शंभराची मनसब देण्यात आली. जुन्नरचा बक्षी आणि वाकेनवीस मीर नेमतुल्ला ह्याला शाल देण्यात येऊन जुन्नराला जाण्यासाठी निरोप देण्यात आला. असरखानाचे नातू आणि इनायतखानाची मुले ह्यांच्या मनसबीत वाढ देण्यात आली.

दिलेरखान विजापुरी ह्याचा चुलतभाऊ आबु महंमद ह्याची मनसब वाढविण्यात आली. बुलंदखान ह्यास करवंडी (मलवंडी?) किल्ल्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले आणि त्याची मनसब वाढविण्यात आली. फतेउल्लाखान बहादुर ह्याने बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती केली—

अनुक्रमणिका

“आपण पुण्याला छावणी घातली आहे. वाटेत नद्या आणि ओढे आहेत. धान्यांची रसद छावणीपर्यंत पोहचविण्यात काय अडचणी येतात हे स्पष्ट आहे. कोरेगावला छावणी घालावी अशी अपेक्षा आहे. म्हणजे सैन्याला निश्चिंतता व आराम मिळेल.”

बादशहा हे ऐकून गप्प बसले. एक घंटका गेल्यानंतर हत्तीखान्याचा करोडी मुहरमखान ह्याला निरोप देताना बादशहांनी म्हटले की, मोगलखानाला औरंगाबादच्या परिसरातील तळाकडे घेऊन जावे. पुढील लोकांचे विनंती अर्ज बादशहाकडे आले. ते नजरेखालून गेले.

(१) खानफीरोझ ह्याच्या सैन्यात तैनात असलेला मैल्याराव (नेताराव?), (२) देवळीचा जमिनदार रावत प्रतापसिंग.

**पंधरा मे १७०३**

आज मोहरमची १० वी तारीख, दोन्ही दिवाण बंद ठेवण्यात आले. बादशहाच्या आज्ञेने सर्फेखास (खाजगी खर्चाचा) दारोगा (व्यवस्थापक) सैफुल्ला ह्याने आठ अनाथ पोरे हुजुरात आणली. बादशहांनी त्यांना मेवामिठाई, काही सोने चांदी देऊन मुलांच्या डोक्यावर आपला शुभहात ठेवला (दस्तेमुबारक) नंतर त्यांना परत जाण्यास निरोप देण्यात आला.

**सोळा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटिका झाला असता न्यायालयात (अदालत) प्रवेश केला. काल बादशहाने हमीरूद्दीन खानबहादूर यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—“तुम्ही इनायतउल्लाखान (अकामे अलमगीरीचा लेखक) त्याला असतखानाच्या (मुख्यप्रधान) डेऱ्यावर घेऊन जा आणि अमीरउमरा आसतखान, सांगा की, (आसतखानाकडून) त्याने इनायतउल्लाला क्षमा करावी ह्याप्रमाणे, अमीउद्दीनखान ह्याने केले. हमीर उद्दीनखान हा बादशहापाशी आला, त्याने म्हटले, “इनायतउल्लाला क्षमा केली आहे. मी उद्या त्याला त्यांच्या कचेरीत बसविन.” दुसऱ्या दिवशी हमीर उम्राह हा न्यायकचेरीत येऊन बादशहाना भेटला. बादशहाने त्याला सांगितले, “तुम्ही जाऊन आपल्या कचेरीत बसा.” त्याप्रमाणे अंमलबजावणी झाली.

बुंदीचा राजा (जमिंनदार) राव बुधसिंग ह्याचा चुलतभाऊ संग्राम हा झुल्फिकारखानाच्या सैन्यात तैनात होता. तो खजिन्याबरोबर आला होता. तो बादशहाना भेटला. त्याने निसार म्हणून पाच मोहरा अर्पन केल्या. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात येऊन झुल्फिकारखानाच्या फौजेत पाठविला. अमानतखान उर्फ ख्वाजामहंमद (इनायत उल्लाखानाचा जावई) हा संगमनेर वगैरेचा फौजदार आणि अमिन होता. त्याच्याकडे इसापूर (वैजापूर असावे) ची फौजदारी देण्यात आली. तो निरोप घेऊन जाताना त्याला बक्षीस म्हणून देण्यासाठी एक हत्ती काढून ठेवावा अशी बादशहाने आज्ञा केली.

जानबाजखान ह्याची नेमणूक बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्लेदार म्हणून करण्यात आली होती. ती रद्द करण्यात आली. त्या ऐवजी जानबाजखान ह्याला आजमगड उर्फ पुरंदरच्या किल्ल्यावर किल्लेदार

म्हणून नेमण्यात आले. त्या किल्ल्यावर त्यापूर्वी खानचंग हा किल्लेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. खानचंगची नेमणूक बक्षिंदाबक्ष उर्फ कोंडाणा (सिंहगड) चा किल्लेदार आणि फौजदार म्हणून करण्यात आली.

राजगड आणि तोरणा ह्या किल्ल्यासमोरील मोर्च्यासाठी योग्य जागा पहाण्यासाठी बादशहानी फत्तेउल्लाखान बहादूर ह्यास जाण्यासाठी निरोप दिला. त्याच्याबरोबर उस्मानखान व यक्काताजखान हे ही गेले. ऊंटखान्याचा दारोगा महंमद जमान ह्याला ऊंटाना चरवण्यासाठी औरंगाबादकडे जाण्यास निरोप देण्यात आला. अशाप्रकारे बैलांना चरवण्यासाठी त्या खात्याच्या कर्मचाऱ्यांना औरंगाबादकडे पाठविण्यात आले.

मरहूम कीफायतखान ह्याचा जावई मीर महंमद ह्याचे समाधान करण्यात आले आणि त्याला एक बालाबंद देण्यात आला. ख्वाजाखानची आई वारली असे बादशहाना कळवण्यात आले. ख्वाजाखानाला सुतकातून काढून आपल्याकडे आणावे अशी आज्ञा बादशहाने नेकनामखानाला दिली. हत्तीखान्याचा दारोगा हमीरउद्दीन खानबहादूर ह्याने मरहूम अब्दुल रसुलखान ह्याच्या मालमत्तेपैकी अकरा हत्ती बादशहासमोर आणले ते त्याने आपल्या नजरेखालून घातले. ब्रह्मदेवाचा मुलगा देवीसिंग हा फत्तेउल्लाखानाच्या सैन्यात तैनात होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

खुदाबंदाखान (शाहीस्तेखानाचा मुलगा औरंगजेबाचा मामेभाऊ) हा मोहंमदाबाद येथे सुभेदार असताना तीर मोहंमदाचा मुलगा शेर मोहंमद पेशकार (कारभारी) हा त्याचा कारभारी होता. तो येऊन बादशहाला भेटला. त्याला नेकनामखानाच्या कार्यालयात घेण्यात आले. सूरतबंदराचा मुत्सद्दीन (मुत्सदी, कारभारी) ह्याचा नोकर ख्वाजाईमाद हा एतिबारखानाने पाठविलेल्या खंडणी आणि भेटी बरोबर (पेशकस) हुजुरात आला होता. त्याला शाल देण्यात येऊन निरोप देण्यात आला. बादशहाने आज्ञा केली की, हाफीस अंबर आणि हजीस मजकूर ह्याचे हुद्दे कळविण्यात यावेत म्हणजे त्यांच्यावर अधिक कृपा करता येईल.

बादशहानी मोगलखानाबरोबर हत्तीखाना आणि काफिला हे पाठविताना कुशलतेचा फातेहा पढवून त्याला निरोप दिला.

**सतरा मे १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटिका झाल्या असता न्याय कचेरीत प्रवेश (अदालत) पुढील मंडळी येऊन बादशहांना भेटली. जमानउल्लाखानाचा मुलगा अमानउल्लाखान मध्यआशियातून नुकताच आलेला. बाकरखान काशधरी ह्याचा मुलगा अब्दुल वाहीद, बऱ्हाणपूरहून बदललेला काझी शेख महंमद अली फराझखानाचा अधिकारी मीर महंमद अली.

काल रात्री बादशहानी वाकेनिगार शेख हीदायतकेश ह्यास बोलावून विचारले "गेल्या वर्षी कोणच्या तारखेस पाऊस सुरू झाला बरे, त्याने सांगितले गेल्या वर्षी मोहरम महिन्याच्या पहिल्या तारखेस सोमवारी पावसाळा सुरू झाला. त्यावेळी आपण सखरलना (विशाळगड) येथे होतो." बादशहाने आज्ञा केली की, "ह्या वर्षी मोहरम महिन्याच्या १० तारखेस (१५ मे १७०३) पावसाळा सुरू झाला आहे. दैनंदिनीत आणि वृत्तांतात ह्याची नोंद घेण्यात यावी.

अनुक्रमणिका

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. “काल रात्री पाऊस पडला. त्यामुळे इनायततुल्लाच्या तंबूचे खांब मोडले (बादशहाचा चिटणीस आणि आकामे अलमगीरीचा लेखक) त्यामुळे इनायतुल्लाला मार बसला म्हणून तो मुजरा करण्यासाठी आला नाही.” बादशहाने आज्ञा केली की, हकीमसजाजचा मुलगा ह्याने जाऊन त्याच्यावर उपचार करावेत.

सुलेनानखान ह्याने अर्ज करून पुढीलप्रमाणे विनंत्या केल्या.—(१) माझ्यावर कृपा व्हावी, ह्यावर बादशहाने त्याची मनसब वाढविली, (२) दुआबच्या खुराकाचे बंधन माफ करण्यात यावे. बादशहाने दोन वर्षासाठी माफ केले (बादशाही सैन्यातील जनावरांना खुराक देण्यासाठी मनसबदाराकडून पैशाची मागणी केली) मरहुल रस्तुलाखान ह्याचा मुलगा इलायतखान ह्याने हुजुरात येऊन बादशंहाना मुजरे केले. (रूस्तुलाखान हा भावी निजाम मुल्कचा मामेभाऊ) आणि शहाजहांच्या वजीराचा मुलगा).”

इस्माईलखान मका हा खजिन्याबरोबर आला होता. बादशहाने त्याला आज्ञा केली की, “तुम्ही हत्तीखान्याबरोबर अहमदनगरपर्यंत जा, त्या नंतर तुम्ही खान नुस्रतजंग (झुल्फीकारखान) ह्याच्या सैन्यातील आपल्या तैनातीत जा.” सैयदखान उर्फ सैयदलाल हा उजवीकडे उभा होता. बादशहाने त्याच्याकडे पाहून म्हटले ह्याला डावीकडे उभा करा.

**अठरा मे १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद होते.

**एकोणवीस मे १७०३**

दक्षिणच्या तोफखान्याचा अधिकारी मनसुरखान हा बक्षिंदाबक्ष (सिंहगड) च्या किल्ल्यात आहे. त्याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—“किल्ल्यात पाऊस पडला, वीज पडली, आठहात लांब आणि चार हात रुंद अशी तटाची भिंत कोसळली, ती बांधून काढण्यासाठी एक बांधकाम करणारा (मेमार) पाठवावा. “घनशामसिंग ह्याला दीड हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब होती, तो वारला, त्याचा मुलगा जसवंतसिंग ह्याला नव्याने मनसब देण्यात आली. इस्माइलखान मका ह्याला हत्तीखान्याबरोबर जाण्यासाठी निरोप देण्यात आला. गदगचा फौजदार जैनुद्दीन अहमद ह्याला तेथून बदलण्यात आले. त्याचा नायब सैयद ह्याची मनसब कमी करण्यात आली. जैन्नुद्दीला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, एक गुर्जबर्दार नेमण्यात यावा. मरहूम अमीरखान (काबुलचा माजी सुभेदार, आणि बक्षी रुहुल्लाखान याचा काक) यांची मुले मुहंमद हुसेन वगैरे यांना शहाजानाबाद (दिल्ली) येथून सजावली करून (कडक आज्ञा करून) हुजूरात आणावे.

बादशहाना कळविण्यात आले की, मुहंमद अमीनखान बहादुर (भावी निजामउल्मुल्काचा चुलत चुलता आणि मुगल साम्राज्याचा भावी मुख्य प्रधान) हा काही (घासदाणा) आणण्यासाठी बादशहाच्या आज्ञेने गेला आहे. बादशहाने बक्षी रुहुल्लाखान यास आज्ञा केली की, अमीनखानाच्याबरोबर देण्यासाठी पाचहजार स्वारांच्या सैन्याची यादी (तूमार) तयार करावी.

अनुक्रमणिका

**वीस मे १७०३**

फत्तेउल्लाखान बहादूर व यक्काताजखान हे राजगड व तोरण्यासमोर मोर्च्यासाठी योग्य स्थळे पाहावी म्हणून गेले होते, ते या सुमारास परत आले. त्यांनी हमीदोद्दीनच्या द्वारे बादशहाकडे विनंती अर्ज पाठविला. अर्जात म्हटले होते की, "आम्ही चहूकडून किल्ल्याची पाहणी केली. राजगड किल्ल्याच्या पलीकडे किल्ल्याची जागा निवडली. त्यावेळी झालेल्या चकमकीत बादशहाच्या कृपेने शत्रूंची आठ माणसे ठार झाली. आमच्याकडील चार माणसे कामी आली."

**एकवीस मे १७०३**

दोन्ही दिवाणचे काम बंद होते.

पुरंदर (आजमगड) चा किल्लेदार खानचंद याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला.—"बक्षी रुहुल्लाखानाची मोहोर असलेल्या आज्ञापत्राद्वारे माझी नेमणूक बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्लेदार व फौजदार म्हणून करण्यात आली आहे; पण ती मला नको. मला हुजुरात बोलावून घ्यावे." बादशहाने विनंती मान्य केली आणि आज्ञा केली की, बक्षिंदाबक्षवर इतर कोण्या इसमाची नेमणूक करावी.

**बावीस मे १७०३**

दिवाण व न्याय कचेरी दिवसाच्या पूर्वार्धात बंद ठेवण्यात आली. कालरात्रीच्या एक प्रहर व चार घटिका झाल्या असता बक्षी रुहुल्लाखान याने एकांतात येऊन बादशहापाशी पुढीलप्रमाणे विनंती केली.—— (तोफखान्याचा प्रमुख) तरबियतखान याची विनंती अशी आहे की, अहमदनगरच्या किल्ल्यावर आणि फौजदारीवर सध्या अब्दुलगफूर खान हा आहे. त्याला तेथून बदलावे आणि त्याच्या जागी अहमदनगरच्या किल्लेदारी व फौजदारीवर माझी नेमणूक करावी, म्हणजे मी माझे कुटुंबीय आणि इतर लोक यांना तेथे ठेवीन. अहमदनगरवर माझ्यातर्फे नायब म्हणून माझा मुलगा मुहंमद इसहाक याला नेमण्यात यावे, म्हणजे मी निश्चितपणे बादशाही चाकरी बजाऊ शकेन बादशहाने तरबियतखानाची विनंती मान्य केली. तरबियतखान यास तीन हजार जात आणि दीड हजार स्वार अशी मनसब होती. त्यात चारशे स्वारांची भर घालण्यात आली. त्याचा मुलगा मुहंमद इसहाक याला तीनशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब होती. तीत शंभरची भर घालण्यात आली.

हत्तीखान्याचा अधिकारी (करोडी) मुहरमखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला.— औरंगाबाद आणि दौलताबाद येथे सरकारी बागा आहेत त्यांची पाहणी करावयाची आहे. औरंगाबाद आणि दौलताबाद येथील किल्लेदारांना आज्ञा करण्यात यावी की, "मी (मुहरमखान) बागा पाहण्यास जात आहे. पाहणी करू द्यावी." विनंती मान्य करण्यात आली.

शाहजादा मुहंमद आजम याचे पत्र आले. हे पत्र गुजराथचा दिवाण ख्वाजा अब्दुलहमीद याने आपल्या विनंती अर्जाबरोबर पाठविले.

शाहजादा बेदारबख्तच्या छावणीतून बातमी कळली की, बेदारबख्ताची मुलगी सालेहुन्निसा ही मरण पावली.

अनुक्रमणिका

**तेवीस मे १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद होते.

**चोवीस मे १७०३**

राजा उत्तमराम हा गाजिउद्दीनखान फिरोजजंग याच्या सैन्यात तैनात होता. तो यावेळी बादशहाच्या हुजुरात होता. त्याची तैनाती विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्या सैन्यात करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, गुर्जबर्दाराने राजा उत्तमरामला त्याच्या जागेवर पोहोचवून यावे.

**बहादुरगड**

बहादुरगड किल्ल्यावर (पेडगाव) मुरीदखान हा किल्लेदार व फौजदार म्हणून काम करीत होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर अहमदनगरचा माजी किल्लेदार व फौजदार अब्दुल गफूरखान याला नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, गुर्जबर्दार नेमण्यात यावा आणि त्याने इस्माइलखान मका यास चीनकुलीजखान याच्या सैन्यातील तैनातीच्या जागेवर पोहोचवून यावे. देगलूरचा जमिंनदार व फौजदार (बदललेला), हुसेनखानाचा नातू, सैदी जाहीद याचा मुलगा, सैदी अब्दुल्ला हा काल बादशहाला भेटला. त्याला दक्षिणच्या तैनात पथकात नेमण्यात आले आणि त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली कीं, बादशहा जादा कामबक्ष याच्या खात्यातील मीरबक्षी आणि नुसरतखान आणि मीर तुजक यांना न्याय कचेरीत येऊ देऊ नये.

अहमदनगरचा माजी रक्षक (हारिस) सिद्दी मिफताहखान याला बादशाही छावणीपासून ते औरंगाबादपर्यंतच्या मार्गाचा रक्षक मुगलखान याच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. त्याने विनंती अर्ज लिहून पाठविला की, “माझ्याकडे पूर्वीप्रमाणे अहमदनगरच्या रक्षणाचे (हिरासत कस्टडी) काम देण्यात यावे. बादशहाने विनंती मान्य केली नाही. बादशहाने आज्ञा केली की, गुर्जबर्दार पाठवून त्याला हुजुरात बोलावण्यात यावे आणि त्याच्या आजाराची चौकशी करून मुगलखानाने वृत्तांत सादर करावा.”

मीर अब्दुलसलीम याला शहाजानाबाद (दिल्ली) येथे कोतवाल म्हणून नेमण्यात आले होते. त्याने काही विनंत्या लिहून पाठविल्या त्या मान्य करण्यात आल्या.

**पंचवीस मे १७०३**

ब्रम्हदेव शिसोदिया याचा मुलगा देवीसिंह याला बक्षिंदाबक्ष (सिंहगडचा) चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

अनुक्रमणिका

मंगळवेढ्याचा किल्लेदार व फौजदार शमशेरखान याने एक बंदूक पेशकश म्हणून पाठविली. होती. ती तरबियतखानाच्या द्वारे बादशहाना देण्यात आली. बादशहानी ती नजरेखालून घातली. ती पाहून बादशहा संतुष्ट झाले.

कल्याणी येथे (कर्नाटक, बीदर जिल्हा) अहसनखान हा किल्लेदार व फौजदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले आणि त्याच्या जागेवर मिहदीखानाचा मुलगा मिर्जा मुहंमद याची नेमणूक करण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात यावी. हरकाऱ्यांचा दारोगा यार अलीबेग हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहाना येऊन भेटला.

अमानतखान (संगमनेरचा फौजदार) याला द्यावयाचा हत्ती बादशहाना दाखविण्यासाठी हमीदोद्दीन खान याने आणला.

बादशहाने आज्ञा केली की, आघाडीवरील पथकासाठी फकीर मुहंमद अईज याच्याबरोबर पन्नास कर्नाटकी प्यादे देण्यात यावे.

रजापूर (हे वैजापूर असावे) चा बदललेला फौजदार मुहंमद तकी याची मनसब कमी करण्यात आली.

हरकऱ्यांच्या तोंडून काल बातमी कळली ती अशी, "शिवसिंग याच्या सैन्यांतील नोकर हे घोड्यांना पाणी पाजण्यासाठी बादशाही छावणीच्या बाहेर चालले होते. इतक्यात शत्रूंचे, (मराठ्यांचे) सात स्वार त्यांच्यावर तुटून पडले आणि त्यांनी घोडे पळविले. ही बातमी कळताच शिवसिंग याने मूली (?) या गावापर्यंत त्यांचा पाठलाग केला. त्याने घोडे सोडविले या शिवाय त्याने त्यांच्या चार घोड्या पकडल्या, शत्रू पळून गेले.

बादशहाने आज्ञा केली की, खान फिरोजंग याच्या सैन्यात असलेले फजलुल्ला व शहा मुहंमद यांना हुजुरात बोलावून घेण्यात यावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—खान फिरोजजंगाच्या सैन्यात ज्याना तैनात करण्यात आले आहे अशा इसमांना अमानुल्लाखान याने आणि नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या सैन्यातील तैनात असलेल्या इसमाना नुसरतखान याने त्यांच्या त्यांच्या तैनातीच्या जागेवर नेऊन बसवावे.

**सव्वीस मे १७०३**

काल रात्री एक प्रहर व चार घटिका झाल्या असता बादशहाने बक्षी रुहुल्लाखान यास एकांतात बोलाविले आणि म्हटले—"तुम्ही फत्तेउल्लाखान बहादूर यांस सांगा की, मी त्याला बादशहाजादा मुहंमद मुअज्झम (मुअज्ञम) बहादुरशाहा (काबुलचा सुभेदार) याच्या तैनातीत पाठवीत आहे; तयार रहा." फत्तेउल्लाखानाचा हुद्दा मला कळवा. त्याला देण्यासाठी खिलातीची खास वस्त्रे तयार ठेवा.

अनुक्रमणिका

रात्री बादशहाने रुहुल्लाखान यांस आज्ञा केली की, तुम्ही सोमवारी कही आणण्यासाठी जा. सर्फराजखान यांस बक्षीच्याबरोबर तैनात करण्यात आले.

शेख तय्यब हा नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात होता. तो फत्तेउल्लाखानाबरोबर हुजुरात येऊन बादशहाला भेटला. बादशहाने आज्ञा केली की, शिष्टाचाराचा अधिकारी (मीर तुजक) मुनोमखान यांने शेख तय्यबला नुसरतजंग (झुल्फिकारखान) यांच्या फौजेत रवाना करावे.

बादशहाना पुढील हकीकत कळविण्यात आली—"अहमदनगरहून काफिला निघून बादशाही छावणीकडे येत होता. कोरेगावच्या जवळ काफिल्यापैकी काही माणसे जखमी झाली (त्यांच्यावर हल्ला झाला) व त्यांची मालमत्ता लुटण्यात आली."

नुरुद्दीन यास बलकोंडा (नलगुंडा असू शकेल) येथील किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली होती. ती आज्ञा रद्द करण्यात येऊन नुरुद्दीन यांस इरादतखानाच्या जागेवर गुलबर्ग्याची किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली.

कोहोरचा बदललेला किल्लेदार व फौजदार कासिमखान याला रायचुरचा किल्लेदार आणि फौजदार नेमण्यात आले.

## सत्तावीस मे १७०३

आज दिवाणचे काम बंद होते.

नावांचा (नौका) अधिकारी म्हणून शाह मिर्जा याची नेमणूक करण्यात आली. त्याच्यापूर्वी मुहंमद तकी हा त्या जागेवर काम करीत होता.

## अठ्ठावीस मे १७०३

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटका झाले असता न्याय कचेरीत प्रवेश (अदालत).

मेदीखानाचा मुलगा मिर्झा महंमद ह्यास कल्याणीचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. चौकीखासच्या खात्यात अतिशखानाच्या जागी सुलेमान डेगचा मुलगा मुहंमद तकी आणि कौलार तुर्क ह्यांची नेमणूक करण्यात आली.

ईनायतउल्लाखान हा खालशाचा दिवाण होता. तंबूचा खांब कोसळून त्याला मार लागला होता. तो बरा होऊन बादशहाना भेटला. कचेरी संपण्यापूर्वीच त्याला परत जाण्यासाठी निरोप दिला.

फत्तेउल्लाखान बहादुर ह्याला बादशहाजादा महंमद मुअज्जम बहादुर शहा (काबुलचा सुभेदार) ह्याजपाशी तैनात करण्यात आले होते. त्याची मनसब वाढविण्यात आली. त्याला एक भाता (बाणांचा)

अनुक्रमणिका

बक्षीस देण्यात आला. त्यांच्यासाठी बादशहानी खुशालीची प्रार्थना केली आणि त्याला निरोप देण्यात आला. फत्तेउल्लाखानासाठी एक वेगळा ध्वज काढून ठेवण्यात यावा अशी बादशहाना आज्ञा केली.

पुरंदरचा माजी किल्लेदार खानचंद ह्यास आझामनगर (बेळगाव) चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. बेळगांवचा पूर्वीचा फौजदार आणि किल्लेदार सैफखान ह्याची मनसब कमी करण्यात आली. बक्षी मिर्झा "सदुरुद्दीन मुहंमदखान हयाच्या विनंतीवरून चौल बंदराचा मुत्सद्दी (कारभारी) मोहीमखान ह्याची मनसब वाढविण्यात आली. जक्कलचा माजी किल्लेदार मुझफरहुसेन ह्याला नैरुद्दीनखानाच्या ऐवजी नरगुंद्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

बक्षी मिर्झा सदरुद्दीन मिर्झाखान ह्याने विनंती केली की, दाभोळ परगण्याचा दिवाण अब्दुल्ल ह्याने आपल्याला पुढीलप्रमाणे लिहिले आहे––"ह्या प्रदेशातील किल्ले बादशहाच्या ताब्यात आणावे अशी माझी इच्छा आहे तर मोहिमेच्या प्रसंगी माझ्याशी सहकार्य करण्यासाठी बादशहानी यासिनखान व सिद्दी याकुदखान (जंजिरा) व राजा उदीतसिंग (विशाळगडचा किल्लेदार) ह्यांना आज्ञा करावी." बादशहानी आज्ञा केली की, ह्या बाबतीत वरील मंडळींना लिहिण्यात यावे.

**एकोणतीस मे १७०३**

बादशहा हे हमीरूद्दीनखान बहादूर यांस म्हणाले, "बादशहाजादा मुहंमद मुअज्ज़म बहादुरशाहा ह्यांच्याकडे पाठविण्यासाठी काढून ठेवलेले घोडे दाखवा. हमीरुद्दीनने दोन इराकी आणि तीन त्‌आरबी घोडे दाखविले. बादशहाने घोडे पाहून ते मुहंमद मोहजमकडे पाठवून देण्याची आज्ञा केली. या प्रमाणे मोहजमकडे पाठविण्यासाठी रत्नालंकार काढून देण्याची आज्ञा करण्यात आली. ह्या भेटी फत्तेउल्लाखानाबरोबर पाठवावयाच्या होत्या.

फीरोझनगर उर्फ रायचूर येथे पूर्वी अल्लाहकुलीचा मुलगा नजफकुली हा किल्लेदार आणि फौजदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याची मनसब कमी करण्यात आली. मोहमंदकुली हा मध्य आशियातून नुकताच आला होता. त्याने बादशहाना दोन घोडे अर्पण केले.

अकबरपूरच्या (नर्मदाकाठ) बातम्यावरून पुढील हकीगत कळली—हयात नावाचा इसम हा मनसबदार असून रुस्तुमदिल खानाच्या सैन्यात तैनात होता. रुस्तुमदिल खानाच्या परवानगीने (दस्तक) तो आपल्या जहागिरीची व्यवस्था करण्यासाठी उत्तर हिन्दुस्थानात गेला. त्याची जहागिरी काढून घ्यावी, अशी बादशहाने आज्ञा केली.

बादशहाना कळविण्यात आले की, किल्ल्यातील (नाव लागत नाही बहुदा सहराला, सिवाला किंवा सखरलना म्हणजे विशाळगड असावे.) लोकांची आर्थिक दुर्दशा झाली आहे. त्यांच्यावर कृपा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली आणि त्याप्रमाणे मुहंमद गौस, मुल्ला वासे इत्यादिंना बढत्या देण्यात आल्या.

बादशहाने आज्ञा केली की, तहबूरखान व शुकूरखान (शुकूरखान हा इस्लामपुरी म्हणजे ब्रम्हपुरीचा किल्लेदार दिसतो.) यांना अंमलबजावणीचा अधिकारी नेमून त्यांच्याद्वारे त्यांच्या जागेवर पाठविण्यात यावे.

**तीस मे १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद होते. बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी रुहुल्लाखान हा आज्ञेप्रमाणे कही (घासदाणा) आणण्यासाठी गेला आहे.

**एकतीस मे १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

इस्माईलखान मका याचा मुलगा परवरीशखान याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला आपल्या बापाबरोबर राहण्याची आज्ञा करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, रायभान याच्या मनसबीचे स्मरणपत्र (याददास्त-मेमो) काढण्यात यावे. तो हुजुरात आल्यावर त्याला देण्यात येईल. त्याला एक हजार जात अशी मनसब देण्यात येणार होती.

बहादुरगड (पेडगांव) चा खानसामान व दिवाण फज्रलल्ला याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, गुर्जबर्दारांनी जाऊन मरहूम अमीरखान यांच्या मुलांना घेऊन यावे. मतलबखान हा गुर्जबर्दारांचा दारोगा (अधिकारी) याचे म्हणणे असे की, हा हुकूम रद्द झाला आहे. बादशहाने आज्ञा केली की, रद्द झालेला हुकूम दाखविण्यात यावा आणि बक्षी रूहुल्लाखान यास आज्ञा करण्यात आली की, गुर्जबर्दारांना पाठवून अमीरखानाच्या मुलांना बोलावून घ्यावे.

बादशहाने आज्ञा केली की, "अहसनखानाच्या नावे फर्माने पाठविण्यात यावे की, कल्याणीचा किल्ला मिर्जा मुहंमद याचे हवाली केला, असे समजण्यात यावे.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार सय्यद नूरुद्दीन याला नेमण्यात आले होते. त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशाही छावणीपासून औरंगाबादेपर्यंतच्या वाटेचा मार्गदर्शक (राहदार) मोगलखान ह्याने पुढीलप्रमाणे अर्ज लिहून पाठविला. खाज्या सय्यद व माझा भाचा खाजा आमानुल्ला ह्यांना बंगाल मधून हुजुरात बोलावून घेण्यात आले आहे. विनंती अशी की, त्यांना तेथेच तैनात ठेवण्यात यावे, विनंती मान्य करण्यात आली. सैय्यद नुरूद्दीन अहमद ह्याला तळाच्या (ब्रह्मपुरी), कोतवालीवरून व फौजदारीवरून बदलला होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले होते. तो हुकूम रद्द करण्यात आला आणि त्याला पूर्वीच्या आज्ञेप्रमाणे बहाद्दरगडाच्या (पेडगांव) तळाचा कोतवाल आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**एक जून १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटका झाल्या असता न्याय कचेरीत (अदालत) बादशहाने न्याय कचेरी केली. हयातबेग गुर्जबर्दार हा शहाजादा मुअज्ज़म बहाद्दरशहा (काबुलचा सुभेदार) ह्यांच्या नावे बादशहाचे फर्मान घेऊन गेला होता. तो उत्तर घेऊन परत आला. उत्तर बादशहाच्या नजरेखालून गेले. शहाजाद्याने गुर्जबर्दाराला खिलातीची वस्त्रे बक्षीस म्हणून दिली होती, ती त्याने आपल्यापाशीच ठेवावी अशी आज्ञा झाली. बादशहाने ती बक्षीसे त्याला माफ केली. तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान ह्याचा मुलगा महंमद इसहाक ह्याला आपल्या बापातर्फे नायब (Deputy) (डेप्युटी) म्हणून अहमदनगरचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला एक खंजीर बक्षीस देण्यात येऊन त्याला अहमदनगरकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

शमशुद्दीन मोहंमदखान (कंधार, जिल्हा नांदेडचा माजी किल्लेदार, मिरजेच्या लढाईत मारला गेला. इ. स. १७०१) ह्याचा मुलगा गुलामकादरी ह्याला त्याच्या लग्नासाठी म्हणून कंधारकडे जाण्यास निरोप देण्यात आला. (कंधार, जिल्हा नांदेड). मतलबखान करावल बेगी त्याने विनंती केली की, रुहुल्लाखान बक्षी हा घासदाणा (कही) आणण्यासाठी गेला होता. त्याने एका निलगायीची शिकार केली, ती पाठविली आहे. ती पाहण्यासाठी आणा म्हणून बादशहाने आज्ञा केली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली. ती आज्ञाः इनायतउल्लाखान (खालशाचा दिवाण) आणि दक्षिण सुभ्याचा दिवाण ह्यांना होती. ती अशी ——ज्या काही मागण्या असतील त्या पाकीटात बंद करून जुमदतुलमुल्क ह्यांना द्याव्यात. ते असदखान (मुख्य प्रधान) वरील अर्जातून निवडून काढून बादशहानी पाहण्याचे अर्ज बादशहाकडे पाठवतील. त्या पाकीटावर (लिफाफा) मोहर आणि शिक्का पाहिजे.

कामगारखान (माजी मुख्य प्रधान महंमद जाफरचा मुलगा औरंगजेबाचा मावसभाऊ नामदारखानाचा भाऊ) हा बादशहाच्या आज्ञेने बंगालमधून निघून बादशहाकडे येत होता. औरंगाबाद मुक्कामाहून त्याने विनंती लिहून पाठविली, ती विनंती—"मी औरंगाबादेस आलो आहे, येथे शहाजादे बेदारबक्त (औरंगजेबाचा नातू आझमचा मुलगा, औरंगाबादचा सुभेदार) आहेत त्यांच्या भेटीला मी जावे की नाही, काय आज्ञा." बादशहाने आज्ञा केली की, "भेटीस जावे." बादशहाने आणखी आज्ञा केली की, बेझारबक्तने कामगारखानाला लौकर हुजुरात पाठवावे. बादशहाने आज्ञा केली की, शंभर बेलदार आणि दोन पाणी वाहणारे ह्यांना झुल्फीकारखानाच्या फौजेत तैनात करण्यात यावे. निजामउद्दीनच्या मृत्यूने सदारक (न्याय आणि दान ह्या खात्याचे प्रमुख) ही जागा रिकामी होती. औरंगाबाद व गुलबर्गा ह्या दोन्ही ठिकाणांवर खाज्या अब्दुल फताह ह्याचा मुलगा खाजा आझीज ह्याची नेमणूक करण्यात आली.

अतिकउमेरखान ह्याचा मुलगा नसिरुद्दीन हा वऱ्हाडच्या सुभ्याच्या वाकेनवीसांचा कारभारी होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले होते. तो अद्याप हुजुरात आला नाही, असे कळविण्यात आले. फरारी म्हणून त्याची नोंद करावी अशी आज्ञा झाली.

ह्यानंतर मधेच २४ फेब्रुवारी १७०३, १८ शव्वाल सत्तेचाळीसावे वर्ष ह्या तारखेची नोंद आली आहे. त्यातील काही मजकूर पुढे लिहित आहे:—

सैय्यद राजी महंमद फौजदार, खंदोला ह्याने अर्ज लिहून पाठवून काही विनंत्या केल्या—

अनुक्रमणिका

(१) विनंती अशी: उदुर्रील ह्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे, विनंती मान्य करण्यात आली.

(२) घोड्यांना डाग देणे वगैरेतून माफी मिळावी, विनंती मान्य झाली,

(३) माझ्या मुलांना मनसबी मिळाव्यात, आज्ञा झाली, त्यांना पहावयाचे आहे, तर त्यांना हुजुरात पाठवावे.

(४) ह्या पुढील माझ्या विनंत्या मनसुरखानच्या मार्फत सादर करण्यात येतील, विनंती मान्य करण्यात यावी, (गावाचे वाचन नीट होत नाही. खंडोळा वगैरे काहीतरी असावे), राव मानसिंग ह्याला मायलदौंड (बहुधा दौंडचा परिसर असावा) ही ठाणेदारी देण्यात यावी. तेथे त्यापूर्वी अब्दुल रसूलखान हा ठाणेदार होता. प्रत्यक्ष जागेवर राव मानसिंगच्या भावाला नायब म्हणून नेमण्यात आले. त्याला अडीचशे स्वारांची मनसब होती. त्यात शंभर स्वारांची भर घालण्यात आली.

**पंचवीस फेब्रुवारी १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते. बऱ्हाणपूर (खानदेश) येथे नजाबतखान हा सुभेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. खानदेशच्या सुभेदारीवर, बादशहाने शहाजादा बेदारबख्त याची नेमणूक केली. बेदारबख्ताकडे औरंगाबादचा सुभाही होता. त्याला जोडून बेदारबख्ताला खानदेशाचीही सुभेदारी देण्यात आली. नजाबतखान याची बागलाण्याची फौजदारी कायम ठेवण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, बेदारबख्त याने खानदेशावर आपला नायब (डेप्युटी) म्हणून आपल्याला स्वतःला हवा तो मनुष्य निवडावा. हवे असल्यास नजाबतखानाला आपल्या सैन्यात ठेवावे नाहीतर त्याला त्याच्या बागलाणच्या फौजदारीवर पाठवून द्यावे.

घाटावरील नावा परत आणून घ्याव्यात आणि त्याच्यासाठी एक गुर्जबर्दार नेमण्यात यावा अशी आज्ञा करण्यात आली.

हत्तीखान्याचा अधिकारी हमीदोद्दीनखान बहादूर याने बादशहाना दाखविण्यासाठी दहा हत्ती आणले. बादशहाने त्यापैकी एक हत्ती मोहम्मद अमीनखान बहादूर (भावी निजामउल्मुल्काचा चुलत चुलता आणि मुगल साम्राज्याचा भावी मुख्य प्रधान) यांस दिला आणि तीन हत्ती शाहजादा मुइजुद्दीन (औरंगजेबाचा नातू आणि मुअज्ञमचा मुलगा, मुल्तानचा सुभेदार) याला दिले.

फकीरउल्ला यांस चांदोलाच्या फौजदारीवर नेमण्यात आले.

मुहंमद अमीनखान बहादूर यांस बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—"तयार रहा—नवाब झिनतउतन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) उदयपुरी महाल, (औरंगजेबाची बायको) आणि अंतःपुरातील इतर स्त्रिया यांना तळावरून ब्रह्मपुरीची छावणी आणावयाचे आहे. त्यासाठी मी तुम्हाला तळावर जाण्यास

निरोप देणार आहे. येथील हुजुरातून हत्ती, घोडे घेऊन जा आणि बहादूर गडात पोहोचवा.” बक्षी रूहुल्लाखान याने अमीनखानाच्या बरोबर देण्यात येणाऱ्या सैन्याचा तपशील (तूमार) तयार केला आणि बादशहासमोर ठेवला. फकीर मुहंमद, अईजुल्ला, शुक्रुल्ला हे गवंडी (मेमार, बांधकाम करणारे) अमीनखानाच्या बरोबर देण्यात आले. याशिवाय खजिन्यातून एक हजार रुपये देण्यात आले, हेतु हा कीं, बहादुरगड किल्ल्यात राहण्यासाठी असलेले वाडे, आवश्यक त्या ठिकाणी दुरुस्त करण्यात यावे.

**(शव्वाल वीस), सव्वीस फेब्रुवारी १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाना कळविण्यात आले की, मोर्चात (सिंहगडासमोर) सबा दहाना (शब्द लागत नाही). तयार करण्यात आला. काम चालू होते पण चोरांनी (मराठ्यांनी) वरून मोठमोठे दगड फेकले. त्यामुळे दहाना मोडून पडला. या चकमकीत पाच बादशाही सैनिक कामी आले.

**(सव्वाल एकवीस), सत्तावीस फेब्रुवारी १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी (अदालत) चे काम केले. नुरूद्दीनखान यांस मेकुंदा (किल्ल्याचे नाव लागत नाही) ची फौजदारी व किल्लेदारी देण्यात आली. यापूर्वी त्या किल्ल्यावर राम राठौड याचा मुलगा केशवदास हा होता. नुरूद्दीनखानाला निरोप देण्यात आला. इनायतउल्लाखान हा आजारी होता. बरा झाल्यावर तो येऊन बादशहाला भेटला. त्याचा मुलगा मीर जियाउल्ला याची मनसब वाढविण्यात आली.

**(शव्वाल बावीस) २८ फेब्रुवारी १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. रणमस्तखान हा कन्नडचा फौजदार होता (जिल्हे औरंगाबाद) त्याला होशंगाबादच्या फौजदारीवर नेमण्यात आले.

कोल्हापूरचा ठाणेदार इखलासखान हा होता. त्याच्या जागेवर नाहरखान यांस नेमण्यात आले. मलकापुरचा ठाणेदार अबू मुहंमद हा होता. त्याच्या जागेवर अबदुर्रवूफखान याची नेमणूक करण्यात आली.

अजीजखान याने विनंती केली की, माझ्या कुटुंबियांना राहण्यासाठी औरंगाबादेत मला एक वाडा देण्यात यावा, विनंती मान्य करण्यात आली.

नूरगड आणि तालीगड (?) चा बदललेला किल्लेदार आणि फौजदार आणि दिलावरखानाचा मुलगा दिलेरहिंमत याने विनंती लिहून पाठविली की, जग्गू नावाचा (जक्क) एक सरदार चारशे पायदळ शिपाई घेऊन किल्ल्याभोवती घिरट्या घालू लागला. मी शत्रूचे पारिपत्य केले. सरदाराला पकडले आहे. त्याला हुजूरात पाठवण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली कीं, एक पथक बरोबर देऊन त्याला हुजूरात पाठवावे. मार्गावरील फौजदारांनी आपापली पथके संरक्षणासाठी द्यावी.

अनुक्रमणिका

बादशहाना कळविण्यात आले की, इनायत अफगान हा माळव्यामध्ये धामधूम करीत होता. जमिनदारांच्या युद्धात तो नरकाला गेला.

निजीमसेवर देखरेख ठेवणारा अधिकारी (मुहटसिब) ख्वाजा महंमद त्याने विनंती केली की, बादशाहा छावनीत मनसबदारांच्या बाजारात धर्मनिषिद्ध कृत्ये चालतात. (विद्दत—धर्मनिषिद्ध करण्यात येणारी अनुचित गोष्ट) ही काढून टाकण्यात यावी तर ही निषिद्ध कृत्ये थांबतील. बादशहाने आज्ञा केली कीं, मनसबदारांचे बाजार बंद करण्यात यावेत आणि ते बादशाही बाजारात विलीन करण्यात यावेत.

**(शव्वाल तेवीस ) मार्च १७०३**

बादशाही आज दिवाण बंद ठेवले. ते हमीरूद्दीनखान बहादूर व मुहरमखान ह्यास म्हणाले "तुम्ही तर्बियतखानाच्या मोर्च्यावर जा आणि कोंडाण्याचे किल्ल्यावर तुमच्यासमोर तोफांचे गोळे सोडण्यास लावा. तर्बियतखानाला ताकीद देऊन हे काम करवा" बादशहाच्या आज्ञेप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

**(शव्वाल चोवीस) २ मार्च १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि चार घटीका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली.

मातबरखान (कल्याण-भिवंडीचा सुभेदार) ह्याच्या विनंतीवरून बादशहाने उदयकरणचा मुलगा छत्रसिंग ह्याला मातबरखानापाशी तैनात केले. त्याला (छत्रसिंगला) चारशे जाट आणि अडीचशे स्वाराची मनसब होती.

हमजाखानाचा मुलगा असदउल्ला हा पूर्वी अवसा (जिल्हा लातूर, मराठवाडा) येथे किल्लेदार होता. त्याची मनसब कमी करण्यात आली. त्याला अवशाहून बदलण्यात आले आणि हुजुरात बोलावण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, रूहुल्लाखान ह्याने ग्वाल्हेरचा फौजदार जाननिसारखान ह्यांस पुढीलप्रमाणे लिहावे—"माळव्याचा सुभेदार शाहीस्ताखान ह्याच्याकडे तुम्ही आपल्या मोठ्या मुलाबरोबर पाचशे स्वार आणि पाचशे पायदळ असे पथक पाठवावे."

तर्बियतखानाचा वकील ह्याने बादशहापाशी पुढीलप्रमाणे विनंती केली—"तर्बियतखानाचा बारा हजार रुपयाचा खनिजा हुजूरात येत होता त्यावेळी बऱ्हाणपूरचा कोतवाल आल्लायार बेग हा होता. त्याच्या काळात त्या रकमेची विल्हेवाट लागली आणि रक्कम नाहीशी झाली. हुजुरानी कोतवालाला आज्ञा करावी की, ही रक्कम काढून द्यावी. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"कोतवालानी रकमेचा भरणा केल्यास बरे, तसे न केल्यास त्यांच्या जामीनाकडून पैसे भरुन घ्यावेत, पाचशे स्वार व पाचशे पायदळ अशी शिबंदी माळव्याचा सुभेदार शायास्तेखान ह्यास देण्यात यावी.

नुसरतजंग (झुल्फीकारखान) ह्याचा नायब (डेप्युटी) दाऊदखान ह्याने केलेल्या विनंती प्रमाणे माधवकीर (किंवा गिर, नाव लागत नाही) ह्यास दोन हजारी मनसब देण्यात आली. नौकांचा प्रमुख (मीरबहर) सैफुलाखान ह्यांच्या विनंतीप्रमाणे मणूरच्या घाटावर (उतारावर) भीमाकाठ, (विजापूर-जिल्हा) असलेल्या नौकांच्या दुरुस्तीसाठी गुलाम मुईजुद्दीन, इनायतउल्लाखान व अब्दुलजलील ह्यांना

अनुक्रमणिका

पाठविण्यात आले. निरोपाच्या वेळी त्यांना एकेक शाल बक्षीस देण्यात आली. नांवा (नौका) हुजुरात आणण्यासाठी गुर्जबर्दार नेमण्यात आला. विजापूरचा सुभेदार चिनकिलीजखान (निजामउल्मुक आणि इंदापूरचा ठाणेदार मोगलखान आणि इतर फौजदार ह्यांनी संरक्षक पथके द्यावीत (बदरका) अशी आज्ञा झाली.

[**टीप**.—ह्या नंतरच्या नोंदी ज्या आल्या आहेत त्या जानेवारीच्या, आभ्यासकानी तारखांचे अवधान ठेवून ह्या नोंदी वाचाव्यात.]

**(रमझान——४७) ८ जानेवारी १७०३**

बादशहाने दिवाणचे काम बंद केले.

[वरील ४७ आकडा म्हणजे बादशहाच्या राज्यकारभाराचे ४७ वे वर्ष सुरू झाले असे समजावे]

**(२ रमझान) ९ जानेवारी १७०३**

आज दिवाण आणि न्याय कचेरी ह्या बंद होत्या.

**१० जानेवारी १७०३**

शहाजादा महंमद कामबक्ष ह्याने नवीन राज्यारोहन वर्षानिमित्त अभिनंदनाचे मुजरे केले. हरकऱ्यांच्या तोंडून कळते की, शिकारपूर (शिक्रपूर) येथील ठाणेदार खानचंद ह्याचा नायब (डेप्युटी) ह्याने ठाणे रिकामे सोडले आणि तो तेथून निघून गेला. बादशहाने त्याची मनसब कमी केली. मुहमंद अमीनखान बहादूर याने अर्ज केला की, "माझ्या बिरादरीचे लोक, खान फिरोजजंगच्या फौजेत मनसबदार म्हणून आहेत. त्यांना हुजूरात बोलावण्यात आले आहे, ते तेथेच (हुजुरात) राहावे" विनंती मान्य करण्यात आली.

बऱ्हाणपूरचा सुभेदार नजाबतखान याने अर्ज पाठवून काही विनंत्या केल्या त्या अशा.——

(१) माझ्यावर कृपा व्हावी, (आर्थिक सहाय्य मिळावे.) बादशहाने आज्ञा केली की, नजाबतखानाचा हुद्दा कळविण्यात यावा;

(२) एक हजार स्वार व एक हजार पायदळ शिबंदी देण्यात आली होती ती आता दोन हजार स्वार आणि पायदळ अशी पूर्वीप्रमाणे चालू ठेवावी. बादशहाने आज्ञा केली कीं, ठीक आहे. वर्षभर ही व्यवस्था चालू ठेवावी.

(३) मुल्हेर उर्फ औरंगगडचा किल्लेदार मीर मुहंमद याच्यावर कृपा व्हावी. बादशाहाने किल्लेदाराची मनसब वाढविली;

अनुक्रमणिका

(४) माझा नातेवाईक बहादुरचा मुलगा बेग यांस अकबरपूर जवळील नर्मदेच्या उतारावर अधिकारी म्हणून नेमण्यात यावे, विनंती मान्य करण्यात आली;

(५) खांडव्याचा फौजदार म्हणून सय्यद राजी मुहंमद याची नेमणूक व्हावी, विनंती मान्य झाली.

बादशहाना कळविण्यात आले की, राज्यकारभाराच्या सत्तेचाळीसाव्या वर्षाचे अभिनंदन करण्यासाठी अमीरउल्उमरा हे (मुख्य प्रधान असदखान) आले असून दिवाणेखास मध्ये बसले आहेत, आज्ञा झाली कीं, त्यांनी आता परत जावे. त्यांना एक मोसंबी बक्षीस म्हणून देण्यात आली.

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे काल हमीदोद्दीनखान बहादूर आणि मतलबखान हे किल्याजवळ (सिंहगड) गेले. किल्ल्याच्या दरवाजासमोर सर्फराजखान याचे ठाणे होते, तेथून सर्फराज खानाला काढून त्यांनी त्याला किल्ल्याच्या अलीकडे एका झाडापाशी तळ देण्यास लावले. किल्ल्यासमोरील ठाण्यावर अमानुल्लाखान याला कायम करण्यात आले. इतर ठाण्यांची पहाणी करुन ते दोघे परत आले आणि त्यांनी बादशहाला हकीकत कळवली. माणिकदौंडचा ठाणेदार मानसिंग राठौड याने अर्ज करुन काही सवलती द्याव्या म्हणून विनंती केली. ती मान्य करण्यात आली.

मुतुंजाबाद (मीरज) चा किल्लेदार मुहंमद बक्ष याने अर्ज करुन पुढील विनंत्या केल्या:—

(१) येथील फौजदारीवर माझा भाऊ बुऱ्हाणबेग याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात यावी. आणखी एक विनंती अशी की, किल्ल्याच्या भिंती मोडकळीला आल्या आहेत यावर काय आज्ञा? यावर बादशहाने आज्ञा केली कीं, खानेसामान (पुरवठा खात्याचा मुख्य अधिकारी) याने हे काम तडीस न्यावे.

## अकरा जानेवारी १७०३

भीमगडचा बदललेला किल्लेदार जोझारसिंग, दारोंद्याचा बदललेला किल्लेदार रहिमुद्दीन हे बादशहाला भेटले. मुमाल (शब्द लागत नाही) परगण्याचा देशमुख शिवाजी हा मुहरमखानाच्या मध्यस्थीने बादशहाना भेटला. त्याने निसार ओवाळणी म्हणून एक मोहोर बादशहापुढे ठेवली. त्याला एक शाल देण्यात आली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १२ जानेवारी इ. स. १७०३ ते ३ सप्टेंबर १७०३

### बारा जानेवारी १७०३

मिर्झाबेग हा नुकताच मध्य आशियातून आला होता, तो मुहंमद अमीनखानाच्या मध्यस्थीने बादशहाना भेटला. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे दिली आणि त्याला दोनशे स्वारांची मनसब दिली.

मुहंमद मोहसिन हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला एक हजार रुपये बक्षीस म्हणून देण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली कीं यक्कताजखान याला पूर्ववत बहाल करण्यात आले आहे. मुजऱ्यासाठी त्याने न्याय कचेरीत येत जात असावे.

मातबरखान (नाशिक, कल्याण व भिवंडी येथील अधिकारी) याने केलेल्या विनंतीप्रमाणे बादशहाने गोवर्धन (नाशिक जवळ) चा किल्लेदार अबूतुराव याच्या मनसबीत वाढ केली. वऱ्हाडचा बदललेला सुबेदार अलिमर्दानखान याने अर्ज पाठवला होता तो बादशहाच्यासमोर ठेवण्यात आला. त्याने आपल्या अर्जात म्हटले:—

> “नरसोजी भोसले (परसोजी असावे) हा मोठे सैन्य घेऊन वाशिम सरकार (जिल्हा) मधील मंगळूर (मगरूळ) खेड्यापाशी आला. इकडूनही (आमच्याकडून) लढ्याला तोंड लागले. लढाई हातघाईची झाली. शत्रूपैकी अनेक लोकांना नरकात पाठविण्यात आले. शत्रूचा पराजय झाला अन् आमचा विजय झाला.”

इरादतखान (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे. याची आत्या ही औरंगजेबाचा भाऊ शुजा याची बायको) याला बादशहाच्या छावणीपासून (सिंहगडासमोर) पुण्यापर्यंतच्या मार्गावर रक्षक ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या दिमतीला पन्नास बेलदार आणि इतर सरंजाम देण्यात यावा, अशी आज्ञा झाली.

हैद्राबाद-कर्नाटक प्रांतातून येणाऱ्या बातम्यावरून कळले की, पराणगड (नाव नक्की लागत नाही) किल्ल्याचा किल्लेदार पुरुषोत्तमसिंग याला त्याच्या पायदळ सैनिकांनी पगार बाकी थकली होती ती द्यावी म्हणून किल्लेदारावर हल्ला करून त्याला ठार मारले. बादशहाने आज्ञा केली कीं, बक्षी रूहुल्लाखान याने त्या जागेवर किल्लेदार म्हणून इतर कुणाची तरी नेमणूक करावी. बक्षी रूहुल्लाखान याने शाईस्ताखान (माळव्याचा सुभेदार) याच्या नावे पत्रे लिहिले की, बंडखोर हे सैन्य (स्वार व पायदळ) गोळा करून बंड करू इच्छितात तर तुम्ही फौजदार आणि जमिंनदार यांना बरोबर घ्यावे आणि बंडखोरांचे पारिपत्य करावे.

अनुक्रमणिका

केशवराव हरकारा याने वृत्त लिहून पाठवले कीं, शहाजादा मुहंमद बेदारबख्त हा शिकारीसाठी गेला होता. तो शव्वाल महिन्याच्या (२५) पंचवीस तारखेस बऱ्हाणपूर शहरात दाखल झाला. त्याचे सैन्य टेहळणीसाठी म्हणून बारा कोसावर गेले होते.

**(पाच रमजान) बारा जानेवारी १७०३**

लोहगड व पालिगड येथील नायब किल्लेदार याने लिहून पाठवले की, आपण शत्रूचा एक सरदार पकडला आहे आणि त्याला हुजुरात पाठविला आहे. माझा मुलगा वरणसिंग (कदाचित रणसिंग असावे) याला पालिगडची नायब किल्लेदारी देण्यात यावी. त्याला मनसबही देण्यात यावी. सदर विनंती बक्षी सदरूद्दिन मुहंमदखान याने बादशहासोर ठेवली. विनंती मान्य करण्यात आली.

बक्षी सदरूद्दीन याने दाभाडी (सुभे औरंगाबाद) येथील ठाणेदार मोतिकदखान याचा पुढील विनंती अर्ज बादशहासमोर ठेवला. अर्जात म्हटले होतेः—

> “शहाजादे मुहंमद बेदारबख्त बहादूर हे सहल आणि शिकार यासाठी माझ्या ठाण्यात आले होते. शिकार आटोपल्यावर त्यांनी मला एक घोडा बक्षीस दिला. तो मी घ्यावा किंवा नाही यासंबंधी आपली काय आज्ञा आहे.”

बादशहाने आज्ञा केली कीं, घोडा घ्यावा आणि शहाजादे बोलावतील तेव्हा त्यांच्या सेवेत हजर व्हावे.

मतलबखानाने पुढील विनंती अर्ज केलाः—

> “मन्सूरखानाच्या मोहरेचे परवानगीपत्र आमच्या कार्यालयात आले आहे. त्यात म्हटले आहे कीं, बहादुरगड (पेडगाव) चा बदललेला बक्षी व वाकेनवीस मुहंमद हुसेन हा कामाचा माणूस आहे. आपल्याला त्याचे कामावर बहाल ठेवण्यात यावे अशी त्याची विनंती आहे.”

बादशहाने विनंती मान्य केली. त्या माणसाची मनसब वाढविण्यात आली. त्याला सांगण्यात आले कीं, त्याने स्वतः हुजुरात रहावे आणि त्याचा नायब (Deputy)त्याने नंदगाव येथे रहावे.

रामजी हा तर्बियतखान (तोफखान्याचा प्रमुख सिंहगडसमोरील मोगल सैन्याचा अधिकारी) ह्याचा कारकून होता. त्याची मनसब कमी करण्यात आली.

जुन्नर (शिवनेरीचा किल्लेदार व फौजदार) नसरुल्लाखान हा बादशाही छावणीपाशी आला. छावणीतील रेहकलाबार (शस्त्रे ठेवण्याचा तळ) येथे येऊन थांबण्यासाठी (दस्तक) परवानगी पत्र हवे असे त्याच्या वकीलाने सांगितले. बादशहाने आज्ञा केली की, दस्तक देण्यात यावे.

बादशाही छावणीचा कोतवाल चरबराहखान ह्याला आज्ञा करण्यात आली की, बादशाही छावणीच्या भोवती भिंत (अहाता-कंपौंड) घालण्यात यावी.

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, अब्दुल हमीदखान व इतर चारशे स्वार ह्याना मोगलखानापाशी तैनात करण्यात यावी.

[**टीप.**——ह्या पुढील नोंदी एप्रिल महिन्याच्या दिसतात.]

**सात एप्रिल १७०३**

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे तळकोकणचा पीरजादा सैय्यद कुतुबुद्दीन आणि इतर मंडळी ही आली. यारअलीबेग याने दुपारच्या नमाजानंतर त्यांना बादशहापुढे आणले. त्यांनी बादशहांना पेशकस व निशाद दिले.

काल रात्री हलकाऱ्यांच्या तोंडून कळले की, सुलेमान खान, ख्वाजाखान व तुर्कताजखान, ह्यांनी हलकट शत्रूंशी (मराठ्यांची) लढाई करुन यांचे पारिपत्य केले. शत्रू पुण्याच्या पलीकडे गेले. पुढे बादशहानी आज्ञा केली की, बक्षीरुल्लाखान, हमीरुद्दीनखान बहादूर, वगैरेंनी हुजुरातून सैन्य घेऊन जावे व शत्रूंचे पारिपत्य करावे ही बातमी कळली ह्या वर शत्रू (मराठे) पळून गेले. त्यामुळे बादशहाने आज्ञा केली की, बक्षीरुल्लाखान आणि हमीरुद्दीनखान बहादूर ह्यांनी हुजुरात परत यावे. त्याप्रमाणे ते परत आले. त्यांनी बादशहाना कळविले कीं, पुण्यापासून १८ कोस पुढे जाऊन सुलेमानखान आणि ख्वाजाखान ह्यानी शत्रूशी लढाई करुन उत्कृष्ट कामगिरी बजावली” बादशहा म्हणाले सेवेचा मजुरा झाला. (सेवा मान्य झाली.)

खुस्त्रबखान ह्याने पुढीलप्रमाणे अर्ज केला—“मला दगडामुळे तीन जखमा झाल्या आहेत. (मराठ्यांनी फेकून केलेल्या) मला तीन महिन्याची रजा देण्यात यावी”, बादशहांनी विनंती मान्य केली.

बादशहाने आज्ञा केली कीं, बाणाचे एकशेएक भाते व पन्नास धनुष्ये हमीमउद्दीनखान ह्यांच्या मोर्च्यात त्यांच्या हवाली करण्यात यावेत.

ख्वाजाहशीम गुर्जबर्दार (वेत्रधारी) ह्याला मुर्तजानगर (मीरज) येथे फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. त्या पूर्वीचा तेथील किल्लेदार हबीबउल्ला ह्यास मुस्तफानगरची किल्लेदारी देण्यात आली. नळदूर्ग (उस्मानाबाद जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार मुहतशमखान ह्यास काही सवलती देण्यात आल्या.

बादशहाने विचारले “कंधारचा मुस्तोफी (अधिकारी) मीर महंमद मीहदी कुठे आहे”? कळविण्यात आले की, जो मोगलखानाच्या काफील्यात गेला आहे. बेळगावचा किल्लेदार आणि मरहूम शेखचा मुलगा फक्रुद्दीन हा हुजुरात येउन बादशहाना भेटला. त्याने दोन धनुष्ये बादशहाना पेशकस म्हणून दिली.

[**टीप**.— ह्या पुढील नोंद फेब्रुवारीची आहे.]

**(१५ शव्वाल) एकवीस फेब्रुवारी १७०३**

अनुक्रमणिका

आज बादशहाने दिवाण बंद ठेवले. शेख गुलाम महमद उर्फ बाले (पूर्वीचे नाव बाळाराम असावे) ह्यास पुढीलप्रमाणे खानसामाच्या खात्याचा वाकेनवीस म्हणून त्या खात्याच्या कामावर लक्ष ठेवण्यास सांगण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, काफरांची (मराठ्यांची) पथके बादशाही छावणीभोवती पसरली आहेत. बादशहानी आज्ञा केली की, बक्षी रूहुलखान आणि हमीरुद्दीनखान बहादूर ह्यांनी सैन्य आणि सैनिकांची यादी तयार करावी (तुमार) आणि बादशाही छावणीचा कोतवाल सरबराहखान ह्याने बादशाही छावणीच्याभोवती मोर्चे उभे केले होते. त्याच्या भिंती नीट कराव्यात.

**बावीस फेब्रुवारी १७०३**

दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. नळदुर्गचा किल्लेदार मुहतशमखान ह्यास नळदुर्ग कडे जाण्यास निरोप देण्यात आला. त्याला खिलातीची वस्त्रे आणि एक घोडा बक्षीस म्हणून देण्यात आली. त्यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली. मीर अलीखान ह्यास अली कबीरच्या जागी ब्ऱ्हाणपूरचा वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

बहादूरगड (पेडगाव) येंथील बक्षी व वाकेनवीस मोहमद हुसेन ह्याला त्र्यंबक (जिल्हा-नाशिक) येथील किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. आणि त्याची मनसब वाढविण्यात आली. अबुलकासिम उर्फ मोतीकदखान ह्यास मुख्लीसखान अशी पदवी देण्यात आली. त्यास पूर्वी बडतर्फ करण्यात आले होते. पुन्हा बहाल करण्यात येऊन पुढील पदवी देण्यात आली.

मरहूम कदीम कुलीखान याचा मुलगा आणि हनुमंतगडचा किल्लेदार हादीअलीखान यास ठाणेदारी देण्यात आली आणि त्याची मनसब वाढविण्यात आली होती. तो हुकुम तहकुब करण्यात येऊन ती ठाणेदारी मातबरखान याच्याकडे (कल्याण-भिवंडीचा आधकारी) देण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले कीं, छावणीतील सैनिक आणि इतर माणसे ही लाकुड-फाटा आणि घासदाणा आणण्यासाठी जातात तेव्हा चोर त्यांच्यावर हल्ला करतात आणि त्यांना लुटतात. अशा प्रसंगी काय आज्ञा! आज्ञा झाली कीं, चोरांना (मराठ्यांना) कोतवालीवर नेऊन त्यांची डोकी उडविण्यात यावी.

**(१७ शव्वाल) तेवीस फेब्रुवारी १७०३**

शिकाकोळ (आन्ध्रप्रदेश) येथील बातम्यावरुन कळले की, “सुभे हैद्राबादेत असलेल्या मुर्तजानगर किल्ल्यावर बंडखोर पिदिया याने ताबा मिळविला आहे. तो प्रांतात धामधूम करीत आहे.” ही बातमी कळल्यावर बादशहाने तेथील फौजदार रुस्तुमदिलखान याची मनसब कमी केली.

चीन कुलीजखानबहादूर (भावी निजामउल्मुल्क) हा विजापूरचा सुभेदार आणि अधोनी (इम्तियाजगड—अधोनी हे गुंतगल जंकशन जवळ आहे) चा फौजदार होता. त्याच्याकडून अधोनीची फौजदारी काढून घेण्यात आली. त्याप्रमाणात त्याची मनसब कमी करण्यात आली.

अनुक्रमणिका

## (१८ शव्वाल) चोवीस फेब्रुवारी १७०३

दिवसाचा एक प्रहर अन् चार घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरीचे काम सुरू केले. बादशहाने आज्ञा केली की, बांधकाम खात्याचा अधिकारी शुक्रुल्ला याने बहादुरगडास जावे आणि तेथील महालांची डागडूजी व दुरुस्ती करावी. औरंगाबादचा सुभेदार शहाजादा बेदारबख्त याने सुल्तान बेदारदिल (बेदारबख्याचा मुलगा) याच्या खतना (सुंता) च्या समारंभाच्या निमित्ताने बादशहाकडे जवाहिराची पेटी पाठविली, ती बादशहाच्या नजरेखालून गेली. बादशहाने बेदारबख्ताच्या नावे फर्मान आणि खिलातीची वस्त्रे पाठविली.

मेहदीखान यास मनसबीवर पुन्हा बहाल करण्यात आले. त्याला चीनकुलीजखान याच्या फौजेत तैनात करण्यात आले. दाऊदखानाच्या (पन्नी) बिरादरीपैकी असलेला सुलेमानखान याला हुजुरात बोलावण्यात आले होते. त्याला चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. रणदुल्लाखानाचा भाऊ मुहंमद लतीफ याला खान ही पदवी देण्यात आली.

राव मानसिंग जाधव (शिन्दखेडकर जाधव) याचा भाऊ दयाची (दत्ताजी) यास आपल्या भावाचा नायब म्हणून केम (नाव लागत नाही) वगैरेच्या ठाण्यावर नेमण्यात आले. त्याच्या मनसबीत पन्नास स्वाराची वाढ करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली कीं, फाजिल गुर्जबर्दार याने जाऊन बद्रीच्या घाटावर नांवा आणाव्यात. चीनकुलीजखान व मुगलखान याने फाजिलखानाला संरक्षक पथके द्यावी. (बदरका—संरक्षक पथके)

शिवापूर (पुण्याजवळ) च्या ठाण्यावर अमानुल्लाखान याच्या ऐवजी उजबेगखान याची नेमणूक झाली होती. त्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला.—“मला तोफा आणि इतर सरंजाम देण्यात यावा. जुनी (माझी) जागीर तनखा म्हणून कायम करण्यात यावी. गंधक व दारू देण्यात यावी. बेलदार व रुक्का (पाणी पुरविणारे) देण्यात यावेत.” विनंती मान्य करण्यात आली.

## (१९ शव्वाल) पंचवीस फेब्रुवारी १७०३

काल बादशहाने पुढीलप्रमाणे खान फिरोजजंगच्या नावे आज्ञा पाठविली. आज्ञेतील मजकूर असा होता–“नवाब जिनतुन्नीसा बेगम (औरंगाजेबाची मुलगी) या इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) हून बहादुरगडला येतील. त्यांना बहादुरगडला पोचवून मग गनिमांच्या (मराठ्यांच्या) पाठलागास जावे.”ब्रह्मपुरीच्या तळावर खिदमतगारखान हा नाझर (देखरेख ठेवणार) म्हणून काम करीत होता. त्याला आज्ञा करण्यात आली की, जिनतुन्नीसा बेगम आणि अंतपुरातील इतर स्त्रिया ह्यांच्याबरोबर ब्रह्मपुरी ते बहादूरगडच्या स्वारीत त्याने रहावे.

शहजादा महंमद बेदारबख्त (औरंगाबादचा सुभेदार) याला बऱ्हाणपुरीची (खानदेश) पण सुभेदारी देण्यात आली. खानदेशच्या पूर्वीचा सुभेदार नजाबदखान ह्याला बागलाणाच्या फौजदारीवर कायम करण्यात आले. नळदूर्गचा बदललेला किल्लेदार व फौजदार कासीमखान ह्याला गड (शब्द लागत नाही) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. आता त्या गडाची किल्लेदारीही त्याला देण्यात आली.

अनुक्रमणिका

पूर्वीचा किल्लेदार शरीफखान ह्याला कंधार (नांदेड जिल्हा, मराठवाडा) येथील किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले.

## (२० शव्वाल) सव्वीस फेब्रुवारी १७०३

बादशहानी मोहमंद अमीनखान बहादूर ह्यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"पन्नास हत्ती आणि इतर सरंजाम बरोबर घेऊन तुम्ही इस्लामपुरीस जावे (ब्रह्मपूरी) तेथून नवाब जिनतुन्नीसा बेगम ह्या बहादुरगडास येतील."

कोल्हापूरचा ठाणेदार इखलासखान ह्याच्या पत्रावरून पुढीलप्रमाणे कळले—"फत्तेउल्लाखान बहादूर यांनी मला पुढीलप्रमाणे आज्ञा केली आहे." "कोल्हापूरची ठाणेदारी आणि बेनीशाहदूर्ग (पन्हाळगड) पासून बेलगावपर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्याचे काम (राहदारी) ही कामे तुमच्या ऐवजी नाहरखानाकडे देण्यात आली आहेत. तुम्ही आमच्याबरोबर यावे. पण अशा प्रकारची आज्ञा आपल्याकडून मला झाली नाही. फत्तेउल्लाखानची वागणूक माझ्याशी अगदी गैर आहे. असा मी काय अपराध केला आहे बरे? त्याने असे माझ्याशी गैरवर्तन करावे, मला हुजुरात बोलावून घ्यावे आणि शक्य असल्यास सेवकात सामील करुन घ्यावे."

बादशहाने आज्ञा केली की, "इखलासखान ह्यास चिनकुलीजखान (भावी निजाममुल्क) ह्याच्या सैन्यात तैनात करण्यात यावे. त्याने तिकडे जावे अगर हुजुरात यावे.

## (२१ शव्वाल) सत्तावीस फेब्रुवारी १७०३

मीरनुरूद्दीन याला पेनुकोंडा (आंध्रप्रदेश, अनंतपूर जिल्हा) येथील किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला खान ही पदवी देण्यात आली. महंमद अमीनखान बहादूर ह्याच्या बिरादरीतील ऐवज बेग (?) ह्याची मनसब वाढविण्यात आली.

## (२२ शव्वाल) अठ्ठावीस फेब्रुवारी १७०३

बादशहाना कळविण्यात आले की, जनकोजी बंडखोर (मराठा) हा ४०० स्वार बरोबर घेऊन दुष्ट हेतु मनात धरून पालीगड (जिल्हा रायगड) च्या पायथ्याशी आला होता. पालीगडचा किल्लेदार सेनापत ह्याने आपली पथके पाठवून त्याचे पारिपत्य केले आणि त्याला जिवंत पकडले. त्यासंबंधी पुढील आज्ञा काय? बादशहाने आज्ञा केली की, सेनापती ह्याने आपली पथके बरोबर घेऊन बंडखोरास हुजुरात पाठवावे.

फतेउल्लाखान बहादूर ह्याच्या फौजत तैनात असलेला नाहरखान ह्यास कोल्हापूर वगैरेची ठाणेदारी देण्यात आली. पूर्वीचा ठाणेदार इखलासखान ह्यास वगळण्यात आले. बुऱ्हाणउद्दीनच्या मुलाला पन्हाळगडची किल्लेदारी देण्यात आली. लतीफउल्ला ह्याची मनसब वाढविण्यात आली. हत्तीखान्यावर (पीलखाना) नारायणदास हा मुसरफ (अधिकारी) होता. त्याला त्या जागेवरून बदलण्यात आले. त्या

अनुक्रमणिका

जागेवर फराजखान्याचा मुशरफ मुहंमद हाबी ह्याला त्याच्या पूर्वीच्या जागेवर नेमण्यात आले. नारायणदासला दुसरी जागा देण्यात यावी, अशी आज्ञा झाली.

## (२३ शव्वाल) एक मार्च १७०३

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले. अहमदनगरहून आलेल्या बातम्यावरून पुढील हकीगत कळली. नारो व शंभा वगैरे मराठे सरदार हे मोठे सैन्य घेऊन शेख रमझान (कानिफनाथ कीसगांव मढी—नगर जिल्हा) च्या रोझाकडे (दर्ग्याकडे) जाण्याचा हेतु धरून अहमदनगरपासून १२ कोसावर कत्तुर ह्या गावी पसरले. त्या भागातील रयत ही घाबरून अहमदनगरला येत आहे. बादशहाने आज्ञा केली की, रुहुल्लाखान ह्याने ह्या बाबतीत मोगलखान ह्यांस लिहावे. नरगुंद्याचा किल्लेदार आणि रामसिंग राठोड याचा मुलगा केशवदास ह्याला येथून बदलण्यात आले. त्याची मनसब थोडी कमी करण्यात आली.

[**टीप.**—यापुढील नोंदी सलगपणे जून महिन्याच्या आहेत. या महिन्यात बादशहा पुण्याच्या छावणीत आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे.]

## आठ जून १७०३

काल संध्याकाळी ख्वाजा मसूदमहली याने पुढीलप्रमाणे कळविले—"मरहूम अधरखानाचा नातू आणि डाव्या फळीच्या आघाडीचा अधिकारी शमशीरबेग याने युद्ध केले. पालकर (?) सरदार याने चौक्याजवळून गाई व उंट पळविले. चार कोसपर्यत शत्रूंचा पाठलाग करण्यात आला. (मराठ्यांचा) शमशीर बेगच्या सोबत्यापैकी एकजण ठार व पाच माणसे जखमी झाली. शत्रूचे (येथे निंबाळकर हा शब्द वाचता येतो, कदाचित हणमंतराव निंबाळकर असावे.) सैन्य बरेच असल्यामुळे शमशीरबेगला परत यावे लागले. बादशहाने शमशीरबेगला सोळा होन आणि काही सोने बक्षीस म्हणून दिले.

रुहुल्लाखान हा शत्रूंच्या (मराठ्यांच्या ) पारिपत्यासाठी गेला होता. त्याने वृत्तांत पाठविला. तो बादशहाच्या नजरेखालून गेला. शेख मिहरुल्ला (हा मिहरचंदचा मिहरुल्ला झाला होता) याचा मुलगा भागमल याला तोफखान्याचा शिरस्तेदार म्हणून नेमण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, ख्वाजालालची मुले ही घासदाणा आणण्यासाठी गेली होती. बादशहानी त्यांना आठ होन व पाच अश्रफ्या बक्षीस म्हणून दिल्या.

बादशाही छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याने पुढीलप्रमाणे कळविले—तीन चोर (मराठे) हे छावणीतील सैनिकांचे घोडे पळवून नेत होते. कोतवालीच्या लोकांनी त्यांना पकडले. बादशहानी आज्ञा केली की, त्यांना कैद करण्यात येऊन त्यांचे पारिपत्य करण्यात यावे.

## नऊ जून १७०३

औरंगाबादेत बादशाही फौजा तैनात होत्या. तेथील तोफखान्याचा दारोगा म्हणून मकसूदबेग याची नेमणूक करण्यात आली. मरहूम अधरखान याचा नातू शमशीरबेग हा हुजूरात आला. त्याला एक घोडा

बक्षीस देण्यात आला. मुहतशमखान नळदुर्गचा किल्लेदार याचा मुलगा मुहंमद खान हा ब्रह्मपुरीच्या तळावरून आला होता. तो हुजुरात येऊन बादशहाना भेटला. विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले.

दिवाणचे काम आटोपल्यानंतर बादशहानी तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान यास बोलावू पाठविले. बहादुरगड येथील तळाबद्दल खबरदारी बाळगण्याचे काम त्याच्याकडे देण्यात आले. त्यापूर्वी ते काम नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्याकडे होते. बादशहाने आज्ञा केली की, नुसरतजंग याने धनाजी जाधवच्या पाठलागावर जावे.

बक्षी रूहुल्लाखान हा सैन्य घेऊन शत्रूंच्या पारिपत्यासाठी बादशाही छावणीपासून दहा कोसावरील बोरघाट (नूरघाट असेही वाचन होऊ शकेल), बादशहाना कळविण्यात आले की, त्याच्या सैन्यात धान्याचे दुर्भिक्ष आहे. धान्य अतिशय महाग झाले आहे. बादशहाने आज्ञा केली की, अडीचशे बैलावर धान्याच्या गोण्या लादून रसद बक्षीच्या सैन्यात पाठविण्यात याव्या. हे काम फकीर मुहंमद याने पार पाडून छावणीत परत यावे.

### दहा जून १७०३

बादशहाने सकाळी हमीदोद्दीनखान बहादूर यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"तुम्ही सैन्य घेऊन जा आणि बादशाही परिसरात टेहळणी करीत रहा." त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान बहादूर सैन्य घेऊन गेला आणि दिवसभर टेहळणी करून परत आला.

### अकरा जून १७०३

सर्फराजखान हा परंड्याचा किल्लेदार व फौजदार होता. त्याचा मुलगा निजामउद्दीन हा परंड्याहून आला आणि बादशहाना भेटला.

बादशहाना कळविण्यात आले की, छावणीभोवती टेहळणी करण्यासाठी मुहंमद अमीनखान हा गेला आहे. बादशहाने आज्ञा केली की, एक दिवस अमीनखान तर एक दिवस हमीदोद्दीनखान यांनी छावणीभोवती टेहळणी करण्यास जात जावे. तरबियतखानाला बहादुरगडची खबरदारी बाळगण्यासाठी पाठविण्यात आले होते. त्याच्या सैन्याचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नुरमहंमद यांस नेमण्यात आले. तरबियतखानाकडे बादशाही छावणीतील चौथ्या चौकी पहाऱ्याच्या मुख्याधिकाराचे काम होते. ते काम सदरूद्दीन मुहंमदखान बक्षी यांच्याकडे देण्यात आले.

मुहंमद रफी याने गुलाब आणले. त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. बादशहाना कळविण्यात आले की, त्याच्या आज्ञेप्रमाणे अडीचशे बैलावर धान्याची रसद लादून बादशाही छावणीपासून चौदा कोसांवर भीमेच्या अलीकडे असलेल्या रुहुल्लाखान याजकडे पाठविण्यात आली.

ख्वाजा अबुलफतूह हा नुकसान मध्य आशियातून आला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

अनुक्रमणिका

## (तेरा सफर) सतरा जून १७०३

काल रात्री बादशहानी इरादतखान यास बोलाविले (इरादतखानाची आत्या ही औरंगजेबाची भावजय, शुजाची बायको, इरादतखानचा आजा, आजमखान दक्षिणचा सुभेदार १६३०, बाप अयोध्येचा सुभेदार, इरादतखानाचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.) आणि त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"उत्तरेकडून येत असलेला काफिला पारनेर (शब्द नीट लागत नाही, कदाचित बारनेर असू शकेल) पर्यंत आला आहे. तो घेऊन या." बादशहाने त्याला निरोप दिला. बादशहाने आज्ञा केली की, इरादतखानाच्या बरोबर पन्नास गुर्जबर्दार, पन्नास खवासीची माणसे, चार हेर (जासूस) आणि शिसे, गंधक व दारू ही देण्यात यावी.

## (चौदा सफर) अठरा जून १७०३

मुहंमद रफी यास औरंगाबादची कोतवाली आणि बयूतात (सरकारी मालमत्ता) हे अधिकार देण्यात आले. त्याला खान ही पदवी देण्यात आली. मरहूम लुत्फुल्लाखान (भावी निजामउल्मुल्काचा मामा) याचा मुलगा इनायतखान, मुनीमखान (हा पुढे मुगल साम्राज्याचा मुख्य प्रधान झाला.) आणि मुहंमद काजिम हे बादशहाला भेटले.

बक्षीखान हा मंगळवेढ्याचा किल्लेदार होता. त्याच्या ऐवजी मुहंमद आकिल गुर्जबर्दार याची किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. मंगळवेढ्याची फौजदारी व कानूनगोई याची वेगळी व्यवस्था करण्यात आली. बक्षीशबेग गुर्जबर्दार हा बादशहाचे फर्मान घेऊन रुहुल्लाखान याजकडे गेला होता. उत्तर घेऊन तो परत आला. त्याने सांगितले की, रुहुल्लाखान हे हुजुरात येत आहेत.

मन्सूरखान हा बक्षिंदाबक्ष (सिंहगड) वरून येऊन बादशहाना भेटला. बादशहाने तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याची मोहोर (शिक्का) त्याच्या (मन्सूरखान) हवाली केली.

## (पंधरा सफर) एकोणवीस जून १७०३

बक्षी रूहुल्लाखान हा फौज घेऊन धनाजी जाधव वगैरे शत्रूच्या पारिपत्यासाठी भीमेच्या काठापर्यं गेला होता. तो हुजूरात येऊन बादशहाना भेटला. त्याचे बरोबरचे पुढील सहकारीही बादशहाला भेटले.—(१) अजीजखान, (२) शिवासिंग, (३) अकदीखान, (४) मेंहदीखान, (५) आनंदसिंग, (६) सिद्दीमुरादखान, (७) सिद्दीबुलाकीखान, (८) लोदीखान, (९) सय्यदखान, (१०) जाफ्ररखान, (११) मेहंदीखानाचा मुलगा मुहंमद हसन, (१२) सय्यद मुगलखान, (१३) सुलेमानखान.

मन्सूरखानाचा मुलगा हसनखान (?) हा लाखउमरा व कडूस येथे ठाणेदार होता. त्याची मनसब वाढविण्यात आली. बादशहा मुनीमखानाला म्हणाले.—"फत्तेउल्लाखान बहादूर याला काबुलच्या तैनातीवर रवाना करा." काल बादशहाने हिदायतकेश वाकेनिगार यांस म्हटले––की, हुजुरापासून कोरेगाव, चाकण आणि शिक्रापूर यांचे अंतर काय आहे, ते कळवावे"

औरंगाबादच्या बातम्यावरून कळले की, कामगारखान (माजी पंतप्रधान जाफर याचा मुलगा, बादशहाचा मावस भाऊ) हा मोहरमच्या सत्तावीस तारखेस शहाजादा बेदारबख्त यास भेटला. त्यांनी

अनुक्रमणिका

त्याला खिलातीची वस्त्रे व घोडा ही देऊन हुजूरात रवाना केले. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—"की आज्ञेप्रमाणे व्यंकोजी (शिवाजी महारांजाचे बंधू, तंजावरकर) यांचा मुलगा रायभान, शंकराजीच्या बिरादरीचे प्रतापजी वगैरे मंडळी ही बादशहाना मुजरा करण्यासाठी न्यायकचेरी सुरू होण्याच्यापूर्वी हजर झाली आहेत." बादशहाने आज्ञा केली की, "नेकनामखान याने त्याला (रायभानला) हुजुरात आणावे." त्याप्रमाणे त्याने (रायभानाने) न्यायकचेरीच्या मार्गाने बक्षी रुहुल्लाखानाच्या तळाजवळ बादशहाची भेट घेतली. रायभानाने पन्नास मोहरा निसार (ओवाळणी) म्हणून पुढे ठेवल्या. त्याला खिलातीची वस्त्रे, एक हत्ती, सोनेरी खोगीर व साज असलेला घोडा आणि दोन हजार रुपये रोख ही देण्यात आली. त्याला सहा हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब देण्यात येऊन त्याला ध्वज व नगारे यांचा मान देण्यात आला.

### वीस जून १७०३

आज दिवाण कचेऱ्या बंद ठेवण्यात आल्या.

### एकवीस जून १७०३

नवाब गोहरआरा बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिने दिल्लीहून काही भेटी पाठविल्या होत्या त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्लेदार व फौजदार देवीसिंग याने अर्ज पाठवून पुढीलप्रमाणे विनंती केली:—

(१) काही कृपा व्हावी, बादशहाने त्याची मनसब वाढविली,

(२) दुआब खुराक याची माफी मिळावी, विनंती मान्य करण्यात आली.

(३) मदत म्हणून दहा हजार रुपये देण्यात यावे, विनंती अमान्य करण्यात आली.

अमीरउल्‌उमरा (मुख्य प्रधान असद्‌खान) याने विनंती केली की, "कामगारखान (बादशहाचा मावस भाऊ) हा औरंगाबादेत असून आर्थिक अडचणीत आहे." बादशहाने आज्ञा केली की, "औरगांबाद येथील खजिन्यातून कामगारखानाला दहा हजार रुपये देण्यात यावेत.

केशवराम हरकारा हा औरंगाबादेत तैनात होता. त्याने पुढीलप्रमाणे बातमी पाठविली:—

"शहाजादा मुहंमद बेदारबख्त (औरंगजेबाचा नातू आणि औरंगाबादेचा सुभेदार) याला कळले की, नेमाजी शिंदे वगैरे (मराठे) सरदार हे पंधरा हजार स्वारांचे सैन्य घेऊन देऊळघाटकडे गेले आहेत. हे ऐकून बेदारबख्त याने राजा जयसिंग, मीर अहंमदखान बक्षी वाकेनवीस अब्दुलहादीखान वगैरे मंडळीना (ही औरंगाबादेत तैनात होती.) बक्षिसे देऊन चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी रवाना केले."

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद अमीनखान बहादूर व हमीदोद्दीनखान बहादूर यांनी पाळीपाळीने बादशाही छावणीभोवती टेहळणी आणि गस्त घालण्यासाठी जात जावे.

**बावीस जून १७०३**

बादशहाने आज दिवाणचे काम बंद ठेवले.

**तेवीस जून १७०३**

बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्ते झाल्याबद्दल गोहरआराबेगम हिने ख्वाजा मंजूर याच्याबरोबर एक हजार मोहरा बादशहाकडे पाठविल्या होत्या. ख्वाजामंजूर हा बादशहाना भेटला.

नौकांचा प्रमुख मीर बहर सैफुल्लाखान याने खाननुसरतजंग (झुल्फिकारखान) यांस भीमा पार करविले होते. तो (सैफुल्लाखान) येऊन बादशहाला भेटला. मरहूम सिकंदरखान विजापूरी (विजापूरचा माजी बादशहा सिकंदर आदिलशहा) याचा मुलगा मुहंमद अली याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

मुहंमद मुरादखान (इतिहासकार खाफीखान याचा मित्र) याचा भाचा सुल्तान हुसेन हा रायभानला (व्यंकोजीराजे यांचा मुलगा) याला आणण्यासाठी गेला होता तो येऊन बादशहाला भेटला. त्याची मनसब वाढविण्यात आली.

नुसरतजंग (झुल्फिकारखान) याने शत्रूचे (मराठ्याचे) पारिपत्य करावे, अशा अर्थाचे आज्ञापत्र त्याच्या नावे पाठविण्यात आले.

मुहंमद कासिम कम्बू याचा मुलगा मुहंमद आशिक याला इस्लामाबाद उर्फ मथूरा येथे काजी म्हणून नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, रायभान (भोसले) याला शहाजादा मुहंमद कामबक्ष याच्या भेटीस न्यावे. शहाजादा जे देईल ते त्याने घ्यावे. नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या शिफारशीप्रमाणे मेहदीबेग याची चारशेच्या मनसबीवर नेमणूक करण्यात आली.

**चोवीस जून १७०३**

बादशहाना हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे:—

> नुसरतजंग (झुल्फिकारखान) हा बहादुरगड येथे होता. आज्ञेप्रमाणे तरबियतखान हा बहादुरगडला जाऊन पोहोचला. त्याला बहादुरगडास सोडून नुसरतजंग (झुल्फिकारखान) हा धनाजी जाधव याच्या पारिपत्यासाठी निघाला. गुरवारी त्याने भीमानदी ओलांडली. धनाजी जाधवने तळ हलवून पलायन केले आणि तो दहा कोस पुढे निघून गेला."

अनुक्रमणिका

खान फिरोजजंग याचे पत्र आले, ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रुहुल्लाखान, हमीदोद्दीनखान बहादूर आणि मुहंमद अमीनखान बहादूर यांनी पाळीपाळीने बादशाही छावणीभोवती टेहळणी आणि गस्त घालण्यासाठी जात जावे.

**पंचवीस जून १७०३**

ख्वाजा फरीदूनचा मुलगा अब्दुल अलावल हा नुसरतजंग झुल्फिकारखान याच्या सैन्यात तैनात होता. तो येऊन बादशहाला भेटला. त्याने परत आपल्या जागेवर जावे अशी आज्ञा करण्यात आली. इस्लामपुरी उर्फ रामपूर येथील जमिनदार राजा इस्लामखान (रतनसिंग चंद्रावतचा मुसलमान झालेला मुलगा) याचे विनंती अर्ज आले ते बादशहाने नजरेखालून घातले.

मंगळवेढ्याचा माजी किल्लेदार व फौजदार बक्षीखान याचे सहकारी सैफुल्ला व अमानुल्लाबेग यांना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान हा शत्रूच्या पारिपत्यासाठी रायबाग व हुक्केरी भागात आला होता. त्याच्याकडे गुर्जबर्दाराने बादशहाचे फर्मान नेऊन पोहोचविले. नंतर तो (गुर्जबर्दार) परत आला. गुर्जबर्दाराच्या तोंडून कळले की, त्या भागात (रायबाग, हुक्केरी) चोरांचा (मराठ्यांचा) बराच जमाव पसरला आहे. चीन कुलीजखानाने त्याचे पारिपत्य करण्यासाठी आपली पथके नेमली आहेत.

हरकऱ्यांच्या तोंडून कळले ते असे:—

"चोरांची (मराठ्यांची) पथके भूलत (? नाव लागत नाही.) भागात पसरली आहेत.

बादशाही छावणीतील लोक घासदाणा आणण्यासाठी आजमगड (पुरंदर) च्या दिशेने जातात. शत्रूंचे (मराठ्यांचे) लोक त्यांच्यावर आक्रमण करतात आणि त्या भागातील खेड्यातील गुरेढोरे पळवून नेतात. तेथील (पुरंदर) किल्लेदार व फौजदार जानबाजखान याचे चोरांशी (मराठ्यांशी) मैत्रीचे संबंध आहेत. (इखलास) तो गुरेढोरे सोडवून आणीत नाही."

बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रूहुल्लाखान याने जानबाजखान किल्लेदार यास या बाबतीत

**सव्वीस जून १७०३**

काल रात्री बादशहाने बक्षी रूहुल्लाखान यांस बोलावून त्यांच्याशी एकांतात खलबते केली.

सियालकोट (पंजाब) चे कानूनगो बहराम (भीमराम असावे) हा ख्वाजा इज्जतअलीखान याच्या मध्यस्थीने मुसलमान झाला.

अनुक्रमणिका

मुहंमद युनूस काशगरी याचा भाऊ अब्दुल वाहिद याला मुहंमद अमीनखानाच्या शिफारशीवरून मनसब देण्यात आली.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार सय्यद नूरउद्दीनखान याने कळविले की, आपण आपल्या जागेकडे रवाना झालो.

धारूर (बीड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार व फौजदार मुजबेगखान याने अर्ज पाठवून पुढीलप्रमाणे विनंती केली:—

(१) मला धारूरकडे परत जाण्याची परवानगी देण्यात यावी. (सिंहगडला बादशाही सैन्यात त्याला ठेऊन घेण्यात आले होते) मी शत्रूंचे (मराठ्यांचे) पारिपत्य करीन, विनंती मान्य करण्यात आली.

(२) माझ्यावर काही कृपा व्हावी, मनसबीत सवलती देण्यात आल्या.

(३) माझा भाऊ मुहंमद मतलब याच्यावर कृपा करण्यात यावी—त्याची मनसब वाढविण्यात आली.

(४) खानाजाद (आश्रित, सेवक) मुहंमद मुआली (मुलगा) याच्यावर कृपा व्हावी. बादशहाकडे अर्ज करतांना स्वतःच्या मुलांचा उल्लेख खानाजाद (आपल्या घरात वाढलेला) असे अनेक जण करीत. बादशहानी आज्ञा केली की, "तुम्ही पुन्हा हुजुरात याल तेव्हा त्याला मनसब देण्यात येईल.

**सत्तावीस जून १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले.

**अठ्ठावीस जून १७०३**

शहाजादा मुहंमद मोअज्ज़म बहादूरशहा (काबुलचा सुभेदार) याने पत्र पाठविले होते, ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

औरंगाबादेस तैनात असलेला हरकारा केशवराव याने पुढीलप्रमाणे वृत्तांत लिहून पाठविला:— "वऱ्हाडच्या इलाख्यात अलवा (मौजे अलवा, तालुके बरार) असे शब्द आहेत. तेथे उचकखान हा मोगल अधिकारी होता. त्या गावाला नेमाजी शिंदे वगैरे मराठे सरदारांनी वीस हजार स्वारासहित वेढा घातला. उचकखानाच्या कुमकेसाठी शहाजादा बेदारबख्त या राजा जयसिंग, रणमस्तखान, अहमंदखान खानसामा, बक्षी वगैरे बादशाही सरदार व हाजी, शाबजी वगैरे स्वतःच्या पथकातील सरदार यांना पाठविले. युद्ध झाले. शत्रूपैकी (मराठ्यापैकी) काहीजण जखमी झाले. चार घोड्या व भाले वगैरे हस्तगत करण्यात आले. वेढा उठविण्यात आला. शत्रूला लढाईत ठाण मांडून राहण्याचा धीर झाला नाही. शत्रूंची

दोन माणसे मारली गेली. शत्रू तिकडून निघून तीन कोस मागे पांगला." यार अल्लीबेग याने विनंती केली की, आपल्याला रायबाग हुक्केरीचा किल्लेदार व फौजदार मुहंमद अश्रफ याने पुढीलप्रमाणे पत्र लिहिले आहे. "यापूर्वी बहिर्जीचा वेढा युद्ध वगैरेची हकीकत कळवली होती. पत्र लिहिपर्यंत म्हणजे सफर महिन्याच्या तीन तारखेपर्यंत लढा चालू आहे. शत्रूंचे पारिपत्य झाले आहे. चीनकुलीजखान बहादूर यांना मदत व दारूगोळा पाठविण्यासंबंधी पत्र लिहिले होते, पण उत्तर आले नाही. सैफखान, नाहरखान, जमशीदखानस जिल्हेदार याचा नायब दिलेरखानाचा गुमास्ता, मोर्तुजाबाद (मिरज) चा किल्लेदार मोहंमद मुहसिन हे जवळच्या इलाख्यात आहेत. त्यांनी मदत व युद्धाचे सामान पाठविले. हुजुराकडून कुमक आल्यास बरे होईल. नाहीतर मी स्वतः हुजुरात येईन." बादशहाने आज्ञा केली की, "चीनकुलीजखान याला आज्ञापत्र पुढील अर्थाचे पाठविण्यात यावे. इस्माईलखान आणि सत्रसाल राठौड पोहोचले असतील. त्यांची माणसे येथे आली होती. ती पोहोचली असतील. त्यांना कुमकेसाठी पाठवावेत किंवा स्वतः जावे. हुजुरातूनही पथके पाठविण्यात येतील."

### **एकोणतीस जून १७०३**

मतलबखान करावल बेगी हा आजारी होता. तो बरा झाला आणि बादशहाना त्याने दोन अश्रफ्या नजर केल्या. त्या माफ करण्यात आल्या.

बादशहा हे बक्षी रूहुल्लाखानाला म्हणाले तुमचे बक्षीगिरीचे व खान सामानीचे काम बरेच आहे. टेहाळणीसाठी तुम्ही जाऊ नका. सदरूद्दीन मुहंमदखान याला आज्ञा झाली की, तुम्ही पाळीने गस्त आणि टेहाळणी यासाठी जा. बादशहाने रूहुल्लाखानाला म्हटले की, "तुम्ही, अजीजखान रोहीला, सुलेमानखान, शिवसिंग मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजीम वगैरे मिळून एक हजार तीनशे ऐंशी स्वारांचे पथक (सैन्य) तयार करा. ते माझ्या नजरेखालून जाऊ द्या. हे सैन्य बक्षीच्याबरोबर टेहाळणी आणि गस्त यासाठी जात जाईल. इतर सैन्याप्रमाणे यालाही पायदळ आणि तोफा आदि सरंजाम पुरविण्यात यावा." सरहिंदचा फौजदार वजीर खान हा काम चांगले करतो असे कळविण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहांने आज्ञा केली की, यक्काताजखान याने आपल्या भाऊकी पैकी (बिरादरी) शंभर माणसे यांना सरकारी नोकरीत आणावे.

खिदमतखान हा आग्र्यात होता. बादशहाना कळविण्यात आले की, रोजा मुनव्वरा (ताजमहाल?) चा व्यवस्थापक (मुतबल्ली) आणि रजवीखान मरहूम याचा नातू व मीर मूसाखान याचा मुलगा मीर असहुल्ला याच्यावर कृपा व्हावी. त्याची एक मुलगी लग्नाची आहे. लग्न कर्तव्य आहे. बादशहाने त्याची मनसब वाढविली. यक्काताजखान याने आणलेला शेख मूसाचा मुलगा शेख दाऊद याला मनसब देण्यात आली होती. ती आता थोडी कमी करण्यात आली होती. चाकणचा बदललेला किल्लेदार कामयाबखान याची मनसब थोडी कमी करण्यात आली.

मुहंमद हुसेनचा मुलगा मुहंमद मासूम हा कहारांच्या (पालखी वगैरे वाहणारे) व्यवस्थेसाठी औरंगाबाद आणि ब्ऱ्हाणपूर या सुभ्यात गेला होता. त्याने काम चांगले केले असे बादशहाना कळविण्यात आले. बादशहानी त्याची मनसब वाढविली.

अनुक्रमणिका

**तीस जून १७०३**

अमीनखान बहादूर याच्या शिफारशीवरून मरहूम किफायतखान याचा जावई मीर महमूद याला काबुल सुभ्याच्या सदारत (न्यायखाते) या जागेवर नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला. मकसूदखान याला हैद्राबाद, कर्नाटक सुभ्यातील मल्कनपल्ली येथे किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. तो हूकूम मागे घेण्यात आला. त्या ऐवजी मकसूदखानाला बेळगांव उर्फ आजमनगर येथे खानचंद याच्या ऐवजी किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. मल्कनपल्लीच्या किल्लेदारीवर फजलुल्ला बेग याची नेमणूक करण्यात आली.

अमानुल्लाखान याचा भाऊ अत्ताउल्लाखान हा आपल्या भावापाशी तैनात होण्यास कबूल होईना, त्याची मनसब कमी करण्यात आली.

नसरूल्लाखानाचा मुलगा मुहंमद मेहदी यास (गावाचे नाव लागत नाही बहुदा सगर असावे) किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले.

कौली (?) या किल्याचा किल्लेदार व फौजदार मुहंमद आबीद याची मनसब वाढविण्यात आली.

बक्षी रुहुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली:—

"कंधार (नांदेड जिल्हा) ची किल्लेदारी खान फिरोजजंग (नांदेड, बिदरचा सुभेदार व भावी निजामउल्मुल्काचा बाप) याच्या अधिकारात देण्यात आली आहे. पूर्वीचा किल्लेदार आणि मरहूम हमजाखान याचा मुलगा असदुल्ला याला मनसबीचा काही भाग किल्लेदारीच्या अटीवर होता. या संबंधी काय आज्ञा. बादशहाने आज्ञा केली की, अटीच्या प्रमाणात मनसब कमी करण्यात यावी."

बादशहाना कळविण्यात आले की, मुहंमद हसनचा मुलगा मुहंमद अश्रफ हा रूस्तुमदिलखान याजपाशी तैनात होता तो वारला.

चाकणचा बदललेला किल्लेदार कामयाबखान याला फर्मान गेले की, "तुम्ही ख्वाजा अमानुल्लाखान किल्लेदार याला किल्ला हवाली करावा.

**एक जुलै १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले.

**(२८ सफर) दोन जुलै १७०३**

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले. काल रात्री बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

अनुक्रमणिका

(१) “अमीरऊलउमरा (मुख्य प्रधान असदखान),

(२) बक्षी रुहुल्लाखान,

(३) अमीदोद्दीनखान बहादूर,

(४) मुहंमद अमीनखान बहादूर,

(५) खानाजादखान,

(६) अबदुर्रहीमखान वगैरे चोवीस श्रेष्ठ उमराव यानी दिवाणखासच्या मार्गे न्याय कचेरीत (अदालत) मध्ये येणे करीत जावे. बाकीच्यांना येऊ देऊ नये. काश्मीरचा सुभेदार इब्राहिमखान याचा मुलगा याकूबखान याने बक्षिंदाबक्ष (सिंहगड) याच्या फत्तेबद्दल दोनशे अश्रफ्या निसार (ओवाळणी) म्हणून पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

**(२९ सफर) तीन जुलै १७०३**

तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याचा कारभारी (पेशदस्त) सभाचंद हा होता. तरबियतखानकडे अहमदनगरचा किल्ला होता पण प्रत्यक्षात अहमदनगरचा किल्लेदार व फौजदार म्हणून मुहंमद इसहाक (तरबियतखानाचा मुलगा) हा आपल्या बापातर्फे नायब (डेप्युटी) म्हणून काम पाहत होता. सभाचदाने दोन महिन्यासाठी मुहंमद इसहाककडे जाऊन राहावे. अशी बादशहाने आज्ञा केली. सय्यदखान हा एक हजार जात व अडीचशे स्वार अशी मनसब बाळगून होता. तो दिवाणेखासच्या वाटेने अदालत मध्ये आला. यापुढे त्याने दिवाणेखासच्या बाहेरच्या वाटेने अदालत मध्ये येत जावे, अशी आज्ञा झाली.

बादशहाना कळविण्यात आले की, मोगलखान हा खजीना घेऊन अहमदनगरहून या महिन्याच्या पंचवीस तारखेस बहादूरगडला पोहोचला. बेळगाव उर्फ आजमनगर येथील किल्लेदार व फौजदार म्हणून सैफखान याला पूर्वीप्रमाणेच कायम ठेवण्यात आले. खानचंद याला त्या हुद्यावरून काढण्यात आले.

कल्याण (कल्याणी, बीदर जिल्हा कर्नाटक) चा किल्लेदार व फौजदार हसनखान हा होता. त्याची मनसब थोडी (दिडशे स्वारांनी) कमी करण्यात येऊन त्याला हुजूरात बोलावून घेण्यात आले.

**१ रबिलावल. चार जुलै १७०३**

बादशहाच्या आज्ञेने मतलब खानाच्या मोहरे निशी खान नुसरतजंग याच्याकडे आज्ञापत्र पाठविण्यात आले.

**पाच जुलै १७०३**
**बेंगलूर**

अनुक्रमणिका

बेंगलूरच्या फौजदारीवर नूरूल्ला हा होता. त्याच्या जागेवर मरहम खानेआलम याचा मुलगा मुहंमद ताहिर याची नेमणूक करण्यात आली होती. ताहिरला पाचशे जात व ऐंशी स्वार अशी मनसब होती. आता त्या मनसबीत शंभर स्वारांनी वाढ करण्यात आली आणि मुहंमद ताहिर याला ताहिरखान ही पदवी देण्यात आली.

सैदखान हा खान नुसरतजंग याच्या सैन्यात तैनात होता. त्याला दोन हजार रुपये मदत म्हणून द्यावे, अशी आज्ञा केली. जहागीर व इतर मागण्या यासंबंधी सईदखानाच्या विनंतीची दिवाणांनी चौकशी करावी, अशी आज्ञा झाली.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याने विनंती केली की, “माझा भाऊ अताउल्लाखान माझ्यापाशी तैनात होण्यास, राजी झाला आहे. त्याची मनसब कमी केली आहे; ती पुन्हा बहाल करण्यात यावी,” विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांने आज्ञा केली की, आवजी ओढळराव याला हुजुरात बोलावून घेण्यात यावे. त्याला चारशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती, त्यात शंभर जात अडीचशे स्वार अशी वाढ करण्याची आज्ञा झाली. बादशहाने आज्ञा केली की, सर्फराजखान हा हैद्राबादी पायदळाच्या पथकाबरोबर नंदगावच्या रस्त्यावर आहे. मुगलखान हा खजीना व काफिला घेऊन येईल. मरहूम मुवतखरखान याचा मुलगा जहूरउल्ला याला मदत म्हणून पाचशे रुपये देण्यात आले. मरहूम हमजाखान याचा मुलगा असदउल्ला याला बादशहाने फर्मान पाठवून आज्ञा केली की, “तुम्ही कंधारचा किल्ला (जिल्हा नांदेड) खान फिरोजजंग याच्या हवाली करा.”

शहाजादा बेदारबख्त याला आज्ञा झाली की, “नवलगडच्या किल्लेदारीवर तुम्ही हवे असलेल्या इसमाची नेमणूक करा.” मरहूम इफ्तेखारखान याचा मुलगा मुहंमद जाफर याला बेदारबख्ताच्या तोफखान्याचा दारोगा म्हणून पूर्वीप्रमाणे बहाल करण्यात आले.

एक दिवसापूर्वीची आणखी एक नोंद.

**चार जुलै १७०३**

सय्यद मीरकुली हा दामर्ली व माशल (?) येथे फौजदार होता. त्याची मनसब वाढविण्यात आली. तोरगलचा (वगैरे) किल्लेदार याला बदलण्यात येऊन त्याला विजापूरच्या सुभेदारापाशी तैनात करण्यात आले. त्याला पाच हजार जात व पाच हजार स्वार अशी मनसब होती. औरंगाबादेहून हरकाराच्या लिहिण्यावरून समजले की, मुहंमद जाफर आणि मुहंमद इब्राहिम हे मनसबदार तेथे हजर नाहीत. त्यांच्या जहागिरी काढून घेण्यात याव्यात, अशी आज्ञा करण्यात आली.

धारूर उर्फ फतेहाबादचा किल्लेदार व मरहूम उजबेगखान ह्याचा मुलगा दोस्तमबेग याने विनंती अर्ज लिहून पाठविला की, “आज्ञा होत असल्यास येथे मी आपला नायब ठेवून हुजुरात येईन. मान्यता देण्यात आली. खाने आलमचा भाऊ अमीनखान (संभाजी राजांना धरणाऱ्या मुक्ररबखान याचा मुलगा)

याची मनसब वाढविण्यात आली. जजियाच्या खजिन्यावर शेख अब्दुलहादी हा कारकून होता. त्याच्या जागी नुरूल्ला याची नेमणूक करण्यात आली.

**सहा जुलै १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, खजीना नदीपार उतरविण्यासाठी बादशहाच्या आज्ञेप्रमाणे मतलबखान हा गेला आहे. इनायतउल्लाखान (अहकामे आलमगिरी या पत्रांचा संग्रह करणारा) याचा नोकर कैलास काश्मिरी हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे आणि पाच अश्रफ्या या वस्तू म्हणून देण्यात आल्या.

आजमगड (पुरंदर) चा बदललेला किल्लेदार खानचंद याला खाननुसरतजंग याच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. तो छावणीत आला. त्याला मन्सूरखान याने नुसरतजंगच्या छावणीत एक गुर्जबर्दार देऊन पोहोचवावे, अशी आज्ञा करण्यात आली.

खालश्याचा दिवाण इनायतउल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली—“संगमनेरचा बदललेला अमीन, फौजदार काजी नजीब याच्याकडून तीन लाख रुपयाचे सरकारचे येणे आहे, ही रक्कम तो देत नाही.” बादशहाने आज्ञा केली—“त्याला कैद करा आणि रक्कम वसूल करा.”

सुलेमानचा पुतण्या आणि इब्राहीम याचा मुलगा मुहंमद मुराद याला असीरगडच्या तोफखान्यावर दारोगा म्हणून नेमण्यात आले.

**सात जुलै १७०३**

बादशहाच्या आज्ञेने पुढील मंडळींच्याकडे आज्ञापत्रे (हजबुलहुकूम) रवाना झाली. त्यांच्यावर (आज्ञा पत्रावर) अमीरउलउमरा (मुख्य प्रधान असदखान) याची मोहोर होती— (१) आग्र्याचा सुभेदार मुखत्यारखान, (२) ग्वालेरचा फौजदार जाननिसारखान, (३) ग्वालेरचा किल्लेदार खिदमत तलबखान.

कदीम कुलीखान हा हनमंतगडचा किल्लेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याला आज्ञा करण्यात आली की, “तुम्ही तो किल्ला रहमानदाद किल्लेदार याच्या हवाली करावा.”

बादशाही छावणीपासून औरंगाबादेपर्यंत त्या मार्गाचे रक्षण मुगलखान याजकडे होते. तो खजीना व काफिला घेऊन बादशाही छावणीत आला. तो बादशहांना भेटला. त्याने छावणीतील काफिला पोहोचवावा (औरंगाबादकडे) अशी आज्ञा करून बादशहा हे फातेहा खैर (कुशल होवो) अशी प्रार्थना) पढले; आणि त्यांनी मुगलखानाला निरोप दिला.

मरहूम अबदुल अजीजखान याचा मुलगा अबुलहसन याला बऱ्हाणपूर येथे तैनात करण्यात आले. त्याला निरोप देण्यात आला.

अनुक्रमणिका

नुसरताबाद उर्फ सगर (गुलबर्गा जिल्हा) येथील बदललेला अमीन अलीकुली हा येऊन बादशहाला भेटला.

मुहंमद काजिम हा नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात होता. तो तेथून फरारी झाला. तो छावणीत येऊन मतलबखानाच्या मध्यस्थीने हुजुरात आला. बादशहाने त्याला नोकरीवर पुन्हा बहाल ठेवले.

हरकाऱ्यांच्याकडून पुढीलप्रमाणे बातमी समजली—"धना (जी) जाधव हा फौज घेऊन चंदनवंदन किल्ल्याजवळ उतरला. त्याने हणमंतराव (निंबाळकर) याला राजारामाची पत्नी (ताराबाई) हिची गांठ घेण्यासाठी प्रतापगडाकडे पाठविले.

खान नुसरतजंग हा मौजे बदसा (? गावांचे नांव लागत नाही) येथे तळ ठोकून आहे.

## दहा जुलै १७०३

हमीदोद्दीन खान बहादूर याने बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती केली. "श्रेष्ठ अमीरउमराव मनसबदार, पेशकार वगैरे हे मुजरा करण्यासाठी येतील तर त्यांच्यासंबंधी काय आज्ञा?" बादशहा म्हणाले—"सर्वांची यादी तयार करा. त्याप्रमाणे यादी तयार करण्यात आली बादशहाने यादी पाहिली आणि आज्ञा केली की, यादीत असलेल्यापैकी पुढील मंडळींनीच पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणे मुजरा करण्यासाठी दिवाणेखासमध्ये येत जावे. ही मंडळी पुढीलप्रमाणे:—

(१) अमीरउल्उमरा (मुख्यप्रधान असदखान), (२) बक्षी रूहुल्लाखान, (३) बक्षी मिर्जा सदरूद्दीन मुहंमदखान, (४) मतलबखान, (५) हाजीअलीखान, (६) मन्सूरखान, (७) राजा शाहू, (८) हमीदोद्दीनखान बहादूर, (९) इनायतउल्लाखान, (१०) अबदुर्रहीमखान, (११) असदखान, (१२) सियादतखान, (१३) बाकरखान, वगैरे अधिकारी.

बादशहा हे हमीदोद्दीनखान बहादुर यास म्हणाले:—

"तुम्ही रायभान (व्यंकोजी पुत्र रायभानजी भोसले, तंजावरकर) याला बोलवा आणि त्याची व राजा शाहू यांची भेट घडवून आणा. आज्ञा प्रमाणे हमीदोद्दीनखान बहादूर याने, दिवाणेखासमध्ये राजे शाहू आणि रायभान यांची परस्परांत भेट घडवून आणली. ही हकीकत बादशहाना कळविण्यात आली. बादशहाने राजा शाहू आणि रायभान यांस प्रत्येकी एक रत्नजडित पदक बक्षीस (इनाम) दिले.

बादशहाना कळविण्यात आले की मतलबखान, हा टेहळणी (गस्त) करण्यासाठी बादशाही छावणीच्या बाहेर गेला आहे.

सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार नजरबेग याने विनंती अर्ज पाठविला होता, तो बादशहाच्या नजरे खालून गेला. मुहमंद मोअज्जम बहादुरशहा (काबूलचा सुभेदार व औरंगजेबचा मुलगा) याच्या

अनुक्रमणिका

सरकारातील बदललेला दिवाण हादीखान, याच्या द्वारे शहाजाद्याने सत्तावीस घोडे पाठवले होते. ते हमीदोद्दीनच्या विनंतीवरून बादशहाने नजरेखालून घातले. बादशहाने आज्ञा केली की, एक रत्नखचित खंजीर (जमघर) शहाजादा अजीम (मुअज्जमचा मुलगा, नाव अजीमुश्शान भावी सम्राट फरूकसिअरचा बाप) याच्यासाठी काढून ठेवावा. खंजिरांची किंमत दहा हजार रुपये होती.

**अकरा जुलै १७०३**

आज पावसामुळे (बाराने रहमत—कृपावृष्टी) दिवाण आणि न्याय कचेरी (अदालत) याची कामे बंद होती.

**बारा जुलै १७०३**

पावसामुळे दिवाणचे काम बंद. आग्र्याचा सुभेदार मुक्तारखान याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले. ते आज्ञापत्र डाक चौकीने लवकरात लवकर जावे, अशी आज्ञा करण्यात आली.

**तेरा जुलै १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. पावसामुळे ते केचेरीत अर्धा घटका होते. नंतर न्याय कचेरी बरखास्त करण्यात आली.

काल रात्री बादशहाने दिवाणे आलाच्या कचेरीचा अधिकारी (दारोगा) त्याची आठवण काढली. बादशहाना कळविण्यांत आले की, तो (फत्तेदौलत कौल दारोगा) हा गुलालबारमध्ये नाही. बादशहा म्हणाले “त्याला सांगा, रात्री गुलालबारेत राहिलास तर ठीक नाहीतर मुहंमद आरिफ कौलला सांगा, त्याने गुलालबारमध्ये हजर असावे. शाहजादा कामबक्ष हा दिवाण कचेरीचे काम सुरू होण्यापूर्वी बादशहाना येऊन भेटला.

ख्वाजा बख्तावर महली याने विनंती केली की,—

> “मला स्वारी करण्यालायक घोडा नाही. सरकारातून एक घोडा मिळावा. विनंती मान्य करण्यात आली. न्याय कचेरी बरखास्त झाल्यानंतर बादशहाना कळविण्यात आले की, अमीरउल् उमरा (मुख्यप्रधान असदखान) हे मुजऱ्यासाठी आले आहेत.

बादशहाने परवानगी दिली. बादशहापाशी थोडावेळ (तासभर) बसून असदखान हा निरोप घेऊन आपल्या तंबूकडे परत गेला. (बंगलोर) मंगलोरचा बदललेला फौजदार व मरहूम कादरदादखान याचा मुलगा नूरुल्ला याची मनसब कमी करण्यात आली. (मुळात मंगलोर शब्द आलाय पण संदर्भ पाहता तो बंगलोर असावा.)

**चौदा जुलै १७०३**

अनुक्रमणिका

पावसामुळे बादशहाने आज फक्त अर्धा घटिका न्याय कचेरीचे काम पाहिले.

यक्काताजखान याला लोणी (?) ची ठाणेदारी देण्यात आली होती. तो हुकूम मागे घेण्यात आला. त्या ऐवजी कडूसच्या ठाणेदारीवर त्याला नेमण्यात आले. तेथील ठाण्यावर पूर्वीचा ठाणेदार निजामराव हा होता. त्याला तेथून बदलण्यात आले.

इरादतखान हा पूर्वी गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार होता. तेथून त्याला बदलण्यात आले होते. त्याला लोणीची ठाणेदारी देण्यात आली. इरादतखान याला एक हजार जात व तीनशे स्वार अशी मनसब होती. (औरंगजेबाचा भाऊ शुजा याची बायको ही इरादत खानाची आत्या. इरादतखानाचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.)

[प्रेशित किंवा सुप्रसिद्ध साधुसंत यांचे स्मरण देणाऱ्या काही वस्तू अगर अवशेष याना आसारे शरीफ (Holly Relic) म्हणत. बादशहाने अशा काही वस्तू बाळगल्या होत्या. आपल्या वास्तव्य स्थानापासून वस्तू ठेवलेल्या जागेपर्यंत तो अधूनमधून जाई आणि प्रार्थना करून येई.]. फरासखानाच्या मुश्रफला बादशहाने आज्ञा केली की, “आमच्या दौलतखान्यापासून आसारे शरीफ पर्यंत कनाती (सरा परदा) उभ्या करा. आम्ही येथे फातेहा देण्यासाठी जाणार आहोत.

## पंधरा जुलै १७०३

दिवसाचा एक प्रहर अन दोन घटिका झाल्या असता बादशहा हे कनातीच्या मार्गाने आसारे शरीफकडे गेले. बादशहाबरोबर हमीदोद्दीनखान, हाफिज बख्तावर महली पालखीखान्याचा दारोगा फतेदौलत कौल हे होते. बादशहाने आसारे शरीफला प्रदक्षिणा घातली. दीडशे मोहरा आणि एक हजार रूपये भेट म्हणून दिले. त्यानंतर ते आपल्या दौलतखान्यात परत आले.

## सोळा जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. जिन्नतउन्नीसा बेगमच्या सरकारातील मीर सामान (पुरवठा कारभारी) व इनायतउल्लाखान याचा मुलगा हिदायतउल्लाखान याला त्या हुद्दाला जोडून दारोग्याचा हुद्दा देण्यात आला.

## सतरा जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद होते.

## अठरा जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद होते. गुर्जबर्दारांपैकी काहीनी गडबड उडवून दिली. बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीन खानबहादूर यांनी त्यांचा बंदोबस्त करावा. त्यांनी ऐकले नाही तर त्यांना कैद करावे.

अनुक्रमणिका

## एकोणीस जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद होते.

## वीस जुलै १७०३

शेख गुलाम मुहंमद उर्फ बालीराम (बालीरामचा गुलाम मुहंमद झाला) याने विनंती केली की, आपल्याला मुजरा करण्यासाठी न्यायकचेरीत (अदालत) येण्या-जाण्याची परवानगी मिळावी, बादशहाने विनंती मान्य केली.

बादशहाने आज्ञा केली की, शाहजादा कामबख्श याची मुलगी ह्यातुन्निसा बेगम हिच्यासाठी एक लाख रुपयाचे अलंकार करण्यात यावे.

## बंगलोर

ताहिर मुहंमदखान याला बंगलोरचा फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन बंगलोरकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

सय्यद यादगार हुसेन याला चंदनवंदनचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला निरोप देण्यात आला.

विजापूरचा सरदार मरहूम (दिवंगत) फरहादखान याचा मुलगा हमीदुल्लाखान उर्फ सिद्दीइब्राहिम याला बेळगावचा किल्लेदार व फौजदार सैफखान याच्यापाशी तैनात करण्यात आले. शहाजहानाबाद (दिल्ली) येथील बातम्यावरून पुढील हकीकत कळली—“मेवात (अलवर प्रांत) चा फौजदार शुक्रुल्लाखान व दिल्लीचा फौजदार शाकीरखान हे दोघे एक होऊन मेवात येथील बंडखोरांवर चालून गेले. युद्ध झाले. बंडखोरांपैकी दिडशे माणसे ठार झाली बंडखोरांचा पुढारी अकराम हा होता. त्याच्या भावाला कैद करण्यात आले. बंडखोरांचे गळे कापण्यात येऊन त्यांची डोकी शहाजानाबाद (दिल्ली) चा सुभेदार मुहंमद यारखान याजकडे पाठविण्यात आली आहेत.” बादशहा म्हणाले “सेवा मान्य झाली.”

**पट्टा (विश्रामगड**—नाशिक आणि नगर जिल्ह्याच्या सरहद्दीवर) येथील किल्लेदार व फौजदार लोदीखान याला तिकडे (किल्ल्याकडे) जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्यावेळी बादशहा कुशलतेचा फातेहा (प्रार्थना) पढले.

## एकवीस जुलै १७०३

आज दोन्ही दिवाणचे काम बंद होते. फत्ते दौलत हा दिवाणे आलाच्या कचेरीचा दारोगा (अधिकारी) होता. बादशहाने त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

अनुक्रमणिका

“बादशाही छावणीतील बातमी खात्यातील (मर्दुमे खबरदारान) इसमांना ताकीद करा की, यांनी ऐकीव बातम्या लिहीत जाऊ नये.”

**बावीस जुलै १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**तेवीस जुलै १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**चोवीस जुलै १७०३**

बादशहानी काल रात्री बक्षी रुहुल्लाखान याजबरोबर एकांतात बोलणी केली. कासिमखान, नजफकुली व शरीफखान यांचे हुद्दे आपल्याला कळविण्यात यावेत अशी बादशहाने रुहुल्लाखान याला आज्ञा केली.

मीर बक्षीचा नायब मतलबखान याने विनंती केली की, “माझा मुलगा अबू तालिब याचे लग्न मीर आतिश (तोफखान्याचा प्रमुख) तरबियतखान याच्या मुलीशी ठरले आहे. काही सहाय्य मिळावे आणि रजा मिळावी.” बादशहाने विनंती मान्य केली आणि अबूतालिब याला खिलातीची वस्त्रे व इनामे देऊन औरंगाबादेस जाण्यास निरोप दिला.

व्यंकोजी (शिवाजी महाराजांचे बंधू व्यंकोजी राजे) चा मुलगा रायभान यास सरकारातून मनसब मिळाली होती. यावेळी बादशहाने त्याला एक झागा, (रत्नजडित शिरपेंच) हीं बक्षीस म्हणून दिली आणि आज्ञा केली की, “तुम्ही (रायभान) मुजऱ्यासाठी दिवाणेखास मधे येत जावे.

मंगळवेढ्याच्या (परगण्याच्या) अमीनी व फौजदारीवर पूर्वी बक्षीखान हा होता. त्याच्या जागेवर मुहंमद (नाव पुसट असल्यामुळे लागत नाही) याची नेमणूक करण्यात आली होती. त्याची मनसब वाढविण्यात आली.

बक्षी रुहुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली:—

> “शामियाना हा दरवाजाच्या पुढे उभा करण्यात आला आहे. दफ्तरची कागदपत्रे पावसामुळे खराब होत आहेत. एक वेगळा तंबू देण्यात यावा.” विनंती मान्य करण्यात आली.

अजमीरचा सुभेदार हसनअलीखान याच्या विनंतीवरून काही मंडळींच्या नेमणुका करण्यात आल्या.

**पंचवीस जुलै १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

## सवीस जुलै १७०३

बादशहाने आज्ञा केली की, शमशीरबेग आणि त्याच्या बीरादरीचे लोक यांना दख्खनमधे तनखा जाहागिरी द्याव्यात.

फत्तेउल्लाखान याने लिहून पाठविले की, "माझ्या बिरादरीपैकी असलेला हैदरबेग याचा मुलगा यार मुहंमदबेग मनसबदार हा आज्ञेप्रमाणे वागत नाही. सांगून सवरूनही ऐकत नाही." बादशहाने आज्ञा केली की, त्याला मनसबीवरून बडतर्फ करण्यात यावे.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.—"मी आजारी आहे. हकीम दाऊद याचा मुलगा हकीम सुलेमान याला माझ्या औषधोपचारासाठी माझ्यापाशी तैनात करण्यात यावे." विनंती मान्य करण्यात आली.

बंगालचा सुभेदार अजीमुश्शान (बादशहाचा नातू) याच्या मुलीचे शिक्षण सुरू झाले. त्या प्रीत्यर्थ त्याने ओवाळणी म्हणून दोनशे अश्रफ्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. यांच्याकडे बक्षिसे पाठविण्यात यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

गुलाम मुहंमद उर्फ बालीराम याने मुजरा करण्यासाठी न्यायकचेरीत येताना बरोबर हत्यारे बाळगून यावे, अशी त्याला परवानगी देण्यात आली.

तरबियतखान हा बहादुरगड येथे होता. त्याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"बापू पंडित (?) हा कामाचा माणूस आहे. तो पूर्वी हैद्राबाद येथे कानूनगोच्या जागेवर होता. पूर्वीप्रमाणे त्याच जागेवर त्याला बहाल करण्यात यावे. बादशहाने हे मान्य केले नाही. बादशहाने आज्ञा केली की, त्याला काबुल सुभ्यात तैनात करण्यात यावे. त्याला उत्तर भारतात जहागीर देण्यात यावी. मन्सूरखान याने त्याला सजावल (अंमलबजावणीचा अधिकारी) बरोबर देऊन काबुल प्रांतात फत्तेउल्लाखान याजकडे पाठवावे. (नाव नीट लागत नाही. बालू सद्दी असेही होऊ शकेल. बालू पंडित हा केवळ तर्क आहे).

## (चोवीस रबिउलअव्ल) सत्तावीस जुलै १७०३

दाऊदखान (पन्नी) याचा विनंती अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला. अर्जातील मजकूर पुढीलप्रमाणे होता:—

> "शंकरा (जी?) याच्या हातून काही बादशाही (राजकीय) कामे करवून घ्यायची होती. यासाठी शंकराजी, (पुढे प्रसिद्धीस आलेला हा शंकराजी मल्हार दिसतो) त्याची बायकामुलें व त्याचे इतर सोबती यांना मी आपल्याजवळ बाळगले आणि त्यांना सत्तावीस हजार एकशे सत्तर होन व बावीस हजार सातशे पन्नास चक्र (एक नाणे) या उत्पन्नाच्या जहागिरी त्यांना बहाल ठेवून

त्यांच्या इतर जहागिरी जप्त करण्यात आल्या. माझी विनंती आणि अपेक्षा अशी आहे की, शंकराजीची मुले, व्यंकटराव व रामराव आणि मानसिंग मोरे यांना मनसबी देण्यात याव्या. आणि त्यांना माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. मनसबीप्रमाणे त्यांना जहागिरी बहाल ठेवण्यात याव्या. त्यांच्याकडून मातबर जामीन घेण्यात आले आहे. मनसबी पुढील इसमास पुढीलप्रमाणे देण्यात याव्याः——

(१) मानसिंगचा मुलगा बदरजी यास दीड हजार जात व एक हजार स्वार.

(२) किशनराव, हजारी पांचशे स्वार.

(३) गोपाळराव, पांचशे जात व (३००) तीनशें स्वार,

(४) बेणीराव, चारशें जात व शंभर स्वार,

(५) भानजी, दोन हजार जात व एक हजार स्वार,

(६) संताजी, सातशे जात व तीनशे स्वार,

(७) नानाजी, चारशे जात व शंभर स्वार,

(८) बाळाजी, एक हजार जात व पाचशे स्वार,

(९) शंकराची मल्हार, याचा मोठा भाऊ त्रिंबक मल्हार यास दोन हजार जात व एक हजार स्वार.

(१०) नरकवासी रामा (राजाराम महाराज) याचा मेहणा नारायण खानखाव (आडनाव लागत नाही) पाचशे जात व सातशे स्वार.

बादशहाने आज्ञा केली की, वरील सर्वांना हुजुरात घेऊन यावे, म्हणजे त्यांची योग्यता व पथके (त्यांच्या जवळची) पाहून त्यांच्यावर कृपा करण्यात येईल. शंकराजी तेथे आपली तीन मुलें घेऊन आहे. जे काम करण्याचे घाटत आहे ते पार पडले तरच त्यांना मनसबी देण्यात येतील. नाही तर नाही.

## अठ्ठावीस जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

## एकोणतीस जुलै १७०३

अलाहबादचा सुभेदार सर्फराजखान याची (सुभ्यातील बंदोबस्ताविषयी) पत्रे आली. ती बादशहाच्या नजरेखालून गेली.

मरहूम लुत्फुल्लाखान (निजामउल्मुल्काचा मामा) याचा मुलगा इनयातखान याला बेट जालंधर. येथे फौजदार म्हणून नेमण्यात आले.

**एकतीस जुलै १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**एक ऑगस्ट १७०३**

अटलसिंग याला लोहगाव (पुण्याजवळ) चा ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला चारशे जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. तीत शंभर स्वारांची भर घालण्यात आली.

इरादतखान याला लष्करची कारकूनी देण्यात आली होती त्याच्याबरोबर पुढील सरंजाम देण्यात आला. तोफखान्याचा सरंजाम, नगदीकडे शंभर माणसे, शंभर गुर्जबर्दार, शंभर बेलदार, दहा पाणी वाहणारे, चार जासूद याशिवाय गंधक (बंदूकीची दारू वगैरे).

आतिशखान याजकडेही तोफखाना वगैरेचा सरंजाम देण्यात आला. त्यात शंभर वरकंदाज पन्नास गुर्जबर्दार, पायदळ शिपाई पाचशे असाही सरंजाम देण्यात आला.

पाईन विलायत (पुणे आणि वाईमधील भाग) येथे मुहंमद आकिल हा काम करीत होता त्याला त्याच्या हुद्याला जोडून बेनीशाहदुर्ग (पन्हाळगड) येथे अमीन म्हणून नेमण्यात आले. यापूर्वी त्याजागेवर अमरसिंग हा होता. त्याची मनसब कमी करण्यात आली.

**दोन ऑगस्ट १७०३**

बादशहाने बक्षी रुहुल्लाखान याला बोलावू पाठवले आणि त्याला म्हटले "मरहूम अमीरखान (काबुलचा सुभेदार) याच्या मालमत्तेपैकी जड-जवाहीर वगैरे माझ्यासमोर घेऊन जा. त्याप्रमाणे करण्यात आले. पाहून झाल्यावर बादशाहाने रुहुल्लाखान यास चौकीखान्याकडे जाण्यास निरोप दिला.

**तीन ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. ख्वाजा मसवूद महली याने बादशहास पुढीलप्रमाणे कळविले:—

> "मेहरुल्लाची मुले आणि अबदुल्ला खानाचे पुतणे आणि ओहम्खानाचे नातू, मीर जलालउद्दीन वगैरे आग्रा सुभ्यात तैनात होते. आज्ञेप्रमाणे आपल्या हुजुरात ते येण्यास निघाले,

त्यांनी नर्मदा ओलांडली. नर्मदेच्या अलीकडे चोरांनी (मराठ्यांनी) त्यांच्यावर हल्ला केला. जलालउद्दीन जखमी झाला. त्याची सगळी मालमत्ता लुटून नेण्यात आली. त्याची विनंती अशी आहे की, आपल्याला आग्रा सुभ्यातच ठेवण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

धामोणी (सागर जवळ, बुंदेलखंड) येथे खैर अंदेशखान हा फौजदार होता. त्याच्या विनंती वरून, बादशहाच्या लष्करातील चौकी खासवर असलेला आणि सय्यद ताजुद्दीनचा मुलगा सय्यद मुइनोद्दीन याला धामोणीच्या पायदळ शिपायांचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, वाकेनिगार यांना ताकीद करण्यात यावी की, त्यांनी आपले वृत्तांत स्वतः आपल्या हाताने लिहित जावे.

सुलतान कासिम याचा मुलगा मुहंमद मोमीन याला नवलगडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. यापूर्वी तेथे मुहंमद बाकर हा किल्लेदार होता. त्याल तेथून बदलून शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**चार ऑगस्ट १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**पाच ऑगस्ट १७०३**

दिवाणचे काम बंद करण्यात आले.

**सहा ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्ते झाल्याबद्दल शाहाजादा मुहंमद मोईजोद्दिन (औरंगजेबाचा नातू व मुअज्ज्मचा मुलगा) सुभेदार मुल्तान याने दोनशे अश्रपया ओवाळणीच्या पाठविल्या होत्या. सोबत एक पत्रही पाठविले होते. त्या बादशहाच्या नजेरखालून गेल्या. सैन्य कूच करीत असताना शेतीची पायमल्ली होऊ नये म्हणून अधिकारी नेमले जात. उजव्या फळीकडच्या अशा अधिकाराच्या (अमीनी) जागेवर जियाउल्ला याच्या जागेवर रुहुल्लाच्या कचेरीचा दारोगा व मरहूम मोतमीनखान याचा मुलगा मीर फक्रउद्दीन याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक शाल देण्यात आली.

ऐवजबेगखान वगैरे सात गुर्जबर्दार यांना बादशहाने पुढील आज्ञा केली—"चीनकुलीजखान (निजामउल्मुल्क) याच्या बिरादरीचे तीनशे स्वार अहमदनगर येथे तैनात आहेत. तुम्ही त्यांना तेथून काढून, चीनकुलीजखान (विजापूरचा सुभेदार) याच्याकडे पोहोचवून द्या."

विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज लिहून पाठविला. "येथे कुराणाची एक अप्रतीम प्रत सांपडली आहे. ती कूफी पद्धतीच्या हस्ताक्षरांत लिहिली आहे. तिची किंमत तीनशे रुपये आहे. हे पुस्तक सरकारात पाठविण्यास योग्य आहे. कृपा करून हुजुरातून एक

गुर्जबर्दार पाठवावा म्हणजे ती प्रत सरकारात पाठविण्यात योग्य आहे. कृपा करून हुजुरातून एक गुर्जबर्दार पाठवावा म्हणजे ती प्रत त्याच्या हवाली करता येईल." बादशहाने विनंती मान्य केली. त्यांनी आज्ञा केली की, या कामासाठी एक गुर्जबर्दार नेमावा.

बहादुरगड (पेडगाव) येथील किल्लेदार व फौजदार अब्दुल गफूरखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला—"आज्ञेप्रमाणे मी मुहंमद इसहाक याच्याकडे अहमदनगरची किल्लेदारी व फौजदारी सोपविली आणि मी पंधरा रबिलावल रोजी बहादुरगडला पोहोचला. (१८ जुलै १७०३) आपले नवीन काम मी सांभाळीत आहे."

नबाब झिन्नतुन्निसा बेगम (औरंगजेबाजी मुलगी) येथे आहेत. त्यांना भेटण्यासंबंधी आपली काय आज्ञा. बादशहाने आज्ञा केली की, "तुम्ही बेगम साहेबांच्या देवडीवर जाऊन मुजरा करावा आणि ओवाळणीची एक मोहोर (निसार) द्यावी."

बादशहाने मुनीमखानाला विचारले.—"फत्तेउल्लाखान बहादूर रवाना झाला किंवा नाही." (त्याची तैनाती काबुल प्रांतात झाली होती). मुनीमखानाने विनंती केली कीं, जियाउल्लाखान हा कोरेगांवला पोहोचला की, फत्तेउल्लाखान पुढे रवाना होईल.

**सात ऑगस्ट १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**आठ ऑगस्ट**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. चाकणच्या माजी किल्लेदार व फौजदार कामियाबखान हा बादशहांना भेटला, त्याने दोन मोहरा ओवाळणी म्हणून पेश केल्या.

मेवात (अलवर प्रांत) येथील बंडखोर अकराम जमिनदार याला तेथील फौजदार शुक्रुल्लाखान याने ठार मारले होते. बंड मोंडल्याबद्दल त्याची मनसब वाढविण्यात आली.

माळव्याचा सुभेदार शायिस्ताखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.—"अफगाण अब्बास बंडखोर याने माझ्याकडे अर्ज लिहून पाठविला आहे की, "माझे अपराध माफ करावे—मी चाकरी करण्यास तयार आहे."

**नऊ ऑगस्ट १७०३**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली "तंजावरचा जमिनदार शाहजी (व्यंकोजी भोसले यांचा मुलगा शहाजी तंजावरकर) यांच्यासाठी खिलातीची वस्त्रे देण्यात आली आहेत. ती इनायतउल्लाखान याने शहाजीकडे पाठवावी."

अनुक्रमणिका

काल दिवसाच्या अखेरीस दिवाणेआला कचेरीचा दारोगा फत्तेहदौलत याने बादशहाच्या आज्ञेप्रमाणे संभाजीचा मुलगा राजा शाहू यांस शाहाजादा मुहंमद कामबख्श याच्या डेऱ्यावर नेले. शाहजादा कामबख्श याने राजा शाहू यास खिलातीची वस्त्रे व बक्षिसे दिली आणि त्याला (राजा शाहूला) आपल्या तंबूकडे जाण्यास निरोप दिला.

बागलाण (नाशिक जिल्हा) येथे पायबाकी जमिनी होत्या. (पायबाकी म्हणजे—जहागीर वगैरे देण्यायोग्य—कुणाचा ताबा नसलेल्या मोकळ्या जमिनी) त्या जमिनींचा व्यवस्थापक (अमीन) मुहंमद रजा हा होता. त्याला बदलण्यात येऊन त्याच्या जागी मुहंमद अफजल याचा मुलगा मुजफ्फरउद्दीन हुसेन याची नेमणूक करण्यात आली.

झुल्फिकारखान बहादूर याचे विनंती अर्ज (अर्जदास्त) बादशहाच्या नजरेखालून गेला.

बादशहाने आज्ञा केली की, इरादतखानाच्या जवळ ५० (पन्नास) गुर्जबर्दार तैनात आहेत. त्यांना खाजगी खजिन्यातून (अंदरूने महल) दोन महिन्याचा पगार देण्यात यावा. हिशेब नंतर करावा. (अशा देण्याला अलल्हीसाब म्हणत.) बादशहाने आज्ञा केली की, बागलाण्याचा किल्लेदार व फौजदार नजाबतखान याच्याकडे बासा (नाव लागत नाही) या किल्ल्याची पण किल्लेदारी देण्यात यावी. तेथील पूर्वीचा किल्लेदार बरखुर्दार याची मनसब कमी करण्यात आली.

**दहा ऑगस्ट १७०३**

पवनारचा फौजदार (वर्धा जिल्हा—विदर्भ) मुहंमद मुरादखान याच्याकडे चांदा वगैरे प्रदेशच्या जमिंनदारांकडून (राजाकडून) खंडणी (पेशकश) वसूल करण्याचे काम होते. (हासिल—संपादन, तहसीलदार—संपादन करणारा, अशा अधिकाऱ्याला तहसिलदार पेशकश, म्हणजे खंडणी संपादन करणारा असे म्हणत. तहसीलदार या शब्दाचा वापर मोगल या संदर्भात करीत.)

मुरादखानाने लिहिले की, "नियमाप्रमाणे मी जितके पथक बाळगण्यास हवे त्याहून अधिक बाळगीत आहे."

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.—"सय्यद अबुलहसन हैद्राबादी याला दीड हजार जात व चारशे स्वार अशी मनसब होती. तो मराठ्यांच्या कैदेत होता. तो आता कैदेतून सुटून माझ्याकडे आला आहे. आपली मनसब पूर्ववत् बहाल ठेवण्यात यावी, अशी तो आशा बाळगून आहे. त्याची विनंती मान्य करण्यात आली.

नेमत्खान याने विनंती केली की, "छावणीच्या भोवती टेहळणीच्या कामात माझे घोडे जाया झाले आहेत. मला पाच घोडे देण्यात यावे." बादशहाने आज्ञा केली की, "घोडे देण्यात यावे."

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—"औरंगाबादच्या किलेअर्कमध्ये तैनात असलेला पूराबाशी (एक हुद्दा) कासिम हा सतत आजारी आहे." बादशहाने त्याची शंभरची मनसब तीसने कमी केली आणि आज्ञा केली की, गुर्जबर्दार पाठवून त्याला हुजुरांत बोलावून घ्यावे.

कासिम अली हा चांदोल परगण्याचा जहागीरदार होता. त्याला त्या परगण्याचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्यापूर्वी पूर्वीचा फौजदार फकीरउल्ला याची मनसब वीस स्वारांनी कमी करण्यात आली.

**अकरा ऑगस्ट १७०३**

अहमदाबाद (गुजराथ) येथील सुभेदार शहाजादा मुहंमद आजम याचे पत्र आले ते बादशहाच्या नजरेखालून गेले. विशिष्ट पद्धतीच्या वळणाची अक्षरे काढाणारा तज्ञ (तुगरानवीस—शिक्यावरील बादशहाच्या वंशावळीचा मजकूर लिहिणारा) मुहंमद रजा याने विनंती केली की, माझी आर्थिक स्थिती चांगली नाही, काही कृपा व्हावी. बादशहाने त्याला पाच अश्रफ्या दिल्या व काही सोने बक्षीस म्हणून दिले.

**बारा ऑगस्ट १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. मराठ्यांचे पारिपत्य करावे या अर्थाची आज्ञापत्रे बक्षी रुहुल्लाखानाच्या शिक्क्यानिशी पुढील मंडळीकडे रवाना झाली:—

(१) आजमतारागड (सातारा) चा फौजदार यासीनखान.

(२) पदाजी (घाटगे) ठाणेदार, बुधपाचगाव.

(३) नागोजी माने, ठाणेदार, म्हसवड.

**तेरा ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. यारअलीबेग हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहाना भेटला. बादशहा म्हणाले “आजार मोठाच होता,” यारअलीबेग म्हणाला “बादशहाच्या कृपेने आता संपूर्णपणे बरा झालो आहे.” दिवाण (कचेरी) संपण्यापूर्वीच बादशहाने त्याला आपल्या तंबुकडे परत जाण्यास निरोप दिला.

मतलबखान हा मीरबक्षी नुसरतजंग (झुल्फिकारखान) याचा नायब म्हणून काम करित होता. त्याने विनंती केली की, अब्बासकुली याला खान ही पदवी, एक हजार जात व दोनशे स्वार अशी मनसब होती. दुर्देवामुळे तो बडतर्फ झाला. आपले अपराध माफ होतील व आपली मनसब पूर्ववत बहाल होईल, अशी आशा तो बाळगून आहे. बादशहाने त्याची मनसब, सातशे जात व शंभर स्वार अशी बहाल ठेवली.

**गोंड राजे**

देवगड (नागपूर) येथील बदललेला जमिनदार राजा नेकनाम याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला:—

अनुक्रमणिका

“माझा नोकर दया (?) हा हुजूरात येत होता. येथील आर्थिक परिस्थिती चांगली नव्हती, असे जाणून तो येत होता. वाटेत चीनकुलीजखान याची मल्कापूर येथील जहागीर लागली. त्या जहागिरीचा अधिकारी (आमिल) भोंदा (नाव नीट लाग नाही.) हा आहे. चांद्याचा जमिनदार (राजा) बीरसिंग याच्याशी त्याचे मैत्रीचे आणि एकोप्याचे संबंध आहेत. त्याने दया, याला कैद केले आणि तो त्याची मालमत्ता बळकावून बसला आहे. त्याची इच्छा अशी आहे की, दयाला बीरसिंगाकडे पाठवावे. बीरसिंगाची आणि माझी अदावत आहे. तो दयाला जिवे ठार मारील. विनंती अशी की, बक्षी रुहुल्लाखान यांच्या शिक्याचे आज्ञापत्र बऱ्हाणपुरच्या नायब सुभेदाराच्या नावे त्वरित यावे. दयाला कैदेतून मुक्तता मिळावी आणि बक्षी रुहुल्लाखानाकडे त्याला पाठवावे.

वरील विनंतीवर बादशहाने आज्ञा केली की, अशा प्रकारचे आज्ञापत्र पाठविण्यात यावे.

## चौदा ऑगस्ट १७०३

बक्षी रुहुल्लाखान याने विनंती केली की, छावणीतील मुहतसिब (नितीमत्तेवर देखरेख ठेवणारा सेन्सर) मुहंमदशहा याने आपल्याला एक चिठ्ठी लिहिली आहे. चिठ्ठीतील मजकूर हा आहे, हरकाऱ्यानी दिलेल्या बातम्यावरून कळले की, बहादुरगड येथे छावणीत सरदारांची पथके आहेत. सिद्दी बलाबलखान, अनूपसिंग, मुजफ्फर वगैरे सरदारांच्या पथकाला जोडून असलेल्या गोटात दारूपीणे , उघड उघड चालते. लफंगे दारुने धुंद होऊन माणसे गरीबगुरीबांना त्रास देतात.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—मोहतसीबने आपला नायब तेथे नेमावा. नायबला सर्व प्रकारे सहाय्य करावे. अशा अर्थाचे पत्र बक्षीने तरबियतखानाला लिहावे. विनंतीनंतर बहादुरगड येथे नायब मोहतसीब म्हणून मुहंमद हुसेन याची नेमणूक झाली आणि त्याने त्या ठिकाणी (बहादुरगड) येथे जाऊन आपले देखरेखीचे कार्य व्यवस्थितपणे पार पाडावे असे ठरले.

राजा उत्तमराम याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला, माझा भाऊ किशनसिंग हा खान फिरोजजंग याच्या सैन्यात तैनात होता. त्याची परिस्थिती चांगली नाही. त्यामुळे तो माझ्याकडे आला आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. माझ्या कार्यक्षेत्राच्या शेजारचे सुभेदार आणि फौजदार यांनी मला सहाय्य करावे. अशा अर्थाची आज्ञापत्रे पाठविण्यासाठी म्हणून (सरकारातून) दोन गुर्जबर्दार माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, सिरहिंद जा पीरजादा ख्वाजा पारसा आणि त्यांची मुले (दोन) यांच्यासाठी खिलातीची वस्त्रे काढून ठेवण्यात यावी, अशी बादशहाने आज्ञा केली. (सिरहिंदचे अहमद मुजद्दिद सिरहिंदी याचे हे घराणे औरंगजेबाचे गुरु घराणे होय. औरंगजेबाच्या धार्मिक धोरणातील उग्रपणा या घराण्याच्या शिकवणीमुळे आला असे समजले जाते.)

## पंधरा ऑगस्ट १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

अनुक्रमणिका

**सोळा ऑगस्ट १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. "गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी ख्वाजाखान हा भीमानदीच्या दिशेने गेला होता. तो आला असून दिवाणेखासच्या प्रवेशद्वारावर उभा आहे. त्याला भेटीस बोलावण्यासंबंधी काय आज्ञा." बादशहा म्हणाले—"जहूरची नमाज झाल्यावर हमीदोद्दीनखान बहादूर याच्याबरोबर त्याने हुजुरात यावे." आज्ञेप्रमाणे ख्वाजाखान येऊन भेटला. तो म्हणाला:—"मी चोरांचा (मराठ्यांचा) पाठलाग केला. भीमेच्या काठापर्यंत जाऊन मी मराठे सरदारांच्यावर हल्ला केला. लढाई झाली. शत्रूपैकी जवळजवळ दोनशे माणसे गेली. (मारली). काही जखमी झाली. काहीजण पळून जंगल झाडीकडे निघून गेले. शत्रूंचे दीडशे घोडे, भाले, बरच्या वगैरे शस्त्रेही लूट आमच्या हाती सापडली. मी आपल्या पथकाबरोबर एक कोस अलीकडे होतो. नेमाजी (तिमाजीही असू शकेल.) हा सरदार चाळीस स्वारांसहित चालून आला होता. तो जवळच लपून बसला होता. तो तेथून पळाला. लढण्यास तो समर्थ ठरला नाही. त्याला ठार मारण्यात आले." बादशहा म्हणाले, सेवा मान्य झाली. बादशहानी या मोहिमेतील माणसांना मनसबी व इनामे दिली. ते म्हणाले:—

> त्या लोकांचे हुद्दे कळविण्यात यावेत. लढाईत घोडे हस्तगत झाले होते. त्यापैकी एक घोडी सरकारांत ठेऊन घेऊन बाकीची माफ करण्यात (लढणाऱ्यांना देण्यात यावी) अशी आज्ञा झाली.

**सतरा ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. गनिमांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी मुहंमद अमीनखान बहादुर यांस जाण्यास निरोप देण्यात आला. बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रुहुल्लाखान याने मुहंमद अमीनखान याच्याबरोबर देण्यासाठी चार हजार नव्वद स्वार याची यादी (तूमार) करून त्याप्रमाणे ते सैन्य तयार करावे.

**राजा शाहू**

बादशहाने आज्ञा केली की—राजा शाहू याला देण्यासाठी तीनशे मोहरांच्या किंमतीचा घोडा काढून ठेवण्यात यावा. बादशहाना कळविण्यात आले की, नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत असलेला सय्यद ओघलान याच्यापाशी स्वतःची पथके नाहीत. त्याची मनसब कमी करावी, अशी आज्ञा बादशहाने दिली. सहाराणपूरच्या हकीकतीवरून कळले की, सय्यद अजमतउल्लाखान हा दोन वर्षापासून घरी स्वस्थ बसून आहे. त्याला एक हजार जात आणि पाचशे स्वार अशी मनसब आहे. (तो काही काम करीत नाही.) बादशहाने त्याची मनसब पाचशे जात आणि एकशे स्वार अशी कमी केली.

**अठरा ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने दिवाणेखास चे काम पाहिले. नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मुहतशमखान याची मनसब फौजदारीचे काम त्याच्याकडून काढल्यामुळे काहीशी कमी करण्यात आली. छावणीतील फिरंगी

सैनिकांच्यावरील व्यवस्थापकाच्या जागेवर इनायतउल्ला हा होता. त्याच्या ऐवजी खुशहाल कौल याची नेमणूक करण्यात आली.

### एकोणीस ऑगस्ट १७०३

मुहंमद अमीनखान बहादूर याच्याबरोबर मोहिमेवर जाण्यासाठी सय्यद जाफरखान वगैरेना निरोप देण्यात आला. सर्फराजखान हा मुहंमद अमीन खानापाशी तैनात होता. त्याला तेथून बदलून बादशहाने त्याला आपल्या तैनातीत घेतले.

शिष्टाचाराचा प्रमुख तहबुरखान यांस बादशहाने आज्ञा केली की, "तुम्ही मुहंमद अमीनखान याला भीमेच्या पलीकडे पाठवून यावे."

नुसरतगड उर्फ जींजी येथील किल्लेदार स्वरूपसिंग आणि बामगड (?) चा किल्लेदार किशनसिंग यांनी विनंती अर्ज पाठविले होते ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

गढी संख (जत तालुका, सांगली जिल्हा) येथील ठाणेदार राजे मुहंमद याने अर्ज पाठविला की, माझ्या विनंत्या ख्वाजा हाफिजअंबर याच्याद्वारे हुजुरात मांडण्याची परवानगी असावी, विनंती मान्य करण्यात यावी.

### एकवीस ऑगस्ट १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

### बावीस ऑगस्ट १७०३

काबुलचा सुभेदार शहाजादा मोअज्ज़म यांचे पत्र त्याचा वकील मुनीमखान याच्या द्वारे बादशहा समोर ठेवण्यात आले.

मरहूम अजमतउल्ला याचा मुलगा हशमतउल्ला याला शिवापूर उर्फ रसूलाबादची ठाणेदारी देण्यात आली. यापूर्वी त्या ठाण्यावर दलसिंग हा ठाणेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले.

अहमदबेग याला मोहमंद अमीनखान बहादूर याच्या बरोबर मोहिमेवर पाठविण्यात आले. त्याला अहमदबेगखान ही पदवी देण्यात आली.

गोरंग (कुरंग?) चा किल्लेदार किशनसिंग याचा पुतण्या मनोहरसिंग याला नव्याने मनसब देण्यात आली.

### तेवीस ऑगस्ट १७०३

बादशहाना काल कळविण्यात आले की, ख्वाजामंजूर हा आज्ञेप्रमाणे औरंगाबादेहून लष्करात आला आहे. पण तो आजारी आहे. बादशहाने आज्ञा केली की, हकीम हाजिकखान याने त्याच्यावर उपचार करावे.

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याने पुढीलप्रमाणे कळविले, “शेख इब्राहिमचा मुलगा शेख फरीद हा माझ्या फौजेत तैनात होता. आजारामुळे तो हुजुरात निघून गेला. यामुळे फरारी म्हणून त्याची नोंद झाली आहे. तो इसम इकडच्या प्रदेशाचा वाकबगार आहे. त्याला बहाल करून माझ्यापाशी तैनात करण्यात यावे.” विनंती मान्य करण्यात आली. पुणे वगैरेचा ठाणेदार खानचंद याचा मुलगा दलसिंग हा रसुलाबाद उर्फ शिवापूरचा ठाणेदार होता. त्या ठाण्यावरून त्याला बदलल्यामुळे त्याची मनसब त्या प्रमाणात कमी करण्यात आली.

मरहूम यादगार हुसेनखान (बेळगावचा माजी किल्लेदार याची पत्रे प्रसिद्ध आहेत.) याच्या नातवांची लग्ने निघाली त्यासाठी त्यांना देशी जाण्यासाठी जामीन ठेऊन एक वर्षाची रजा देण्यात आली.

**चोवीस ऑगस्ट १७०३**

आज दोन्ही दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**पंचवीस ऑगस्ट १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**रायभान भोसले**

व्यंकोजी राजे यांचा मुलगा रायभान याला सहा हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब देण्यात आली होती. त्याला आता बादशाही जनावरांच्या खुराकाची व आपल्या पथकातील घोड्यांना डाग देण्याची माफी देण्यात आली.

तेवीस ऑगस्टच्या नोंदीत पुढील मजकूर आहे. बादशहाने आज्ञा केली होती की. बादशाही नोकरीत असलेल्या अधिकाऱ्यांना यापुढे दक्षिणच्या सुभ्यात बादशाही आज्ञेशिवाय जाणूनबुझून जहागिरी देण्यात येऊ नयेत. त्यांच्या पथकांसंबंधी काय आज्ञा, अशी विनंती करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, हा हुकूम निघेपर्यंत ज्यांच्या जहागिरी आहेत त्या बहाल राहतील. तनखाच्या बाबतीत मात्र त्यांना मिळणारी तनखा द्यावी, अशी आज्ञा झाली. अशाचप्रकारे सैनिकांच्या यादीत कार्यक्षम सैनिक पाहून त्यांना पगार देण्यात यावा, अशी आज्ञा झाली. अनेकांनी दख्खनमध्ये आपले मुचलके देऊ असे सांगितले. त्याप्रमाणे करावे अशी आज्ञा झाली.

**पंचवीस ऑगस्टची नोंद**

अनुक्रमणिका

(अयोध्या) अवधचा सुभेदार शमशीरखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"या सुभ्याची परिस्थिती अशी आहे. मोअज्ज़माबाद (गोरखपूर) जिल्हा हा संपूर्णपणे उध्वस्त झाला आहे. येथील जमिंदार हे अवध आणि लखनौच्या सरकारात (जिल्ह्यात) बंडे करीत आहेत. येथील सुभेदाराने मोअज्ज़माबाद (गोरखपूर) मध्ये जाऊन राहिल्या शिवाय काम होणार नाही. प्रथम लखनौ आणि नंतर गोरखपूर येथे जाऊन राहण्याची आज्ञा असावी." बादशहाने आज्ञा केली की, "ते कार्यक्षेत्र तुमचे आहे—तुम्हाला योग्य वाटेल ते करा."

खांदवा, सलाबतपूर वगैरेचा ठाणेदार जाधव राय याला दोनशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब होती. तो वारला. बादशहाने आज्ञा केली की, तेथील ठाणेदारी राव मानसिंग (सिंदखेडचे जाधव) याला देण्यात यावी. राव मानसिंगला एक हजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब होती. स्वारांपैकी तीनशे स्वार दोघोडी होते. बक्षी रुहुल्लाखान याने कळविले की, "रणथंबोरहून बदललेला किल्लेदार व फौजदार तकीखान याला हुजूरात बोलावण्यात आले होते. तो अद्याप आला नाही." बादशहाने आज्ञा केली की, "त्याची जागीर काढून घेण्यात यावी."

**सव्वीस ऑगस्ट १७०३ (शुक्रवार)**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सत्तावीस ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज्ञा केली होती की, सर्फराजखान याने मोहम्मद अमीनखान बहादूर यांच्याबरोबर मोहिमेवर जावे, पण आता बादशहाने आज्ञा केली की, शहाजादा मुहंमद कामबक्ष याचा तनबक्षी (तनख्याचा बक्षी) मीर मुहंमद याने मुहंमद अमीनखानाबरोबर जावे.

मुहंमद अमीनखान बहादूर याच्या तोफखान्याचा बदललेला दारोगा (अधिकारी) मिर्जा मुहंमद हा बादशहाना भेटला.

मुहंमद अमीनखान बहादूर याने पुढीलप्रमाणे विनंती केली.—"उजव्या फळीचा करावल (अधिकारी) फकीर मुहंमद याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे." विनंती मान्य करून बादशहाने आज्ञा केली की, उजव्या फळीवर फकीर मुहंमदच्या ऐवजी तुर्कताजखान याची नेमणूक करण्यात यावी. त्याला एक हजार जात व दोनशे स्वार अशी मनसब होती.

कोप्पळचा जमिनदार व्यंकट याने विनंती केली की, हरिहरचा परगणा हा माझ्या तनखाजहागिरीत आहे. त्या परगण्याची फौजदारी पण मला देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. व्यंकटला दीड हजार जात व दोनशे स्वार अशी मनसब होती.

**अठ्ठावीस ऑगस्ट १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

अनुक्रमणिका

## एकोणतीस ऑगस्ट १७०३

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

## तीस ऑगस्ट १७०३

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, सुगंधशाला व अर्जीपुढे मांडण्याच्या कामाचा अधिकारी ख्वाजामंजूर हा औरंगाबादेहून छावणीत आला होता. तो आजारी होता. तो वारला. बादशहाने आज्ञा केली की, हमीमोद्दीन खान बहादूर, काजी अकरमखान, हाजी सुहेल वगैरेनी जाऊन त्याला शेख सल्ला (शनवारवाड्या समोर) च्या दर्ग्याजवळ दफन करण्याचा बंदोबस्त करून यावे.

मरहूम कादरदादखान याचा पुतण्या आणि मेहदीदादचा मुलगा रहीमदाद याने पुढीलप्रमाणे अर्ज केला—"दोन वर्षापासून आर्थिक परिस्थितीमुळे मी फार हैराण झालो आहे. मला सुभे बऱ्हाणपूर (खानदेश) मध्ये भुसावळ परगण्यावर (कदाचित यावल ही असू शकते) फौजदार म्हणून नेमण्यात यावे."

त्याच्यापाशी एक तोफ होती. ती बऱ्हाणपुरात होती. ती त्याने सरकारात देऊ केली. बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रुहुल्लाखान याने याच्या बद्दल वृत्तांत सादर करावा.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"रेहकलाबार (शस्त्रे ठेवण्याचा तळ) येथून शाहजादा कामबक्ष याच्या तंबूपर्यंत किती साखळी अंतर आहे, हे पहावे आणि कामबक्षाच्या डेऱ्याजवळ नरकवासी संभाचा मुलगा राजा शाहू याच्या डेऱ्यासाठी (तंबूसाठी) योग्य जागा पाहून, ठरवून कळविण्यात यावे. त्या प्रमाणे रेहकलाबार पासून पंधरा साखळ्या (जरीब) शहाजाद्याच्या तंबूच्या वाटेवर आणि राजा शाहूच्या डेऱ्यापासून १८ दिरआ (१८ क्युबिट—) अंतरावर जागा ठरविण्यात आली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"किल्ले आजमगड (पुरंदर) येथील हशमाच्या (शिबंदी) पगारासाठी १ लाख १ हजार रुपये मरहूम अईजखान याचा नातू सहरबेग याने नेऊन पोहोचवावे.

## एकतीस ऑगस्ट १७०३

इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) चा बदललेला किल्लेदार मुरीदखान हा बादशहाना भेटला. त्याने दिवाणे खासच्या मार्गाने न्याय कचेरीत येत जावे, अशी आज्ञा झाली.

ख्वाजा मंजूर हा वारला होता, त्याच्या मालमत्तेत दीड हजार रुपये, तीन हत्ती व तीन घोडे होते. त्यापैकी दोन हत्ती औरंगाबादेत आहेत. या शिवाय कपडा-लत्ता आहे. बादशहाने आज्ञा केली की, ख्वाजा बख्तावरकडे मालमत्ता द्यावी. हत्ती, घोड्यांच्या खुराकीचा खर्च तो देत असल्यास बरे नाहीतर ते सरकारात घेण्यात यावेत.

अनुक्रमणिका

## जिजिया

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—जिजिया गोळा करणारे अधिकारी (मुत्सद्दी) हे जिजियासाठी रायभान (भोसले) च्या माणसांपाशी कटकट करीत आहेत. (त्रासदेत आहेत) पण या माणसांची आर्थिक परिस्थिती चांगली नाही.” “बादशहाने आज्ञा केली की, दोन वर्षेपर्यंत त्यांना जिजिया माफ करण्यात यावा.” कालरात्री हरकऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले:—

> “मुहंमद अमीनखान बहादूर व ख्वाजाखान हे गनिमांच्या पारिपत्यासाठी गेले आहेत. मुहंमद अमीनखान याच्या जासूजाने खबर आणली की, कान्होजी व येसाजी पवार हे तीन हजार स्वारांचे सैन्य घेऊन घोडनदीच्या कांठावर मौजे तामल (?) जवळ आले आहेत. ही बातमी ऐकून मुहंमद अमीनखान हा सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून गेला. शत्रूंची तीस माणसे मारली गेली. काहीची डोकी कापण्यात आली. काहीना जिवंत पकडण्यात आले. शत्रूंपैकी अनेक जण जखमी झाले. पाचशे घोडे, दोनशे उंट—पाचहजार गुरेढोरे, एक पालखी, भाले, छत्र वगैरे लूट हातीं आली.” बादशहा म्हणाले “सेवा मान्य झाली.”

### एक सप्टेंबर १७०३

दोन्ही दिवाण बंद ठेवण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की, मुहंमद अमीनखान बहादूर याने गनिमावरील (मराठ्यां) विजयाचे पत्र पाठविले आहे. त्या बरोबरच लुटीच्या मालांतील शस्त्रे, नगारे, एक पालखी, इत्यादिं पाठविले आहेत. हे सर्व त्याने आपला भाऊ नजीबखान आणि मुलगा ख्वाजा मुहंमद फाजिल यांच्याबरोबर हुजुरात पाठविल्या. बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीनखान बहादूर याने त्या दोघांना बादशहाचे विश्रामगृहांत (आरामगाह) आणावे— त्याप्रमाणे ते दोघे येऊन भेटले. बादशहाने त्यांच्यापाशी युद्धाची हकीकत विचारली. त्या दोघांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मुहंमद अमीनखान याचा, दर्जा कळविण्यात यावा अशी बादशहाने आज्ञा केली.

### दोन सप्टेंबर १७०३

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

काल रात्री बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—“तुर्कताजखान हा उजव्या फळीकडील आघाडीचा अधिकारी (करावल) होता. टेहळणीसाठी तो गेला होता. त्याने दोन चोरांना (मराठ्यांना) मारून त्यांची डोकी कापली. भाले, बरच्छा—पाच घोड्या ही लूट शत्रूकडून मिळवली. तो आला आहे.” बादशहानी त्याला विश्रांतीगृहात बोलावले. त्याला पाच अश्रफ्या बक्षीस म्हणून दिल्या. बादशहा म्हणाले धन्य तुमची—तुम्ही आपले कर्तव्य पार पाडलेत.

### तीन सप्टेंबर १७०३

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

अहमदबेगखान हा बादशहाच्या निकटच्या सेवकांपैकी (बंदा हाए जल्लू) त्याला इमारवर्दीखान ही पदवी देण्यात आली.

**श्रीरंगपट्टण**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"एक गुर्जबर्दार नेमा. श्रीरंगपट्टण येथे अबदुर्रहमान हा हरकारा आहे. त्याला हुजुरात घेऊन या. (सजावली करून म्हणजे टुमणे लावून).

अबदुर्रहमानबेगचा मुलगा मजनूनबेग हा बऱ्हाणपुरचा माजी कोतवाल अल्लाहयारबेग याचा जामीन होता. तो फरार झाला. बादशहाने आज्ञा केली की, त्याला कैद करण्यात यावे. त्याला शंभर जात अशी मनसब होती.

बादशहाच्या, वाहून नेण्याच्या सिंहासनामध्ये (तख्तेरवां) एक गुप्ती होती. बादशहाने ती मागविली आणि शहा मोमीन दरवेश यांजकडे पाठविण्याची आज्ञा केली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## ४ सप्टेंबर इ. स. १७०३ ते १६ सप्टेंबर १७०३

### चार सप्टेंबर १७०३

आज बादशहाने दिवाण बंद ठेवले. दुपारच्या नमाजानंतर त्याने न्यायकचेरी केली.

बंगालचा सुभेदार शाहजादा अजीमुश्शान याची पत्रे आली. ती बादशहाच्या नजरेखालून गेली. मरहूम शाह नवाजखान याचा नातू मुहंमद मुराद हा शाहाजादा मुईजोद्दीन (मुल्तानचा सुभेदार) याजपाशी तैनात होता. तो येऊन बादशहाना भेटला. स्वतःच्या लग्नासाठी दिल्लीला जाण्यासाठी त्याने बादशहाची परवानगी घेतली. बादशहाने त्याची मनसब वाढविली आणि दिल्लीच्या खजिन्यातून त्याला सहाय्य म्हणून एक हजार रुपये देण्यात यावे अशी आज्ञा केली.

शेख गुलाम मुहंमद याच्या भाऊबंदापैकी ज्वालानाथ हा बादशहाना भेटून मुसलमान झाला. त्याला पन्नास जात अशी मनसब आणि खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

अबदुर्रहमान याला विजारतखान अशी पदवी होती. त्याला बडतर्फ करण्यात आले होते. त्याला पुन्हा बहाल करण्यात येऊन औरंगाबाद येथे तैनात करण्यात आले.

देवदुर्ग (रायचूर जिल्हा, कर्नाटक) चा किल्लेदार गोपाळसिंग याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले— “बेणीदासचा मुलगा प्रतापसिंग याने किल्लेदारीच्याबद्दल वाद घातला. तो येथून निघून देशी गेला आहे. त्याची जहागीर बदलण्यात यावी. त्याच्या जहागिरी माझ्या जहागिरीत समाविष्ट आहेत.” बादशहाने आज्ञा केली की, तेथील बक्षी व वाकेनवीस याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा.

रूहुल्लाखान याने मुहंमद अमीनखानाचा भाऊ नजीबखान आणि मुलगा मुहमद फाजिल यांना दरबारात बादशहासमोर उभे केले. (त्यांच्या मनसब वाढीसाठी) बादशहा म्हणाले—मुहंमद अमीनखान याला तेथे काम नाही. हुजुरात बोलावून घ्या.

नाहरखान उर्फ संग्रामखान हा कोल्हापूर येथे ठाणेदार होता. त्याला त्याच्या बापाच्या वेळेच्या पद्धतीप्रमाणे खुराक दुआबाची माफी होती. बादशहाने ती माफी काढून घेतली. नाहरखानाला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती.

### सहा सप्टेंबर १७०३

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

### दहा सप्टेंबर १७०३

विजापूर सुभ्याच्या दिवाण फकरूद्दीनखान याची मनसब काढून घेऊन बादशहानी त्याला पाचहजार रुपये वर्षासनाची नेमणूक करून दिली.

बक्षी सदरूद्दीन मुहंमदखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली. "कल्याण-भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याने मला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले आहे, तो म्हणतो.—"हरीशगडचा किल्लेदार आणि भीमसिंगाचा मुलगा गोपाळसिंग याला स्वतःची शुद्ध नाही. तो कोणतीही खबरदारी बाळगू शकत नाही. हरीशगडच्या किल्लेदारीवर मुकुटरामचा मुलगा बदनसिंग याची नेमणूक झाली तर किल्ल्याचा बंदोबस्त चांगला राहील." बादशहाने विनंती मान्य केली आणि पूर्वीच्या किल्ले दाराला हुजुरात बोलावण्यात यावे अशी आज्ञा केली.

### विजापूर (कर्नाटक)

विजापूर कर्नाटकचा दिवाण रूस्तमखान याची मुले मुहंमद कुली व मुहंमद तकी यांना नव्याने शंभर-शंभरच्या मनसबी देण्यात आल्या.

राजा किशनदास याचा नातू शिवसिंग हा अधोनी इम्तियाजगड येथे मुश्रफ (हिशेब अधिकारी) होता. त्याला तेथून काढून टाकण्यात आले होते. तो मुसलमान झाला. त्याला अबदुलरहीम हे नाव देण्यात आले. त्याच्या पूर्वीच्या नोकरीवर त्याला बहाल ठेवण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याला नव्याने मनसब देण्यात आली.

### बारा सप्टेंबर १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. हमीदोद्दीनखान बहादूर याने पुढीलप्रमाणे विनंती केली—(आज्ञेप्रमाणे) "एक लाकडी बंगला तयार करण्यात आलेला आहे. दिवाणेखास व दिवाणेआममध्ये तो उभा करण्याबद्दल काय आज्ञा आहे". बादशहा म्हणाले—दिवाणेखासच्या मोठ्या तंबूत तो उभा करा. मी तो पाहीन आणि नंतर काय सांगायचे ते सांगीन. त्याप्रमाणे करण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, आतीषखान हा तिकोणा किल्ला (?) जिंकून घेण्यासाठी गेला होता. त्याने तो किल्ला जिंकून घेतला आहे. बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रूहुल्लाखान याने तेथील किल्लेदारीसाठी नावाची तजवीज करावी.

### तेरा सप्टेंबर १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. एक्ताताजखान हा कडूसच्या ठाण्याकडे गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला. बक्षी रुहुल्लाखानाच्या शिक्क्याने एक आज्ञापत्र, दोन गुर्जबर्दारांच्याद्वारे, हैद्राबाद कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान (पन्नी) याच्याकडे पाठविण्यात आले. गुर्जबर्दारांना सांगण्यात

आले की, करनूलच्या परिसरात सोमण्णा जमिनदार याने बंड केले आहे. करनूलचा किल्लेदार युसुफखान याला मदत करावी आणि सोमण्णाचे पारिपत्य करावे यासाठी दाऊदखानाला टुमणे लावून (सजावली) करनूलला पोहोचवावे.

हाफिजअंबर याने पुढीलप्रमाणे बादशहाना कळविले—"पुण्याचा (पुरंदर) किल्लेदार व फौजदार जानबाजखान याचा नायब सय्यद मुहंमद हा टेहळणीसाठी आणि गस्त घालण्यासाठी रोशनखोडा (?) च्या दिशेने गेला होता. तेथे त्याने गनिमांचे (मराठ्यांचे) पारिपत्य केले. तीन माणसें कैद केली. अकरा घोडे, वीस बैल आणि झेंडे हस्तगत करून आणले. बादशहाने आज्ञा केली की, लुटीचा माल सय्यद मुहंमदला माफ करण्यात यावा. (त्याला देऊन टाकावा.)

**चौदा सप्टेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. पुढील मंडळींना गुलाबाचे अत्तर बक्षीस देण्यात आले—(१) नवाब झिन्नतउन्निसा बेगम (बादशहाची मुलगी) २० तोळे, (२) उदयपुरी महल (बादशहाची बायको) २० तोळे, (३) अब्लितुन्निसा बेगम—२०तोळे, (४) मेहेरुन्निसा बेगम (बादशहाची मुलगी)— १५ तोळे, (५) सिपहर शुकोह (दाराचा मुलगा आणि औरंगजेबाचा जावई)– १५ तोळे, (६) खान नुसरतजंग (झुल्फिकारखान) १० तोळे, (७) बक्षी रुहुल्लाखान– १० तोळे, (८) मतलबखान, ७ तोळे (९) काजी अक्रमखान ५ तोळे.

**पंधरा सप्टेंबर १७०३**

दिवाण बंद ठेवण्यात आले. हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान (पन्नी) याने पुढीलप्रमाण लिहून पाठविले:—

> "मी शंकरा (शंकराजी मल्हार) वगैरेच्या मनसबीसंबंधी, वेलूर किल्ल्याच्या किल्लेदाराच्या (अंबुरही असू शकेल) हवाल्याने लिहून पाठविले होते." त्यावर बादशहाने आज्ञा केली की, त्यांना (शंकराजी मल्हार वगैरे हुजुरात पाठवावे. त्याप्रमाणे त्यांना प्रवास आणि इतर खर्चासाठी दहा हजार रुपये देऊन पाठवीत आहे. यावर काय आज्ञा? बादशहाने विनंती मान्य केली.

खान नुसरत्जंग (झूल्फिकारखान) याच्याकडे मतलबखानाच्या शिक्क्याची आणि विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याजकडे, इनायतउल्लाखान (औरंगजेबाच्या पत्रांचा संग्राहक) याच्या शिक्क्याची बादशाही आज्ञापत्र रवाना झाली. शिरसाळावर फौजदार म्हणून आजमकुलीखान याची नेमणूक झाली होती. पण तो हुकूम बदलून अमानुल्लाखान यास पूर्वीप्रमाणे त्या जागेवर कायम ठेवण्यात आले. पालीकोटचा (?) ठाणेदार उमर याने विनंती केली की, पूर्वीच्या फौजदाराला अधिक मनसब होती तशी मला मिळेल अशी आशा बाळगतो. बादशहाने आज्ञा केली की, "आशा करीत रहावे". (उमेदवार बाशद) त्याच्या इतर विनंत्या मान्य करण्यात आल्या.

बादशहाने आज्ञा केली की, मुनीमखानाने फत्तेहुल्लाखान बहादूर यास पुढीलप्रमाणे लिहावे—"बाबू पंडित (बापूजी पंडित) यांस हुजुरात पाठवावे."

अनुक्रमणिका

## सोळा सप्टेंबर १७०३

दिवाण बंद ठेवण्यात आले.

## सतरा सप्टेंबर १७०३

दुपारच्या नमाजानंतर बादशहाने न्यायकचेरी केली. मुहंमद अमीनखान बहादूर वगैरे हे गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी अहमदनगरच्या दिशेने गेले होते. ते येऊन बादशहाना भेटले. भेटणारी मंडळी पुढीलप्रमाणे:—

(१) मुहंमद अमीनखान बहादूर,

(२) मुगलखान,

(३) अमीनखानाचा बक्षी इमामउद्दीनखान,

(४) अमीनखानाचा भाऊ नजीबखान,

(५) ख्वाजम कुलीखान.

सियादतखानाचे चुलत भाऊ आलमख्वाजा व मदीरख्वाजा हे मध्य आशियातून आले होते. त्यांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली. अमानुल्लाखान याने तिकोणा किल्ला, फत्ते केला म्हणून सोन्याच्या किल्ल्या मुहंमद शफीच्याबरोबर पाठविल्या. बरोबर एक पत्रही पाठविले. ते बादशहासमोर ठेवण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली आणि मनसब वाढविण्यात आली.

दिवाणे आला (प्रधानांची कचेरी) कचेरीतील बातमीवरून पुढीलप्रमाणे कळले. "मुहंमद अमीनखान बहादूर याचे मोगल सैनिक हे पगाराच्या बाकीवरून इनायतउल्लाखान दिवाणे तन (तनखा वाटणारा दिवाण) याला शिवीगाळ करीत आहेत. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"हमीदोद्दीनखान बहादूर याने सरबराहखान कोतवाल यास तिकडे पाठवावे आणि सैनिकांना वठणीवर आणावे.

मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याला बादशहा म्हणाले "तयार रहा, तुम्हाला बादशाही कामासाठी पाठवीत आहे."

बादशहाने आज्ञा केली की, कामयाबखान (तरबियतखानाचा भाऊ) याने मुजऱ्यासाठी न्याय कचेरीत येत जात असावे.

पुढील मंडळीना बढत्या देण्यात आल्या आणि काहीना नव्याने मनसबी मिळाल्या:—

अनुक्रमणिका

(१) रायभानच्या भाऊबंधापैकी, देवराय, सातशे जात व शंभर स्वार,

(२) नरसिंगरावचा मुलगा आण्णाजी—पाचशे जात आणि शंभर स्वार,

(३) सर्जारावचा मुलगा भीमराव—चारशे जात आणि पन्नास स्वार,

(४) हणमंतरावचा मुलगा रामाजी—दोनशे जात व तीस स्वार,

**अठरा सप्टेंबर १७०३**

दिवसाचा एक प्रहर व चार घटिका झाल्या असता बादशहा दिवाणे आम मध्ये आले. अनेक हत्ती व घोडे त्याची यांनी पाहाणी केली. दोन घटिकानंतर ते दिवाणे आममधून निघून गेले.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

> “चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान हा गनिमांचा (मराठ्यांचा) पाठलाग करीत बादशाही छावणीपासून दोन-तीन कोसावर आला आहे. काय आज्ञा?” बादशहा म्हणाले “त्याला येऊ द्या” त्याप्रमाणे तो हुजुरात येऊन भेटला. त्याने पाच मोहरा ओवाळणी दाखल दिल्या. त्याला खिलातीची वस्त्रें देण्यात आली.

मरहूम दिलावरखान याचा मुलगा मुहंमद नईम यास तळाकडे (ब्रह्मपुरी) जाण्यास निरोप देण्यात आला.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली——“शंकरा (शंकराजी मल्हार) वगैरेंना त्यांनी आणलेल्या रत्ने वगैरेच्या भेटीसहित ख्वाजा जानी याने आणावे. राजा शाह यांस एक अंगठी देण्यात आली. सैन्ये इम्तियाजगड (अधोनी) पर्यंत पाठवा, अशा अर्थाचे आज्ञापत्र चीनकुलीजखान (विजापूरचा सुभेदार) याला पाठवावे अशी आज्ञा झाली.

औरंगाबादचा कोतवाल व फौजदार मुहंमद रफी याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला:—

> “बरेच चोर (मराठे) व उपद्रवी लोक हे येथे राहात आहेत. त्यांना येथील लोकांचा पाठिंबा आहे. त्यांना पकडण्यासाठी कोतवालीचे लोक जातात तर ते लोक लढण्यास उद्युक्त होतात आणि गडबड माजवितात. माझी विनंती अशी की, अशा लोकांच्या तक्रारी आल्या तर चौकशी वाचून त्या मान्य करू नयेत.”

विजापूर येथे तैनात असलेल्या हरकाऱ्यांनी पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—चीनकुलीजखान बहादूर आणि इस्माइलखान मका यांची पथके बंडखोर देमाचा (?) मुलगा आणि देवगौडा, हुल्केरीचा जमिंनदार (बेळगांव जिल्हा) यांच्यावर चालून गेली. त्यांचे (शत्रूंचे) पारिपत्य झाले. बंडखोरांपैकी अनेक लोक मारले गेले व अनेकजण जखमी झाले. दोन किल्ले चिकोंदी (?) व यमकनमरडी हे हस्तगत झाले.

तेथील फौजदार व अमीन मुहंमद अश्रफ याच्या हवाली ते किल्ले करण्यात आले. या चकमकीत आपलेही बरेच लोक जखमी झाले. आपल्या लोकांनी चांगली कामगिरी केली.

बादशहाच्या आज्ञेने दिवाणे आमच्या ओट्यावर (चबुतरा) श्रेष्ठ अमीरउमराव (उमरायाने उज्ञाम) हे उभे राहिले आणि त्यांनी बादशहाना मुजरे केले (तसलीमात). त्यांची नावे अशी:—

(१) बादशहाजादा मुहंमद कामबक्ष,

(२) अमीरउल्‌उमरा,

(३) मुहंमद अमीनखान बहादूर,

(४) मिर्जा सदरुद्दीन मुहंमद खान,

(५) बक्षी उल्मुल्क रुहुल्लाखान,

(६) सियादतखान,

(७) राजा शाहू,

(८) रायभान (त्याला राजा शाहूच्याखाली उभे करण्यात आले),

(९) हमीदोद्दीन खान बहादूर,

(१०) खानाजाद खान,

काल रात्री बादशहाने औरंगाबादच्या मार्गाचा रक्षक (राहदार) मुगलखान याची आठवण केली. त्याप्रमाणे तो येऊन बादशहाना भेटला. बादशहांनी त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

(१) झिनतउन्नीसा बेगम (बादशहाची मुलगी) त्यांच्यासाठी म्हणून एक तंबू हुजुरात आहे तो बहादुरगडला नेऊन पोहोंचविणे.

(२) बादशाही हत्तीखाना—औरंगाबादेहून मुहरमखानाबरोबर हुजुरात पाठविणे.

(३) तुम्ही पेडगाव (बहादूरगड) पोहोचल्यावर नबाब झिन्नतउन्नीसा बेगम—यांना लागणारे सामान त्यांच्याकडे देणे.

मुगलखान याने विनंती केली की, मला सहाय्य म्हणून मला एक हत्ती देण्यात यावा. बादशहाने आज्ञा केली की, हत्तीची किंमत म्हणून पाच हजार रुपये मुगलखान यांस देण्यात यावे.

अनुक्रमणिका

यानंतर जून १७०३ च्या नोंदी सुरू होतात. कागदपत्रच मागे-पुढे झाले असावेत. अभ्यासकांनी तारखांची काळजीपूर्वक नोंद घ्यावी म्हणजे घटनांच्या अभ्यासास गोंधळ होणार नाही.

**बादशहाच्या कारकीर्दीचे सत्तेचाळीसावे वर्ष**

**मोहरम २८——दोन जून १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की, शत्रूंचे (मराठ्यांचे) खंडोजी वगैरे सरदार दोन हजार स्वार बरोबर घेऊन बोरघाटाजवळ पसरले आहेत. बादशहानी आज्ञा केली की, मुहंमद अमीनखान याने तयार राहावे. शत्रू त्या भागात आले की, त्यांचे पारिपत्य करावे.

पाईन विलायत (वाई खालचा भाग) चा दिवाण मुहंमद आकिल याच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले—"धना (धनाजी) जाधव हा सैन्य घेऊन पाईन विलायतमधे पसरला आहे. या भागात छावणी घालण्याचा त्याचा बेत आहे. बादशहाच्या आज्ञेने आणि यार अली बेगच्या शिक्याने तळाचा (ब्रह्मपुरी) संरक्षक, खान नुस्रतजंग झुल्फिकारखान याला आज्ञापत्र गेले की, शत्रूचें पारिपत्य करावे.

औरंगाबाद येथे तैनात असलेल्या हरकाऱ्याच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले—"औरंगाबादचा सुभेदार शहाजादा मुहंमद बेदारबख्त याने मानसिंग व स्वतःची पथके व राजा जयसिंग यांच्या बरोबर खजिना व इतर कारखाने हुजुरात पाठविण्यासाठी म्हणून या महिन्याच्या (पंचवीस मे) एकोणीस तारखेस लालखान याजकडे पाठवीत आहे. काय आज्ञा?" बादशहाने आज्ञा केली की, लालखानापाशी पाठवावे. हत्तीखाना आणि काफिला लालखानाबरोबर इकडे रवाना करावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

"तळकोकणचा फौजदार हसनअलीखान हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेत होता. तो सुटून आला. तो कैदेत असल्यापासून आतापर्यंत त्याची जहागीर व मनसब ही बहाल समजण्यात यावी. त्याला विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याजपाशी तैनात करण्यात यावे. त्याला तीनहजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती. मनसब थोडी कमी करण्यात आली.

**तीन जून १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**चार जून १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**पाच जून १७०३**

अनुक्रमणिका

बादशहाने आज न्याय कचेरी केली. मुहंमद जबल याला सुरत बंदर आणि बडोदा येथील सवानेह निगार (घटनांचे रिपोर्ट, वृत्तांत पाठवणारा) म्हणून नेमण्यात आले. मुझफर हुसेन यास नलगोंड्याचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याला निरोप देण्यात आला. बादशहाने झुल्फिकार खानाचा नायब मतबलखान, मुहंमद शफी आणि अशफाक उर्रसूल यांना उभे करून त्यांना शाली बक्षीस म्हणून दिल्या. अंतःपुरातील चिठया लिहिणारी आणि पोहोचविणारी फातिमा खानम हिची सहायक हफीज बानू ही तळावरून (ब्रह्मपुरीच्या) येवून बादशहांना भेटली. तिला एक शाल बक्षीस देण्यात आली.

काल रात्री एक प्रहर अन् चार घटका झाल्या असता बक्षी रुहुल्लाखान हा हुजुरात आला. त्याने पुढीलप्रमाणे सांगितले——"राजा उत्तमराम हा गाजिउद्दीनखानाच्या फौजेत तैनात होता. तो हूजुरात आला होता. त्याला विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्या फौजेत तैनात करण्यात आले आहे. पण उत्तमरामची आर्थिक परिस्थिती चांगली नाही. त्याचे म्हणणे असे की, मला एक वर्षासाठी देशी जाण्याची परवानगी मिळाली तर मी पथके तयार करून येईन." त्याची विनंती मान्य करण्यात आली.

## वीस जून १७०३

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाने न्याय कचेरी केली. शंकराजी हा मुहंमद अमीनखान बहादूर याच्या फौजेत तैनात होता. तो येऊन बादशहाला भेटला. यक्काताजखान हा बक्षी रूहुल्लाखानाच्याबरोबर येऊन बादशहाला भेटला.

औरंगाबादचा कोतवाल वझीखान याला निरोप देण्यात आला.

नसरूल्लाखान किल्लेदार व फौजदार (बहुदा शिवनेरीचा) याने बादशहाचा निरोप घेतला. राजा उत्तमराम याला देशी जाण्यासाठी एक वर्षाची रजा देण्यात आली. बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्लेदार व फौजदार देवीसिंग याने पुढीलप्रमाणे विनंत्या लिहून पाठविल्या:—

(१) काही कृपा व्हावी, त्याची मनसब वाढविण्यात आली,

(२) खुराक दुआब माफ करण्यात यावा. विनंती मान्य

(३) माझा भाऊ लखमनदास याच्यावर कृपा व्हावी, लखमनदासची मनसब वाढविण्यात आली.

केशवराम हरकारा हा औरंगाबाद येथे तैनात होता. त्याच्या लिहिण्यावरून पुढील हकीकत कळली.—"शहाजादा बेदारबख्त यास कळले की, नेमाजी शिंदे वगैरे सरदार हे पंधरा हजार स्वारांचे सैन्य घेऊन नवलघाटात (?) पसरले आहेत. शहाजाद्याने जयसिंग, मीर अहमदखान अब्दुल हादीखान इत्यादी औरंगाबादेत तैनात असलेल्यांना शत्रूच्या पारिपत्यासाठी रवाना केले. त्यांना बक्षिसे देण्यात आली.

हमीदोद्दीनखान बहादूर व मुहंमद अमीनखान बहादूर यांची माणसे पाळीपाळीने बादशाही छावणी भोवती टेहळणीसाठी जात असावे. अशी आज्ञा देण्यात आली एकवीस जुन १७०३.

अनुक्रमणिका

## बावीस जून १७०३

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. गोहरआराबेगम (बादशहाची मुलगी) हिने (दिल्लीहून) बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्ते झाल्याबद्दल ओवाळणीच्या एक हजार मोहरा आणि इतर वस्तू पाठविल्या, त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

नरकवासी शिवा (शिवाजी महाराज) यांचा पुतण्या रायभान याला सहा हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती. त्याने विनंती केली की, "बादशहाजादा मुहंमद कामबक्ष यांची भेट घेण्यासंबंधी मला काय आज्ञा." बादशहाने आज्ञा केली की, "भेटीस जावे आणि शहाजादे देतील ते घ्यावे."

## तेवीस जून १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. नौकांचा प्रमुख (मीरबहर) सैफुल्लाखान हा नौकांना घेऊन बहादुरगडला (भीमा नदीवर) गेला होता. त्याने खान नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याला नदीपार करविले. नंतर तो (सैफुल्लाखान) येऊन बादशहाला भेटला.

हमीदोद्दीनखान बहादूर याने कळविले की, सिकंदरखान विजापूरी (विजापूरचा शेवटचा बादशहा सिंकंदर आदिलशहा) याचा धाकटा मुलगा मुहंमदअली हा आहे. बादशहाने आज्ञा केली की, सिंकंदरची दोन मुले मुहंमद मुहिउद्दीन व मुहंमदअली यांना हूजुरात आणावे, त्याप्रमाणे ते आले. त्यांनी पन्नास मोहरा ओवाळणीच्या दिल्या. बादशहाने आज्ञा केली ती. त्यांना कठड्याच्या आंत उभे करावे. (सिंहासनाच्या जवळचा कठडा) मुहंद अलीला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

नुस्रतजंग (झुल्फिकारखान) चा सहकारी अब्दुल्ला हा शंभर स्वारांचे पथक घेऊन सैफुल्लाखानाबरोबर आला होता. तो बादशहाना भेटला.

सदरूद्दीन मुहंमदखान बक्षी याला अक्कलकोट महाल जहागीर परगणा येथील फौजदारीवर नेमण्यात आले.

फत्तेउल्लाखान आलमगीरशाही (हा बादशहाबरोबर विशालगड, परळी वगैरेच्या वेढ्यात होता) हा काबुल सुभ्यात तैनात होता. त्याने अर्ज पाठवून काही मागण्या केल्या. त्यापैकी एक म्हणजे अशी— फकीरूल्लाखान (फत्तेउल्लाचा मुलगा हा सज्जनगडच्या वेढ्यात मारला गेला). याची मुले पीरगुलाम व नेमतउल्ला यांना काबुल सुभ्यात जहागीरी मिळाव्या. दिवाणांनी चौकशी करून वृत्तांत सादर करावा, अशी आज्ञा झाली.

## चोवीस जून १७०३

अनुक्रमणिका

विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याच्याकडे बादशहाचे फर्मान गेले होते. ते पोहोचवून गुर्जबर्दार परत आले. सुभेदारकडून त्यांना मिळालेले पाचशे रुपये आणि कापड त्यांना माफ करण्यात आले.

### पंचवीस जून १७०३

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—"धान्याच्या गोणी भरलेले एक हजार बैल, एकश स्वार व पाचशे बंदुकची, झुल्फिकारखानाच्या सैन्यात रवाना करावे."

सियालकोट (पंजाब) चा कानूनगो लच्छीराम हा ख्वाजाइज्जत याच्याद्वारे मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

बादशहाने आज्ञा केली की, तहवुरखान (शिष्टाचाराचा अधिकारी) याने सजावली करून (मागे लागून) अहसनाबाद उर्फ गुलबर्गा येथील किल्लेदार व फौजदार नुरूद्दीनखान याला गुलबर्ग्याकडे पाठवून द्यावे.

### सव्वीस जून १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. काल रात्री एक प्रहर चार घटिका झाल्या असता बादशहानी बक्षी रूहुल्लाखान यास बोलावले. बादशाही छावणीपासून औरंगाबादेपर्यंतचा नकाशा बादशहाच्यासमोर ठेवण्यात आला. बादशहा म्हणाले. "औरंगाबादेहून छावणीत येण्यासाठी बहादुरगडावरून मार्ग आहे. मध्ये एक नदी लागते." बादशहानी औरंगाबादेहून येणाऱ्या काफिल्यासाठी तोच मार्ग ठरविला. बादशहा म्हणाले.— "आम्ही हा मार्ग ठरविला आहे." तरबियतखान हा बहादुरगड येथे आहे. त्याला लिहिण्यात यावे की, काफिल्याला तेथून बरोबर संरक्षक पथक देऊन हुजुरात पाठवित जावे. सियालकोटचा कानूनगो लच्छीराम हा मुसलमान झाला होता, त्याचे नांव अब्दुल कुद्दस ठेवण्यात आले.

बेलदाराचा दारोगा खिदमतराय हा कादराबादची गढी तयार करण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

नुरूद्दीनखान याने विनंती केली की, "गुलबर्ग्याच्या किल्लेदारीवर व फौजदारीवर माझी नेमणूक झाली आहे. मी जावे म्हणून मागे लागले आहेत. (सजावली) पण मला अद्याप कोणताही सरंजाम मिळाला नाही, तर मला सरंजाम मिळवून देण्याची प्रथम आज्ञा व्हावी." विनंती मान्य करण्यात आली.

सुल्तान हुसेनचा मुलगा मुहंमद खलील हा सुभे वऱ्हाडचा बक्षी व वाकेनवीस होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याला हुजुरात बोलवावे अशी आज्ञा करण्यात आली.

फत्तेउल्लाखानाच्या भाऊबंधापैकी पुढील मंडळींना मुहंमद अमीनखान आणि शमशीरबेग यांच्यापाशी तैनात करण्यात आले:—

(१) उर्फखान, (२) मुहंमद बाकर, (३) बुऱ्हाणोद्दीन.

अनुक्रमणिका

## सत्तावीस जून १७०३

चीनकुलीजखान (विजापूरचा सुभेदार) याच्या बिरादरीचे मनसबदार हुजुरात आले होते. सजावली करून त्यांना चीनकुलीजखानाकडे पाठवून द्यावे, अशी आज्ञा झाली.

## अठ्ठावीस जून १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. चाकणचा किल्लेदार व फौजदार कामियाबखान हा होता. त्याला तेथून बदलून त्याच्या जागी अमानुल्लाखान याची नेमणूक करण्यात आली.

अतलापूर (?) चा ठाणेदार सोमानजी याने शत्रूच्या सरदाराला (नाव लागत नाही) पकडले. त्याला हुजुरात आणावे म्हणून गुर्जबर्दार नेमण्यात आला.

हुक्केरी (जिल्हा बेळगाव) चा किल्लेदार व फौजदार मुहंमद अश्रफ याने पुढीलप्रमाणे लिहून पाठवले—"बहिरा (बहिर्जी हिंदुराव घोरपडे) याने मोठे सैन्य बरोबर घेऊन चाल केली आणि त्याने किल्ल्याला वेढा घातला. मी त्याच्याशी लढत आहे. विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याला मी परोपरीने लिहिले की, मला मदत करावी पण मदत आली नाही, हुजुरातून कुमक आल्यास बरे नाहीतर मी स्वामीकार्यात खर्चून जाईल." बादशहाने आज्ञा केली "चीनकुलीजखानाला लिहा. त्याने बद्री (कृष्णानदीवर) या खेडयापर्यंत यावे आणि तेथून मुहंमद अश्रफच्या कुमकेसाठी सैन्य पाठवावे.

औरंगाबाद येथे तैनात असलेला हरकारा केशव याच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले. नेमा (नेमाजी शिंदे) वगैरे मराठे सरदार हे वीस हजार सैन्यासहित मौजे अनवा (?) तालुके (शब्द लागत नाही.) ला वेढा घालून होते. कुचकखान हा त्यांच्यावर चालून गेला. शहाजादा बेदारबख्त याने राजा जयसिंग वगैरे अधिकाऱ्यांना त्याच्या (कुचकखानाच्या) मदतीस पाठविले. लढाई झाली. शत्रूपैकी काही जणांना जखमी करण्यात आले आणि काहींना नरकात पाठविण्यात आले. चार घोडे, भाले वगैरे हस्तगत करण्यात आले. चार जणांची डोकी कापण्यात आली. शत्रूने वेढा उठविला. शत्रूला (मराठ्यांना) धीर धरवला नाही. शत्रूचे सैन्य पळून गेले. राजा जयसिंग याने शत्रूच्या जागेवर आपला तंबू उभा केला. शत्रूचे (मराठ्यांचे) सरदार हे मुगल सैन्यापासून तीन कोसांवर गेले आहेत.

## एकोणतीस जून १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. पाऊस पडत होता. त्याने फक्त एकच घटिका काम केले. पूर्वी गस्त घालण्यासाठी म्हणून दोन मोठी पथके हमीदोद्दीनखान बहादूर व मुहंमद अमीनखान बहादूर यांच्या बरोबर देण्यात आली होती. आता आज्ञा अशी झाली की, एक दिवस हमीदोद्दीनखान, एक दिवस मुहंमद अमीनखान आणि एक दिवस बक्षी सदरूद्दीनखान यांनी गस्त आणि टेहळणी यासाठी जात रहावे. सदरूद्दीनच्याबरोबर देण्यात येणाऱ्या पथकात एक हजार आठशे स्वार असावेत. त्यांत अजीजखान, सुलेमानखान, शिवसिंग आणि मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम वगैरे अधिकारी असावेत अशी आज्ञा

अनुक्रमणिका

झाली. मातबरखानाच्या लिहिण्यावरून ईरजखान याचा मामेभाऊ सय्यद मुहंमद याला दोनशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब देण्यात आली.

मीर अलीतकी याची नेमणूक सुभे मुहंमदाबाद (बीदर–नांदेड) चा दिवाण म्हणून करण्यात आली.

सार्वजनिक मालमत्ते (बयूतात) चा अधिकारी अबदुल रहीमखान याच्यावर नीलांबर मिश्रा या वैद्याने यशस्वी उपचार केले होते. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**तीस जून १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. बादशहाने आज खान फिरोजजंग (भावी निजामउल्मुल्काचा बाप) याच्यासाठी खास खिलातीची वस्त्रे, एक शिरपेच एक पाचूची अंगठी काढून ठेवली. फिरोजजंगकडे पाठविण्यासाठी त्या वस्तू मुहंमद अमीनखान बहादूर (फिरोजजंगाचा चुलतभाऊ) याच्याकडे देण्यात आल्या.

मुहंमद आबिद हा कोहीरचा किल्लेदार व फौजदार होता. (बीदरजवळ) त्याची मनसब वाढविण्यात आली.

चाकणचा किल्ला हा नव्याने नेमलेला किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याच्या हवाली करावा असा हुकूम माजी किल्लेदार कामियाबखान याला देण्यात आला.

अमानुल्लाखानाचा भाऊ अताउल्लाखान याला तेथील (चाकण) ठाणेदारी देऊन अमानुल्लाच्या बरोबर पाठविण्यात आले. पण हे अताउल्लाखानाला नको होते. म्हणून त्याला (अताउल्लाला) तेथून बदलण्यात आले. पट्टा (विश्रामगड) किल्ल्याचा किल्लेदार व फौजदार लोदीखान हा किल्ल्यावर आपला नायब (डेप्युटी) ठेवून हुजूरात आला होता. त्याने पुढीलप्रमाणे विनंती केली––"सरकारातून मला आणि माझा मामेभाऊ अबदुर्रहमानखान यांना सहासटलाख दाम येणे आहे, पट्टा आणि सकुनगडच्यामध्ये परगणे अंकोल व कनोल (?) आहेत. मला ते दिल्यास ते मी दुरुस्त करीन." बादशहाने आज्ञा केली की, "मोतमदखान याने चौकशी करून कळवावे. जमिनी शिलकीत (पायबाकी) असल्यास जागीर म्हणून देण्यात येतील.

**एक जुलै १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद ठेवण्यात आले.

**दोन जुलै १७०३**

आज दोन्ही दिवाण बंद ठेवण्यात आले फरासखान्याचा मुश्रफ मीरहादी याला आज्ञा झाली की, दिवाणेखास येथे तंबू उभा करावा. याकूबखान (इब्राहिमखानाचा मुलगा इब्राहिमखान हा बहुधा गोळकुंड्याचा माजी सेनापती असावा) याने बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्ते झाल्याबद्दल दोनशे मोहरा

पाठविल्या. त्याने विनंती लिहून पाठविली की, आपण मला हुजुरात बोलावल्यास मी चारशे स्वारांचे पथक तयार करून घेऊन येईन. तूर्त मला खर्चासाठी म्हणून काही रक्कम देण्यात यावी. (पथकाच्या मान्य खर्चातून ती वळती करून घेण्यात येईल). एडहॉक बादशहाने विनंती मान्य केली आणि आज्ञा केली की, आग्र्याच्या खजिन्यातून (अकबराबाद) याकूबखानाला पाच हजार रुपये देण्यात यावे.

तोफखान्याचा प्रमुख (मीर आतिश) तरबियतखान याचा मुलगा मुहंमद इसहाक याची अहमदनगरच्या किल्ल्यावर नेमणूक झाली होती. बादशहाने आज्ञा केली की, तरबियतखानाचा कारभारी सेनाचंद याने, मुहंमद इसहाकच्या बरोबर दोन महिन्यासाठी अहमदनगरला जावे.

जासूदांच्या तोंडून पुढील बातमी कळली.—"व्यापारी वगैरे प्रवासी चाकणहून हुजुरात येत होते. बादशाही छावणीपासून तीन कोसांच्या अंतरावर चोरांच्या (मराठ्यांच्या) तीस स्वारांनी त्यांच्यावर हल्ला केला. हल्ल्यात एक माणूस ठार झाला. अनेक लोक जखमी झाले. सगळी मालमत्ता लुटण्यात आली." बादशहाने आज्ञा केली की, "बक्षी रूहुल्लाखान याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा."

रसूलाबाद (शिवापूर) येथे तैनात असलेल्या हरकाराच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले.— "चोर (मराठे) हे कतलूरा (? नाव लागत नाही) गावापाशी जमाव करीत असून त्यांचा हेतू उपद्रव करण्याचा दिसतो." बादशहाने आज्ञा केली की, खानचंद याने तेथे जाऊन त्यांचे पारिपत्य करावे."

## तीन जुलै १७०३

सईदखान हा काबुल येथे तैनात होता. तो येऊन बादशहांना भेटला. त्याला दीड हजार जात व आठशे स्वार अशी मनसब होती. त्याला मनसबीत सवलती देऊन आणि खिलातीची वस्त्रे देऊन खान नुसरतजग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात करण्यात आले. त्याला आणि त्याचा मुलगा मुहंमद अर्शद यांना झुल्फिकारखानाच्या फौजेत आपल्या तैनातीच्या जागेवर जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

काजी अक्रमखान, खानजादखान आणि इनायतउल्लाखान यांच्याकडे बादशहाने फळफळावळे पाठविली.

नुस्रताबाद (सगर, गुलबर्गा जिल्हा, कर्नाटक) येथील हकीकतीवरून कळवले की, ताळीकोटचा ठाणेदार मुरादउल्लाखान हा वारला. बेडर लोकांनी धामधूम चालविली आहे. बादशहाने आज्ञा केली कीं, दुसरा फौजदार नेमण्यात यावा.

बादशहाने आज्ञा केली की, उमदी (जत तालुका, सांगली जिल्हा) येथील ठाणेदारीवर अताउल्लाखान आहे, त्याला बदलावे आणि त्याच्या जागी इतरांची नेमणूक करण्यात यावी.

सुजानसिंग खानजहानी (खानजहानच्या पथकातला) याला शिराढोण परगण्याचा अमीन म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात येवून त्याला एक शाल बक्षीस म्हणून देण्यात आली.

अनुक्रमणिका

हरकऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली.—“धना (जी) जाधव याचे पारिपत्य करावे म्हणून खान नुसरतजंग ‘(झुल्फिरारखान) हा बहादूर गडीहून निघाला व नूरघाटाला (?) पोहोचला. तो शत्रूचा पाठलाग करीत आहे. धनाजी जाधव हा घाटाच्या पायथ्याखालच्या भागापासून सात कोसावर आला होता. वरील बातमींने तो भीमा (नीरा?) ओलांडून पळून जात आहे.

**चार जुलै १७०३**

उम्दतुल्मुल्क खानफिरोजजंग याने पुढील प्रमाणे लिहून पाठविले.—“माझ्या पथकाचे जड सामान सरंजाम ठेवण्यासाठी एखादा किल्ला हवा—पुष्कळदा असे होते कीं, सुरक्षित जागा नसल्यामुळे जड सामानांचे संरक्षण करण्यासाठी मुद्दाम कसलेली पथके ठेवावी लागतात. मला असे सामान ठेवण्यासाठी मुजफ्फराबाद (बहुधा—कोहिर) चा किल्ला देण्यात आल्यास बरे—ते होत नसल्यास कंधार (नांदेड जिल्हा) चा किल्ला देण्यात यावा. यापूर्वी खुदाबंदाखान (बीदर-नांदेडचा पूर्वीचा सुभेदार) यालाही हा किल्ला या कारणासाठी देण्यात आला होता.” बादशहाने विनंती मान्य केली आणि कंधारचा किल्ला खानफिरोजजंगकडे देण्यासाठी फर्मान देण्यात यावे. अशी आज्ञा केली. खानफिरोजजंग यांस सात हजार जात, सात हजार स्वार—त्यापैकी तीन हजार स्वार दुघोडी, एक कोटी दाम इनाम अशी मनसब आहे.

हमजाखान मरहूम याचा मुलगा असदुल्ला हा कंधारचा किल्लेदार व फौजदार होता, त्याला हुजुरात बोलावण्यात आले. लोधीखानाचा मामेभाऊ आणि परी सजावलीचा मुलगा ताज उर्फ मुजफ्फर याची मनसब वाढविण्यात आली.

मरहूम उजबेगखान (कल्याणच्या लढाईत हा मराठ्यांशी लढतांना मारला गेला.) याचा मुलगा आणि धारुर उर्फ फत्तेहाबाद (बीड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार रुस्तुमबेग याने लिहून पाठविले की, “आज्ञा होत असल्यास येथे आपला नायब (डेप्युटी) ठेऊन मी हुजुरात येईन.” विनंती मान्य झाली नाही.

बादशहाना कळविण्यात आले ते असे.——(रायगडहून आलेल्या हकीकतीवरून) वाटेवर चोरांचा (मराठ्यांचा) उपद्रव वाढला आहे. आपले सैनिक छावणीत (बादशाही) येतात. चोरांनी (मराठ्यांनी) त्यांच्यावर हल्ले केले. त्यांनी काहींना जखमी केले. व काहीना ठार मारले. बादशहाने आज्ञा केली की, राजमार्गावरील ठाणेदाराना, मतलबखान याने या बाबतीत ताकीदपत्रे लिहावीत.

**पाच जुलै १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. बुऱ्हाणपुराहून मरहूम अबदुल अजीजखान याचा मुलगा अबुलहसन हा आपल्या मुलाला घेऊन हुजुरांत आला. बुऱ्हाणपूर येथील साधु अबदुल लतीफ याच्या दर्ग्यातून त्याने बादशहासाठी मुलाला मानाचा पोषाख आणला होता. त्याला खिलातीची वस्त्रे आणि काही सोनेही देण्यात आली. चाकणचा किल्लेदार अमानुल्ला याचा भाऊ अताउल्ला हा भावापाशी तैनात होण्यास राजी झाला. त्याला निरोप देण्यात आला.

जिझियाचा कारकून म्हणून मुहंमद हादी काम करीत होता. त्याच्या जागी शेख नुरुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

अनुक्रमणिका

तोरगल (मुद्‌गलही असू शकेल) चा किल्लेदार जमशीदखान विजापुरी (हा पुढे वाकीणखेड्याच्या वेढ्यात मारला गेला.) याला तेथून बदलून चीनकुलीजखान (विजापूरचा सुभेदार) याच्या सन्यात तैनात करण्यात आले. त्याला पाच हजार जात आणि पाच हजार स्वार अशी मनसब होती.

**बंगलोर**

बंगलोरच्या फौजदारीवर खाने आलमचा मुलगा मुहंमद ताहिर याची नेमणूक करण्यात आली. त्याला ताहिर मुहंमदखान अशी पदवी देण्यात आली. त्याला पाचशे जात व ऐंशी स्वार अशी मनसब होती. तीत दीडशे स्वारांची भर घालण्यात आली. सुभे खानदेश मधील नवलगडच्या किल्लेदारीवर शहाजादा बेदारबख्त याने बादशाही अधिकाऱ्यातून एकाची नेमणूक करावी अशी आज्ञा झाली. मुफ्तखरखान मरहूम याचा मुलगा मुहंमद जाफर याला पूर्वीप्रमाणेच बेदारबख्ताच्या तोफखान्याचा अधिकारी म्हणून बहाल ठेवण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, मुगलखान हा औरंगाबादेहून काफिला व खजीना घेऊन येत आहे तर सर्फराजखान याने लोहगांवला जाऊन तळ ठोकावा.

औरंगाबादच्या हरकाऱ्याच्या वृत्तांतावरून कळले की, पुढील मंडळी बादशहाच्या परवानगी शिवाय (दस्तक प्रमाणपत्र) येथे येऊन बसली आहेत. बादशहाने आज्ञा केली की, त्यांच्या जहागिरी काढून घ्याव्यात. त्यांची नावे अशी (१) जाफरबेग (२) इब्राहिमबेग.

**सहा जुलै १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. बादशहा हे मतलबखान यास म्हणाले. “मुगलखान हा खजीना घेऊन लष्करी छावणीजवळ आला आहे. तुम्ही जाऊन खजीना आणा. सैफुल्लाखान याला आज्ञा झाली की, तुम्ही खजीना नदीच्या पार आणवून द्या. (सैफुल्लाखानाकडे नावाची व्यवस्था होती.) किशनदास पंडित हा इनायतुल्लाखानाच्या द्वारे (through) मुसलमान झाला. त्याने पाच मोहरा ओवाळणीच्या म्हणून दिल्या. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

पुरंदरचा माजी किल्लेदार खानचंद याला खान नुस्रतजंग याच्या फौजेत तैनात करण्यात आले. याला निरोप देण्यात आला. खालश्याचा दिवाण, इनायतउल्लाखा याने पुढीलप्रमाणे विनंती केली.— “काजी नजीब हा करखोल (?) वगैरेचा अमीन आणि फौजदार होता. त्याने संगमनेरच्या उत्पन्नातून बरीच रक्कम दाबून ठेवली आहे. ती दाखल (सरकारात) करण्याची तो खटपट करीत नाही. बादशहाने आज्ञा केली की, त्याला कैद करण्यात यावे.

पाईन विलायत (वाईखालचा प्रदेश) चा दिवाण मुहंमद आकिल कंबू याला त्याच्या हुद्याला जोडून कोल्हापूरचा अमीन म्हणून नेमण्यात आले. त्या जागेवर (अमीनीच्या) पूर्वी अमरसिंग हा होता. अमरसिंगला परगणे काटी व बार्शी (सोलापूर जिल्हा) येथे अमीन व फौजदार म्हणून नेमण्यात आले. तेथे त्यापूर्वी जमशीदखान हा काम पहात होता.

अनुक्रमणिका

## सात जुलै १७०३

आज दिवाणचे काम बंद होते. शहाजादा मुअज्ज़म (काबुलचा सुभेदार) याने एक हजार डाळिंबे, दोन घोड्यांवर लादून बादशहाकडे पाठविली. ती त्यांच्या नजरेखालून गेली. फळे मेवाखान्यात (फळे ठेवण्याची जागा) ठेवावी आणि घोडे पाग्याचा प्रमुख (अख्ताबेगी) हमीदोद्दीनखान याजकडे द्यावे अशी आज्ञा झाली.

## आठ जुलै १७०३

दिवाण बंद ठेवण्यात आले. चाकणचा किल्लेदार व फौजदार याला खजिन्यातून काही कामगिरीसाठी म्हणून एक हजार अश्रफ्या आणि तीस हजार रुपये देण्यात यावेत, अशी आज्ञा झाली.

## नऊ जुलै १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. मुगलखान हा खजीना व काफिला यांजबरोबर आला होता, तो येऊन बादशहाना भेटला. त्याला बहादुरगडकडे जाण्यासाठी निरोप देऊन बादशहाने आज्ञा केली की, इकडूनही काफिला बरोबर घेऊन जा. शहाजादा कामबक्ष याचा मुलगा सुल्तान मुहियुल्मिल्लत याची कबर शेख जलालउद्दीन याच्या दर्ग्याजवळ पुण्यात होती. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"मतलबखान करावल आणि सर्रबराहखान कोतवाल यांनी जावे आणि दर्ग्याभोवती गढी तयार करावयाची आहे—कसबे पुण्यातील ही गढी व त्याच्या आतील गढी (गढी अर्क) यांची साखळीने मोजमाप करावी आणि तपशील कळवावा." त्याप्रमाणे गढीच्या भोवतालचा परिसर शंभर साखळ्या (जरीब) आणि अर्कचा परिसर बत्तीस साखळी अशा प्रकारे नकाशा तयार करून त्यांनी हमीदोद्दीनखानाच्या द्वारे बादशहापुढे मांडला. बादशहाने नकाशा पाहिला.

काल रात्री बादशहाना कळविण्यात आले कीं, मतलबखान हा आज्ञेप्रमाणे खजीना नदीपार करवून आला आहे. बादशहाने आज्ञा केली की, त्याने छावणीभोवती गस्त घालण्यासाठी जावे.

सुरत बंदरचा बदललेला मुतसद्दी (मुत्सद्दी) दियानतखान (मासिरुल्उमरा या ग्रंथाचा कर्ता, शहानवाजखान याचा पूर्वज) हा येवून बादशहांना भेटला. त्याने पांढरे कागद आणि इतर वस्तू बादशहाना भेट म्हणून (पेशकश) दिल्या. पुढील मंडळीच्या नावे बादशहाच्या आज्ञेन आज्ञापत्रे रवाना झाली:—

(१) अकबराबाद, आग्र्याचा सुभेदार मुख्तारखान (याची मुलगी ही शाहजादा बेदारबख्त याची बायको—औरंगजेबाची नात सून),

(२) जान निसारखान, ग्वालेरचा फौजदार (१६९० मध्ये संताजीने याचा पराजय केला होता.)

(३) खिदमत तलबखान, किल्लेदार, किता (किल्ल्याचे नाव लागत नाही.)

कमरनगर (करनूल) या भागातील खाणीत हिरे निघत, करनूलचा किल्लेदार व फौजदार युसुफखान यांजकडून त्यापैकी एक हिरा घेण्यात आला आणि बादशहाच्यासमोर ठेवण्यात आला. हनुमंतगड (नाशिक जिल्हा) चा किल्लेदार कदीमकुली याच्या जागी रहमानदाद याची नेमणूक करण्यात आली होती. कदीमकुलीने किल्ला रहमानदादच्या हवाली करावा असे फर्मान बादशहाकडून गुर्जबर्दाराच्या द्वारे पाठविण्यात आले.

नुस्रताबादचा बदललेला अमीन हा येऊन बादशहाना भेटला. नुस्रतजंगच्या (झुल्फिकारखान) फौजेत मुहंमद काजिम हा तैनात होता. तो तेथून फरारी झाला होता. या सुमारास मतलब खानाच्या मध्यस्थीने तो बादशहासमोर आला. बादशहाने आज्ञा केली की, "त्याला कामावर बहाल म्हणून समजण्यात यावे."

शहाजादा कामबक्ष याने राजगड आणि तोरणा या किल्ल्यांचे नकाशे बादशहासमोर मांडले.

## धनाजी जाधव

हरकाऱ्याच्या तोंडून पुढील हकीकत कळली. "धना (जी) जाधव हा स्वतःच्या सैन्यासहित चंदनवंदन किल्यानजीक तळ देऊन आहे. त्याने नरकवासी रामा (राजाराम महाराज) याच्या बायकोकडे (महाराणी ताराबाई) हणमंतराव (निंबाळकर) याला पाठविला आहे. खान बहादूर नुस्रतजंग (झुल्फिकारखान) हा मौजे बदलर (नाव लागत नाही बहुधा बुधपाचगाव) येथे मुक्काम करून आहे.

इनायतउल्लाखान याचा मुलगा झियाउल्ला यास सुभे आग्र्याचा दिवाण म्हणून नेमण्यात आले, त्याला निरोप देण्यात आला.

शहाजादा मुअज्जम (काबुलचा सुभेदार) याने आपला बदललेला दिवाण हादीखान याच्याबरोबर वीस घोडे पाठविले होते. तो हमीदोद्दीनखान याच्याद्वारे येऊन बादशहाला भेटला. घोडे बादशहाना दाखविण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की.—शहाजादा अजीमुश्शान (मुअज्जमचा मुलगा आणि औरंगजेबचा नातू) बंगालचा सुभेदार याच्यासाठी दहा हजार रुपये किंमतीचा रत्नजडीत खंजीर काढून ठेवण्यात यावा, (पाठविण्यासाठी). सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार (सोलापूर जिल्हा) नजरबेगखान याने काही वस्तू पेशकश म्हणून पाठविल्या.

## दहा जुलै १७०३

बादशहाने आज दिवाणेखास भरवला. दिवाणेखासचा दारोगा (व्यवस्थापक) हमीदोद्दीनखान बहादूर याने पुढीलप्रमाणे विनंती केली. दिवाणखास मध्ये मुजऱ्यासाठी कुणी यावे याची यादी करण्यात आली आहे. त्यात श्रेष्ठ उमराव, मोठे मनसबदार, बक्षींचे कारभारी वगैरे अधिकाऱ्यांची नावे आहेत.

अनुक्रमणिका

त्यासंबंधी काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली “त्यांच्या नावाची यादी आपल्यासमोर आणावी”. त्याप्रमाणे बादशहासमोर यादी ठेवण्यात आली, त्याप्रमाणे पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—

(१) उम्दतुलमुल्क—अमीरउल्उमरा (असद्खान मुख्यप्रधान),

(२) बक्षीउल्मुल्क—रूहुल्लाखान,

(३) बक्षी उल्मुल्क—सदरुद्दीन मुहंमदखान,

(४) मतलबखान,

(५) हाजी मुहंमद अलीखान,

(६) मन्सूरखान,

(७) राजा शाहू,

(८) हमीदोद्दीन खानबहादुर,

(९) इनायत उल्ला खान,

(१०) अबदुल् रहीमखान,

(११) रशीदखान,

(१२) शादीखान,

(१३) बाकरखान,

(१४) मुनीमखान.

वगैरे अधिकाऱ्यांनी पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे दिवाणेखासमध्ये मुजऱ्यासाठी येत असावे. त्याप्रमाणे अंमलबजावणी झाली.

बादशहाने दिवाणखासमध्ये हमीदोद्दीन खान बहादुर यास आज्ञा केली कीं, “व्यंकोजी (व्योंकोजीराजे तंजावर) चा मुलगा रायभान यास बोलवा आणि त्याची व नरकवासी संभा (संभाजी महाराज) याचा मुलगा राजा शाहू यांची गाठ घालून द्या.” आज्ञेप्रमाणे हमीदोद्दीन खान याने दिवाणेखासमध्ये त्या दोघांची गाठ घालून दिली आणि ही हकीकत बादशहाना कळवली. बादशहानी त्यांना पुढील प्रमाणे बक्षिसे दिली. राजा शाहू याला दोन रत्नजडित पदकें व रायभान यांस एक रत्नजडित पदक.

अनुक्रमणिका

**अकरा जुलै १७०३**

दोन्ही दिवाण येथील काम बंद ठेवण्यात आले.

**बारा जुलै १७०३**

बादशहाने दोन्ही दिवाण बंद ठेवले.

**तेरा जुलै १७०३**

बादशहा आज न्याय कचेरींत आले. पाऊस पडत असल्यामुळे ते कचेरीत अर्धा घटिका बसून उठून गेले.

काल रात्री दिवाणे आलाच्या कचेरीचा दारोगा फत्तेदौलत याची आठवण बादशहाने काढली. बादशहांना कळविण्यात आले कीं, तो गुलालबार मध्यें हजर नाही. बादशहा म्हणाले "त्याला सांगा त्यानें गुलालबारमध्यें हजर राहिले नाही तर बरे नाही, तर, मुहंमद आरिफ कौल याला सांगा कीं त्यानें (मुहंमद आरिफ) नें गुलालबार मध्यें हजर रहावे.

**बंगलोर**

मरहूम कादरदादखान याचा मुलगा आणि बंगलोरहून बदललेला फौजदार नुरुल्ला याची मनसब एकशेंचाळीस स्वारानी कमी करण्यात आली. त्याला हुजुरात बोलावण्यात आले. बख्तावर महली यानें अर्ज केला कीं, माझ्यापाशी स्वारी योग्य घोडा नाहीं, बक्षीस म्हणून घोडा देण्याची कृपा व्हावी, विनंती मान्य करण्यात आली.

**चौदा जुलै १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. यक्काताजखान याला तोली-पोली (लोणीही असूं शकेल) येथे फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. तो हुकूम रद्द करण्यात आला. त्या ऐवजीं कडूसच्या ठाण्यावर ठाणेदार म्हणून त्याला नेमण्यात आले. त्या ठाणेवर त्याच्यापूर्वी निजामराव हा होता. त्याला बदलण्यात आले. इरादतखान हा गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार होता. त्याची नेमणूक बोली (पोली?) ठाणेदार म्हणून करण्यात आली. त्याला तीन हजार जात व तीनशें स्वार अशी मनसब आहे. (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे).

बादशहाने फरासखानाचा मुश्रफ (अधिकारी) मीरहादी यास म्हटले, "आमच्या निवासस्थानापासून, आसारे मुबारक (पवित्र अवशेष ठेवलेली जागा) पर्यंत दोन्ही बाजूस कनाती लावा, आम्ही फातेहा देण्यासाठी जाणार आहोत." धना (जी) जाधव याने चाकरीच्या संबंधाने (दरबांदे बंदगी) बादशहाकडे अर्जदास्त पाठविली होती, ती बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याच्या मार्फतीने

बादशहाच्यासमोर ठेवण्यात आली. (कुणीकडून कां होईना—मराठ्यांशी तडजोड व्हावी आणि युद्धाची कटकट संपवावी असे मुगल सरदारांना वाटू लागले. औरंगजेबालाही असेच वाटे पण अभिमानाने तो बोलत नसे, मध्यस्त मात्र मराठ्यांशी संपर्क ठेवण्याचा प्रयत्न करीत. यासाठी मुगलांनी तंजावरहून रायभान भोसलेला आणले. अशाच प्रयत्नामध्यें धनाजी जाधवचे हें पत्र असावे. मुगलांच्या अडेजाव-बडेजाव पद्धतीने या पत्राला चाकरीचे पत्र असे संबोधण्यात आले आहे. हा सावधगिरीचा इशारा लक्षात ठेवला पाहिजे.)

येथून २ ऑगस्ट १७०३ च्या नोंदी सुरू होतात:

## दोन ऑगस्ट १७०३

मतलबखान याचा मुलगा अबूतालीब याचे लग्न तरबियतखान याच्या मुलीशी व्हावे असे ठरले. त्यासाठी त्याला आणि त्याचा भाऊ असद्उल्ला यांना औरंगाबादेस जाण्यासाठी रजा देण्यात आली.

## तीन ऑगस्ट १७०३

बादशहाने आज न्याय कचेरी केली. वऱ्हाडचा सवानेह निगार (वृत्तांत लिहून पाठविणारा) म्हणून मुहंमदखलील काम पहात होता. त्याच्याऐवजी अबदुल रसूलचा मुलगा अबदुल अजीज याची नेमणूक करण्यात आली. एक शाल देऊन त्याला निरोप देण्यात आला.

माहूर (जिल्हा नांदेड) बक्षी व वाकेनवीस म्हणून मुहंमद समी याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक शाल देण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आली की, देगलूर (जिल्हा नांदेड) येथून बदललेला फौजदार सिद्दी अबदुल्ला हा हुजुरात आला आहे. पण त्याच्या भाऊबंधापैकी शिद्दी दौलतमंद लोक आलेले नाहीत. बादशहाने आज्ञा केली की, त्यांच्या जहागिरी काढून घेण्यात याव्या.

## चार ऑगस्ट १७०३

अकबराबाद (आग्रा) सुयाचा सुभेदार मुख्तारखान याजकडे फर्मान घेऊन ख्वाजा काशिफ हा गुर्जबर्दार गेला होता, तो अद्याप आला नाही, असे बादशहाना कळविण्यात आले. त्याला फरारी समजण्यात यावे, अशी आज्ञा करण्यात आली.

## पाच ऑगस्ट१७०३
## विजापूर कर्नाटक

विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान (शाईस्तेखानाचा मुलगा) याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—“मला येथे उफी वळणातील अक्षरात लिहिलेली कुराणग्रंथाची प्रत मिळाली आहे. तिच्यासाठी तिनशे रुपये लागले. ती आपल्याला द्यावी अशी इच्छा आहे”. बादशहा म्हणाले “एक गुर्जबर्दाराने जाऊन ती प्रत आणावी”.

अनुक्रमणिका

**सहा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. मीर फक्रुद्दीन हा बक्षी रुहुल्लाखानाच्या कचेरीचा दारोगा—त्याला नौलखा (नवलाख उंबरे) कडे जाण्यास निरोप देण्यात आला.

हरकऱ्याच्या तोंडून पुढील हकीकत कळली—बादशाही छावणीतील जनावरे चरण्यासाठी रानात गेली होती. चोरांनी (मराठ्यांनी) हल्ला करून ती वळवून नेली. ही बातमी कळताच ओंढण्याचा ठाणेदार जाबिताखान हा त्यांच्यावर चालून गेला. चोरांनी (मराठ्यांनी गुरे सोडून दिली आणि ते पळून गेले. जाबताखान याने गुरे मालकांच्या हवाली केली.)

**सात ऑगस्ट १७०३**

शेरबेगचा मुलगा शाहबेग याला मोहतशीमखान याच्या जागेवर ढोकी (तेरढोकी, उस्मानाबाद जिल्हा) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

हुक्केरी (बेळगाव जिल्हा) येथील अमीन व फौजदार याची मनसब वाढविण्यात आली. नुस्रतखान याला बादशाही छावणीजवळ ठाणेदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याने विनंती केली होती की, "मला मदत म्हणून दहा घोडे देण्यात यावे." आज्ञा झाली की, पाच घोडे द्यावे. आठवड्यातून एकदा मुजरा करण्यासाठी येईन, परवानगी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

**आठ ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. चाकणचा बदललेला किल्लेदार व फौजदार कामियाबखान हा येऊन बादशहाना भेटला. हमीदोद्दीनखान विजापुरी यास आजमनगर उर्फ शिकारपूर येथे तैनात करण्यात आले, त्याला निरोप देण्यात आला.

माळव्याचा सुभेदार शाइस्ताखान (मोठ्या शाइस्ताखानाचा मुलगा) याचे पत्र आले—ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

ख्वाजाखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज केला—सुमारे चारशे चोर (मराठे) यांनी लोहगाव जवळ तळ दिला. ते प्रवाशांवर हल्ला करतात आणि त्यांना लुटतात. आज्ञा झाल्यास मी जाऊन त्यांचे पारिपत्य करीन. बादशहानी त्याच्याबरोबर सातशे स्वार दिले आणि चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी त्यास रवाना केले.

मुहतशमखान याचा मुलगा मुहंमदखान याची मनसब वाढविण्यात आली. शेखगुलाम मुहंमद उर्फ बालिराम याला बेगमाच्या खजिन्याचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

**नऊ ऑगस्ट १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली.—सुलेमानखान हा गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी नौलाख उंबरेकडे गेला होता त्याने विनंती करुन पाठविली की:—

(१) मला, एक धनुष्य आणि बाणांचे दोनशे भाते देण्यात यावे, विनंती मान्य करण्यात यावी,

(२) दोनशे गाड्याभरुन आणि इतर आवश्यक सामान मिळावे, विनंती मान्य करण्यात यावी,

(३) दारुगोळा मिळावा, मन्सूरखानाने व्यवस्था करावी, अशी आज्ञा झाली,

(४) नदीपार करण्यासाठी नावा मिळाव्या——नावाच्या प्रमुखाने ही विनंती हाताळावी, अशी आज्ञा झाली.

**तंजावर**

तंजावरचा जमिनदार शाहजी (तंजावरचे राजे व्यंकोजी यांचा मोठा मुलगा शाहजी हा व्यंकोजी नंतर तंजावरच्या गादीवर आला, तो इ. स. १७११ पर्यंत गादीवर होता.) याला खिलातीची वस्त्रे पाठविण्यात यावी म्हणून ती इनायतउल्लाखान याच्या हवाली करण्यात आली.

काल दिवाणचे काम आटोपल्यानंतर बादशहाने फत्तेदौलत कौल याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली:

**शाहूराजे**

“नरकवासी संभा (संभाजी महाराज) चा मुलगा राजा शाहू हा रेहकलाबार (जेथे शस्त्रांचा तळ आहे तो परिसर) मध्ये आहे. त्याला बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याच्या डेऱ्यावर घेऊन जा आणि राजा शाहूची बादशाहजाद्याशी भेट घालून द्या आणि नंतर त्याला परत आणा. त्याप्रमाणे झाले, बादशहाजाद्याने राजा शाहू याला खिलातीची वस्त्रे आणि अलंकार दिले आणि निरोप दिला. त्यानंतर राजाना रेहकलाबारमध्ये आणण्यात आले. सुलेमानखानाच्या बरोबर गुर्जबर्दार तैनात होते. त्यांना पगार बाकी पैकी दोन महिन्याचा पगार (ॲडाक—सगळा हिशोब पुरा होईपर्यंत) द्यावा अशी आज्ञा झाली.

**दहा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली.

**तेवीस ऑगस्ट १७०३**

अनुक्रमणिका

मरहूम इज्ञतुल्लाखान याचा मुलगा अश्मतउल्ला याला रसूलाबाद उर्फ शिवापूर येथील ठाणदारीवर नेमण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

खानचंदचा मुलगा दलसिंग हा रसूलाबाद उर्फ शिवापूरचा पूर्वीचा ठाणेदार होता. त्याची मनसब थोडी कमी करण्यात आली.

अमानुल्लाखान याने आणलेला (आवर्दा—पदरी बाळगलेला) आणि हीरामणचा मुलगा मुन्शीराम याला मनसबीवरून बडतर्फ करण्यात आले.

करितसिंग याचा मुलगा हाथीसिंग (बेनीसिंगही असू शकेल) हा बेदारबख्ताच्या फौजेत तैनात होता. तो फौजेत हजर नाही असे बादशहाना कळविण्यात आले. फरारी म्हणून त्याची नोंद करण्यात यावी, अशी आज्ञा झाली.

बक्षी रूहुल्लाखान याने कळविले की, विजापूरचा सुभेदार चीन कुलीजखान याचे पुढीलप्रमाणे पत्र आले आहे—"शेख इब्राहिमचा मुलगा शेख मुरीद हा आजारामुळे इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) येथील छावणीत आला होता. त्याच्या जहागिरी काढून घेण्यात आल्या आहेत. मनुष्य कामाचा आहे त्याला बहाल करून माझ्या येथे तैनात करण्यात यावे.

नळदुर्ग व अक्कलकोट येथील फौजदार याला मनसबीत सवलती देण्यात आल्या. त्याच्याकडे नळदुर्गची फौजदारी ठेवण्यात आली. अक्कलकोटची फौजदारी काढून घेण्यात आली.

मिफताहअल्फुतूह (बहुधा चंदन-वंदन) किल्ल्याचा किल्लेदार याने लिहून विनंती केली की,—"नोकरी मिळाल्यापासून आपले सेवेत हजर राहण्याचा योग आला नाही. माझा (किल्लेदार जमाली याचा) भाऊ मुहंमद आलम् याने लढायातून कामगिरी केली आहे. आज्ञा होत असेल तर किल्ल्यात माझ्या भावाला ठेवून आणि त्याच्याबरोबर एक पथक देऊन मी काही माणसे बरोबर घेऊन हुजुरात येईन."

बादशहाने आज्ञा केली की, "किल्ल्याचा बंदोबस्त करून तेथे आपला नायब ठेवून हुजुरात यावे"

**अकरा ऑगस्ट १७०३**

चंद्रपूरचा राजा बीरसिंग याच्या विरुद्ध नागपूरचा राजा नेकनामखान (गोंड) याने तक्रार केली ती हकीकत मागे आलेली आहे. या तारखेच्या नोंदीत त्या मजकुराची पुनरुक्ति झाली आहे.

**बारा ऑगस्ट १७०३**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते.

**तेरा ऑगस्ट १७०३**

अनुक्रमणिका

बादशहाने आज न्याय कचेरी केली. यारअली बेग (औरंगजेबाचा याच्यावर फार विश्वास होता) आणि मोतमिदखान (दक्षिणेच्या सुभ्याचा दिवाण) हे आजारी होते. आजारातून उठल्यावर ते येऊन बादशहाना भेटले.

मुहंमदअली हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला पाचशेची मनसब देण्यात आले.

इरादतखान यास बादशाही छावणीजवळच असलेल्या मौजे हरिसूल येथील ठाणेदारीवर नेमण्यात आले. बादशहाने त्याला पन्नास रुपये किंमतीचा एक खंजीर बक्षीस म्हणून दिला आणि त्याच्या कुशलतेचा फातेहा (प्रार्थना) पढून त्याला निरोप दिला.

**पंधरा जुलै १७०३**

आज बादशहा आसारे शरीफच्या प्रदक्षिणेसाठी आणि दर्शनासाठी मेण्यात बसून गेले. तेथे भेट अर्पण म्हणून दीडशे मोहरा व एक हजार रुपये ठेवले. नंतर ते तेथून आपल्या निवासस्थानाकड परत आले. आज दिवाणचे काम बंद होते.

**सोळा जुलै १७०३**

पावसामुळे बादशहाने दिवाण व न्यायकचेरी बंद ठेवली. रूहुल्लाखान बक्षी याच्या नातेवाईकांपैकी एक मुहंमद अलीखान हा नुकताच मध्य आशियातून आला होते. त्याला एक हजार जात व दोनशे स्वार अशी मनसब नव्याने देण्यात आली.

**सतरा जुलै १७०३**

नरकवासी शिवाचा (शिवाजी महाराज) पुतण्या रायभान याने अर्ज करून काही विनंत्या केल्या होत्या त्या हिदायतकेश वाकेनवीस याच्याद्वारे पाठविण्यात आले.

**अठरा जुलै १७०३**

पावसामुळे बादशहाने दिवाण बंद ठेवले. बादशहाना कळविण्यात आले की, गुर्जबर्दार हे आरडाओरडा आणि तक्रार करीत आहेत, ते बदललेला दारोगा सियादतखान याच्या चिथावणीमुळे बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीनखान याने त्यांना ताळ्यावर आणावे ते न झाल्यास त्यांना कैद करावे.

**एकोणीस जुलै १७०३**

पावसामुळे बादशहाने दिवाण बंद ठेवले.

**वीस जुलै १७०३**

अनुक्रमणिका

बादशहाने आज न्याय कचेरी केली. बंगालचा सुभेदार अजीमुश्शान (औरंजेबाचा नातू, मुअज्ज्मचा मुलगा) याला बिहारचीही सुभेदारी देण्यात आली. तशा अर्थाचे फर्मान आणि खिलातीची वस्त्रे अजीमुश्शानचा वकील मुहंमद मेहदी याजकडे सोपविण्यात आली. अजीमुश्शानला देण्यासाठी बारा हजार रुपये किंमतीचा रत्नजडित खंजीर बादशहाने काढून ठेवला तो त्याच्याकडे पाठवावा म्हणून बक्षी रूहुल्लाखानापाशी देण्यात आला.

हमीदखान उर्फ मुहंमद इब्राहिम विजापुरी याला आजमगड उर्फ बेळगावचा किल्लेदार व फौजदार (आजमनगर पाहिजे) सैफखान याच्यापाशी तैनात करण्यात आले. त्याला दीड हजार स्वार व एक हजार जात अशी मनसब होती.

लोदीखान फौजदार यास आपल्या इलाख्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

मरहूम लष्करखान याचा भाचा सय्यद यादगार हुसेन याला चंदनगडची किल्लेदारी देण्यात आली.

**बंगलोर**

मरहूम खानेआलम याचा मुलगा आणि बंगलोरचा फौजदार ताहिर मुहंमदखान यास खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

**एकवीस जुलै १७०३**

पावसामुळे दिवाण बंद.

**बावीस जुलै १७०३**

पावसामुळे दिवाण बंद

**तेवीस जुलै १७०३**

पावसामुळे दिवाण बंद

**चोवीस जुलै १७०३**

बादशहाने आज दिवाणेखासचे काम पाहिले. बादशहाने आज ऐंशी घोडे नजरेखालून घातले.

रायभान याला मनसब देण्यात आली होती. त्याला रत्नजडित शिरपेच देण्यात आला. चिंतू चिमणा याला मंगळवेढ्याचा अमीन व फौजदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

**पंचवीस जुलै १७०३**

तरबियतखान मीर आतिश हा बहादुरगड येथे आहे. त्याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली—

"हैद्राबादचा कानूनगो बापूजी पंडित (बाबू पंडित) याला काढून टाकण्यात आले आहे. तो निरपराधी आहे. माणूस कामाचा आहे. त्याचे अपराध माफ करून, त्याला आपल्या पूर्वीच्या जागेवर बहाल करण्यात यावे." बादशहानी रोष म्हणून बाबू पंडितची तैनाती काबुलला केली. त्यांनी आज्ञा केली की, मुनीमखानाचा मुलगा मुहंमज काजिम याने त्याला आपल्याबरोबर न्यावे आणि फतेउल्लाखानाच्या हवाली करावे. फत्तेउल्लाखान हा त्याला काबुलला घेऊन जाईल.

**सव्वीस जुलै १७०३**

बादशहाने आज न्यायकचेरी केली. बक्षी झुल्फिकारखान याचा नायब मतलबखान याने अर्ज केला की, "माझा कारभारी (पेशदस्त) दियानतराय हा मरण पावला. त्याची मुले अनुपराम वगैरे सुतकात बसली आहेत.

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे तोफखान्याचा मुश्रफ (हिशेब अधिकारी) कुंजमन याने त्यांना सुतकातून बाहेर काढले आणि त्यांना बादशहासमोर आणले. अनुपरामला त्याच्या बापाच्या जागेवर नेमण्यात आले. त्याचा भाऊ शोभाराम याला बक्षी सदरुद्दीनखानाचा कारभारी (पेशदस्त) म्हणून नेमण्यात आले. त्यांच्या मनसबी वाढविण्यात येऊन त्यांना शाली देण्यात आल्या. लोधीखान किल्लेदार आणि फौजदार (किल्ल्याचे नाव लागत नाही—बहुधा पट्टा असावा) यास आपल्या इलाख्यावर जाण्यास निरोप देण्यात आला.

**सत्तावीस जुलै १७०३**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद अमीनखान, बहादूर मतलबखान, मिर्झा सदरुद्दीन मुहंमदखान व नेकमानखान हे छावणी भोवती टेहेळणी करण्यासाठी जातात—ते काम त्यांनी बंद करावे.

**अट्ठावीस जुलै १७०३**

आज दिवाण व न्यायकचेरी ही बंद ठेवण्यात आली. वैजापूरचा जिजिया वसुलीचा अमीन मुहंमद रजाचा मुलगा मुहंमद गौस हा होता, त्याची मनसब वाढविण्यात आली. बहादूर गडवर मुगलखान हा किल्लेदार व फौजदार असून त्याच्या तर्फे त्याचा मुलगा अब्दुल है हा नायब होता. त्याला बदलण्यात आले व त्याची मनसब पन्नास स्वारानी कमी करण्यात आली.

अंतूर (औरंगाबाद जिल्हा) चा किल्लेदार व फौजदार याला अब्दुल कादरखान अशी पदवी देण्यात आली. सिद्दीमसूद मरहूम याच्या मुलाला मसूदखान ही पदवी देण्यात आली. (सिद्दी मसूद हा एकेकाळी विजापूरचा मुख्य प्रधान होता.) त्याला पाच हजार जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब होती. मरहूम

खानेआलम् याची मुले अबुलखैर आणि जहूरउल्ला यास मनसबी देण्यात किंवा वाढविण्यात आल्या. (अबुलखैरची वाढविण्यात आली व जहूरउल्लाला नव्याने देण्यात आली).

**एकतीस जुलै १७०३**

आज दिवाण व न्याय कचेरीही बंद ठेवण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, आतिशखान ठाणेदार नौलाखउंबरे याच्याबरोबर पुढीलप्रमाण माणसे देण्यात यावी––दहा गुर्जबर्दार, शंभर बरकंदाज, हशम (पायदळ) पाचश.

**एक ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. इरादतखानच्या ठाणेदारीची जागा बादशाही छावणीच्या जवळ होती. त्याच्याबरोबर पुढील माणसे तैनात करण्यात आली. गुर्जबर्दार वीस (२०) बरकंदाज पन्नास, अहदी (शिलेदार) शंभर, हशम (पायदळ) शंभर, दारुगोळा, जासूद चार. तेथे गढी तयार करण्यासाठी बेलदार शंभर, शिवाय मजूर.

मरहूम फत्तेजंगखान याचा मुलगा ताज हा मुगलखानापाशी तैनात होता. तो हुजुरात आला. त्याची मनसब कमी करण्यात आली.

**कल्याण–भिवंडी**

कल्याण–भिवंडीचा पीरजादा कुतुबउद्दीन याचा मुलगा नुरुद्दीन याला नव्याने चारशेची मनसब देण्यात आली. फक्रुद्दीनखान याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला नुसरतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**दोन ऑगस्ट १७०३**

दिवाण बंद ठेवण्यात आला.

**तीन ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. राजी मुहंमद याला गढी संक (जत तालुका, सांगली जिल्हा) येथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला निरोप देण्यात आला.

**चार ऑगस्ट १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. खानदेशातील नवलगड किल्ल्यावर मुहंमद बाकर हा किल्लेदार होता. त्याच्या ऐवजी सुलतान कासिमचा मुलगा मुहंमद मोमीन याची नेमणूक करण्यात आली. मुहंमद बाकरला शाहजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मंगळवेढ्याचा किल्लेदार मुहंमद आकिल याने विनंती करून मोहोळ परगण्यात (सोलापूर जिल्हा) आपल्याला तनखा जहागीर मिळावी असा अर्ज केला. विनंती मान्य करण्यात आली.

**शुक्रवार, पाच ऑगस्ट १७०३**

दिवाण बंद ठेवण्यात आले.

**सहा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. सुलेमानखान याला एक शिरपेच बक्षिस देण्यात आला. पवनुलगड (शब्द नीट लागत नाही.) येथील ठाणेदार आतिशखान उर्फ काजिम याच्या मदतीसाठी सुलेमानखानाला पाठविण्यात आले. शेरबेगचा मुलगा शाहबेग याला परगणे ढोकी (उस्मानाबाद जिल्हा) येथे फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्यापूर्वी त्या परगण्याची फौजदारी मोहतशमखान याजकडे होती.

**सात ऑगस्ट १७०३**

आज न्याय कचेरी व दिवाण ही बंद ठेवण्यात आली. लाहोरचा सुभेदार जबरदस्तखान याच्या नावे एक फर्मान पाठविण्यात आले.

**आठ ऑगस्ट १७०३**

हमीदखान उर्फ मुहंमद इब्राहिम विजापुरी याला आजमनगर उर्फ बेळगाव येथे तैनात करण्यात आले होते. त्याला निरोप देण्यात आला. त्याला तीन हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती. त्याला एक कट्यार बक्षीस देण्यात आली. ताहिर मुहंमदखान याला मंगलोर (बंगलोर) वगैरेचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठवली——खुराक-दुआब याची माफी देण्यात यावी. माझ्या विनंत्या इनायतउल्लाखानाच्या द्वारे सादर करण्यात येतील. परवानगी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

**नऊ ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली.

**दहा ऑगस्ट १७०३**

अनुक्रमणिका

पवनार (विनोबांचे पवनार, वर्धा जिल्हा) येथील फौजदार आणि चांदा वगैरे कडच्या जमिनदारांकडून खंडणी (पेशकश) वसूल करणारा तहसिलदार (अधिकारी) याने बादशहाकडे पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला:—

"नियमाप्रमाणे जी पथके बाळगावयाची त्याहून अधिक पथके मी बाळगीत आहे. येथील बंदोबस्ताविषयी मी खबरदार असून येथील व्यवस्था मी चोख ठेवीत आहे आणि आवश्यक तेव्हा पारिपत्य करीत आहे. माझ्यावर कृपा व्हावी. ती होईल अशी आशा आहे." विनंती मान्य करण्यात आली नाही.

**बारा ऑगस्ट १७०३**

रुहुल्लाखानाच्या शिक्क्याने पुढील मंडळींना गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्याबद्दल आज्ञापत्रे (हजबुलहुकूम) पाठविण्यात आली:—

(१) यासीनखान—फौजदार, आजमतारागड (सातारा).

(२) पदाजी (घाटगे) ठाणेदार, बुधगाव (बुधपाचगाव).

(३) नागोजी माने, ठाणेदार, म्हसवड.

**तेरा ऑगस्ट १७०३**

नुरुद्दीन (पीरजादा) हा मातबरखान (कल्याण–भिवंडीचा फौजदार) याचा भाचा, त्याला चारशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब होती. मनसबीच्या अटी, जहागिरीच्या उत्पन्नाचा एकचतुर्थांश भाग (चाहरम) सरकारांत वजा करण्याचे ठरले होते. मातबरखानाच्या विनंतीवरून वजा करणे (वळते करून घेणे) याची नुरुद्दीनला माफी देण्यात आली.

देवगड (नागपूरजवळ) येथे राजा नेकनाम हा जमिनदार (राजा) होता. त्याला बदलण्यात आले होते. त्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज केला:—

बादशहाना कळविण्यात आले ते असे—"माझा नोकर दत्ता जुन्नारदार (ब्राह्मण) हा आर्थिक दुर्दशेमुळे हुजुरात येत होता, वाटेत मलकापूर हे गांव लागते. हा परगणा चीनकुलीजखान बहादूर याच्या जहागिरींत आहे तेथील कारभारी तहवंदाखान हा चांद्याचा (चंद्रपूर) जमिंदार (राजा) बीरसिंग याचा स्नेही आहे, त्या स्नेहाखातर खानाने दत्ताला कैद केले. त्याची सगळी मालमत्ता आपल्या ताब्यात घेतली. त्याची इच्छा अशी आहे की, दत्ताला बीरसिंगकडे पाठवावे. बीरसिंग याची आणि माझी अदावत आहे. तो दत्ता ब्राह्मण यांस जिवे ठार मारील, माझी पुढीलप्रमाणे विनंती आहे. बक्षी रुहुल्लाखान याच्या शिक्याने बऱ्हाणपूरचा नायब सुभेदार याच्या नावे आज्ञापत्र सादर होऊन डाक चौकीने रवाना करावे. आज्ञा पत्रात अशी आज्ञा देण्यात यावी की, दत्ता यांस कैदेतून मुक्त करवून हुजुरात पाठवून द्यावे."

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, “आज्ञापत्र पाठवावे.”

**चौदा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. नरकवासी संभाजी याचा मुलगा शाहू याच्या इस्टेटीचा नाजिर (सुपरिन्टेन्डेट) म्हणून ख्वाजा संदल याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक शाल बक्षीस देण्यात आली.

**पंधरा ऑगस्ट १७०३**

हमीदोद्दीनखान बहादूर याने पुढीलप्रमाणे कळविले:—“शत्रूच्या सैन्याने सुप्याजवळ भिकणगाव या ठिकाणी तळ दिला होता. ख्वाजाखान व तुर्कताजखान व दौलतमंदखान उर्फ खंडोजी (हा खंडोजी कोण?) वगैरे त्यांच्यावर चाल करून गेले. शत्रूंपैकी अनेक लोक ठार झाले आणि अनेक जण जखमी झाले. शत्रू सैन्याचा प्रमुख जबल (नाव लागत नाही.) हा मारला गेला. बाकीचे लोक पळून गेले. लुटीमध्ये दोन निशान (ध्वज) दीडशे घोड्या सापडल्या. शत्रू सैन्याचा प्रमुख आणि इतर चार जणांची डोकी कापण्यात आली.”

बादशहा म्हणाले, सेवेचा मजुरा झाला. ख्वाजाखान व तुर्कताजखान यांना भेटीस आणावे. त्याप्रमाणे ते मशिदीत बादशहाला भेटले. बादशहानी त्यांना बक्षिसे दिली. त्यांचा दर्जा आणि हुद्दे (पुढील बढतीसाठी) कळविण्यात यावे, अशी त्यांनी आज्ञा केली.

सिद्दी फरहादखान याच्या अर्जावरून पुढील प्रमाणे कळले.——“मला येथील हवापाणी मानवत नाही. मी नेहमी आजारी पडतो. मला गुलशनाबाद (नाशिक) येथे जहागीर आहे. मला जहागिरीवर जाण्यासाठी चार महिन्यांची रजा देण्यात यावी. बादशहाने विनंती मान्य केली. त्याला एक हजार जात व चारशे स्वार अशी मनसब होती.

**सोळा ऑगस्ट १७०३**

आज दिवाण बंद ठेवण्यात आले. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—“आज्ञेप्रमाणे राजा शाहू यांचा डेरा न्याय कचेरीच्या जवळ, बादशहाचे निवासस्थान आणि हमीदोद्दीनखान बहादूर यांच्या डेऱ्याच्यामध्ये उभा करण्यात आला आहे.

**सतरा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली.

**राजा शाहू**

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, “राजा शाहू याच्यासाठी तीनशे मोहरांच्या किंमतीचा घोडा वेगळा काढून ठेवावा.”

मुहंमद साने याला औरंगाबाद येथील किताबखाना (बादशाही ग्रंथालय) याचा व्यवस्थापक म्हणून नेमण्यात आले. त्याला एक शाल बक्षीस देण्यात आली.

**कल्याण-भिवंडी**

गुलशनाबाद (नाशिक) चा पीरजादा कुतुबुद्दीन याचा पुतण्या आणि मातबरखानाचा जावई नरूद्दीन याला खिलातीची वस्त्रे, १ जमधर, (जमदाड—खंजीर), पन्नास मोहरा किंमतीचा घोडा या वस्तू बक्षीस म्हणून देण्यात आल्या. त्याला गुलशनाबादेस (नाशिक) जाण्यासाठी निरोप देण्यात आला. नुरुद्दीन याला चारशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब आहे.

मीर कासिमचा मुलगा आणि मीर इब्राहीमचा मामेभाऊ मुहंमद हाशिम याला मीर अलीच्या जागी सुभे खानदेशचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. मीर अलीखान याला हुजूरात बोलावून घेण्यात आले.

**अठरा ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज दिवाणे खास मध्ये काम केले. राजा शाहू याला एक रत्नजडीत पोंची बक्षीस म्हणून देण्यात आली.

कोप्पळचा जमिंनदार व्यंकट हा शिवा (शिवाजी महाराज) याचा पुतण्या रायभान याला आणण्यासाठी गेला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. रायभान यास दोनशे त्र्यांशी रुपये किंमतीची पोची बक्षीस देण्यात आली. ख्वाजाखान व तुर्कताजखान यांना मनसबींत वाढ देण्यात आली.

काल रात्री जोनपूर (उत्तर प्रदेश) च्या काही माणसांनी पुढीलप्रमाणे फिर्याद केली—“जोनपूरचा जमिंनदार अक्राम हा अकबराबाद (आग्रा) च्या किल्ल्यात कैदेत आहे. त्याचे वकील हसामुद्दीन वगैरेच्या द्वारे काही लोकांनी जमिनदारातर्फे दरबारात जबर पैसे खर्च करून अक्रामच्या सुटकेचा हुकूम मिळविला आहे.” बादशहाने आज्ञा केली की, छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याने या बद्दल चौकशी करावी. सुटकेचा हुकूम निघाला असल्यास तो परत बुलावून घ्यावा. नसल्यास हुकूम देण्यात येऊ नये.

अहसनाबाद (गुलबर्गा) येथील बातम्यावरून कळले की, वाणकोजी (वणकोजी?) स्वार हा खान फिरोजजंग याच्या फौजेत तैनात होता. त्याला चारशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती. तो फौजेतून पळाला आणि आपल्या मालकाकडे (मराठ्यांकडे) गेला. त्याची फरारी म्हणून नोंद करावी, अशी आज्ञा झाली.

**एकोणवीस ऑगस्ट १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**वीस ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. मरहूम अमानतखान याचा मुलगा आणि वऱ्हाडचा बदललेला दिवाण मीर अहंमद हा येऊन बादशहाना भेटला.

बादशहाना हुजुरात असलेले जाफरखान वगैरे पाचशे इसम यांना मुहंमद अमीनखान बहादूर याजपाशी तैनात करण्यात येवून (रायरीचा किल्लेदार व फौजदार शिवसिंग हा हुजुरात आहे. त्याला मुहंमद अमीनखान पाशी तैनात करण्यात येऊन पाठविण्यात आले.) त्यांना निरोप देण्यात आला.

कोफळचा जमिंनदार व्यंकट याच्यासाठी साठ मोहरा किंमतीचा एक घोडा काढून ठेवण्यात यावा अशी आज्ञा करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, एक खंजीर रत्नजडित (मोत्यांनी युक्त—मीनेचे काम केलेला) एक हजार रुपये किंमतीचा रायभान (तंजावरकर भोसले) साठी काढून ठेवावा.

बादशहाने आज्ञा केली की, तहवुरखान याला गनिमांच्या पारिपत्यासाठी मुहंमद अमीनखान याजपाशी तैनात करण्यात येत आहे. सजावली (टुमणे लावून) करून त्याला रवाना करण्यात यावे.

**एकवीस ऑगस्ट १७०३**

अकबराबाद (आग्रा) चा सुभेदार मुख्तारखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज लिहून पाठविला— "ग्वालेर, नरवर, इटावा हे आग्रा सुभ्यात मोडतात तर, ग्वालेरचा फौजदार जाननिसारखान आणि इटाव्याचा फौजदार खैर अंदेशखान यांना आज्ञा करण्यात यावी कीं, ज्या ज्या वेळी पावसाळा संपल्यावर मी दुष्टांच्या पारिपत्यासाठी बाहेर पडेन त्यावेळी त्याने आपल्या मुलांना पथके बरोबर देऊन माझ्याकडे पाठवावे." विनंती मान्य करण्यात आली. किशनसिंग याचा पुतण्या मनोहरसिंग याला कुरंग (?) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

मित्रसेन बुंदेला याचा मुलगा आणि नुस्रतगड उर्फ जींजी येथील किल्लेदार रूपसिंग आणि उदितसिंगचा मुलगा किशनसिंग फौजदार पामगड यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

**बावीस ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. कोप्पळचा जमिनदार आणि व्यंकटराव याचा मुलगा भीमराव याला एक हजार जात आणि शंभर स्वार (दुघोडी) अशी मनसब होती. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

परगणे अक्कलकोट आणि जवळचे महाल हे बक्षी मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याच्या नावे जहागीर म्हणून देण्यात आल्या. त्याच्या जोडीलाच त्याला अक्कलकोट परगण्याची फौजदारी देण्यात आली.

(शहाजादा) मुहमद कामबक्ष याचा दिवाण विझारतखान याने एक यादी रुहुल्लाखान बक्षी याजकडे पाठविली. त्यांत असे म्हटले होते की, नरकवासी शिवा (शिवाजी महाराज) यांचा पुतण्या रायभान याला सहा हजारी जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब देण्यात आली, त्याचा जामीन माफ करण्याबद्दल काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, "जामीन माफ"(रायभानने आपल्या मनसबी बद्दल जामीन म्हणून देण्याचे कारण नाही.)

**तेवीस ऑगस्ट १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. कन्नड (जिल्हा औरंगाबाद) चा बादललेला फौजदार शेख फत्तेउल्ला हा हुजुरात आला. त्याला एक घोडा बक्षीस देण्यात येऊन, त्याची मनसब वाढविण्यात आली.

अहमदनगरचा दरवेश (साधू, फकीर) शाह अजमतउल्ला याची मुले अब्दुल अली व मुहमद अली ही हुजुरात येऊन बादशहांना भेटली.

दिवंगत भीम (उदयपूरचा राजपुत्र) याचा मुलगा विजयसिंग हा देशीहून येऊन बादशहांना भेटला. त्याला तीनशे जात व पन्नास स्वार अशी मनसब होती.

(यानतर दहा दिवसांपूर्वीची म्हणजे १४ ऑगस्ट १७०३ ची नोंद आली आहे.)

**चौदा ऑगस्ट१७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, नुसरतजंग झुल्फिकारखान याचा पेशदस्त (पर्सनल कारकून) शेख हिदायतउल्ला याने राजिनामा दिला आहे. बादशहाने तो मान्य केला नाही. मुहंमद मासूम याचा मुलगा अजीजउल्ला याला गाजिउद्दीन फिरोजजंग यांच्या फौजेत दारोगा (अधिकारी) म्हणून नेमण्यात आले. श्रीरंगपट्टणचा काजी आणि अलफचा मुलगा अबदुल्ला याला बक्षीस देण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, नरकवासी संभा (संभाजी महाराज) याचा मुलगा राजा शाहू याचा तळ मिर्जा सदरुद्दीन मुहंमद आणि हमीदोद्दीनखान बहादुर यांच्या डेऱ्या नजीक उभा करण्यांत यावा.

**पंचवीस ऑगस्ट १७०३**

हमीदोद्दीनखान याने बादशहांना पुढीलप्रमाणे कळविले—"शत्रू सैन्याने (मराठ्यांनी) पुण्या नजीक लिकनगाव (भिकनगांव?) येथे छावणी घातली होती. ख्वाजाखान व तुर्कताजखान वगैरे त्यांच्यावर (मराठ्यांच्यावर) चाल करून गेले. शत्रूपैकी अनेकांना नरकात पाठविण्यात आले आणि अनेकांना जखमी करण्यात आले. बाकीचे लोक पळून गेले. शत्रूंचा झेंडा व दीडश घोड्या वगैरे माल हस्तगत करून ते लोक आले आहेत." बादशहा म्हणाले.—"ख्वाजाखान याला भेटीस घेऊन या." आज्ञेप्रमाणे ख्वाजाखान हा बादशहाना मशीदीत भेटला. दोघांना (तुर्कताजखान यालाही) बादशहानी बक्षीसे दिली. त्यांनी आज्ञा केली की, वरील दोघांना हुद्दा कळविण्यात यावा.

अनुक्रमणिका

**सतरा ऑगस्ट १७०३**

बादशहाने न्याय कचेरी केली. मुहंमद इसहाक याला पवनार येथे बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याला एक शाल देण्यात आली. या नोंदीत मातबरखानाचा जावई पीरजादा नुरउद्दीन (भिवंडीचे घराणे) याला पीरजादा कुतुबउद्दीनचा भाऊ म्हटले आहे. मागच्या नोंदीत त्याला पुतण्या म्हटले आहे.

शाहाजादा कामबक्ष याने दिलेली खिलातीची वस्त्रे घालून राजा शाहू हा बादशहाच्या हुजुरात आला व त्याने बादशहांना मुजरा केला. त्याला रत्नखचित अलंकार दिला.

**एक सप्टेंबर १७०३**

मुहंमद अमीनखान बहादूर याने शत्रूंवर हल्ला करून काही लूट मिळविली. ती लूट आणि काही शत्रूंची डोकी ही त्यांने आपला भाऊ बख्तखान (?) आणि मुलगा मुहंमद फाजिल यांच्या बरोबर हुजुरात पाठविली. ही कालची घटना. बादशहानी, त्यांना खिलातीची वस्त्रे दिली.

**तीन सप्टेंबर १७०३**

आज दिवाणचे काम बंद होते.

**चार सप्टेंबर १७०३**

बादशहाने आज्ञा केली की, “बहिर्जी पांढरे हा चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याजपाशी तैनात होता. आता त्याला विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याजपाशी तैनात करावे.” बहिर्जी पांढरे यांस एक हजार जात आणि सातशे स्वार अशी मनसब होती.

**पाच सप्टेंबर १७०३**

मुगलखान याने बहादुरगडाहून काफिला छावणीत आणला होता. तो आणि त्याचा सहकारी राव मानसिंग हे येऊन बादशहाना भेटले.

**सहा सप्टेंबर १७०३**

रणथंबोर (राजस्थान) चा किल्लेदार आणि मरहूम अबदुलरहमान याचा मुलगा, हसनअलीखान याने विनंती लिहून पाठविली कीं, परवानगी असल्यास येथे आपला नायब ठेऊन मी हुजुरात हजर होईन. विनंती मान्य करण्यात आली.

कोल्हापूरचा ठाणेदार नाहरखान उर्फ संग्रामखान याला खुराक-दुआब माफ करण्यात आले होते, नंतर ती माफी काढून घेण्यात आली. त्याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती.

अनुक्रमणिका

जालानाथ वगैरे हिंदु हे मुसलमान झाले. त्यांना खिलाती देण्यात आल्या.

राजा शाहू याला दिवाणमध्ये आणण्यात यावे, अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणे दौलत कौल याने राजा शाहू यांस, न्याय कचेरीत (दिवाण अदालत) आणले. राजा शाहूंना बादशहाने एक तलवार, ढाल, एक आरसा, अत्तर वगैरे बक्षीस म्हणून दिले. न्याय कचेरी संपल्यानंतर राजा शाहूला स्वतःच्या तंबूकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. बादशहाच्या आज्ञेवरून फत्ते दौलत कौल हा राजा शाहूच्या बरोबर सोबत म्हणून गेला.

सिद्दी याकूत व राव जगतसिंग यांना मुसाहिबखान यांजबरोबर तैनात करून कामगिरीवर पाठविण्यात आले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली–"बादशहाजादा कामबक्ष हा ज्या ज्यावेळी कामासाठी म्हणून राजा शाहू याला आपल्या तंबूत बोलाविल त्या त्यावेळी राजा शाहूने त्याच्याकडे जात रहावे.

**आठ सप्टेंबर १७०३**

बादशहाने आज न्याय कचेरी बंद ठेवली होती. मुहंमद कामबक्ष याला मुलगी झाली. ओवाळणी म्हणून कामबक्षाने बादशहाना पाचशे अश्रफ्या निसार केल्या. (ओवाळणी) बादशहाने त्यातून फक्त शंभर अश्रफ्या घेतल्या.

कोप्पळचा जमिंनदार व्यंकट याला काही कामगिरी सागण्यात आली होती. त्याने पुढीलप्रमाणे विनंती पत्र लिहून पाठविले–"मी सय्यद मीर अबदुलबाकी याला धना (जी) जाधव याजपाशी सोडून आलो आहे. त्याला योग्य ती मनसब देण्यात यावी." आज्ञा झाली की, चौकशी करून त्याला (अबदुल बाकीला) सहा महिन्याचे उत्पन्न मिळेल अशी जहागीर व दोनशेंची मनसब देण्यात यावी. (मुगलांतर्फे व्यंकटराव आणि अबदुलबाकी हे धनाजी जाधव याजबरोबर तडजोडीची बोलणी करण्यासाठी गेले होते असे दिसते.)

राजा शाहू याच्यासाठी एक ढाल वेगळी काढून ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली.

कडूसचा बदललेला ठाणेदार निजामराव याला एक हजार जात आणि सहाशे स्वार अशी मनसब होती. त्यापैकी पन्नास स्वार काही अटीवर होते ते आणि दीडशे स्वार त्याच्या मनसबीतून कमी करून त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली. "अहमदनगर येथील वाडे दुरुस्त करण्यात यावेत. झिन्नतउन्निसा बेगम तेथे येतील. वाड्याच्या (महाल) दुरुस्तीचा आराखडा तयार करून पाठविण्यात यावा."

**नऊ सप्टेंबर १७०३**

आज दिवाण बंद होते.

**दहा सप्टेंबर १७०३**

बादशहाने न्याय कचेरी केली. राजा शाहू हा हुजुरांत आला होता. त्याला अडीचशे रुपये किंमतीची आणि नकशीकाम केलेली ढाल (बक्षीस) देण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, राजा शाहू याने मुजऱ्यासाठी दिवाण अदालतमध्ये येत जावे.

राजा शाहूच्या पदरची माणसे, यांना राजा शाहूने आपल्या जवळ बोलावून स्वतः त्यांच्या कामाची आणि मागण्यांची व्यवस्था करावी, अशीही आज्ञा करण्यात आली. (यावरून यापूर्वी शाहूच्या मनसबीची व जहागिरीची व्यवस्था बादशहाकडून नेमलेल्या अधिकाऱ्यांकडून होत असे आणि त्यांच्यावर शाहूची सत्ता नसे, असे दिसते.)

**अकरा सप्टेंबर १७०३**

बादशहा दिवाणेखास मध्ये आले आणि त्यांनी काम पाहिले.

बादशहाने पुढील मंडळींना (प्रामुख्याने आपल्या कुटुंबातील) पुढीलप्रमाणे अत्तराच्या कुप्या (सुगंधी द्रव्ये) दिल्या आणि पाठविल्याः—

(१) बादशहाजादा मोअज्ज्म—शंभर तोळे,

(२) बादशहाजादा मुहंमद आज्ज्म—शंभर तोळे,

(३) बादशहाजादा मुहंमद कामबक्ष—चाळीस तोळे,

(४) शहाजादा बेदारबख्त—चाळीस तोळे,

(५) शहाजादा मुईजोद्दीन (मुअज्ज्मचा मुलगा)—वीस तोळे,

(६) शहाजादा अजीमुश्शान—वीस तोळे,

(७) शहाजादा वालाजाह—दहा तोळे,

(८) जानी बेगम (आजमची बायको आणि दाराशुकोहची मुलगी)—पन्नास तोळे,

(९) झिन्नतउन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी)—पन्नास तोळे,

अनुक्रमणिका

(१०) उदेपुरी महल (औरंगजेबाची बायको)—चाळीस तोळे,

(११) सुल्तान बुलंद अख्तर—चार तोळे,

(१२) जहांजेब बानू बेगम—दहा तोळे,

(१३) मेहरून्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी)—पंचवीस तोळे,

(१४) सरहिंदी महाल—पंचवीस तोळे,

(१५) ताज सुल्तान—दहा तोळे,

(१६) आराम बानू बेगम—दहा तोळे, इतर बायका (अंतःपुरांतील स्त्रियां)—पंधरा, तोळे,

(१७) शहा बेगम—दहा तोळे,

(१८) सकीना बानू बेगम—नऊ तोळे,

(१९) बुलाकी बेगम—दहा तोळे,

(२०) हमराज बानू—सात तोळे,

(२१) कारसाज बानू—सात तोळे,

(२२) सुल्तान सिपर शुकोह (दाराचा मुलगा आणि बादशहाचा जावई)—पंधरा तोळे,

(२३) सुल्तान इज्ञतबक्ष (मुरादचा मुलगा आणि बादशहाचा जावई)—पंधरा तोळे,

(२४) सुल्तान दावरबख्श—चार तोळे,

(२५) हयातुन्निसा बेगम—नऊ तोळे,

(२६) सईफा बानू—दहा तोळे,

ज्या अधिकाऱ्यांना अत्तरे वाटण्यात आली त्यांची नावे पुढीलप्रमाणे:—

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | अमीरउल्उमरा (असदखान मुख्य प्रधान) | (२) | उम्दतुल्मुल्क खान फिरोजजंग, |
| (३) | झुल्फिकारखान, | (४) | बक्षी रुहुल्लाखान, |
| (५) | हमीदोद्दीन खान, | (६) | मतलबखान, |

अनुक्रमणिका

(७) इनायतउल्लाखान,
(८) हकीम सादिकखान,
(९) काजी अक्रमुद्दीन,
(१०) मरहमत्खान,
(११) अबदुर्रहीमखान,
(१२) खिदमतगारखान,
(१३) हाफिज अंबर,
(१४) ख्वाजा मसउद्अली,
(१५) ख्वाजा अखतियार,
(१६) हाफिज बख्तारवर,
(१७) ख्वाजा सादत,
(१८) ख्वाजा मतलब,

रुहुल्लाखाखानाने पुढीलप्रमाणे विनंती केली—"आज्ञेप्रमाणे हैद्राबादचा काननगो बापू पंडित याला फत्तेउल्लाहखान बहादूर याजबरोबर काबुलकडे पाठविण्यात येत आहे. तो कामाचा माणूस आहे आणि निरपराधी आहे. त्याला क्षमा करण्यात यावी." विनंती मान्य करण्यात आली आणि बापू पंडितला हुजुरांत बोलावून घ्यावे अशी आज्ञा पाठविण्यात आली.

**बारा सप्टेंबर १७०३**

बादशहांना कळविण्यात आले की, नवलख उमऱ्याचा ठाणेदार आतिषखान उर्फ मुहंमद काजिम, सुलेमान खान आणि चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान त्यांनी चोरांच्या (मराठ्यांच्या) तिकोणा किल्ल्याला वेढा घातला होता. तो त्यांनी जिंकून घेतला आहे.

**तेरा सप्टेंबर १७०३**

यक्काताजखान हा कडूस ठाण्याच्या बंदोबस्तासाठी गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला. हाफिज अंबरने पुढीलप्रमाणे कळविले—आजमगड (पुरंदर)चा किल्लेदार व फौजदार जानबाजखान याचा नायब हा टेहळणीसाठी बाहेर गेला होता. त्याने अकरा घोड्या, दोन उंट, एक झेंडा आणि आठ बैल हे शत्रूंकडून (चोरांकडून) लुटून आणले आहेत." ही लूट त्यालाच देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

सुलेमानखानाच्या बिरादरीपैकी अल्लाबक्ष याला नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याच्या शिफारशीवरून नव्याने मनसब देण्यात आली. लोदीखान याच्या बिरादरीपैकी हसन, दाऊदचा मुलगा मुहंमद कासिमचा मुलगा बहादूर आणि सुलेमान यांस मनसबी देण्यात आल्या. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

**चौदा सप्टेंबर १७०३**

जिन्नतउन्निसा बेगम या बहादुरगड येथे आहेत. त्या अहमदनगरला जातील. त्या इस्लामपुरीहून (ब्रम्हपुरी) बहादुरगडला येताना त्यांच्यापाशी जो सरंजाम (प्रवासाचा वगैरे) होता तसाच सरंजाम बहादूरगड मध्ये त्यांच्यापाशी ठेवावा.

बक्षी रुहुल्लाखान याने आपल्या तंबूजवळ शिंगाडे लावले होते. त्याची एक करंडी त्याने ख्वाजा इद्राक याच्या बरोबर बादशहाकडे पाठविली. बादशहाने खोजाला चार होन बक्षीस दिले.

अनुक्रमणिका

बादशहांना कळविण्यात आले की, बादशाही लष्करांतील उंट आणि बैल हे चरण्यासाठी जातात. चोर (मराठे) त्यांच्यावर हल्ला करून त्यांना पळवून नेतात. बादशहाने आज्ञा केली की, पूर्वीप्रमाणे लष्कराभोवती टेहळणीची पथके पाठविण्यात यावी. गुलबर्गा उर्फ अहसनाबाद येथील किल्लेदार व फौजदार नुरुद्दीनखान याच्या मुलाला तेथेच बापाच्या जागी नायब फौजदार म्हणून नेमण्यात आले. (मुलाचे नांव मरहम असे वाटते.)

**पंधरा सप्टेंबर १७०३**

अईजखान मरहूम याचा नातू शमशीर बेग हा घोड्यावरून पडला. त्याच्या पायाला इजा झाली. बादशहाने आज्ञा केली की, हाडे बसवणारा अबदुल्ला याने जाऊन याचा उपचार करावा.

**कल्याण-भिवंडी**

गुलशनाबाद (नाशिक) वगैरेचा ठाणेदार मातबरखान हा होता. त्याचा दत्तक मुलगा (पिसरे ख्वांदा—मानलेला मुलगा) अबू मुहंमद याला खान ही पदवी देण्यात आली. त्याला चारशे जात आणि दीडशे स्वार अशी मनसब होती.

दिवंगत राजा भीम (उदेपूरचा) याचा मुलगा विजयसिंग हा स्वतःचे लग्न आटोपून हुजुरात आला (उदयपूरहून) त्याची मनसब वाढविण्यात आली.

**सोळा सप्टेंबर १७०३**

हमीदोद्दीन खान बहादुरच्या द्वारे—तोरणा किल्याचा नकाशा बादशहाच्या समोर ठेवण्यात आला. तो पाहून बादशहा हमीदोद्दीनखानला म्हणाले “तयार रहा! तोरणा किल्याचा परिसर पाहण्यासाठी आणि आमच्या निवासस्थानासाठी स्थळ निवडण्यासाठी आम्ही तुम्हाला पाठवू.”

औरंगाबादेहून हत्ती बोलावून घेण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १७ सप्टेंबर इ. स. १७०३ ते ३० डिसेंबर १७०३

### सतरा सप्टेंबर १७०३

बादशहाने आज संध्याकाळी न्यायकचेरी केली. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—

"फत्तेउल्लाखान याजपाशी तैनात असलेले मनसबदार (त्याच्या बिरादरीपैकी) आणि मुहंमद अमीनखान याच्या बिरादरीचे लोक यांनी स्वतःच्या पगाराच्या बाकीसाठी दिवाणाच्या कचेरीत एकच गर्दी केली. दिवाणाचा नगदीचा कारभारी मुहंमद खलील याच्याबरोबर त्यांनी उद्धटपणाचे वर्तन केले. त्यांनी इनायतउल्ला खानाच्या पालखीची मोडतोड केली ते न जाणो इनायउल्लाखानावरही हात टाकतील".

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:——

"हमीदोद्दीनखान बहादूर याने स्वतःची पथके तेथे पाठवावीत. छावणीचा कोतवाल सरबराहखान यानेही तेथे जावे. जे दांडगाई करीत असतील त्यांना शिक्षा करावी."

नमाजाच्या वेळी बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:——

"आज्ञेप्रमाणे सरबराहखान आणि हमीदोद्दीनखानाची पथके दिवाणेआला (मुख्य कचेरी) कडे गेली. तोपर्यंत माणसे संबंधित माणसे कचेरीतून गेली (निघून) होती. मग सरबराहखान आणि हमीदोद्दीन खानाच्या पथकाने इनायतउल्लाखान याला त्याच्या कचेरीतून काढून त्याला त्याच्या तंबूवर पोहोचविले आहे."

आलमखाज्या व नजीरख्वाजा हे मध्य आशियातून आले होते. त्यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या.

फत्तेउल्लाखान बहादूर याचा भाऊ मुहंमद बेग याचा मुलगा मुहंमद तय्यब याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

मुहंमद अमीनखान बहादूर हा गनिमांच्या पारिपत्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाला भेटला. त्याच्याबरोबर त्याचे पुढील सहकारी होते —(१) मुगलखान, (२) ख्वाजा कुलीखान, (३) इमामउद्दीनखान.

अनुक्रमणिका

मरहूम अमानतखान याचा मूलगा मीर अहमद हा बादशहाना भेटला.

**अठरा सप्टेंबर १७०३**

आज बादशहा दिवाणे आममध्ये आले. त्यांनी आज सत्तर घोडे व हत्ती यांची पाहणी केली.

काल रात्री बादशहाने मुगलखान यास हुजूरांत बोलाविले. त्याला एक खंजीर बक्षीस देऊन त्याला आज्ञा केली की, "तुम्ही औरंगाबादेस जाऊन हत्ती घेऊन जा."

चाकणचा किल्लेदार अमानुल्लाखान हा येऊन बादशहाला भेटला. तिकोणा किल्ला घेतल्याबद्दल त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

राजा शाहू यास रत्नखचित अंगठी देण्यात आली.

औरंगाबादच्या बातम्यांवरून कळले की, फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीर शाही [याने विशाळगडच्या वेढ्यांत कामगिरी बजावली होती व सज्जनगडच्या वेढ्यांत याचा मुलगा (नातू?) मारला गेला होता.]. हा काबूलला जात असताना वाटेत औरंगाबादेस थांबला. त्याने आपला मेहुणा बसालतखान याला बरोबर घेऊन शाहजादा बेदारबख्त याची भेट घेतली. शाहजाद्याने त्याला एक रत्नजडित खंजीर व खिलातीची वस्त्रे दिली आणि बसालतखानाला खिलातीची वस्त्रे दिली आणि फतेउल्लाखानाला काबुलकडे जाण्यासाठी निरोप दिला. चीनकुलीजखान यास आज्ञापत्र लिहिण्यात यावे की, "तुम्ही अधोनी उर्फ इम्तियाजगडकडे फौज पाठवावी". अशी बादशहानी रूहुल्लाखानाला आज्ञा केली.

**एकोणीस सप्टेंबर १७०३**

बादशहाना कळविण्यात आले कीं, फकीर मुहंमदखान हा फिरोजजंग याच्या फौजेत तैनात होता. त्याने हैद्राबाद सुभ्यांत जाऊन एका माणसाच्या मुलीशी जबरदस्तीने निका लावला. बादशहाने त्याची खान ही पदवी काढून घेतली. त्याला पाचशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती ती शंभर जात व वीस स्वार अशी कमी केली.

तिकोणा किल्ल्याचा माजी किल्लेदार (मराठा) तुकोजी हा होता. तो अमानुल्लाखानाच्या मध्यस्थीने येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. तिकोणा किल्ल्याला यापुढे अमानगड म्हणण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**वीस सप्टेंबर १७०३**

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**एकवीस सप्टेंबर १७०३**

सुलेमानखान हा तिकोणा जिंकून घेण्यासाठी नौलख्याचा ठाणेदार आतिशखान याजकडे गेला होता. किल्ला जिंकून घेतल्यावर तो येऊन बादशहाना भेटला.

शेख गुलाम मुहंमद याला राजा शाहूचा दिवाण म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**बावीस सप्टेंबर १७०३**

मुहंमद अश्रफ हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला दोनशेची मनसब देण्यात आली. हमीदोद्दीनखान याला तोरणा किल्ल्याकडे पाठविण्यात आले. त्याच्याबरोबर देण्यासाठी एकहजार तीनशे सदतीस स्वारांचे सैन्य तयार करण्यात आले. हमीदोद्दीनखानाबरोबर जाण्यासाठी सुलेमानखान, सैफुल्लाखान, कामियाबखान आणि मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम वगैरेंना नेमण्यात आले. या सैन्याचा बक्षी व वाकेनवीस म्हणून मीर इब्राहिमचा मुलगा मीर अलीकुली याची नेमणूक करण्यात आली.

इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) चा बदललेला किल्लेदार मुरीदखान याची मनसब कमी करण्यात आली.

तिकोणा उर्फ अमानगड येथे गोपालदासचा मुलगा कुंवरसिंग याची किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**श्रीरंगपट्टण**

**तेवीस सप्टेंबर १७०३**

सुरत बंदरचा बदललेला सवानेहनवीस मुहंमद बाकर याला अबदुर्रहमान हरकऱ्याच्या ऐवजी श्रीरंगपट्टणचा अखबारनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याला शंभर जात व पन्नास स्वार अशी मनसब होती. त्यांत पन्नासची वाढ करण्यात आली व त्याला एक शाल देण्यात आली.

**चोवीस सप्टेंबर १७०३**

बादशहाने आज्ञा केली की, अमीरउल्‌उमरा जुम्दतुल्‌मुल्क (असदखान मुख्य प्रधान) हे ज्या दिवशी आपल्या दिवाणे आलाच्या कचेरीत येऊन बसतील, त्या त्या दिवशी शिष्टाचाराचा अधिकारी (मीर तूजक) तहवुरखान याने वीस माणसे बरोबर घेऊन जाऊन त्यांची नीट व्यवस्था करावी.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

> “माहूर (जिल्हा नांदेड) चा बदललेला फौजदार उदाजीराम याला हुजुरात बोलावण्यात आले होते, तो अद्यापपर्यंत आला नाही.” बादशहाने आज्ञा केली की, त्याच्या जहागिरी काढून घ्याव्यात. त्याला तीनशे जात व दोनशे स्वार (त्यापैकी एकशे दुघोडी) अशी मनसब आहे.

अनुक्रमणिका

हमीदोद्दीनखान बहादूर याने लाकडी बंगला तयार केला होता, तो दिड दरआ (काही फूट?) लांब व सव्वा दरआ रुंद होता. कचेरी संपल्यावर बादशहाने तो नजरेखालून घातला.

बादशहा म्हणाले की, हा दिवाणेखासच्या जवळ उभा केला आहे, त्याऐवजी दिवाणेआममधे शामियान्याच्या आत दक्षिणेकडे उभा करण्यात यावा, म्हणजे दिवाणेआम करू तेव्हा आम्ही त्या बंगल्यात बसत जाऊ."

**पंचवीस सप्टेंबर १७०३**

बादशहाने काल पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—दिवाणेआला (मुख्य कचेरी) च्या जवळ जाळी (कठडेवजा) उभी करण्यात यावी म्हणजे लोक गर्दी करणार नाहीत. त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

बादशहाने तैमूरबेग गुर्जबर्दार याची नेमणूक करून त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

"बंगालहून खजीना येत आहे. तो जिथपर्यंत आला असेल तिथपर्यंत जाऊन निकड लावून तो हुजुरात घेऊन ये."

**सव्वीस सप्टेंबर १७०३**

बक्षी रूहुल्लाखान यास सकाळी बादशहा म्हणाले "तयार रहा! मी तुम्हाला राजगड आणि तोरणा हे किल्ले पाहून येण्यासाठी, शनिवारी पाठवीत आहे. सतरा जमादिस्सानी रोजी (सतरा ऑक्टोबर १७०३) येथून (पुण्याहून) कूच करण्याचे ठरले आहे. सगळ्या कारखान्यांना (खात्यांना) ही बातमी पोहोचवा. हत्तीखान्याचा अधिकारी मोहरमखान यास लिहा की, त्याने औरंगाबादेहून हत्ती आणि इतर ओझी वाहण्याची वाहने हुजुरात आणावीत."

औरंगाबाद येथील डाग देण्याच्या खात्याचा अधिकारी कुंजमन याचा मुलगा साहेबराव यास बक्षी सदरुद्दीन याचा प्रमुख कारकून (पेशदस्त) म्हणून नेमण्यात आले. त्या जागेवर पूर्वी शेख मिहरुल्ला हा (मेहेरचंदचा मिहरुल्ला झाला होता) होता. औरंगाबाद येथील डाग देण्याच्या कामाच्या खात्यात कुंजमनचा जावई उत्तमराम याची नेमणूक करण्यात आली.

**सत्तावीस सप्टेंबर १७०३**

आज बादशहाने न्यायकचेरी केली. बक्षी सहुल्लाखान हा आजारातून बरा होऊन बादशहाना भेटला.

**अठ्ठावीस सप्टेंबर १७०३**

अबुल खैरखान हा जुन्नर येथे किल्लेदार फौजदार होता. बादशहाजादा मुहम्मद आजम याने काही वस्तू (मूल्यवान भांडी) हुजुरात पाठविली होती.

उकरी (?) नदीच्या काठावर जुन्नरजवळ कुंजी या गावापाशी चोरांनी (मराठ्यांनी) तो (भांडी) लुटून नेली. त्या वस्तू हस्तगत करून हुजुरात घेऊन या असे अबुलखैरखान याच्या नावे गुर्जबर्दाराच्या हस्ते आज्ञापत्र पाठविण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

मुहंमद अमीनखान बहादूर आणि सदरुद्दीन मुहंमखान यांनी छावणी भोवती टेहळणी आणि गस्त घालण्याचे थांबवावे आणि घासदाणा आणण्यासाठी पाळी-पाळीने जात असावे अशी आज्ञा करण्यात आली. हमीदोद्दीनखानाच्या बरोबर खालील मंडळी देण्यात आली.—

(१) यक्काताज खान (एक हजार जात व पांचशे स्वार),

(२) शेख (पाचशे जात व शंभर स्वार),

(३) हातीमखानाचा मुलगा मुहंमद बाकर (चारशे जात व एकशेवीस स्वार.),

(४) शिकार खान करावल,

(५) जान मुहंमद करावल.

**एकोणतीस सप्टेंबर १७०३**

बादशहाने सकाळी रूहुल्लाखान व हमीदोद्दीनखान बहादुर यांना बोलावून त्यांच्याशी खलबते केली. एक घटिकानंतर त्यांना आपापल्या तंबूकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

सुलेमानखान याला दोन हजार जात आणि शंभर स्वार अशी मनसब होती. तीत दोनशे स्वारांची भर घालण्यात आली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—

"बादशाही छावणीसाठीं येणारी धान्याची रसद चाकण आणि नौलखउंबऱ्यापर्यंत आली आहे." तिकडील ठाणेदारांना ही रसद हुजुरांत पाठवावी असे लिहावे, अशी आज्ञा झाली.

दंडराजपुरीच्या (जंजीऱ्याचा) किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूब याने आपल्या इलाख्यातून हुजुरात धान्याची रसद पाठवावी असे त्याला लिहिण्यात यावे म्हणून बादशहांने आज्ञा केली.

**तीस सप्टेंबर १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**एक ऑक्टोबर १७०३**

बादशहाने सकाळी एक प्रहर व सहा घटिका झाल्यानंतर स्वतःच्या शय्यागृहाची जाळीदार खिडकी सरकवली आणि बक्षी रूहुल्लाखान व हमीदोद्दीन खान यांना बोलावले. त्यांना तोरणा किल्यासमोरील मोर्चे आणि बादशहाच्या निवासस्थानाची जागा यासंबंधी काही सूचना दिल्या आणि निरोप दिला. त्यांना पुढीलप्रमाणे बक्षिसे देण्यात आली. दिवाणेखास हत्तीखान्याच्या दारोगा (अधिकारी) व आख्ताबेगी) (पाग्यासंबंधी) हमीदोद्दीनखान याला तीनशे पन्नास रुपये किंमतीची ढाल देण्यात आली. रूहुल्लाखान यास सहाशे बावन्न रुपये किंमतीचा रत्नजडित अंलंकार देण्यात आला. रूहुल्लाखानाची मुलें मुहंमद खालील आणि मीर मुहंमद अहसन यांना शिरपेच देण्यात येऊन त्यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

नळदुर्गचा बदललेला किल्लेदार व फौजदार कासिमखान याला परंड्याचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्यापूर्वीचा किल्लेदार (सरवर) सखरखान (सजावार खानही असू शकेल) याला हुजुऱात बोलावून घेण्यात आले.

फकीर मुहंमद याने बहादुरगडला जाऊन बादशहाजादा कामबक्ष याच्या मुलीला लष्करात (पुण्याला) घेऊन यावे अशी आज्ञा झाली.

**दोन ऑक्टोबर १७०३**

बादशहाने रूहुल्लाखान आणि हमीदोद्दीनखान यांच्या फौजेला जाण्यास निरोप दिला. फौजेतील पुढील अधिकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली. अजीजखान, अमानुल्लाखान, लष्करयारखान, शिकारखान आणि खान मुहंमद.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याचा भाऊ आणि नायब अताउल्लाखान याने आपल्या इलाख्यातून धान्याची रसद आणली होती, तो बादशहाला भेटला. पुढील मंडळींना सहुल्लाखानच्या फौजेत तैनात करण्यात येऊन रवाना करण्यात आले.— (१) सय्यद जानी, (२) बाकरखान बक्षी, (३) शफीखान बक्षी, सुलेमानखानाला हमीदोद्दीनखान पाशी तनात करण्यात आले. सैफुल्लाखान यास हमीदोद्दीनखानाबरोबर पाठविण्यात आले. बादशाही छावणीत हमीदोद्दीनखानाच्या जागी खवाश्यांचा दारोगा खानाजादखान याने काम पहावे अशी आज्ञा झाली.

राजा शाहू यांस पांचशे रुपये किंमतीचा एक रत्नजडित अलंकार देण्यात आला.

तोफखानाचा अधिकारी (तोपची बाशी) अबदालखान याला तोफा घेऊन येण्यासाठी बहादूरगडाकडे पाठविण्यात आले.

**तीन ऑक्टोबर १७०३**

अनुक्रमणिका

हुजुरात ताबडतोब यावे अशा अर्थाचे आज्ञा पत्र झुल्फिकारखानाच्या नावे पाठविण्यात आले. त्याला देण्यासाठी खास खिलातीची वस्त्रे काढून ठेवण्यात यावीत, अशी आज्ञा झाली.

**चार ऑक्टोबर १७०३**

आज दिवाण व न्याय कचेरी या बंद ठेवण्यात आल्या होत्या.

**पाच ऑक्टोबर १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, झुल्फिकारखान नुस्रतजंग हे आज्ञेप्रमाणे आले आहेत लष्करात (छावणी) येण्याची परवानगी मागत आहेत. परवानगी द्यावी, अशी आज्ञा झाली.

कामगारखान (माजी मुख्य प्रधान मुहंमद जाफरचा मुलगा व औरंगजेबचा मावसभाऊ) हा बंगालहून येत होता. त्याची आणि गुल्शनाबाद (नाशिक) व कल्याण-भिवंडी येथील ठाणेदार मातबरखान यांची पत्रे हुजुरात आली.

लोहगाव (पुण्याजवळ) चा ठाणेदार अटलसिंग हा होता. त्याच्या ऐवजी फकीरमुहंमद अईज याची नेमणूक करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, गोपालसिंग चंद्रावत (याचाच मुलगा रतनसिंग हा मुसलमान झाला होता आणि बादशहाने बापाची जहागीर त्याला दिली होती) हा आला असून, लष्करात येण्याची परवानगी मागीत आहे. परवानगी देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

मरहूम अबर्दुरहीमखान याचा मुलगा मीरनोमान याला मुहंमद तकीच्या जागी बक्षी सदरुद्दीन याचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

**सहा ऑक्टोबर १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, नुस्रतजंग झुल्फिकारखान आणि त्याचे सहकारी राव दलपत रामसिंग हाडा वगैरे हे आले असून दिवाणमध्ये शामियाण्यात बसले आहेत. हुजुरात येण्याची अपेक्षा बाळगून आहेत. परवानगी देण्यात आली. झुल्फिकारखान हा येऊन बादशहाना भेटला. बादशहाने त्याला खास खिलातीची वस्त्रे दिली आणि त्याला काही सूचना केल्या. दिवाण संपण्यापूर्वी त्याला आपल्या डेऱ्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला. बादशहाने नुस्रतजंग झुल्फिकारखान यास म्हटले राजा शाहूला तुम्ही आपल्या बरोबर तंबूकडे घेऊन जा. त्यावेळी राजा शाहू हा दिवाणात हजर होता. त्याला एक ढाल, साठ रुपये किंमतीची बक्षीस देण्यात आली. बादशहाने त्याला आज्ञा केली की, "तुम्ही नुस्रतजंग झुल्फिकारखान यांजबरोबर जावे आणि ते जे देतील ते घ्यावे." झुल्फिकारखानाच्याबरोबर आलेला राव दलपत बुंदेल हा बादशहाना भेटला. त्याने पन्नास मोहरा निसार म्हणून पेश केल्या. रामसिंग हाडाने अठरा मोहरा पेश केल्या.

गोपाळसिंग चंद्रावत हा बादशहासमोर आला. त्याचे हात बांधले होते. ते उघडावे अशी आज्ञा झाली. त्याने नऊ मोहरा निसार दिल्या. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.— खिदमतगारखान नाजिर याला लिहा— "नरकवासी रामा (राजाराममहाराज) यांच्या मुली तळावर (बहादुरगड) येथे आल्या आहेत. मुहंमद कामबक्ष यांचा दुय्यम बक्षी, मीर मुहंमद याला शाहजादा कामबक्ष यांच्या मुलीला छावणीत (पुणे) आणण्यासाठी नेमण्यात आले आहे. त्या मुलींनाही (राजारामाच्या मुलींना) मीर मुहंमदने आपल्याबरोबर आणावे.

**सात ऑक्टोबर १७०३**

शाहजादा मुहंमद बेदार बख्त याच्या नावे बादशहाचे पत्र जासूदाच्या बरोबर पाठविण्यात आले. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. "सिद्धी फरहादखान याला एक हजार जात चारसे स्वार अशी मनसब होती. आजारामुळे उपचारासाठी आपल्या जाहागिरीवर गुलशनाबाद (नाशिक) येथे जाण्यास निघाला. तो अहमदनगरपर्यंत गेला आणि तेथे वारला"

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आलेः—

"वंजारी लोक बैलावर धान्याची रसद घेऊन छावणीत येत होते. शत्रूच्या गर्दीमुळे ते पारनेरपाशी अडकून पडले आहेत"

बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद अमीनखान बहादूर याने सैन्य घेऊन जावे आणि वंजाऱ्याना हुजुरात आणावे. त्याप्रमाणे अमीनखान हा रवाना झाला.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आलेः—

"आज्ञेप्रमाणे राजा शाहू हा काल झुल्फिकारखानाच्या तंबूवर गेला. खानाने त्याला खिलातीची वस्त्रे, एक घोडा, आणि एक खंजीर ही आपल्याकडून (स्वतः) दिली आणि राजा शाहूला स्वतःच्या तंबूकडे जाण्यास निरोप दिला".

**आठ ऑक्टोबर १७०३**

बक्षी रूहुल्लाखान व हमीदोद्दीनखान यांना बादशहानी राजगड व तोरणा इकडे पाठविले होते. मोर्चासाठी जागा, बादशहाच्या निवासस्थानासाठी जागा, अंतर आणि रस्त्याची परिस्थिती ही पाहून यावी, असे त्यांना सांगण्यात आले होते. त्याप्रमाणे दोन्ही किल्याच्या मध्ये त्यांनी जागा निवडल्या आणि ते परत आले. वाटेत हमीदोद्दीनखान हा घाटाचा रस्ता दुरुस्त करण्यासाठी बक्षिंदाबक्ष (सिंहगड) पाशी थांबला. रूहुल्लाखान हा आपल्या सहकाऱ्यांबरोबर येऊन बादशहाना भेटला. बादशहांना कळविण्यात आले की, राजगडचा किल्ला हा बादशाही छावणी (पुण्याच्या) पासून बक्षिंदाबक्षच्या बरोबर पुढील मंडळींनी बादशहाना मोहरा नजर केल्या.—(१) अजीज खान, (२) बाकरखान, (३) मुहंमद अहसनचा मुलगा मुहंमद खलील.

अनुक्रमणिका

झुल्फिकारखानाच्या तैनातीतील पुढील मंडळींनी नजरा दिल्या—(१) नवरोज बेगखान, (२) रुस्तुमबेगखान (तोफखान्याचा दारोगा), (३) हफीजुल्ला (बक्षी व वाकेनवीस).

बादशहानी राजा शाहू याच्यासाठी एक घोडा, शंभर मोहरा किंमतीचा आणि दुसरा घोडा सत्तर मोहरा किंमतीचा वेगळे काढून ठेवण्यात यावे अशी आज्ञा केली.

झुल्फिकारखानाच्या विनंतीप्रमाणे बादशहाने आज्ञा केली की, दलपत बुंदेला व रामसिंग हाडा यांनी मुजऱ्यासाठी दिवाणेखासच्या मार्गाने न्याय कचेरीत (अदालत) येत जावे. त्याप्रमाणे त्यांनी केले. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—बादशहाच्या आज्ञेने मुहमंद अमीनखान बहादुर हा धान्याची रसद आणण्यासाठी रवाना झाला, पण त्याच्या फौजेत तैनात करण्यात आलेले इसम अद्याप फौजेत दाखल झाले नाहीत. बादशहाने आज्ञा केली की, मुनीमखान व नईमखान यांनी सजावली करून सदर इसमांना अमीनखानाच्या फौजेत पोहोचवावे.

**नऊ ऑक्टोबर १७०३**

झुल्फिकारखानाच्या सहकाऱ्यापैकी खालील मंडळी बादशहाना भेटली :—

(१) कान्होजी (?),

(२) रणदुल्लाखान,

(३) फौजेचा दिवाण अबुलहसन.

बाबूचा मुलगा अली याला रसद (धान्याची) आणण्यासाठी सुरतेकडे शाल देवून रवाना करण्यात आले. खुदाबंदाखान (शाईस्तेखानाचा मुलगा, औरंगजेबचा मामेभाऊ, विजापूर कर्नाटकचा सुभेदार) यांच्या शिक्षकाचा मुलगा अब्दुलमलिक याला सुलतानपूर आणि नंदुरबार येथील देशमुखी सांगण्यात आली. कलीमुल्ला यांस जमाखिंडीचा अमीन व फौजदार म्हणून नेमण्यात आले. झुल्फिकारखानाच्या फौजेतील मिसरी बख्त्यार यांस बख्त्यारखान ही पदवी देण्यात आली. बंगालचा सुभेदार अजीमुश्शान (औरंगजेबचा नातू) याने रुहुल्लाखान याच्यासाठी एक हत्ती पाठविला होता. त्याची किंमत आठ हजार रुपये ठरवून, हत्ती सरकारात ठेवून घ्यावा अशी आज्ञा करण्यात आली. गोपाळसिंग चंद्रावतचा मुलगा हिंमतसिंग (धाकटा) हा बापाबरोबर फरारी झाला होता तो परत येऊन बादशहाना भेटला.

बादशहाने आज्ञा केली की, झुल्फिकारखान यांस गनिमांच्या (मराठयांच्या) पारिपत्यासाठी औरंगाबादेकडे पाठविण्याचे ठरले आहे. त्याच्यासाठी आणि त्याच्या सहकाऱ्यासाठी पुढीलप्रमाणे वस्तू काढून ठेवण्यात याव्या :—

(१) झुल्फिकारखानासाठी एक रत्नखचित वस्तू, (२) राव दलपत बुंदेला, रत्नखचित खंजीर, (३) रामसिंग हाडा, रत्नखचित पदक, (४) राय कान्होजी (कान्होजी शिर्के) साठी सजलेला घोडा.

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, सुबे हैद्राबाद,-विजापूर, औरंगाबाद, मुहंमदाबाद बीदर येथील मनसबदारांची आणि त्यांच्या तैनातीतील असलेल्या सैनिकांची संख्या कळविण्यात यावी. बादशहाना कळविण्यात आले की, ही संख्या एक लक्ष साठ हजार व आठशे स्वार अशी आहे (१,६०,८००).

भगवंताचा मुलगा उदीतसिंग यास नव्याने मनसब देण्यात आली.

काल रात्री एक प्रहर अन् चार घटका झाल्या असता बक्षी रूहुल्लाखान हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे हुजुरात हजर झाला. त्याने बादशहांना राजगड व तोरणा हे किल्ले, मोर्चे कायम करण्याच्या जागा व बादशहाचे निवासस्थान ही जागा, ठरविण्यात आले होते. त्यांचे नकाशे दाखविले. काल बादशहाने (गंज) बाजारचा करोडी (अधिकारी) मस्तअलीखान यास धान्याची रसद आणण्यासाठी ताकीद केली. छावणी भोवतालच्या ठाणेदारांना गोरेगाव (?) च्या दिशेने जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

**दहा ऑक्टोबर १७०२**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. आज झुल्फिकारखान यास गनिमांच्या पारिपत्यासाठी औरंगाबादेस पाठविण्याचा दिवस. त्याला आणि त्याचे सहकारी राव दलपत बुंदेला, रामसिंग हाडा वगैरेना बक्षिसे देण्यात येऊन निरोप देण्यात आला. यावेळी बादशाह हे खैरियत (खुशालीचे) चा फातेहा (प्रार्थना) पढले.

**अकरा ऑक्टोबर १७०३**

झुल्फिकारखान बहादुरच्या पुढील सहकाऱ्यांना आज बादशहाने निरोप दिला. सईदखान आणि त्याचा मुलगा मुहमद सादुल्ला, राव कानोजी शिर्के यांना निरोप देण्यात आला.

हमीदोद्दनिखान बहादूर याच्या सहकाऱ्यापैकी अमानुल्लाखान हा येऊन बादशहाला भेटला. मरहूम लोदीखानाचा नातू आणि अहमदचा मुलगा मुहंमद जमाल हा राजनोज उर्फ कोभीला किल्ल्याचे नाव लागत नाही, कदाचित कोथळागड असावा. हा आज्ञेप्रमाणे किल्ल्यात आपला नायब ठेवून हुजुरात आला होता. त्याला बादशहाने दोन मोहरा व खिलातीची वस्त्रे दिली. मुहंमद अलीखान उर्फ मुहंमदकुली हा एक हजार जात व दोनशे स्वार असा मनसबदार होता. त्याला आतील मार्गाने मुजऱ्यासाठी अदालतीत येऊ द्यावे अशी आज्ञा झाली. मरहूम दिलेरखानाचा मुलगा चांद हा औरंगाबादेत होता. बादशहाने त्याला हुजुरात बोलाविले. माझी परिस्थिती चांगली नाही. काही मदत करावी म्हणजे हुजूरात येईन असे त्यांनी लिहून पाठविले. औरंगाबादच्या खजिन्यातून त्याला एक हजार रुपये देण्यात यावे, अशी आज्ञा देण्यात आली.

**श्रीरंगपट्टण**

**अकरा ऑक्टोबर १७०३**

अनुक्रमणिका

श्रीरंगपट्टणचा जमिनदार (राजा) जगदेबराव याने पत्र लिहून पाठविले, त्याबरोबर चार हजार अश्रफी व पाच हजार रुपये पेशकश (खंडणी) म्हणून पाठविले. इनायतउल्लाखानाच्या द्वारे पत्र आणि खंडणी ही बादशहाच्या समोर ठेवण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की राजाचा वकील लखमाजी यास खिलातीची वस्त्रे देण्यात यावी.

चांद्याचा (चंद्रपूर) जमिनदार (राजा) बीरसिंग यास हुजुरात घेऊन यावे म्हणून मुहंमदबादल गुर्जबर्दार याची नेमणूक करण्यात आली. लोहगाव (पुण्याजवळ) चा ठाणेदार अटलसिंग याला खिलीतीची वस्त्रे देण्यात आली. शाहजादा बेदारबख्त याच्या विनंतीवरून नवलगडच्या किल्लेदारीवर मुहंमद बाकर (उस्मानचा मुलगा) याच्या जागी मुहंमद बाकर (ख्वाजा मुहंमद आरिफचा मुलगा) याची नेमणूक करण्यात आली. यासीनखान याच्या भाऊबंदापैकी अहसन यास नव्याने मनसब देण्यात आली. जमाखिंडी व शिरोळचा बदललेला फौजदार मुअज़्म अली याची मनसब कमी करण्यात आली.

**बारा ऑक्टोबर १७०३**

हमीदोद्दीनखान बहादूर हा बक्षिंदाबक्ष (सिंहगड) जवळील घाट नीट करण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला, त्याने कळविले की, मी सुलेमानखान आणि मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याना घाट दुरुस्त करण्यासाठी मध्ये ठेवून आलो आहे. ते दोघे दुरुस्तीचे काम करीत आहेत शिकारखान करावल हा हमीदोद्दीन खानाबरोबर गेला होता. तोही येऊन बादशहाना भेटला.

तिकोणा किल्ल्याचा राघू देशमुख हा अमानुल्लाखानाच्या मध्यस्थीने येऊन बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

परंड्याचा बदललेला किल्लेदार व फौजदार सर्फराजखान याला शाहजादा बेदारबख्ताच्या फौजेत तैनात करण्यात आले. त्याला दोन हजार जात आणि पांचशे स्वार अशी मनसब आहे. रादअंदाजखान हा रेहकलाबार (शस्त्रागार) चा अधिकारी, तोफाचा सरंजाम अमीनखान याजकडे पोहोचविण्यासाठी गेला होता. तो परत येऊन बादशहाना भटला. अकलूज उर्फ असदनगरचा ठाणेदार बुऱ्हाणउल्लाखान यास अकलुजला आपला नायब ठेवून हुजुरात यावे अशी आज्ञा करण्यात आली. गोपालसिंग चंद्रावत आणि त्याचा मुलगा हिंमतसिंग यांना बडतर्फ करण्यात आले होते. त्यांना नव्याने मनसबी देण्यात आल्या. कडूसचा बदललेला ठाणेदार आतिशखान याची मनसब कमी करण्यात आली.

**तेरा ऑक्टोबर १७०३**

आज दिवाण व न्यायकचेरी ही बंद ठेवण्यात आली.

**चौदा ऑक्टोबर १७०३**

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**पंधरा ऑक्टोबर १७०३**

अनुक्रमणिका

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

**सोळा ऑक्टोबर १७०३**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. झुल्फिकारखानाचा नायब, गुर्जबर्दारांचा दारोगा व कौरबेगी मतलबखान हा येऊन बादशहाला भेटला. आजारामुळे तो अशक्त झाला होता. कचेरी संपण्यापूर्वी त्याला आपल्या तंबूकडे जाण्यास परवानगी देण्यात आली.

मुहंमद अमीनखान बहादूर हा धान्याची रसद आणण्यासाठी चाकणकडे गेला होता. तो येऊन आपल्या पुढील सहकाऱ्यासह बादशहाना भेटला.:— (१) शिवसिंग, (२) सय्यद इमामउद्दीन, फौजेचा बक्षी व वाकेनवीस. बाजारचा (गंज) करोडी (अधिकारी) हा बादशाही छावणीच्या भोवतालच्या ठाणेदारांना ताकीद करण्यासाठी गेला होता, तो येऊन बादशहाना भेटला. त्याने ठाण्यांच्या परिस्थितीची माहिती बादशहाना दिली. किल्ले अर्क औरंगाबादची किल्लेदारी मुहिउद्दीनखान याजकडे देण्यात आली. त्यापूर्वी त्या जागेवर मतलबखानाचा भाऊ मुहंमद अहसन हा होता.

(यापुढील नोंदी मागील महिन्याच्या आहेत हे लक्षात ठेवावे.)

**एकोणीस जून १७०३**

रुहुल्लाखान हा सैन्य घेऊन गनिमांच्या (मराठ्याच्या) पारिपत्यासाठी नीरानदीकडे गेला होता, तो येऊन बादशहाना भेटला. त्याच्याबरोबर पुढील मडळी होती.—(१) अजीजखान रोहिला, (२) शिवसिंग, (३) अकीदखान (४) मेहदी मिफताहखान, (५) अटलसिंग, (६) सिद्दी लोहाद खान, (७) सिद्दी नलावीखान, (८) सिद्दी मिसबाहखान, (९) लोदीखान, (१०) सय्यदखान, (११) जाफरखान, (१२) मेहदीखानाचा मुलगा मुहंमद हसन, (१३) सुलेमान खान.

नवलखउमरेचा ठाणेदार आणि मनसूरखानाचा मुलगा आतिशखान याची मनसब वाढविण्यात आली, मीर इब्राहिम याला वऱ्हाडचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. रायभान, (व्यंकोजी राजे तंजावरकर यांचा मुलगा) याला सहा हजार जात, दोन हजार स्वार अशी मनसब खिलातीची वस्त्रे, १ हत्ती, १ घोडा, दहा हजार रुपये रोख व ध्वज ही देण्यात आली. रायभान आला तेव्हा त्याचे स्वागत अहदियांचा बक्षी नेकनामखान याने करून त्याला हुजुरात आणले.

काल रात्री बादशहाने हिदायतकेश याला बोलावून विचारले की, बादशाही छावणीपासून कोरेगाव व शिक्रापूर ही किती अंतरावर आहेत, चौकशी करून कळवावे.

**पंधरा जून १७०३**

बादशहाना कळविण्यात आले की, लुत्फुल्लाखानाचा मुलगा इनायतउल्ला (पहिला निजामाचा मामेभाऊ) आजारी आहे. बादशहानें आज्ञा केली की, त्याच्याऐवजी इरादत्तखान (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध

अनुक्रमणिका

आहे.) याला मुहंमद अमीन खानाच्या सैन्यात तैनात करण्यात यावे व त्याच्या बरोबर शंभर स्वार, शंभर पायदळ बंदुकची देण्यात यावे. त्याच्याकडे पारनेरहून जवाहरखाना वगैरे आणण्याचे काम देण्यात यावे.

**सोळा जून १७०३**

काल रात्री मन्सूरखानाने बादशहापाशी विनंती अर्ज केला की, आज्ञेप्रमाणे बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्ला देविसिंग किल्लेदाराच्या हवाली करून मी छावणीत आलो आहे. मला आज्ञा झाली आहे की, मी तरबियतखानाचा नायब म्हणून तोफखान्यात काम करावे, हे मला कबूल नाही. बादशहाने आज्ञा केली की, ते काम करावे आणि मला दिवाणखान्यात भेटावे.

मुगलखान राहदार (बादशाही छावणीपासून औरंगाबादपर्यंतच्या मार्गाचा रक्षक) यास पुढीलप्रमाणे लिहिण्यात यावे, अशी आज्ञा झाली.—— "नरकवासी संभा (संभाजी राजे) याच्या मुली, बहादुरगडाच्या तळावर आहेत त्यांना हुजुरात आणावे.

पुण्याचा बदललेला किल्लेदार व फौजदार, खानचंद दांगी यास रूहुल्लाखानापाशी तैनात करण्यात आले. शाहजादा कामबक्ष याने कळविले की, रायभान हा सुलतान हुसेनच्या बरोबर हुजुरात आला आहे. बादशहाने आज्ञा केली की, दिवाण भरेल त्या दिवशी त्याला हजर करावे व त्याच्यासाठी खिलीतीची वस्त्रे आणि चांगला हत्ती ही काढून ठेवावी.

**सतरा जून १७०३**

रूहुल्लाखानाने लिहून पाठविले ते असे, धनाजी जाधव वगैरे बंडखोर हे नीरा नदीच्या पलीकडे पळून गेले. नदीला पूर आला आहे. काय आज्ञा. यावर तुम्ही हुजुरात हजर व्हावे, अशी आज्ञा पाठविण्यात आली.

काल राजहरकारा याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले—फत्तेउल्लाखान बहादूर व शिवसिंग हे बक्षी रूहुल्लाखान याजपाशी तैनात होते ते घासदाणा आणण्यासाठी गेले होते. तेथे त्यांच्या अनुयायात आप आपसात मारामारी झाली. त्यात काही माणसे मारली गेली. हीं बातमी ऐकून रूहुल्लाखानाने मुनीमखान यास पाठविले आणि त्यांच्यात समेट घडवून आणला.

काल बादशहाने रात्री मन्सूरखान यास बोलाविले. त्याला तोफखान्याचा अधिकारी तरबियतखान याचा नायब म्हणून नेमण्यात आले.

**अठरा जून १७०३**

राजा नेकनाम (नागपूरचा गोंड राजा) याची बहीण वारली होती. शाहजादा कामबक्षाने त्याला शोक वस्त्रे दिली. नौकादलाचा प्रमुख सैफुल्लाखान यांस आज्ञा झाली की, झुल्फिकारखान यांस दहा नौकांचा ताफा देण्यात यावा म्हणजे तो भीमा पार करुन शत्रुच्या पाठलागावर जाईल.

अनुक्रमणिका

## नऊ जून १७०३

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. उजबेकखान व रणदुल्लाखान वगैरे मंडळी झुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होती. ती संरक्षक पथकाबरोबर पेडगावहून आली आहेत. चौकीवर ते पोहोचले असून आपल्या भेटीची परवानगी मागत आहेत. बादशहाने आज्ञा केली की, त्याच्या भेटीची जरूर नाही. त्यांनी झुल्फिकार खानाकडे म्हणजे आपल्या तैनातीच्या जागेवर जावे. कोतवालाला आज्ञा करण्यात आली की, त्या लोकांना चौकीच्या अलीकडे येऊ देऊ नये.

## दहा जून १७०३

गुलाम मुहंमदचा मुलगा उमर याला ताळोकोटचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूबखान याने सहा करंड्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

झीनतउन्नीसाबेगम (बादशहाची मुलगी) हिचा कारभारी हा बहादुरगडहून बादशहाच्या छावणीवर आला. त्याला छावणीत येण्याची परवानगी देण्यात आली.

## अकरा जून १७०३

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली. मुहंमद मुरादखान याचा भाचा मुहंमद हुसेन हा बादशहाच्या आज्ञेने व्यंकोजी (राजे) यांचा मुलगा रायभान याला नवरोज बेगखान याच्या काफिल्यातून बादशहाच्या हुजुरात घेऊन येत होता. हा काफिला लोहगाव (पुण्याजवळ) जवळ येऊन उतरला. शत्रुचे सैन्य सुमारे तीनशे स्वारांचे होते. त्याने काफिल्यावर हल्ला केला. उभयपक्षाची काही माणसे मारली गेली. त्यानंतर शत्रूने काफिला लुटला.

हरकऱ्यांच्या तोंडून खालील हकीकती कळल्या.—(१) विजापूरचा सुबेदार चीनकुलीजखान याने आपला जमादार (अधिकारी) मुहंमद लतीफ याच्याबरोबर पथके देऊन गनिमांच्या पारिपत्यासाठी पाठविले. (गावाचे नाव लागत नाही, बालखाना असावे) या पथकाने गनिमाची गाठ घेतली. उभयपक्षी हातघाईचे युद्ध झाले. शत्रूचा पराजय झाला. घोडे, भाले, व छत्र ही लूट हाती आली. शत्रू पळून गेला. जमादार त्यानंतर विजापूरास परत आला, (२) विजापूरच्या सुभेदार इखलासखान नियाना यास बहिर्जीची गढी पाडून आणि बहिर्जीचा तळ उध्वस्त करून येण्यासाठी पाठविले. त्याप्रमाणे इखलासखान नियाना हा गनिमांवर चालून गेला. त्याने गनिमाचा तळ लुटला. गनिमांच्या बऱ्याच गढ्या त्याने जमीनदोस्त केल्या. यानंतर तो विजापूरास परत आला.

## बारा जून १७०३

हरकऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली. बक्षी सहल्लाखान हा धना (धनाजी जाधव) चे पारिपत्य करण्यासाठी पूरघाटातून (?) गेला होता. रुहुल्लाखानाच्या लिहिण्यावरून कळले की, त्या भागात असलेल्या आणि त्याच्यापाशी तैनात असलेल्या लोकांची आर्थिक स्थिती चांगली नाही. खजिन्यातून

काही मदत मिळावी. बादशहाने आज्ञा केली की, बक्षी रूहूल्लाखानाकडे या कामासाठी एक हजार अश्रफ्या पाठविण्यात याव्या.

**तेरा जून १७०३**

मोतिमदखान याचा पुतण्या सैफुल्ला हा औरंगाबादेहून येऊन बादशहाना भेटला. त्याची मनसब वाढविण्यात आली. झुल्फिकारखान याचा विनंती अर्ज आला तो बादशहाच्या नजरेखालून गेला. गाजिउद्दीनखान बहादूर फिरोजजंग याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले. लुत्फुल्लाखानाचा मुलगा इनायतउल्लाखान (भावी निजाम उल्मुल्काचा मामेभाऊ) याने विनंती केली कीं, "मला तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले आहे तर मला हुजुरांनी आपल्याकडे घ्यावे" विनंती मान्य करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, सत्रसाल राठोड हा विजापूर कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान याच्यापाशी तैनात आहे. त्याला इनायतउल्लाखानाच्या ऐवजी तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात यावे. सत्रसाल राठोड यास दीड हजार जात व आठशे पन्नास स्वार अशी मनसब आहे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—राणा अमरसिंग याचे पथक (उदयपूरचे) हे हत्तीखाना पोहोचविण्यासाठी गेले आहे, ते परत बोलावण्यात यावे. त्याची तैनाती खान बहादूर (मुहंमद अमीन खान?) याजपाशी करण्यात यावी. इस्माइलखान याने चीनकुलीजखान याजकडे जावे. मरहूम सर्फराजखान याचा मुलगा मुबारकरु हा शिकाकोळ (आन्ध्र) चा फौजदार रूस्तुमदिलखान याजपाशी तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

मरहूम नाहरखान याचा भाचा सय्यद मझली याची मनसब वाढविण्यात आली. हैद्राबाद, कर्नाटककडील बातम्यांवरून कळले की, मरहूम कासिमखानाचा पुतण्या आणि सोनीगड (?) चा किल्लेदार हा मरण पावला आहे. झुल्फिकार बहादूर याला नवीन किल्लेदाराचे नाव सूचविण्यासाठी लिहिण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

**चौदा जून १७०३**

बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद अमीनखान बहादूर याने टेहळणीसाठी छावणीच्या बाहेर जावे. रात्रीच्या चौकीवर त्याने राहण्याची आवश्यकता नाही.

बादशहाने आज्ञा केली की, नुस्रतजंग (झुल्फिकारखान) पाशी पुढील सरंजाम तैनात करण्यात यावा. दोनशे बरकंदाज, पाचशे बहेलिये आणि पाचशे बाण.

मरहूम इज्ज़तउल्लाचा मुलगा हशमतउल्ला याने विनंती केली कीं, आपल्याला शिवापूर उर्फ रसूलपूरची ठाणेदारी देण्यात यावी, विनंती मान्य झाली नाही.

**पंधरा जून १७०३**

मुहंमद अमीनखान बहादूर याच्या फौजेत सय्यद इमामउद्दीनखान यास बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

**पाच जून १७०३**

घाटात रस्ता दुरूस्त करण्यासाठी अमानुल्ला खान याचा भाऊ अताउल्लाखान यास शिवापूरकडे पाठविण्यात आले होते. तो काल हुजुरात येऊन बादशहांना भेटला.

मुहंमद इस्माइल यास सूरत बंदर बडोदे वगैरे स्थळांचा सबाने निगार (घटनांचे वृत्त लिहून पाठविणारा) म्हणून नेमण्यात येऊन त्याला रवाना करण्यात आले.

**सहा जून १७०३**

मुहंमद हाकिम हा तबेल्याचा अधिकारी नूर मुहंमद याचा नायब होता. त्याला मेलेल्या घाड्याच्या तपासणीच्या कामावर नेमण्यात आले.

मुझफर हुसेन यास पेनुकोंड्याची (बलकोंडा?) किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली.

**सात जून १७०३**

बक्षिंदाबक्ष (सिंहगड) फत्तेझाल्याबद्दल माळव्याचा सुभेदार शाइस्तेखान (मोठ्या शाईस्ते खानाचा मुलगा) याने अभिष्ट चिंतनाचा विनंती अर्ज आणि दोनशे अश्रफ्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. शाही अंतःपुरातील चीठ्ठीनवीस (चिटणीस) फातिमाखानम हिंची कारकून (पेशदस्त) हफीजाबानू ही तळावरून (बहादूरगडच्या) हुजुरात आली आणि बादशहाना भेटली. तिला एक शाल बक्षीस म्हणून देण्यात आली. बक्षी मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान यांच्या विनंतीप्रमाणे बऱ्हाणपूर सुभ्याच्या दागेतसीह (घोड्यांना डाग देणे व तपासणी करणे) या अधिकारावर मीर मेहदी याचा मुलगा मीर रजी याची नेमणूक करण्यात आली.

**नऊ जून १७०३**

कालरात्री बक्षी रूहुल्लाखान हा बादशहांना एकांतात भेटला. त्याने बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती केली. राजा उत्तमराम हा गाजी उद्दीनखान बहादूरच्या फौजेतून हुजुरात आला आहे. तो विजापूरचा सुबेदार चीनकुलीज खान याजपाशी तैनात झाला आहे. पण त्याची आर्थिक परिस्थिती चांगली नाही, तो म्हणतो की, आपल्याला एक वर्षासाठी स्वदेशी जाण्याची रजा पाहिजे. म्हणजे मी पथके पुन्हा तयार करुन घेवून येईन. बादशहाने विनंती मान्य केली.

**एकोणवीस सप्टेंबर १७०३**

इज्ज़तखान यास चिंचोळी (जिल्हा गुलबर्गा, कर्नाटक) ची ठाणेदारी देण्यात आली.

अमानुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली.—गनिमांच्या (मराठ्यांच्या) तर्फे तुकोजी हा तिकोणा किल्लेदार होता. तो किल्ला आपल्या ताब्यात आला आहे. हुजुराची चाकरी करावी म्हणून मी तुकोजीला घेऊन आलो आहे. बादशहाने आज्ञा केली कीं, त्याला (तुकोजीला) हुजुरात आणावे. तुकोजीचे हात बांधण्यात आले. तो बादशहासमोर आला. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे दिली. बादशहाने आज्ञा केली की, यापुढें तिकोणा किल्लयाचा उल्लेख अमानगड म्हणून करण्यात यावा.

**टीप.**——या पुढील नोंदी डिसेंबर महिन्याच्या आहेत.

## अठ्ठावीस डिसेंबर १७०३

आज बादशहा तख्तेखाँवर बसून सकाळी एक प्रहर दोन घटिका झाल्या असता निघाले आणि पावनेतीन कोसाची मजल मारुन (राजगडच्या वाटेवर) ते शिवगावला पोहोचले. फकरुल्लाखान यांस राजा मुहंमदशहा गुर्जबर्दार याने सुबे हैद्राबादेतून हुजुरात आणले. निकताहखान याजकडे अहमदनगरच्या रक्षणाचे काम देण्यात आले. त्याला तेराशे स्वाराची मनसब होती. सय्यद हुसेन यास अलवन्त (अहिवन्त?) ची किल्लेदारी देण्यात आली. इन्दापूरच्या ठाण्यावर तैनात असलेला अबदुल्ला हा बादशहा स्वारीत असताना त्यांना भेटला. त्याला बक्षीस म्हणून चार मोहरा देण्यात आल्या.

## एकोणतीस डिसेंबर १७०३

आज बादशहा दीड कोसाची मजल मारुन मौजे हाकणग व येथे पोहोचले मरहूम दिलेरखान याचा मुलगा दिल्दारखान हा मरण पावला. त्याबद्दल शोक चिन्ह (मातमी) म्हणून अजीजखान यास बालाबन्द देण्यात आला.

## तीस डिसेंबर १७०३

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार शिद्दी याकूबखान याने स्वरुपगडचा किल्ला जिंकून घेतला होता. त्याने सोन्याच्या किल्ल्या बादशहाकडे पाठविल्या, त्या त्यांच्या नजरेखालून गेल्या

## एकतीस डिसेंबर १७०३

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १ जानेवारी इ. स. १७०४ ते ११ फेब्रुवारी १७०४

### एक जानेवारी १७०४

कालरात्री बादशहाना कळविण्यात आले की, बाजारात धान्याचा भाव एक रुपयाला दोन शेर झाला. (ही महर्गता पाहून) बादशहाने बाजाराचा अधिकारी (करोडी) मस्त अलीखान याला त्या जागेवरून बदलले आणि इनायतत्तुल्लाखान याचा कारकून (पेशदस्त) शेख सादुल्ला यास नेमले.

शेख जानमुहंमद याचा मुलगा शेख हबीबुल्ला यास नुस्रताबाद ऊर्फ सगर या स्थळाचा (गुलबर्गा जिल्हा, कर्नाटक) बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. त्याला आपल्या स्थळाकडे जाण्यास निरोप देण्यात आला. अलीनकी हा मरहुम शम्सुद्दीन मुहम्मदखान याचा आप्त होता. त्याला अष्ट्याची ठाणेदारी देण्यात आली.

आदील खानाचा मुलगा अब्दुल कय्युम हा शहाजादा मुअज्रम याच्याकडे होता. दोन वर्षापासून त्याने हुजुरात यावे असे त्याला सांगण्यात येत होते. पण तो आला नाही, हे बादशहाला कळविण्यात आले. त्याला निक्षून ताकीद करण्यात यावी, अशी बादशहाने आज्ञा केली.

शहाजादा मुहम्मद बेदारबख्त याचा दिवाण मिरखान हा होता. त्याला बऱ्हाणपूरवर सुबेदार बेदारबख्त याच्यातर्फे नायक म्हणून नेमण्यात आले. त्याची मुले मिरहामिद वगैरे याना मनसबी देण्यात आल्या. मिरअब्दुलसलाम यास बागलाण्याचा फौजदार नजाबतखान याजपाशी तैनात करण्यात आले.

### दोन जानेवारी १७०४

आज दिवाण (कचेरी) चे काम बंद ठेवण्यात आले होते.

### तीन जानेवारी १७०४

आज दिवाण (कचेरी) चे काम बंद ठेवण्यात आले होते.

### चार जानेवारी १७०४

हैद्राबाद कर्नाटकचा फौजदार आणि खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याचा नायब (डेप्युटी) दाऊदखान याच्या नावे आज्ञापत्र पाठविण्यात आले.

बागलाण्याचा फौजदार आणि सुरतबंदरचा मुत्सदी (कारभारी) नजाबतखान याचा विनंती अर्ज आला, तो बादशहाने नजरेखालून घातला.

**पाच जानेवारी १७०४**

मुलतानचा सुभेदार शहाजादा मुइजुद्दीन याने चोवीस शेर डाळिंबे पाठविली. ती पाहून बादशहाना मोठा संतोष झाला. बादशहाचा मुलगा आणि अहमदाबादचा सुभेदार मुहम्मद आजम् याने डाळिंबाच्या १५ करंड्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

तोफखान्याचा प्रमुख (मीर आतिष) तरबीयतखान हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे राजगड किल्ल्यासमोरील मोर्च्यातून येऊन बादशहाना भेटला. बादशहानी त्याच्याकडे वेढ्याच्या परिस्थितीची चौकशी केली.

खान नुस्रतजंग याच्या तोफखान्याचा अधिकारी रूस्तुमबेगखान हा येऊन बादशहाला भेटला. त्याला बढती देण्यात येऊन परत जाण्यास निरोप देण्यात आला. फतेहाबाद ऊर्फ धारुर (बीड जिल्हा, मराठवाडा) येथील किल्लेदार उजबेकखान याला काही अटींवर मनसब होती. मनसबीतून तीस स्वार कमी करण्यात आले. रणथंबोरचा बदललेला किल्लेदार व फौजदार हातमखान याला हजुरात बोलावून घेण्यात आले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—सटवाजी दफळे (जत, जिल्हा सांगली) आणि जानोजी वगैरेंची पथके मिळून चार हजार एकतीस स्वार होत होते. ही मंडळी (सटवाजी, जानोजी वगैरे) खानफिरोजजंग (वऱ्हाड आणि नांदेडचा सुभेदार) यांजपाशी तैनात होती. आता त्यांना विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान यांजपाशी तैनात करण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

खान फिरोजजंगने लिहून पाठविले की, "मी दुष्ट शत्रुंचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यात गुंतलो आहे पण मुनवरखान हा आपल्या जहागिरीत काही काम न करता बसून राहिला आहे. माझ्यापाशी येऊन बादशाही कामगिरीत भाग घ्यावा अशी त्याची इच्छा आहे." बादशहाने विनंती मान्य केली.

**सहा जानेवारी १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सात जानेवारी १७०४**

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली.—"शत्रूंचे सैनिक (मराठे) हे काल रात्री राजगड किल्ल्याच्या बाहेर आले ते एका टेकडीच्या आसऱ्याने उभे राहिले. येथून त्याने मनसूरखान व बख्शीरुहुल्लाखान यांच्या पथकावर बाण (रॉकेट) फेकण्यास सुरुवात केली. या सुमारास बादशाही सैनिक तेथे पोहोचले. हे पाहून शत्रूचे सैनिक तेथून किल्ल्यात पळून गेले." बादशहाने आज्ञा केली की, त्या टेकडीवर एक ठाणे कायम करण्यात यावे.

अनुक्रमणिका

हरकाऱ्याच्या तोंडून पुढील हकीकत कळली.—“वऱ्हाडचा सुभेदार खान फिरोजजंग याचा नायब (डेप्युटी) म्हणून रुस्तुमखान विजापुरी हा वऱ्हाडात काम करीत होता. त्याला मराठ्यांनी कैद केले होते. तो आता त्याच्या कैदेतून सुटून आला असून बाळापूर (वऱ्हाड) येथे आपल्या जहागिरीत पोहोचला आहे.” बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली—“मुहम्मद अमीनखान बहादूर याने रुस्तुमखानाच्या परिस्थितीसंबंधी चौकशी करुन अर्ज सादर करावा.

सुलतानपूर नंदूरबारचा बख्शी व वाकेनवीस मुहम्मद अशरफ यास जोनपूरवर नेमण्यात आले.

खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याला दक्षिणच्या सुभ्यात जहागीर देण्यात यावी, अशी आज्ञा करण्यात आली.

जुल्फीकारखान यास हैद्राबाद-कर्नाटकची फौजदारी होती. त्याला सहा हजार जात आणि सहा हजार स्वार अशी मनसब होती. त्यापैकी दोन हजार स्वार हे दुघोडी होते. त्यापैकी एक हजार स्वार आणि शीवबंदीबाबत दहा लक्ष होन हे हैद्राबाद-कर्नाटकाच्या फौजेदारीसंबंधी होते. मनसबीच्या अटी सैल करण्यात येऊन जुल्फीकारखानाचे उत्पन्न वाढविण्यात आले.

**आठ जानेवारी १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**नऊ जानेवारी १७०४**

इरादतुल्लाखान याचा मुलगा हिदायततुल्ला (इरादतखानाची आत्या ही औरंगजेबाची भावजय, इरादतखानाचे आत्मचरित्र्य प्रसिद्ध आहे.) हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे गुलबर्गाहून हुजुरात आला. त्याला खिलतीची वस्त्रे दिली. बादशाही बरकंदाजाचा (बंदूकजी) अधिकारी मुहम्मद आकिल हा मरण पावला त्या जागेवर राजगड किल्ल्यासमोरील मोर्चाचा बख्शी व वाकेनवीस शफीखान याची नेमणूक करण्यात आली.

पवनार (जिल्हा वर्धा) चा फौजदार मुहम्मद मुरादखान याच्या शिफारशीवरून भागपूरचा देशमुख भीकनराव याला पाचशे जात आणि शंभर स्वार अशी मनसब देण्यात आली होती. तीत आता वाढ करण्यात येऊन त्याला सातशे जात आणि चारशे स्वार अशी मनसब देण्यात आली. मरहूम फत्तेजंगखान याचा मुलगा नुस्रत याची मनसब वाढविण्यात आली.

खाने आलम् याचा भाऊ मुनव्वर खान (संभाजी राजाना पकडणारा मुकर्रखान याचा मुलगा) हा औरंगाबादचे सुभेदार शहाजादे बेदारबख्त (औरंगजेबाचा नातू) याजपाशी तैनात होता. त्याला खान फिरोजजंग याच्या सैन्यात तैनात करण्यात आले होते. पण तो हुकुम रद्द करण्यात येऊन त्याने पूर्वीप्रमाणे बेदारबख्तपाशी तैनात रहावे, अशी आज्ञा करण्यात आली.

अनुक्रमणिका

देऊळघाटाचा फौजदार नस्रुद्दिनखान याने विनंती अर्ज पाठविला की, "मला सेलगावची पण फौजदारी देण्यात आली आहे पण मनसब वाढविण्यात आली नाही, कृपा व्हावी." विनंती मान्य करण्यात आली.

सिंकदरचा मुलगा नेमत हा खान नुस्रतजंग याच्या फौजेत तैनात होता. नुस्रतजंगच्या (जुल्फिकारखान) विनंतीवरुन नेमतला जिंजी ऊर्फ नुस्रतगडच्या इलाख्यात असलेल्या जगदेवगड किल्ल्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

**दहा जानेवारी १७०४**

बागलाण्याचा फौजदार आणि सुरत बंदरचा मुत्सद्दी नजाबतखान याने विनंती लिहून पाठविली की, बादशाही कामाशिवाय मी दुसरे काम करीत नाही. विनंती करुन मी ज्या मागण्या मांडल्या आहेत या बादशाही दफ्तरातून लवकर मान्य व्हाव्या आणि माझ्या नेमणुकीच्या सनदा लवकर पाठविण्यासंबंधी यार अलिबेग यास आज्ञा व्हावी.

**अकरा जानेवारी १७०४**

सुभे माळव्यातील हकिकतीवरून पुढीलप्रमाणे कळले.—"माळव्याच्या सुभेदाराचे असे म्हणणे आहे की, बंडखोराचे पारिपत्य आणि जमिनदारांचा बंदोबस्त वगैरे करण्यासाठी मी उज्जैयनीवरून नर्मदेकडे आलो. माझ्याबरोबर इस्लामखान, आज्ञमकुलीखान वगैरे फौजदार आणि इतर जमिनदार आहेत पण कालिबागचा फौजदार शेर अफगनखान हा आपले निम्मे पथक घेऊन ये म्हणून लिहिले असूनही अद्याप आला नाही." बादशहानी आज्ञा केली की, शेर अफगनखानाला ताकिद पत्र लिहिण्यात यावे. बादशहाला कळविण्यात आले की, नामगीर उर्फ बांधगिरीचा किल्लेदार अंकोजी हा जागेवर हजर नाही. बादशहाने आज्ञा केली की, याची जहागीर काढून घेण्यात यावी.

आदिलाबाद (एदलाबाद, जिल्हा जळगाव) चा फौजदार अब्दुलवाहादखान यांस जामनेरचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. गुलशनाबाद (नाशिक) चा सवानेहनिगार (बातम्या लिहून पाठविणारा) सय्यदखान मुहम्मद याने विनंती अर्ज लिहून पाठविला की, आज्ञा झाल्यास माझ्या मुलाला येथे ठेऊन मी हुजुरात येतो. माझे उत्पन्न अगदी थोडे आणि कुटुंब मोठे आहे. विनंती मान्य करण्यात आली.

कल्याण-भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला.—"आवजी ओबळराव याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब आहे. त्याला इकडील प्रदेशाची चांगलीच माहिती आहे. राजमाची तालुक्यातील नजरापूर येथील ठाणेदारी आणि खर्चासाठी म्हणून त्याला दोन हजार रुपये देण्यात यावे. विनंती मान्य होईल, अशी तो आश्या बाळगून आहे." बादशहाने आज्ञा केली की, "विनंती मान्य करता येत नाही. त्याने (आवजी) अमानुल्लाखानाकडे जावे.

**बारा जानेवारी १७०४**

अनुक्रमणिका

सुलतान अलीखान याचा मुलगा मेहदीखान याला राजगड किल्ल्याभोवतीच्या परिसराच्या ठाणेदारीवर नेमण्यात येऊन तिकडे पाठविण्यात आले. येतीबारखान हा सुरतबंदरावर कारभारी होता. त्याला तेथून वगळण्यात आले. त्याने काही वस्तू (बंदुका वगैरे) भेटीदाखल पाठविल्या त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकुबखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले— “शेरामगड किल्ला हा आपल्या (मोगलांच्या) ताब्यात आला आहे. विनंती अशी की, तेथे सिद्दी अंबर याला किल्लेदार म्हणून नेमण्यात यावे.” विनंती मान्य करण्यात येऊन सिद्दी अंबरला दोनशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब देण्यात आली.

राजगड किल्ल्याचा नकाशा बादशहानी नजरेखालून घातला.

**तेरा जानेवारी १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. अहमदाबादचा सुभेदार शहाजादा आजम् याने डाळिंबाच्या करंड्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

**चौदा जानेवारी १७०४**

काल रात्री बादशहाने बख्शीरुहुल्लाखान यांस पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—“तुम्ही उद्या राजगड किल्ल्याच्या पलीकडे असलेले मुहम्मद अमीनखान बहाद्दूर वगैरेंचे ठाणे पहाण्यासाठी जावे.” त्याप्रमाणे आज बख्शीरुहुल्लाखान हा सदर ठाण्यांची पहाणी करून आला.

बादशहाने आज्ञा केली की, दरवाजा (राजगड) च्या दिशेने असलेल्या ठाण्याचा ठाणेदार कामयाबखान याच्याबरोबर एक गुर्जबर्दार नेमण्यात यावा.

वऱ्हाडचा सुभेदारखान फिरोजजंग याचा नायब (डेप्युटी) रुस्तुमखान विजापूरी हा मराठ्यांच्या कैदेत सापडला होता. तो कैदेतून सुटून आला त्याला सात हजार जात आणि चार हजार स्वार अशी मनसब होती. त्याची एक हजार स्वारांनी कमी करण्यात आली.

**पंधरा जानेवारी १७०४**

बादशहा आज दुपारी न्यायकचेरीत (अदालत) आले. कचेरीत ते दोन घटका काम करीत होते. काल रात्री दिवाणाच्या कचेरीचा अधिकारी फत्ते दौलत याने बादशहांना पुढीलप्रमाणे कळविले.— “रामगडचा अमीन (महसूल अधिकारी) व फौजदार आणि दलपतचा मुलगा गजपत कंबू हा कैदेत आहे, तो विनंती करतो की, आपले अपराध माफ होत असतील तर, आणि आपल्यावरील हिशेब प्रकरणाचा खटला काढून घेण्यात येत असेल तर आपण मुसलमान होण्यास तयार आहोत.” बादशहाने आज्ञा केली गजपतला आपल्यासमोर आणण्यात यावे. त्याप्रमाणे आज त्याला हुजुरात आणण्यात आले. बादशहाने त्याला आपल्यासमोर बोलावून स्वतःच कलेमा (मुसलमानी धर्माचा मंत्र) तीन वेळा म्हणून तो उच्चारावयास

लावला. त्याचे पूर्वीचे नाव (गजपत) हे बदलून त्याचे नाव शेख अब्दुल करीम असे ठेवले. त्याला पूर्वी अडीचशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब होती. त्या मनसबीवरून त्याला बडतर्फ करण्यात आले होते. पण आता बादशहानी त्याला चारशे जात आणि शंभर स्वार अशी मनसब, खिलातीची वस्त्रे, एक घोडा, एक हत्ती ही दिली. बादशहान आज्ञा केली की, “त्याने (गजपत उर्फ शेख अब्दुल करीम) याने गुजरातचा सुभेदार शहाजादा मुहम्मद आजम यांजपाशी जावे, ते त्याला योग्य नोकरी देतील.”

सिरहिंदचा फौजदार वजीरखान याने विनंती अर्ज पाठविले ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

काल रात्री बख्शीरुहुल्लाखान आणि मतलबखान यांनी बादशहाकडे पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—“आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही मुहम्मद अमीनखान बहादूर यांच्या ठाण्याची पहाणी केली. मेहदीखान व कामयाबखान हे राजगडच्या दरवाज्याच्या दिशेने ठाणी बसवित आहेत.

माळव्याचा सुभेदार शाहिस्तेखान याला मांडवगडची पण फौजदारी देण्यात आली. तेथील पूर्वीचा फौजदार नवाजिशखान याला वगळण्यात आले.

हैद्राबाद-कर्नाटकच्या तोफखान्याचा अधिकारी मुहम्मद तकी याला गुर्रमकुंडाचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

अनोहीची (?) किल्लेदार शेख मुहम्मद वारला. त्याच्या जागेवर लायकसिंग याची नेमणूक करण्यात आली.

## शाहू राजे

शाहूराजे यांनी पुढीलप्रमाणे विनंती केली.—“(१) काही रत्ने व अलंकार देण्याची कृपा व्हावी. बादशहाने आज्ञा केली की, शाहुराजांना एक हजार रुपये देण्यात यावे, (२) नेवासा (अहमदनगर जिल्हा) चा परगणा माझ्याकडे जहागीर म्हणून आहे तो पूर्वीप्रमाणेच माझ्याकडे ती जहागीर बहाल ठेवण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

नुस्रताबाद ऊर्फ सगर (गुलबर्गा जिल्हा कर्नाटक) येथील बातम्यावरून पुढील हकिकत कळली—“वाकिण खेड्याचा जमिनदार पीडीआ (बेडर जमातीचा नेता पीडनाईक) याने आपला कारभारी शिवानमा (?) आणि त्याचा गुमास्ता यांना कैद केले आणि त्यांची घरे लुटली. त्यांच्या घरातून जवळ जवळ एक लाख पंचवीस हजार रुपयेची मालमत्ता सापडली.

## सोळा जानेवारी १७०४

राजगडच्या मोर्च्यात तरबियतखान हा होता. त्याला बादशहानी स्वतःची वस्त्रे बक्षिस म्हणून पाठविली. ती आपल्या सेवकास व हमीदुद्दीनखान बहाद्दुर यांस देऊन बादशहा त्यांना म्हणाले—“ही वस्त्रे तरबियतखान हा मोर्च्यात आहे त्याच्याकडे (वस्त्रे) नेऊन द्या त्याचबरोबर मोर्चाची पहाणी करून या.” त्याप्रमाणे करण्यात आले. त्यांनी मोर्च्यातील परिस्थितीची माहिती बादशहाना कळविली.

अनुक्रमणिका

## सतरा जानेवारी १७०४

ऐवजखान हा खान फिरोजजंगाच्या फौजेत तैनात होता. त्यांची मनसब वाढविण्यात आली.

## अठरा जानेवारी १७०४

हमीदुद्दीनखान बहाद्दूर याने लाकडांच्या फळीवर राजगड किल्ल्याचा नकाशा काढला होता. दिवाण (कचेरी) सुरू होण्यापूर्वी त्याने तो नकाशा बादशहाना दाखविला. बादशहाने नकाशा पाहिला. बादशहाने आज्ञा केली की, छावणी आणि किल्ल्यासमोरील अमिरउल्उमरा व इतर यांची ठाणी यांच्यामधील भागात पुढीलप्रमाणे तोफखान्याचा सरंजाम देण्यात यावा.– (१) हशम (पायदळ) २५०, (२) बेलदार ६०, (३) शिलेदार १०० स्वार, (४) पाणी वहाणारे १०, (५) दारुगोळा २२ शेर.

अहमदबेग याला बेलूर (अलूरही असू शकेल) किल्ल्याच्या तोफखान्याचा व हशमाचा दारोगा म्हणून नेमण्यात आले. शिरवळ आणि पाइन विलायत (वाईच्या अलिकडे) मधील भागाचा ठाणेदार ख्वाजाखान हा होता. त्याची मनसब कमी करण्यात आली.

## एकोणवीस जानेवारी १७०४

सुरतबंदराचा कारभारी नजाबतखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—येथून बदललेला पूर्वीचा कारभारी येतीबारखान येथेच बसून आहे. आणि लोकांना बहकावीत आहे. मुद्दाम मनुष्य पाठवून त्याला हुजुरात बोलावून घ्यावे. त्याप्रमाणे बादशहाने आज्ञा केली.

औरंगाबादवरुन केशवराम हरकारा याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—“बऱ्हाणपूरचा नायब सुभेदार म्हणून मिरअहमदखान याची नेमणूक झाली. तो बऱ्हाणपूरला जात होता. वाटेत चोरांनी त्यांच्यावर हल्ला केला. (म्हणजे मराठ्यांनी) अहमदखान यांनी त्याचे पारिपत्य केले. दहा घोडी पकडण्यात आली. चार माणसे मारली गेली व दोन पकडले गेले.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—“जमनावंजारी हा धान्यांची रसद घेऊन बादशाही छावणीपासून सात कोसावर असलेल्या घाटाखाली आला आहे. पण शत्रूच्या (मराठ्यांच्या) उपद्रवामुळे तो ती रसद छावणीत आणू शकत नाही. बादशहाने आज्ञा केली की, मुहम्मद बाकर नजीबयसावल व राजगडच्या पायथ्याचा ठाणेदार यासिमखान यांना धान्याची रसद आणण्यासाठी पाठविण्यात यावे, मनसूलखान आणि आमनुल्लाखान यांनी आपापल्या ठाण्याबद्दल खबरदारी बाळगावी.

बादशहाने डाळिंबाच्या दोन करंड्या नवाब जीनत्तुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी ही बहादूरगडला होती) हिच्याकडे पाठविल्या.

## वीस जानेवारी १७०४

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते.

### एकवीस जानेवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

### बावीस जानेवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

### तेवीस जानेवारी १७०४

औरंगाबादेत असलेल्या बेगमपुरा या भागाच्या अधिकाराच्या (दारोगा) जागेवर शुतरखाना (उंटांचे खाते) चा अधिकारी खिदमत्गुजारखान याची नेमणूक करण्यात आली. शहाजादा बेदारबख्त (औरंगाबादेचा सुभेदार) याच्या नावे आज्ञापत्रे पाठविण्यात आली. मरहूम (दिवंगत) बक्षी महरामंदखान याचा नातू (मुलीचा मुलगा) तकीखान याचे लग्न शाहिस्ताखान (माळव्याचा सुभेदार) याच्या मुलीशी करण्याचे ठरले. शाहिस्तेखानाची बायको औरंगाबादेत होती. तिच्याकडे तिच्या मुलीसाठी अलंकार पाठविण्यासाठी माणसे नेमण्याची आज्ञा झाली. तकीखान याला विवाहखर्चासाठी औरंगाबादच्या खजिन्यातून दोन हजार रुपये देण्यात यावेत, अशी आज्ञा झाली.

अष्टे येथील ठाणेदार आणि मरहूम शमशुद्दिन मुहम्मदखान याचा भाचा मुहम्मद तकी याच्या विनंतीवरुन अलीरजा (बहुधा मुहम्मद तकीचा मुलगा) याला नव्याने मनसब देण्यात आली.

बहमनजादा येथील ठाणेदार मुहम्मद हुसेन याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.—“चोर (मराठे) या भागात घुसले होते. मी त्यांचा प्रतिकार केला. चकमकी झाल्या. शत्रूंपैकी अनेक जण जखमी झाले. त्यांचा पराजय झाला. चार घोडे आमच्या हाती सापडले. या भागातील फौजदारांना आज्ञा आहे की, कामाच्या वेळी त्यांनी माझ्याशी सहकार्य करावे. बादशहानी आज्ञा केली की, “ज्याने सहकार्य केले नाही अशा फौजदारांना ताकीद देण्यात यावी.”

### चोवीस जानेवारी १७०४

काल रात्री बादशहाने बख्शी रुहुल्लाखान, हमीदुद्दिनखान, आणि मतलबखान यांना आज्ञा केली की, “तुम्ही जाऊन मनसुरखान, अमानुल्लाखान व मुहम्मद अमीनखान यांची ठाणी (राजगड किल्ल्याभोवती) पहावी. त्याप्रमाणे ते आज ती ठाणी पाहून आले.

मुघलखान याच्या बरोबर अहदीयानचा (शिलेदार) यांच्या तनबख्शी (पगार वाटणारा अधिकारी) बाकरखान हा औरंगाबादेस हत्तीखाना पाहण्यासाठी गेला होता. ते काम करुन तो येऊन बादशहाला भेटला. त्याला धनुष्यबाण बक्षिस म्हणून देण्यात आले.

अनुक्रमणिका

शहाजादा कामबख्शाच्या मुलाचा बख्शी मुसाहिबखान हा बंडखोर धना (धनाजी जाधव) याच्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

मरहूम ऐजखान याचा नातू शमशेर बेग, काजी अकरम (बादशाही छावणीचा मुख्य काजी) धर्मशास्त्राचा पंडित म्हणून फाजिलखान इत्यादिंना बादशहानी आपल्यापाशी बोलाविले. नरकवासी रामा (राजाराम महाराज) याच्या मुलीचे लग्न शमशीर बेग यांजबरोबर लावून देण्याचे बादशहाने ठरविले होते. बादशहाने काजी अकरमला म्हटले, "तुम्ही शमशेरबेगचा निकाह पढवा आणि वधूसाठी दहा हजार रुपयेचा मिहर ठरवा. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे करण्यात आले. शमशेरबेग यांस बादशहानी खिलातीची वस्त्रे आणि तीन रत्नजडित अंगठ्या या वस्तू दिल्या आणि त्याने शमशेरबेगला म्हटले. "इदुलफित्रचा सण पार पडल्यावर तुम्ही आपल्या बायकोला (राजारामच्या मुलीला) महालातून (बादशहाच्या निवासस्थानाच्या अंतःपुरातून) आपल्या तंबूकडे घेऊन जा." शमशेरबेगने यावर बादशहाला मुजरे केले.

फरासखान्याचे कर्मचारी मोठ्या त्रासात होते. त्यांना अर्ध्या महिन्याचा पगार देण्यात यावा, अशी आज्ञा झाली. पुढील मंडळींना बादशहानी फळफळावळे पाठवून कृपा केली.—(१) इनायतत्तुल्लाखान, (२) तहब्बूरखान, (३) मरहमतखान, (४) मोतिमदखान, (५) अब्दुलरहिमखान, (६) तुर्कताजखान, (६) मुहम्मद अमीनखान बहाद्दूर, (८) सरबराहखान आणि (९) रशिदखान.

यासिनखान हा धान्यांची रसद आणण्यासाठी गेला होता. बादशहाने आज्ञा केली की, "मीर तुजक (शिष्टाचार खात्याचा अधिकारी) इरादतखान याने यासिनखानाकडे तोफखान्याचा सरंजाम पोहचवावा. तो पुढीलप्रमाणे——दारुगोळा ९ मण (सरब बारुत) बाण पन्नास, कुऱ्हाडी चालविणारे शंभर इसम. बंदुकजी १०० इसम.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—"कानोजी हा गुलशनाबाद (नाशिक) येथे तैनात होता. त्याला दीड हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब होती. तो वारला. मरहूम फौजदारखान याचा मुलगा मुहम्मद मुकीम हा आग्रा सुभ्यातील एका परगण्यास जमिनदार होता. (लौह परगणा) त्याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला—मला जहागीर वगैरे काही नाही. मी माझ्या परगण्यातून हुजुरात आलो. बादशाही कारभाऱ्यांनी मला बख्शिसद्दद्दिन मुहम्मद खान याच्या फौजेत तैनात केले. माझी आर्थिक परिस्थिती चांगली नाही. विनंती अशी की, "मला जहागीर मिळेपर्यंत मला बख्शीच्या तैनातीतून काढून हुजुरानी आपल्याकडे घ्यावे." विनंती मान्य करण्यात आली. त्याची मनसब वाढविण्यात आली. सय्यद वजीहुद्दिनखान याच्या वकिलाने बादशहांना पुढीलप्रमाणे विनंती केली.—"वजीहुद्दिन याने देशी जाण्यासाठी चार महिन्याची रजा घेतली होती. परत येण्यास त्याला उशिर लागला. त्याची जहागीर काढून घेण्यात आली आणि त्याने हुजुरात यावे अशी आज्ञा करण्यात आली. त्याची विनंती आहे की, आपली जहागीर बहाल करण्यात यावी. काही अटींवर ती बहाल करण्यात आली.

**पंचवीस जानेवारी १७०४**

आज दिवाण बंद ठेवण्यात आले होते. मुलतानचा सुभेदार शहाजादा मुइजुद्दिन याने डाळिंबाच्या करंड्या पाठविल्या होत्या. त्या पाहून बादशहा खूष झाले. काल राजा नेकनाम (नागपूरचा गोंड राजा) याने बादशहाला विनंती केली की,—"नरकवासी रामा (राजाराम महाराज) याच्या मुलीशी माझे लग्न होत

आहे. आज्ञा असल्यास माझ्या इथे दोन दिवस नौबती वाजविण्यात येतील. परवानगी द्यावी," विनंती मान्य करण्यात आली. काल रात्री बादशहाने राजा किशनसिंग याची बायको व राजा नेकनाम याची आई इस्लामबाई हिला बोलाविले तिला एक शाल बक्षीस म्हणून देण्यात आली, नंतर तिला आपल्या तंबूकडे परत जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

सुरतेच्या बातम्यावरुन कळले की, तेथील किल्लेदार तालीबखान हा मरण पावला. त्याच्या जागेवर त्याच्या भावाची नेमणूक करण्यात आली.

भास्करराव हरकारा (बातम्या लिहून पाठविणारा) याला दोनशे पन्नासची मनसब होती. तो औरंगाबाद येथे तैनात होता. तो मरण पावला. बादशहानी त्याच्या मुलांना बोलावू पाठविले. त्यापैकी किशनराव याची हरकाऱ्याच्या कामावर नेमणूक करण्यात आली आणि शंकरराज याची मनसब वाढविण्यात आली.

**सत्तावीस जानेवारी १७०४**

आज इदुलफित्र (रमझानचा सण). बादशहा आज नमाज पडले आणि दिवाण-ए-खासमध्ये आले. शहाजादा कामबक्ष याने येऊन बादशहाला मुजरा केला. त्याप्रमाणे मुख्य प्रधान अनिरुल् उमरा (असदखान) याने बादशहाला मुजरा करून त्याचे अभिष्टचिंतन केले. बादशहाने त्याला फळफळावळे भेट म्हणून देऊन त्याला आपल्या तंबूकडे परत जाण्यास निरोप दिला.

मतलबखान अभिष्टचिंतनासाठी आला आहे. असे बादशहांना कळविण्यात आले. बादशहा म्हणाले, "त्याला म्हणावे, तुझा मुजरा पोहोचला तू आपल्या डेऱ्याकडे परत जा."

पुढील मंडळींनी रमजानच्या सणानिमित्त अभिनंदन आणि भेटी पाठविल्या होत्या. त्या बादशहाला मिळाल्या.—(१) मुहम्मद आजम (औरंगजेबाचा मुलगा आणि गुजरातचा सुभेदार), (२) शहाजादा वालाजाह (आजमचा मुलगा), (३) जहांजेबबानू बेगम (आजमची बायको, दाराशुकोची मुलगी आणि औरंगजेबची सून).

काल रात्री राजा नेकनाम याने नरकवासी रामा (राजाराम महाराज), याच्या मुलीशी लग्न ठरविले. तो बादशहाच्या हुजुरात आला. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे, सजवलेला घोडा, एक हजार रुपये किंमतीच्या ह्या वस्तू बक्षीस दिल्या.

बादशहा हे हमीदुद्दिन खान यास म्हणाले, "राजा नेकनामला मोत्याची मुंडावळ (सेहरा) बांधा." त्याप्रमाणे करण्यात आले. यानंतर बादशहाने काजी मुहम्मद अकरमखान आणि फाजिलखान यांना बोलाविले आणि त्यांना म्हटले "तुम्ही निकाह पढवा." बादशहाने आज्ञा केली की, "नेकनाम आणि शमशिरबेग यांच्या बायका म्हणजे नरकवासी रामाच्या (राजाराम महाराज) मुली यांना प्रत्येकी दोन-दोन हजार रुपयांचे अलंकार देण्यात यावेत.

**अठ्ठावीस जानेवारी १७०४**

आज दिवाण बंद होते.

## एकोणतीस जानेवारी १७०४

ख्वाजा अब्दुललतिफ याला खान ही पदवी देण्यात आली. रुहुल्लाखान, मतलबखान, मुहम्मद अमीनखान बहादूर, सियादतखान आणि अब्दुल रहिमखान वगैरेनी इदुलफित्र सणाचे अभिष्टचिंतन म्हणून मुजरे केले. हमीदुद्दीनखान बहादूर याने बादशहाच्या आज्ञेप्रमाणे खान फिरोजजंग याच्या पाग्यातून दोन घोडे दाखविण्यासाठी म्हणून बादशहाकडे आणले. त्यांची किंमत ५०० मोहरा होती. बादशहानी त्याची किंमत चार हजार रुपये ठरविली. बादशहानी त्या घोड्याचे नाव बादशहापसंद असे दिले.

हमीदुद्दिनखान बहादूर याने पुढीलप्रमाणे विनंती केली.——“सुरतबंदराचा बदललेला कारभारी एतिबारखान याने सरकारसाठी चाळीस घोडे विकत घेतले आहेत आणि ते अबुल कासीम याच्याबरोबर पाठविले होते.” घोडे आणित असता वाटेत चोरांनी (मराठ्यांनी) त्याचा एक घोडा आणि एक सरकारी घोडा पळविला. बाकीचे घोडे छावणीत आणण्यात आले. बादशहाने ते नजरेखालून घातले. बादशहानी आज्ञा केली की, त्यापैकी नवाजिश नावाचा एक इराकी घोडा याला (अबुल कासीम) देण्यात यावा.

काल यारअलिबेग याने राजा जयसिंग (जयपूरचा सवाई जयसिंग) याचा बेदारबख्ताच्या फौजेतून अर्ज आलेला बादशहापुढे ठेवला. अर्जात राजा जयसिंगने म्हटले होते, माझ्या मनसबीत पाचशेची कमी करण्यात आली होती. मी सरकार सेवेत मनःपूर्वक कामगिरी बजावित आहे. माझी मनसब बहाल करण्यात यावी.

यारअलिबेग याने दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकुतखान याचा विनंतीअर्ज बादशहाकडे पाठविला. सिद्दि याकुतखानाने पुढीलप्रमाणे लिहिले होते——“राजगडच्या वेढ्यात काम करण्यासाठी मी सिद्दी अंबर याला दोनशे स्वार आणि पायदळ सैनिक देऊन पाठवावे, अशी आज्ञा झाली. माझ्यापाशी असलेल्या पथकापैकी एक हजार शिपायांचे पथक हे बादशाही छावणीत धान्यांची रसद पोचवण्याच्या कामगिरीवर आहे. उरलेले पथक ठिकठिकाणी पसरलेल्या शत्रूंच्या (मराठ्यांच्या) पारिपत्याच्या कामावर आहे. सिद्दी अंबर हा ठाण्यावर (निरनिराळ्या सरकारी ठाण्यातून) सरकारी कामगिरी बजावित आहे. त्याला मी बोलावू पाठविले आहे. तो येताच मी हुजुरात पाठवीन. बादशहाने आज्ञा केली की, रुहुल्लाखानाने सिद्दी याकूतखानाला ताकीद पत्र लिहावे की, त्याने सिद्दी अंबरला लवकर पाठवावे. बादशहाने आज्ञा केली की, “बऱ्हाणपूर सुभ्याचा बख्शी व वाकेनवीस मुहम्मद हासिम यांना बदलण्यात यावे आणि त्याच्या ऐवजी इतर कोणाची तरी नेमणूक करण्यात यावी.

## तीस जानेवारी १७०४

दंडराजपूरीचा (जंजिरा) किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याने कलिंगडाच्या दहा करंड्या पाठविल्या होत्या त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

शहाजादा बेदारबख्त याने बख्शी रुहुल्लाखान यांस पुढीलप्रमाणे पत्र लिहिले—“निगुनबख्त (नागपूरचा बंडखोर गोंड राजा) याचा एक सरदार सय्यद अब्दुल कादर याला आपल्याकडे वळविण्यासाठी त्याच्यासाठी पाचशे जात व दीडशे स्वार अशा मनसबीची शिफारस केली आहे बादशहाकडून ती मान्य करवून घेऊन सनदा लवकर पाठवाव्या. म्हणजे त्याचे समाधान होईल. बादशहाने विनंती मान्य केली. शेख मुहम्मद अरबचा मुलगा शेख अहमद याला सुरत येथील घोड्यांच्या पाग्याचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले. बादशहा त्याला म्हणाले “तुला वाटल्यास तुझ्या मुलाला तू घोडे विकत घेण्यासाठी अरबस्थानात पाठीव. बऱ्हाणपूरचा बदललेला बख्शी मुहम्मद हाशिम याला हुजुरात बोलावण्यात आले.

### एकतीस जानेवारी १७०४

दिवाणचे काम बंद होते.

### एक फेब्रुवारी १७०४

आज दिवसाचे एक प्रहर आणि चार घटका झाल्या असता बादशहा न्याय कचेरीत (अदालत) आले. यासीमखान याचा मुलगा अब्दुर्‌ऊफ हा बादशहांना येऊन भेटला. मुहम्मदाबाद उर्फ बनारस (वाराणसी) येथील बदलेलेला कोतवाल (प्रमुख पोलिस अधिकारी) कुलीजबेग हा येऊन बादशहांना भेटला.

मरहूम मुहम्मद बेगखान याचा मुलगा अमानुल्ला याला सोनगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. बादशहाला कळविण्यात आले की, ख्वाजा अब्दुल लतिफ याला खान ही पदवी देण्यात आली आहे. पण रणदुल्लाखानाचा भाऊ हा पण लतिफ खान आहे, त्यालाही खान ही पदवी आहे. दोन नावांचा घोटाळा होण्याचा संभव आहे. बादशहाने आज्ञा केली की, ख्वाजा अब्दुल लतिफ याची पदवी बदलून त्याला लुत्फुल्लाखान असे संबोधण्यात यावे.

### दोन फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाने मनसूरखान याजकडे दोन आणि अमानुल्लाबेगखान यांजकडे एक अशी डाळिंबे पाठविली.

### तीन फेब्रुवारी १७०४

तोफखान्याचा अधिकारी तरबियतखान हा बादशहाच्या आज्ञेने राजगड किल्ल्यासमोरील मोर्च्यातून हुजुरात आला. त्याने मोर्चातील वस्तुस्थितीची माहिती बादशहाना करून दिली. सिद्दी याकूतखान याने बिसरामचा किल्ला जिंकून घेतला होता. त्यावर किल्लेदार म्हणून मरहूम चंदरखान याचा मुलगा मुहम्मद हुसेन याची नेमणूक करण्यात आली.

अनुक्रमणिका

मुहम्मद मुरादखान (इतिहासकार, खाफिखान याचा मित्र) याचा भाचा सुलतान हुसेन याची मनसब वाढविण्यात आली. इस्लामगड (रामगड) चा माजी जमिनदार गोपाळसिंग याची मनसब वाढविण्यात आली. तरबियतखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली––"माझा कारभारी रामजी याने तोफखान्यातील इस्मानच्या पगारवाटपात काळजी घेतली आणि काटकसर केली. त्यामुळे जवळ जवळ लाख रुपये वाचले. त्याच्यावर कृपा व्हावी.बादशहाने त्याला दियानतराय ही पदवी दिली.

मांडवगड (धारजवळ) च्या किल्लेदारीवर नवाजीशखान याला पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले. शाहिस्ताखान (माळव्याचा सुभेदार) याजकडे हे काम पण देण्यात आले होते. ते रद्द करण्यात आले.

बादशहाने बख्शीरुहुल्लाखान यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"राजा भीम याचे भाऊ इंद्रसिंग वगैरे यांना गुजरातचा सुभेदार मुहम्मद आजम याच्या सैन्यातील तैनातीतून हुजुरात बोलावण्यात आले आहे. ते अद्याप पोहोचले नाहीत. कोठे आहेत न कळे. तुम्ही गुजरातचा सवानेहनिगार (वृत्तांत लिहून पाठवणारा) याला लिहा की, त्याने चौकशी करून काय हकिकत आहे, ती कळवावी वरील मंडळींची नांवे अशी— (१) इंद्रसिंग : दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब, (२) बहादूर सिंग : एक हजार जात व पाचशे स्वार, (३) दलसिंग : एक हजार जात व सातशे स्वार. वऱ्हाडच्या सुभ्यावर शेख ताज्रुद्दिन हा दिवाण होता. त्याच्या जागेवर अबुलफजल याची नेमणूक करण्यात आली.

## पाच फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

## सहा फेब्रुवारी १७०४

बादशहानी आज आंघोळ केली. दोन्ही दिवाणाचे काम आज बंद होते.

सिध्दूट (रायलसिमा, आंध्रप्रदेश) येथील किल्लेदार किशोरसिंग याचा अर्ज आला, तसेच पालीगड (जिल्हा रायगड) चा किल्लेदार सेनापत याचा अर्ज आला. बादशहानी हे दोन्ही अर्ज नजरेखालून घातले.

## सात फेब्रुवारी १७०४

बादशहाने आज न्यायकचेरी केली. रुस्तुमखानाच्या (वऱ्हाडचा नायक सुभेदार) अर्जात म्हटले होते––"नेमाजी शिंदे यांजबरोबर वऱ्हाड सुभ्यात झालेल्या युद्धांत माझा जावई मारला गेला तसेच दोन हजार स्वार मारले गेले. सुभ्याच्या हरकाऱ्याने माझ्याशी वैरभाव धरून विपरीत वृत्तांत पाठविला, आणि माझी कागाळी केली. माझा काही अपराध नसतांना माझ्या मनसबीतून एक हजार स्वार कमी करण्यात आले. माझ्यावर तीन लाख रुपयांचे देणे बसविण्यात आले. माझ्याकडे कारंजाचे परगणे आणि इतर महाल होते. त्यांचे उत्पन्न वर्षाला एक लक्ष पंच्याऐशी हजार रुपये होते. ते काढून घेण्यात आले. ते देणे देण्याच्या मोबदल्यात होते. याशिवाय एक लाख दाम वळते करून घेण्यात आले. माझी आर्थिक परिस्थिती कमालीची डबघाईची झाली आहे. माझी पुढीलप्रमाणे विनंती आहे :—"माझ्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी एक अमीन (अधिकारी) नेमण्यात यावा. माझ्या विनंतीचा निकाल लागेपर्यंत अमीनाने

माझ्यावरील सरकारी देण्याच्या मोबदल्यात माझी जहागीर बदलू नये व माझी मनसब पूर्वीप्रमाणे बहाल समजण्यात यावी. बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली—“वऱ्हाडचा बदललेला माजी दिवाण सिराज्नुद्दिन याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा, असे आज्ञापत्र बख्शीरुल्लाखान याने त्याला (सिराज्नुद्दिन) लिहून पाठवावे. उत्तर येईपर्यंत दाम वळते करण्याचे काम स्थगित करण्यात यावे.

शेख नूरमुहम्मद दरवेश याने जमजमचे पाणी (मक्केतील पवित्र विहीर) पाठविले होते. ते मुहम्मद कासीम दरवेश याने बादशहांना दिले. त्याबद्दल बादशहाने मुहम्मद कासीमची मनसब वाढवून दिली.

भागोजीचा मुलगा राणोजी याला चारशे जात आणि तीनशे स्वार अशी मनसब होती. तो शिरवळ येथे तैनात होता. तो वारला, असे बादशहांना कळविण्यात आले.

कऱ्हाडचा फौजदार सुलेमानखा याने बादशहाना पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—“धना (धनाजी जाधव), माधव, केशव वगैरे मराठ्यांचे सरदार हे मुर्तजाबाद (मिरज) च्या दिशेने कऱ्हाडवर चाल करून आले. मी त्यांच्याशी युद्ध केले. बादशहाच्या भाग्याने शत्रूच्या दहा अधिकाऱ्यांना ठार मारण्यात आले. पन्नास घोडे शत्रूकडील माणसांपैकी परशुराम बंडखोर (परशुराम पंतप्रतिनिधी) याचा भाऊ माधव (माधवराव) आणि सुमारे तीनशे माणसे व दोनशे घोडे ही शस्त्राघाताने जखमी झाली. आमच्याकडील अकरा माणसे मारली गेली आणि पाच माणसे जखमी झाली. बादशहाची कृपा व्हावी.

दुसरी विनंती अशी की, बुधपाचगावचा ठाणेदार पदाजी याने या युद्धांत माझ्याशी सहकार्य केले. त्याच्यावर कृपा व्हावी. बादशहानी त्याची मनसब वाढविली.

तिसरी विनंती अशी की, मरहूम फत्तेजमखान याचा भाऊ खानजहांन याचा मुलगा हतिम याने या युद्धांत उत्कृष्ट कामगिरी बजाविली. बादशहाने त्याची मनसब वाढविली.

चौथी विनंती अशी की, पुढील मंडळींना अब्दुल रेहमान, याकुब वगैरेना मनसबी मिळाव्यात बादशहाने आज्ञा केली की, त्यांनी हुजुरात यावे.

पाचवी विनंती अशी.—यासिमखान हा आपल्या ठाण्यातून दारुगोळा घेऊन जातो. आज तारागडच्या किल्लेदाराला आज्ञा व्हावी की कामाच्या प्रसंगी त्याने दारुगोळा आपल्याला द्यावा.

सहावी विनंती अशी की, ठाण्यातून असलेली माणसे पगारासाठी हुजुरात गेली आहेत. त्यांचे पगार देऊन त्यांना परत पाठविण्याविषयी मिर आतिष (दारुगोळ्याचा अधिकारी) याला आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

सातवी विनंती अशी की, खटावचे (सातारा जिल्हा) ठाणेदार किशनराव (कृष्णराव) आणि मसवडचे ठाणेदार नागोजी माने यांना वेळ पडेल तेव्हा माझ्याशी सहकार्य करण्याची आज्ञा करण्यात यावी. बादशहाने आज्ञा केली की, बख्शीरुहुल्लाखान याने त्याला (कृष्णराव आणि नागोजी माने) वरील विनंतीप्रमाणे लिहावे.

गजपत कंबू उर्फ शेख अब्दुल माबुत (मुसलमान झालेला) हा सुन्ता झाल्यावर येऊन बादशहाना भेटला. त्याने बादशहांना पाच रुपये नजर दिले.

बादशहाना कळविण्यात आले की, सखरलना (विशाळगड) किल्ला फत्ते झाल्यानंतर आमिरुल्उमरा (मुख्यप्रधान असदखान) याला एक हत्ती देण्यात यावा, अशी आज्ञा झाली होती. तो हत्ती अद्याप त्याला मिळाला नाही. बादशहाने आज्ञा केली की, हत्तीखान्याचा अधिकारी अमिदुद्दिनखान बहादूर याने हत्तीखान्यातील हत्ती आपल्यासमोर घेऊन यावे, त्याप्रमाणे करण्यात आले. बादशहानी त्यापैकी दहा हजार रुपये किंमतीचा एक हत्ती निवडला आणि आज्ञा केली की, तो हत्ती अमीरुल्उमरा यांना देण्यात यावा.

मरहूम हैदरखान याचा मुलगा मुहम्मद मुहसिन हा बिसरामगडचा किल्लेदार होता. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन किल्ल्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

ख्वाजा इलियास राबिया दौरानी (औरंगजेबाची बायको) हिच्या कबरीवर आणि घुमटावर (बिबिका मकबरा, औरंगाबाद) देखरेख करण्यासाठी अधिकारी म्हणून नेमण्यात आले.

## आठ फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. शहाजादा कामबख्श हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहाना येऊन भेटला.

राजगड किल्ल्यासमोरील मोर्च्यातून आलेले पत्राचे एक पाकिट बादशहाच्या नजरेखालून गेले. पत्रात पुढील मजकूर होता—"दिवसाच्या दोन घटका राहिल्या असता राजगड किल्ल्यासमोर असलेल्या तरबियतखान व हमीदुद्दीनखान याच्या मोर्च्यात तैनात असलेल्या हरकाऱ्यांनी पुढील बातमी आणली. ती बातमी अशी—मोर्च्यात तैनात असलेल्या खडकसिंग हजारी हा आपले बंदुकचे सहकारी यांना बरोबर घेऊन दमदम्याच्या मार्गाने किल्ल्याच्या (राजगड) बुरुजावर चढला. शत्रूचे (मराठ्यांचे) सैनिक येथून पळाले. ते खिडकी (दिंडी-दरवाजा) तून किल्ल्याच्या आत पळून गेले. बुरुजावर त्यांनी सामानसुमान जाळुन टाकले आणि ते किल्ल्यात गेले. आपले लोक बुरुजावर आहेत.

## नऊ फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. आज सकाळी बादशहाने रुहुल्लाखान यांस पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"तुम्ही तरबियतखान आणि हमीदुद्दीनखान बहादूर याच्या मोर्च्यात जाऊन काय परिस्थिती आहे ते पाहून या."

पुण्याचा फौजदार शिवसिंग याला हुजुरात घेऊन यावे अशी आज्ञा देण्यात आली.

सुलेमानखान याने धना व माधव (धनाजी जाधव व परशुराम पंतप्रतिनिधी यांचा भाऊ माधवराव) यांचा पराजय केला होता. त्यांच्याकडे बक्षीस म्हणून एक कटार पाठविण्यासाठी वेगळी काढून ठेवावी,

अनुक्रमणिका

अशी आज्ञा झाली. असिलगडचा किल्लेदार शामतखान याने लिहून पाठविले की; बडखोरांची सैन्ये येथे नेहमी येतात आणि उपद्रव देतात. कोणालातरी पाठवून त्यांचे पारिपत्य करावे. बादशहाने आज्ञा केली की,—"नायक सुभेदार हे त्यांचे पारिपत्य करतील."

शिवापूरचा (पुण्याजवळ) ठाणेदार हशमतुल्ला याने बादशहाकडे गुलाबाची फुले पाठविली होती. बादशहाने त्यापैकी पाच गुलाब शहाजादा कामबख्श (औरंगजेबचा मुलगा) याला बक्षीस म्हणून दिली.

**दहा फेब्रुवारी १७०४**

काल रात्री बादशहाने आज्ञा केली ती अशी––रुहुल्लाखान व मतलबखान हे राजगड किल्ल्यासमोरील तरबियतखान आणि हमीदुद्दीनखान यांचे मोर्चे पहाण्यासाठी गेले आहेत. त्यांनी रात्री मोर्चातच राहावे. बादशहा आज्ञा करतील तेव्हा परत यावे.

तरबियतखान, हमीदुद्दीनखान, रुहुल्लाखान व मतलबखान यापैकी प्रत्येकाला एकेक ढाल बक्षीस म्हणून मोर्चात पाठिविण्याची आज्ञा झाली.

सुरतेचा मुत्सद्दी (कारभारी) नजाबतखान (हा बागलाणचाही फौजदार होता) याने विनंती केली की, माझ्यातर्फे नायब फौजदार म्हणून माझा नोकर फत्ते हा सुलतानपूर, नंदूरबार येथे चांगले काम करीत आहे. मनुष्य कामाचा आहे. त्याला मनसब मिळावी. बादशहानी त्याला तीनशे जात व शंभर स्वार अशी मनसब दिली. नजाबतखानाने अशी विनंती केली की, "ठाणी कायम झाली आहेत. पुढील मंडळींना मनसबी देण्यात याव्यात धान्यांचे ठाणे मुहम्मद हादियास, मुहम्मद सलाह याचे ठाणे (ठाण्याचे नाव लागत नाही), हातगडची ठाणेदारी मुहम्मद आकिल यांजकडे वरील मंडळींना मनसबी देण्यात याव्या.

बादशहाने विनंती मान्य केली. नजाबतखानाची आणखी एक विनंती अशी की, आपला दिवाण बहादूरसिंग याला तीनशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब मिळावी. बादशहाने आज्ञा केली की, दोनशे जात व पन्नास स्वार अशी मनसब देण्यात यावी.

रुस्तुमबेगखान हा खान नुसरतजंग (जुल्फीकारखान) याच्या फौजेत तोफखान्याचा अधिकारी होता. तो आपल्या जागेवर रुजू होण्यास उशीर लावू लागला. तेव्हा एक गुर्जबरर्दार (वेत्रधारी) मुद्दाम नेमून त्याला नुसरतजंगच्या फौजेत नेऊन पोहचवावे, अशी आज्ञा देण्यात आली. लुत्फुल्लाखान याची पदवी पुन्हा बदलून त्याला पुन्हा मुहम्मद लतिफखान ही पदवी देण्यात आली. मुहम्मद अमीनखानाच्या फौजेत सिद्दीखान हा तैनात होता. त्याने विनंती केली की, माझी आर्थिक स्थिती चांगली नाही. विनंती अशी की, जहागिरीच्या ऐवजी मला नगद पगार देण्यात यावा. त्याला आठशे जात व दिडशे स्वार अशी मनसब होती. बादशहाने आज्ञा केली की, याला चारशे जात पुरता पगार द्यावा. उरलेल्या मनसबीची जहागीर चालू राहील.

हैद्राबाद-कर्नाटक सुभ्यातील हिऱ्याच्या खाणीवर अलावर्दीबेग हा अमीन (अधिकारी) होता. तो मरण पावला. याच्या जागेवर मीर अब्दुलगफार याची नेमणूक करण्यात आली.

सरकार (जिल्हा) दौलताबाद येथील पायबाकी (कोणालाही न दिलेल्या सरकारी जमिनी) जमिनीचा अधिकारी जैनूलआबिदिन हा होता. त्याला बदलून त्याच्या जागी अमानीबेग याची नेमणूक करण्यात आली. मुहम्मद मुबारक हा रुस्तुमदिलखान (सुभे-हैद्राबाद) याजपाशी तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले होते. त्याला शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**अकरा फेब्रुवारी १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. बख्शीरुहुल्लाखान आणि मतलबखान हे तरबियतखानाचे मोर्चे पहाण्यास गेले होते. त्यांनी हुजुरात परत यावे, अशी आज्ञा करण्यात आली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १२ फेब्रुवारी इ. स. १७०४ ते ८ मार्च १७०४ पर्यंत

### बारा फेब्रुवारी १७०४

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. काल रात्रीचा एक प्रहर आणि पाच घटका झाल्या असता बादशहानी बख्शीरुहुल्लाखान यांस हुजुरात बोलाविले आणि त्याच्याबरोबर एकांतात मोर्चातील परिस्थितीसंबंधी चौकशी केली. रुहुल्लाखानाने म्हटले, “आपल्या कृपेने मोर्चे किल्ल्याच्या जवळ पोहोचले आहेत. तरबियतखान वगैरे अधिकारी मोर्चात चांगलीच कामगिरी बजावत आहेत. लवकरच किल्ला फत्ते होईल अशी त्यांनी अपेक्षा आहे. बादशहा म्हणाले, “इन्शाल्ला!” (परमेश्वराची इच्छा) यानंतर त्यांनी रूहुल्लाखानाला निरोप दिला. मुहम्मद अफझल हा पूर्वी आदिलाबाद (एदलाबाद, जिल्हा जळगाव) येथे फौजदार होता. त्याला शहाजादा बेदारबख्त यांजपाशी तैनात करण्यात आले होते. त्याने विनंती लिहून पाठविली की, आपली मुले मुहम्मद जाफर व मुहम्मद तक्री यांच्यावर कृपा व्हावी. त्यांना मनसबी देण्यात आल्या.

सुलतानपूर मुल्हेरचा फौजदार ख्वाजा खुदायारखान याचा विनंती अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला. शहाजादा बेदारबख्त याने पत्र लिहून कळविले की, आदिलाबाद (एदलाबाद) चा फौजदार अब्दुलवहाबखान याने बंडखोरांचे पारिपत्य करून बंदोबस्त चांगला राखला आहे त्याच्यावर कृपा व्हावी. बादशहाने त्याची मनसब वाढविली.

गजेंद्रगडचा किल्लेदार आणि बहादूरसिंगचा मुलगा विजयसिंग याने विनंती लिहून पाठविली की, बादशहा काफरांवर (मराठ्यांवर) मोहीम करीत आहोत. हुजुरात येऊन कामगिरी करुन दाखवावी अशी माझी इच्छा आहे. माझ्या जागेवर माझा पुतण्या किरतसिंग याला नेमण्यात यावे. त्याची विनंती मान्य करण्यात येऊन त्याची मनसब वाढविण्यात आली.

### तेरा फेब्रुवारी १७०४

बादशहानी आज न्यायकचेरी केली. कचेरीचे काम संपल्यानंतर त्यांनी बख्शीरुहुल्लाखान आणि हमीदुद्दीनखान यांना बोलावून त्यांच्याशी खलबते केली. होशंगाबाद (मध्यप्रदेश) चा फौजदार रणमस्तखान याचा अर्ज बादशहाने नजरेखालून घातला. (रणमस्तखानाच्या नावाने औरंगाबादेस एक पुरा आहे, रणमस्तखान हा दाऊदखान पन्नीच्या भाऊबंदापैकी एक.)

वऱ्हाड सुभ्याचा दिवाण अबुल फजलखान यास वऱ्हाडकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. सिकंदरजंग याला अष्टीची किल्लेदारी देण्यात आली. मरहूम कादरदादखान याचा मुलगा रहमतुल्ला याला मुर्तुजानगर (सुभे हैद्राबाद) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

साधोरा (पंजाब?) येथील कानूनगो (आपल्याकडील देशपांडे प्रमाणे) हा शेख सादुल्ला यांच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. त्याचे नाव दीपचंद होते. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

वऱ्हाड सुभ्याचा माजी दिवाण शेख सिराजुद्दिन याला बऱ्हाणपूर सुभ्याचा दिवाण म्हणून नेमण्यात आले. मिर्झा अमीरबेग याला बऱ्हाणपूरचा सवानेह निगार (वृत्तांत लिहून पाठवणारा) म्हणून नेमण्यात आले. मेहंदीखान हा राजगडच्या किल्ल्यासमोरील ठाण्यावर होता. मतलबखानाच्या शिफारशीवरून त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. बादशहानी आज्ञा केली की, गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार मातबरखान याने एक हजार पायदळ शिपायाची नव्याने भरती करावी आणि त्यांना हुजुरात पाठवावे यासाठी हुजुरातून एक गुर्जबर्दार मातबरखानाकडे पाठविण्यात यावा अशी आज्ञा झाली. या नवीन पथकाला पगार म्हणून सात हजार रुपये सुरतबंदरच्या खजिन्यातून द्यावेत अशीही आज्ञा द्याली. यासीमखान यांस बेदाबख्तच्या सैनात पोहचविण्यासाठी चालला होता, त्याच्या बरोबर बेदार बख्तकडे आज्ञापत्र पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली. अब्दुल कासीम हा घोडे घेऊन सुरत बंदरातून आला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

मुहम्मद गौस याला अवध प्रांताच्या जिज्या वसुलीचा अमीन म्हणून नेमण्यात आले.

## चौदा फेब्रुवारी १७०४

काल हमीदोद्दीनखान बहादूर याने बादशहाना कळविले की, तरबियतखान हा मोर्च्यात उत्कृष्ट कामगिरी बजावित आहे, त्याच्यावर कृपा व्हावी. त्याला (तरबियतखानाला) तीन हजार जात आणि सतराशे स्वार अशी मनसब होती. तीत पाचशे जात व दोनशे स्वार अशी वाढ देण्यात आली. शेख नेमतुल्ला अरब हा यमन प्रांतातून (अरबस्थान) आला होता. त्याने काही फळे, काही सुगंधी द्रव्ये आणि एक स्मरणी बादशहाला दिली. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली आणि एक हजार रुपये बक्षिस म्हणून देण्यात आले. मुलतानचा सुभेदार शहाजादा मुइजुद्दिन याने डाळिंबाच्या दोन करंड्या पाठविल्या होत्या. त्यापैकी आजमशहा (औरंगजेबचा मुलगा) गुजरातचा सुभेदार याने एक करंडी ठेवून घेतली होती. उरलेली एक करंडी बादशहानी पाहिली. बादशहा खूष झाले.

दुपारच्या नंतर बादशहानी रुहुल्लाखान आणि हमीदुद्दीनखान याना बोलावून त्यांच्याशी खलबते केली. त्यानंतर हमीदुद्दीनखानाला राजगड किल्ल्यासमोरील मोर्च्यात पाठविण्यात आले. मुहम्मद मेहदी हा मध्य आशियातून आला होता. तो बादशहाला भेटला. त्याला मनसब आणि खिलातीची वस्त्रे ही देण्यात आली.

## पंधरा फेब्रुवारी १७०४

सकाळी बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—"सुलतानपूर नंदूरबारचा देशमुख मुहम्मद मोमीन उर्फ शंभूनाथ हा बादशहाच्या छावणीत होता, तो वारला. त्याचे वारस म्हणतात "एका माणसाने त्याला विष घालून मारले आहे." बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली. मयताच्या (शंभूनाथ उर्फ मुहम्मद मोमीन) वारसांना आणि ज्याच्यावर आरोप आहे त्याला धार्मिक न्याय कचेरीसमोर (शरा) उभे करण्यात यावे. हे काम बादशाही छावणीचा कोतवाल सरबराहखान याचकडे देण्यात आले. बहादूरगडचा किल्लेदार

नुरुल्लाखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"सुमेरगड (?) चा किल्लेदार भुपतसिंग हा होता. किल्ल्यातील हशमाच्या (पायदळ शिबंदी) सैनिकांनी त्याला ठार मारले ती जागा (किल्लेदाराची) माझ्याकडे देण्यात यावी. त्यावर मी माझ्यातर्फे नायब म्हणून सय्यद असदुल्ला याला ठेवीन.

हैद्राबाद सुभ्यातील मुस्तफानगर किल्ल्याचा किल्लेदार याने बादशहाना पुढीलप्रमाणे लिहून कळविले (त्यातील काही मजकूर असा) येथील शिबंदी नेमाप्रमाणे तीनशे सैनिकांची आहे, त्यांपैकी फक्त सत्तावीस हजार आहेत. वेळेवर पगार मिळत नसल्यामुळे ते सरकारी काम मन लावून करीत नाहीत. मला आपली माणसे नेमून किल्ल्याचे रक्षण करावे लागत आहे. नियमाप्रमाणे हैद्राबादच्या कारभाऱ्यांनी किल्ल्यात माणसे व गोलंदाज नेमावीत, अशी त्यांना आज्ञा देण्यात यावी. बादशहाने आज्ञा केली की, यासंबंधी तोफखान्याचा अधिकारी मनसूरखान याला लिहिण्यात यावे. किल्लेदाराची दुसरी विनंती अशी की, किल्ल्यात धान्यांचा साठा अजिबात नाही. किल्ल्याचे दरवाजे व भिंती याची दुरुस्ती होणे आवश्यक आहे. बादशहाने आज्ञा केली की, खानसामान (पुरवठा खात्याचा अधिकारी) याला सांगण्यात यावे, किल्लेदाराची तिसरी विनंती अशी की, किल्ल्यात मुशरफ, तहसिलदार वगैरे जागा भरावयाच्या आहेत. नेमणूका करण्यात याव्या. विनंती मान्य करण्यात आली.

## सोळा फेब्रुवारी १७०४

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—"बालीराम ऊर्फ शेख गुलाम मुहम्मद याची बायको बाळंत होऊन तिला जुळी मुले झाली आहेत. बादशहाने त्याला बोलाविले आणि विचारले तुझ्या बायकोचे वय काय? त्याने सांगितले—"ती वारली." बादशहा म्हणाले, "परमेश्वराने तुला दोन मुले दिली आहेत." बादशहानी त्यांची नांवे ठेविली. एकाचे नाव इस्मुल्ला आणि दुसऱ्याचे नांव मुहम्मद अमान. बादशहाने बालीराम उर्फ शेख गुलाम मुहम्मद याला खिलातीची वस्त्रे देऊन त्याला आपल्या तळावर जाण्यास आज्ञा दिली. बेणीराय (धर्मराय?) उर्फ रामजी याच्या मनसबीत तरबियतखानाच्या शिफारशीवरून वाढ करण्यात आली.

दुर्गादास राठोड याला आणण्यासाठी एक गुर्जबर्दार अहदअलीबेग हा गेला होता. दुर्गादासच्या नांवे एक आज्ञापत्र तयार करण्यात आले ते आज्ञापत्र अहदअलीबेग यांच्याकडे पोचवण्यात यावे. म्हणून एक गुर्जबर्दार दिलेरबेग यांच्याबरोबर ते आज्ञापत्र देण्यात आले.

हमीदुद्दीन खान बहादूर हा राजगड किल्ल्यासमोरील मोर्च्यातून येऊन बादशहाना भेटला. बादशहानी किल्ल्यास असलेल्या शत्रूच्या परिस्थितीबद्दल त्याला विचारले. खानबहादूरने म्हटले, "किल्ल्यातील लोकांचे असे म्हणणे आहे की, आमच्या अपराधाची क्षमा करावी आणि आम्हाला प्राणाचे अभय द्यावे आणि आम्हाला किल्ल्यातून जाऊ द्यावे." बादशहा म्हणाले, "त्यांनी तोरण्याचा किल्लाही देऊन टाकावा नाहीतर सर्वांना ठार करण्यात यावे.

काल बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"सर्फराजखान याची मनसब काढून घेण्यात आली होती. त्याने शहाजादा कामबख्श याच्या सेवेत हजर रहावे." त्याप्रमाणे तो शहाजाद्याकडे गेला.

अनुक्रमणिका

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली—शहाजादा बेदारबख्त हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे ह्या महिन्याच्या सहा तारखेस (१ फेब्रुवारी) आपल्या तळावरुन बाहेर पडला. आणि तो गनिमांच्या (मराठ्याच्या) पारिपत्यासाठी चालून जाणार आहे.

बऱ्हाणपूर येथील हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकिकत कळली—"नेमाजी शिंदे वगैरे सरदार आपली सैन्ये घेऊन होशंगाबाद भागातून पसरले. उपद्रव माजवण्याचा त्याचा हेतू आहे. बऱ्हाणपूरातून नायब सुभेदार मिर अहमदखान हा बाहेर पडला आणि त्यांच्या पारिपत्यासाठी एक कोस पुढे चालून गेला. या सुमारास म्हणजे रमझान महिन्याच्या २२ तारखेस (जानेवारीचा मध्ये) खान फिरोजजंग हा तेथे पोहोचला. त्याने मिर अहमदखानाला बऱ्हाणपूरच्या रक्षणासाठी ठेवले. त्याचा हेतू स्वतः नेमाजी शिंदेवर चालून जाण्याचा होता. परगणे खांडवा येथील अधिकाऱ्यांचे सहाय्य मिळवून तो शत्रूच्या चार हजार सैन्याच्या पाठलागावर निघाला. (तो म्हणजे गाजीउद्दीन फिरोजजंग).

**सतरा फेब्रुवारी १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. रात्री बादशहाना पुढील हकिकत कळली. राजगड किल्ल्यातील चोर (मराठे) हे किल्ला बादशहाच्या हवाली करीत आहेत. त्याच्या दोन विनंत्या आहेत. एक अशी की, तोफखान्याचा अधिकारी तरबियतखान याने किल्ल्यावर तोफांचा भडिमार करू नये. दुसरी विनंती अशी की आम्ही (मराठे) किल्ल्यातून बाहेर पडू त्यावेळी मुहम्मद अमीनखान बहादून याने आम्हाला अडवू नये. त्याप्रमाणे बादशहाने त्या दोघांना आज्ञा केली. बादशहाची ही आज्ञा फत्ते दौलत कौल त्यांच्याकडे पोचविली.

रात्रीच्या चार घटका राहिल्या असता यार अलिबेग याने बादशहाकडे एक लखोटा पाठविला. तो हाफिज बख्तावर महली याने बादशहासमोर ठेवला. लखोट्यात म्हटले होते. राजगड किल्ल्याचा हवालदार, हा जीवाच्या भितीने पळून गेला. मोगलांच्या मोर्चाचा प्रमुख, तरबियतखान याने किल्ला ताब्यात आणला. मोगलांचे अधिकारी सिद्दी बलालखान व शफाहखान वगैरे यांनी किल्ल्याच्या आत प्रवेश केला. बक्षीरुहुल्लाखानाचे निशाण किल्ल्यावर लागले. हे अधिकारी किल्ल्याचा बंदोबस्त आणि खबरदारी बाळगीत आहेत. ही बातमी वाचून बादशहा संतुष्ट झाले. बादशहानी हरकाऱ्याला पाच होन बक्षीस म्हणून दिले. त्यांनी आज्ञा केली की, बख्शीरुहुल्लाखान आणि मिर मनसूरखान यांनी किल्ल्यात जावे. नगारखान्याचा अधिकारी मुहम्मद अमीन यांनी पाच घटकापर्यंत नगारे-नौबती वाजवाव्या. त्याप्रमाणे अंमल करण्यात आला. नगारे-नौबतीचा अधिकारी मुहम्मद अमीन याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. नगारे वाजवणाऱ्यांना आठ हजार दाम बक्षीस म्हणून देण्याची आज्ञा झाली.

सकाळी बादशहानी हमीदुद्दीनखान बहादूर यांस पुढीलप्रमाणे आज्ञा केली—"तोरणा किल्ल्यासमोर मोर्चे कायम करावयाचे आहेत. तर तुम्ही मोजमापाच्या साखळ्या (जरेब) बरोबर घेऊन तोरणाकडे जा. पुढील मंडळींनी येऊन बादशहाचे नम्रतापूर्वक अभिनंदन केले. बादशहाजादा मुहम्मद कामबख्श (औरंगजेबाचा मुलगा), सुलतान मुहीउल्ला, सुलतान फिरोचमंद (औरंगजेबचा नातू), अमीरुल्‌उमरा (मुख्य प्रधान असदखान)

अनुक्रमणिका

मुर्तुजानगर (आंध्रप्रदेश) याचा माजी किल्लेदार आणि इस्माइलबेगचा मुलगा मुहम्मद इसहाक याला बादशहाच्या हुजुरात बोलावण्यात आले शेख सिराजुद्दिन याला सुभे बऱ्हाणपूरचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

यासिमखान याला शहाजादा बेदारबख्त यांजपाशी तैनात करण्यात आले होते. त्याने पुढीलप्रमाणे अर्ज लिहून पाठविला मी बेदारबख्ताच्या सैन्यात रुजू होण्यासाठी जाईन. परंतु माझी एक अडचण आहे. माझी बायका-माणसे, आणि मरहूम फत्तेजंगखान यांची माणसे ही बारामतीच्या ठाण्यात रहातात. तेथील फौजदार सुलेमानखान याने ठाण्याला वेढा घातला आहे. तोही उपद्रव देण्यासाठी म्हणून कृपा करुन राव मानसिंग बहादूर याच्या नावे आज्ञा देण्यात आली की त्याने सुलेमानखानाला मना करावे. याबाबतीत बख्शीरुहुल्लाखान यांनी लिहावे अशी बादशहानी आज्ञा केली.

### अठरा फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते. हरकाऱ्याच्या तोंडून खालील बातमी कळली. औरंगाबादचे सुभेदार शहाजादा मुहम्मद बेदारबख्त बहादूर (औरंगजेबाचा नातू) हे चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी बादशहाच्या आज्ञेप्रमाणे गंगापूर व मिरजापूर या गावाच्या दिशेने या महिन्याच्या दहा तारखेस निघाले. शहाजाद्याने कामगारखान (औरंगजेबाचा मावसभाऊ. माजी मुख्यप्रधान मुहम्मद जाफर याचा मुलगा) व इफ्तिकारखान यांस आज्ञा केली की “तुम्ही माझ्याबरोबर गोदावरीपर्यंत रहावे, त्यानंतर मी तुमच्याबरोबर एक संरक्षक पथक देऊन तुम्हाला अहमदनगरपर्यंत पोचविण्याची व्यवस्था करीन.” पण आपल्याबरोबर पुरेसे सामानसुमान नाही, या सबबीवर ते दोघे शहाजादयाबरोबर गेले नाहीत. ते औरंगाबादेतच राहिले.

काल रात्री बख्शीरुहुल्लाखान याने राजगड किल्ला फत्ते झाला याचे निदर्शक म्हणून सोन्याच्या किल्ल्या मरहुम अमीरखान याचा मुलगा इजदतखान याच्याबरोबर बादशहाकडे पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. इजदतखानाला खिलातीची वस्त्रे देण्यात यावीत अशी आज्ञा देण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की “हमीदुद्दीनखान बहाद्दर व तरबियतखान मिर आतिष यांनी तोरणा किल्ल्याकडे जावे आणि किल्ल्यासमोरील जागा निवडून तेथे मोर्चे तयार करावे.

### एकोणीस फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. तरबियतखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.——मुहम्मद लष्करीची मुले आणि माझे भाचे मुहम्मद अस्करी आणि मुहम्मद बाकर यांनी राजगडच्या वेढ्यात उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे. त्यांच्यावर कृपा व्हावी. बादशहांनी त्यांना मनसबी दिल्या.

बादशहानी आज्ञा केली की “यापुढे किल्ले राजगड याचा उल्लेख किल्ले नबिशाहगड म्हणून करण्यात यावा.”

बादशहानी आज्ञा केली की “दिवंगत हरकारा भास्करराव याची कृष्णा वगैरे मुले येऊन हजर होईपर्यंत हरकाऱ्याचे काम कल्याण याने करावे. (स्वारीतील हरकारा).

फुलंब्री (जिल्हा औरंगाबाद) च्या परगण्याची फौजदारी बाकरखान वगैरे जहागिरदाऱ्यांच्याकडे होती. ती त्यांच्याकडून काढून घेण्यात येऊन औरंगाबाद ते फर्दापूर या मार्गाचा रक्षक मिर मनसूर यांजकडे देण्यात आले.

राजदेरचा फौजदार अब्दुल मजीद हा हुजूरात होता.त्याने पुढीलप्रमाणे विनंती केली. पहिली विनंती अशी की "मी शत्रूच्या पारिपत्यासाठी नियमापेक्षा जास्त सैनिक बाळगून माझ्या प्रदेशाचा चांगला बंदोबस्त ठेवला आहे. मला काही सवलती मिळाव्यात." बादशहाने त्याच्या मनसबीत वाढ केली. दुसरी विनंती अशी की, "किल्ल्याचा किल्लेदार रघुनाथसिंग हा व्यवस्थित काम करीत नाही. त्याच्या जागी पुतण्या मुहम्मद मुजफर याची नेमणूक करण्यात यावी."

बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती करण्यात आली.—"बादशहाने आज्ञा केली होती की दक्षिणेतील चोरांची (मराठ्यांची) बंडाळी थांबेपर्यंत दक्षिणच्या सुभ्यातील परगण्यातून जिज्या कर गोळा करणारे अमीन (अधिकारी) यांनी आपले काम बंद ठेवावे. त्याप्रमाणे करण्यात आले. ते आणि त्यांचे कर्मचारी यांच्यासंबंधी काय आज्ञा. बादशहाने आज्ञा केली की, त्यांच्या मनसबी कमी करण्यात याव्या." आज्ञेप्रमाणे ज्यांच्या मनसबी कमी करण्यात आल्या त्या अधिकाऱ्यांची नावे अशी—(१) मुहम्मद नजीब—औरंगाबादचा अमीन (जिज्याचा अधिकारी), (२) लुत्फ अली–अमीन, (३) बऱ्हाणपूरचा जिज्याचा अमीन महम्मद वारीस, (४) वऱ्हाडचा जिज्याचा अमीन शेख सिराजुद्दिन, (५) मुहमदाबाद बीदरचा अमीन–मुहम्मद सना, (६) हैद्राबादचा अमीन मुहम्मद आसीम.

### वीस फेब्रुवारी १७०४

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. तरबियतखान, हमीदुद्दीनखान आणि मतलबखान करावल बेगी यांनी काल बादशहाकडे पत्र पाठविले ते असे—"आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही तोरण्याच्या किल्ल्याकडे गेलो. किल्ल्यासमोरील मोर्च्यासाठी आम्ही जागा निवडल्या. 'बादशहाच्या निवासस्थानासाठीही जागा पाहून आलो काय आज्ञा." बादशहा म्हणाले, 'आमचे आघाडीचे तंबू मंगळवारी रवाना करा."

### एकवीस फेब्रुवारी १७०४

बादशहाने आज न्याय कचेरी केली. पुढील मंडळींनी येऊन राजगड किल्ला जिंकल्याबद्दल बादशहाना नजरा अर्पण केल्या—(१) हमीदुद्दीनखान बहाद्दर, (२) तरबियतखान, (३) मतलबखान, (४) शाकीरूल्लाखान, (५) मरहमतखान, (६) मेहदीखान, (७) मनसूरखानाचा मुलगा मुहम्मद मुजफ्फर (८) खिदमतुल्ला (८) बदुंकधाऱ्यांचा अधिकारी बैकुंठच्या (?) (१०) खडकसेन हजारी (बंदुकचींचा), (११) अब्दालखान.

वरीलपैकी बऱ्याच जणांना बक्षिसे देण्यात आली. सरफराजखान दखनी हा शहाजादा कामबख्शाच्या मदतीने बादशहांना भेटला. त्याला मनसबीवरून काढण्यात आले होते. ती सहा हजारी

मनसब पुन्हा बहाल करण्यात आली. तरबियतखानाचा भाऊ कामयाबखान याची मनसब वाढवण्यात आली.

शेख गुलाममुहंमद (मुसलमान झालेला बालीराम) याची बायको इस्लामकुंवर ही आज्ञेप्रमाणे बादशहाच्या हुजुरात आली. बादशहाने तिला बक्षिसे दिली. बादशहा तिला म्हणाले—"तू समोर कां येत नाहीस" ती म्हणाली—"ज्या ज्या वेळी बेगम (जिन्नतउन्नीसा किंवा उदेपुरी बेगम) हुजूरात असत त्यावेळी मी हुजूरात आले हाते" बादशहा म्हणाले "गुलाम मुहंमदच्या घरी दोन मुले जन्मली आहेत त्यांचा योग्य प्रतिपाल कर आणि अंतःपुरात येणे जाणे ठेव. बेलदारांचा अधिकारी आणि मरहूम सरबराहखान (संगतराश, स्टोन कटर) याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. काल रात्री बक्षीरुहुल्लाखान हा येवून बादशहांना भेटला; आणि नबीशाहगड (वाचन बेनीशाहगडही होऊ शकते) उर्फ राजगडच्या फत्तेबाबत त्याने बादशहांना पन्नास माहरा, एक खंजीर इत्यादि वस्तू अर्पण केल्या. बादशहाने त्याला रत्नजडित शिरपेच देऊन त्याला परत आपल्या डेऱ्याकडे जाण्यास निरोप दिला. मानसिंग हा ठाणेदार म्हणून माणिकदौंड येथे काम करीत हाता. याला राजगडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला तीनशे जात व चारशे स्वार अशी मनसब होती. तीत वाढ करण्यात आली.

**बावीस फेब्रुवारी १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. फरासखान्याचा मुश्रफ (अधिकारी) याने आघाडीचे तंबू पाठविण्याची तयारी केली. तंबू पुढच्या मजलेवर म्हणजे नौहर (?) या गांवाकडे पाठविण्याची त्याने आज्ञा मागितली. बादशहा म्हणाले "पेशखाना पाठवून द्या. पेशखान्याबरोबर मुहंमद अमीनखान बहादूर व नेकनामखान यांनी जावे"

**तेवीस फेब्रुवारी १७०४**

आज दिवसाचा एक प्रहर अन् तीन घटका झाल्या असता, बादशहा तख्तेरखांवर बसून राजगडहून निघाले आणि तोरण्याला वेढा घालण्यासाठी रवाना झाले. मजलेचे गाव नौहर येथे पोहोचले. लष्करातील लोकांच्या संरक्षणासाठी त्यांनी चंदावलचा अधिकारी तरबियतखान (पिछाडी) याला मागे राहण्यास आज्ञा केली. बादशहाने पावणे दोन कोसाची मजल मारली आणि दुपारच्या वेळी ते मुक्कामावर पोहाचले. वाटेत पुढील मंडळींनी त्यांना वेगवेगळ्या वस्तू भेट म्हणून दिल्या.—(१) मतलबखान, (२) अमानुल्लाखान, (३) मरहूम मोअज्ज़मखानाचा मुलगा मुहंमद अक्रम, (४) मुहंमद अमीनखान बहादूर, (५) मीर रुस्तुम बहादूर, (६) कामयाबखान, (७) नजबकुली, (८) फत्तेउल्ला, (९) मीरखान.

फरासखान्याचा अधिकारी मीर हादी याने सांगितले की, मागच्या तळाहून तंबू आले आहेत. बादशहा म्हणाले—"ते तसेच राहू द्या."

बादशहाने आज्ञा केली कीं,—"अमानुल्लाखान याने आपली पथके घेऊन तोरणा किल्ल्याच्या पायथ्याशी जाऊन तळ द्यावा." शत्रूला किल्यातून बाहेर येऊ देऊ नये.

अनुक्रमणिका

मरहूम नाहरखान याचा नातू घोरीखान याला राव मानसिंगच्या ऐवजी माणिकदौंड येथील ठाणेदारी देण्यात आली. त्याला माणिकदौंड येथे पोहोचवून राव मानसिंग याला हुजूरात आणावे म्हणून एक गुर्जबर्दार नेमण्यात आली.

### चोवीस फेब्रुवारी १७०४

बादशहाने आज सकाळी आज्ञा केली की, हमीदोद्दीनखान बहादूर, रुहुल्लाखान, मतलबखान आणि मीर हादी यानी तोरणा किल्याच्या पायथ्याशी जाऊन बादशहाच्या वास्तव्याच्या आणि मोर्च्याच्या जागा निश्चित करून यावे. आज्ञेप्रमाणे ते लोक गेले, असे बादशहांना कळविण्यात आले.

### दोन मार्च १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. आज्ञेप्रमाणे मंसूरखान यानें बेनिशहागड (राजगड) चा किल्ला इजादीखान (इरादतखान असावे) याच्या हवाली केला असून तो हुजूरात आला आहे. बादशहाच्या आज्ञेने तो रात्री येऊन त्यांना भेटला. बादशहा त्याला म्हणाले "उद्या तुम्ही आपल्या ठाण्याकडे जा."

### तीन मार्च १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

काल रात्री बादशहाने रुहुल्लाखान, हमीदोद्दीनखान, तरबियतखान आणि मतलबखान यांना बोलावून एकांतात त्यांच्याशी खलबते केली. तरबियतखान याला एक घोडा, तीनशे मोहरा, दोनहजार रुपये देण्यात आले. कालरात्री त्याला खर्चासाठी म्हणून एक हजार रुपये देऊन बादशहाने त्याला निरोप दिला. बादशहा तरबियतखानाला म्हणाले "उद्या तुम्ही आणि हमीदोद्दीनखान यांनी जाऊन तोरणा किल्यासमोर मोर्चे बांधण्याचे काम सुरू करा." बादशहाने तरबियतखानाकडे खिलातीची चार वस्त्रे आणि दहा शाली देऊन त्याला म्हटले "या वस्तू तुम्हाला हवे असतील त्यांना द्या."

सिद्दी याकूतखान याने राजगड किल्याच्या विजयाबद्दल शंभर अश्रफ्या आणि एक विनंती अर्ज पाठविला होता. तो बादशहाच्या नजरेखालून गेला. यार अलिबेग याने पुढीलप्रमाणे विनंती केली "सिद्दी याकूतखान याचा दत्तक मुलगा सिद्दीअंबर याच्या बरोबर एक हजार पायदळ आहे. त्याचे म्हणणे असे की, तोरणा किल्याच्या पायथ्याची आपल्याला ठाणेदारी देण्यात यावी." बादशहा म्हणाले "उद्या त्याला दिवाण (कचेरी) मध्ये घेऊन या. ठाणेदारी देण्यात येईल. मतलब खान याने तोरणा किल्याच्या परिसराचा नकाशा बादशहाना सादर केला. तो पाहून बादशहा म्हणाले.—"मेहदीखान व शमशीरबेग यांच्या ऐवजी त्यांच्या ठाण्यावर मन्सूरखान याचे ठाणे राहावे. मेहदीखान व शमशीरबेग यांची ठाणी शिवसिंग व अमानुल्लाखान यांच्या ठाण्याच्या मध्ये राहतील. ही ठाणी शाहजादा कामबख्श यांच्या ठाण्याजवळ राहतील." बादशहाने आज्ञा केली की, अमानुल्लाखान यास दोन हजार रुपये देण्यात यावे.

अनुक्रमणिका

इनायतउल्लाखान (औरंगजेबाचा विश्वासू कारभारी आणि लेखक. औरंगजेबाने सांगितलेल्या मजकूरावरून याने लिहिलेल्या आणि बादशहाने मान्य केलेल्या पत्रांचा संग्रह अहकामे आलमागिरी, औरंगजेबाचे आदेश या नावाने प्रसिद्ध आहेत.) याने बादशहापाशी एक यादी देऊन विनंती केली की, पुढील मंडळींना बादशाही छावणीत धान्याची रसद पाठविण्यासाठी फर्माने पाठविण्यात यावी :—

(१) विजापूरचा सुभेदार—चीनकुलीजखान (भावी निजामउल्मुल्क),

(२) विजापूर—कर्नाटकचा फौजदार दाऊद खान पन्नी,

(३) कर्नाटकचा दिवाण सादतउल्लाखान,

(४) गोळकुंड्याचा अधिकारी—सय्यद मुझफ्फर खान.

बादशहाने आज्ञा केली की, हैद्राबाद-कर्नाटक व विजापूर-कर्नाटक येथून सतत रसद येत जावी. पावसाळ्यातही रसद यावी. हे पाहण्यासाठी दोन गुर्जबर्दार नेमण्यात यावेत.

**चार मार्च १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाना कळविण्यात आले की, बक्षीरुहुल्लाखान हा मोर्चाचा प्रमुख तरबियतखान आणि हमीदोद्दीन खान यांच्याबरोबर गेला होता तो आला आहे. बादशहा म्हणाले “त्याला विश्रांतीगृहात (आरामगाह) येऊ द्या”. त्याने येऊन पुढीलप्रमाणे कळविले.—“मी रात्री मोर्चावर होतो. किल्यासमोर मोर्चे सुरू करण्यात आले आहेत. रात्री मोर्चे दोन साखळ्या पुढे सरकले आहेत”. बादशहाने रुहुल्लाखानाला अत्तराची एक कुपी बक्षीस दिली आणि त्याला आपल्या तंबूकडे परत जाण्यास निरोप दिला. अमीरउल्उमरा (मुख्यप्रधान असदखान) याच्याकडेही अत्तर पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहाने बेनिशाहगड (राजगड) चा किल्लेदार इरादतखान याच्या नावे फर्मान पाठविले. ते फर्मान मतलबखानाने पोहोचवावे म्हणून त्याच्याकडे देण्यात आले. इरादतखानाला पाठविलेल्या फर्मानात बादशहाने म्हटले होते की, “राजगडावर नेमला गेलेला किल्लेदार मानसिंग, हा आल्यावर तुम्ही किल्ला त्याच्या हवाली करून-हुजुरात यावे. मानसिंगला किल्ल्याकडे पोहोचविण्याची एक वेगळा गुर्जबर्दार नेमण्यात आला.

सिरहिंदचा पीरजादा खाजा हारिस यांची मुले मुहंमद अली व शेख अबदुस्सलाम यांना खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. (सिरहिंदच्या सय्यद अहमद सिरहिंदी चे हे घराणे औरंगजेबाला गुरुस्थानी होते. औरंगजेबाच्या धार्मिक कट्टरतेचे मूळ यांत आहे, असे समजले जाते.)

तळकोकणचा पीरजादा सय्यद कुतुबउद्दीन हा हेमराज व मातबरखानाचा वकील आणि भूपतरामचा मुलगा साहेबराम यांना हुजूरात घेऊन आला. बादशहाने स्वतः कलमा पढून हेमराज आणि साहेबराम यांना इस्लामची दिक्षा दिली. हेमराज (वाचन निबराज किंवा नीराजही होऊ शकते) याचे नाव

मुहंमद अक्रम असे ठेवण्यात आले. साहेब रामचे नाव मुहंमद अस्लम ठेवण्यात आले. सय्यद कुतुबउद्दीनने विनंती केली कीं, यांची आई पण मुसलमान झाली आहे. तिचे नाव गुलाबू आहे. तिचे मुसलमानी नाव ठेवण्यात यावे. बादशहाने तिचे नाव गुलाबबानू ठेविले.

**पाच मार्च १७०४**

दिवसाचा एक प्रहर पाच घटिका झाल्या असता बादशहाने न्याय कचेरी केली. औरंगाबादेहून बादशहाच्या छावणीपर्यंतच्या मार्गाचा रक्षक (राहदार) मुगलखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहाने आज्ञा केली की,——"तुम्ही बहादुरगडला जा आणि तेथील तळाचे रक्षण करा. तेथील किल्लेदार सदरुद्दीन मुहंमदखान याने हुजूरात यावे. मुगलखान आणि त्याचा मुलगा यांनी बादशहाना नजरा दिल्या, त्याप्रमाणे खाजमकुलीखान आणि खुशालबेग यांनीही नजरा दिल्या.

नरकवासी संभा (संभाजीराजे) याची मुलगी हिला बहादुरगडाहून आणण्यात आले होते. तिचे लग्न फकीर मुहंमद शाहूर याच्या बरोबर करण्याचे ठरले. फकीर मुहंमदला बादशहाने खिलातीची वस्त्रे दिली.

बादशहाने पुढिलप्रमाणे आज्ञा केली. बेळगाव उर्फ आजमनगरचा किल्लेदार सैफखान याला बदलण्यात आले आहे. त्याला लिहिण्यात यावे कीं, नवीन किल्लेदार मकसूदखान हा येथे आल्यावर किल्ला त्याच्या हवाली करावा आणि स्वतः विजापूरचा नायब सुभेदार म्हणून विजापूरला जावे.

जुम्लतुल्मुल्क अमीरउल्उमरा याचा नातू (शाइस्ताखानाचा नातू) मुहंमदसालेह याचे लग्न मरहूम मरहमतखान याच्या मुलीशी ठरले. त्याला १ घोडा, (शंभर मोहरा किंमतीचा) बक्षीस देऊन, त्याला औरंगाबादेस जाण्यास निरोप देण्यात आला. त्याचा भाऊ मुहंमद काजिम याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली आणि त्यालाही आपल्या भावाबरोबर औरंगाबादेस पाठविण्यात आले.

हमीदोद्दीनखान बहादूर आणि मतलबखान हे तोरण्याच्या किल्यासमोर ठाणी कायम करून बादशहाच्या हुजुरात आले. पाईन विलायत (वाई प्रांत) चा ठाणेदार ख्वाजाखान याने लिहून पाठविले कीं,—"या प्रांतात चोरांची (मराठ्यांची) वर्दळ फार आहे. कृपा करून माझ्या बरोबर चांगली पथके द्यावीत." बादशहाने विनंती मान्य केली. त्यांनी आज्ञा केली की, तुर्कताजखान वगैरे पाचशे स्वार आणि राव जगतसिंग, सातहजारी यांना या कामावर नेमण्यात यावे. बऱ्हाणपूरचा पिरजादा, सय्यद अहमद यांची मुले सय्यद मुहंमद, मुहंमद मोहसीन वगैरेंना खिलातीची वस्त्रे देण्यात आली. आज्ञा झाली कीं, खिलातीची वस्त्रे व दीड हजार रुपये सय्यद अहमदच्या तंबूवर पाठवावे. इनायत उल्लाखान यांची मुले, रुहुल्ला आणि अताउल्ला यांना आपल्या बापाबरोबर मुजऱ्यासाठी दरबारात येण्याची परवानगी देण्यात आली.

**सहा मार्च १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. दिवसाच्या शेवटी बादशहाने मोगलखान याला बोलावून त्याला फळफळावळे बक्षीस म्हणून दिली आणि त्याला बहादुरगडकडे जाण्यास निरोप दिला. गाजीउद्दीन फिरोजजंग याच्या शिफारशीवरून त्याच्या सैन्यातील सर अंदाजखान, मीरकखान आणि खंजरखान यांना

बढत्या देण्यात आल्या. पाइन विलायतचा ठाणेदार ख्वाजाखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. सोमाजी अहीरराव (?) हा ख्वाजाखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला तेथून काढून तोरणा किल्याच्यासमोर असलेला ठाणेदार अमानुल्लाखान याजपाशी तैनात करण्यात आले. त्याला दीड हजार जात व सातशे स्वार अशी मनसब होती. मोधू बल्लाळ (माधव बल्लाळ?) हा गाजिउद्दीन फिरोजजंग हयाच्या फौजेत तनात होता. त्याला सहाशे जात आणि चारशे स्वार अशी मनसब होती. त्याने विनंती अर्ज पाठविला की, मी आता म्हातारा झालो आहे. मला निवृत्त करून माझ्या मुलांना मनसबी द्याव्या. विनंती मान्य करण्यात आली आणि त्याची मुले रघुनाथजी यास पाचशे जात, दोनशे स्वार व व्यंकोजी यास तीनशे जात व शंभर स्वार अशी मनसब देण्यात आली.

तोफखान्याचा अधिकारी तराबीयतखान याचा कारभारी रामजी यास दियानतराय ही पदवी देण्यात आली होती; ती बदलून त्याची पदवी दियानतराव अशी करण्यात आली.

हिदायतउल्ला जरीनरकम याने विनंती अर्ज केला की, “माझ्या घरी चोरी झाली आहे आणि दहा हजार रुपयांची मालमत्ता चोरीस गेली आहे.” बादशहाने आज्ञा केली की, छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याने तपास काढून मालमत्ता हुडकून काढावी आणि हिदायतउल्लाला परत करावी.

तोरणा किल्ल्याच्या पायथ्याशी असलेला ठाणेदार मुहंमद अमीनखान बहादूर याने विनंती केली की, “आज्ञा होत असल्यास मी मुजऱ्यासाठी दिवाणात आणि संध्याकाळच्या नमाजासाठी मधूनमधून हुजुरात येत जाईन.” विनंती मान्य करण्यात आली.

## सात मार्च १७०४

मुहरमखान याने लिहून पाठविले की, हुजुरात असलेला खोजाअन्वर हा आजारी आहे. त्याला औरंगाबाद व बऱ्हाणपुरकडे जायला रजा देण्यात यावी. त्याची एक वर्षासाठी रजा मान्य करण्यात आली. त्याला बऱ्हाणपूरला जाण्याची परवानगी देण्यात आली. फकीर मुहंमद शाईर (कवि-शायर-यालाच संभाजी राजांची मुलगी देण्यात आली होती.) याचा भाऊ मुहंमद सिद्दीक याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, सिद्दी याकूतखान याने दोनशे चौदा सैनिक हुजुरात पाठवावे.

## आठ मार्च १७०४

काल रात्री बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले——“तोरण्याच्या पायथ्याशी असलेला ठाणेदार अमानुल्लाखान याने किल्ल्याच्या तटाला दोर लावले आणि मावळ्यांना बरोबर घेऊन तो तटावर चढला. किल्ल्यातील (मराठे) चोर सावध झाले. बादशहाने आज्ञा केली की, उद्या सकाळी हमीदोद्दीनखान बहादूर आणि मुहंमद अमीनखान बहादूर यांनी अमानुल्लाखान याच्या मदतीस जावे.”

यार अलीबेग याने बादशहाना कळविले ते असे.——काबूलचा सुभेदार शाहजादा मोअज़्ज़म बहादुरशहा आणि काश्मीरचा सुबेदार इब्राहिमखान यांनी डाळिंब आणि नाशपाती याच्या करंड्या हुजुरात पाठविल्या होत्या. चोरांच्या (मराठ्यांच्या) दंग्या–धोप्यामुळे या करंड्या नमर्देच्या काठावर अडकून

पडल्या होत्या. त्यापैकी तीनशे पंचावन्न डाकपत्रे (पूर्वी नळकांड्यात पत्रे घालून पाठवीत असत) आणि फळफळावळाच्या पंचावन्न करंड्या छावणीत आल्या उरलेल्या करंड्या चोरांनी (मराठ्यांनी) लुटल्या.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## ९ मार्च इ. स. १७०४ ते १३ एप्रिल १७०४

### नऊ मार्च १७०४

आज दिवाण बंद ठेवण्यात आले. सकाळी हरकाऱ्याचा दारोगा यारअलीबेग याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठवला. तोरणा किल्ल्यासमोरील मोर्चातील हेरांनी बातमी आणली आहे ती अशी. “किल्ल्यातील पायथ्याशी असलेला ठाणेदार अमानुल्लाखान याने रात्र संपण्यास चार घटका राहिल्या असता किल्ल्याच्या तटाला दोर लावले. त्याच्या हाताखालचे मावळे हे किल्ल्यावर चढले. ते बुरुजावर चढले. चोरांच्या (मराठ्यांच्या) बरोबर चकमक झाली. बादशहाच्या भाग्याने चोरांपैकी (मराठ्यापैकी) काहीजण मारले गेले आणि दोन कैद झाले. या सुमारास हमीदोद्दीनखान बहादूर आणि मतलबखान यांना बातमी लागली. ते अमानुल्लाखानाच्या मदतीला धावले आणि किल्ल्याच्या बुरुजावर ठाण मांडून राहिले. चोरांची (मराठ्यांची) चौकी तेथे होती. मराठे तेथून पळून किल्ल्याच्या आत गेले. अमानुल्लाखान, हमीदोद्दीनखान वगैरेनी ठरविले आहे की रात्रीच्या वेळी किल्ल्यावर हल्ला करावा आणि शत्रूंना ठार मारावे.

हे ऐकून बादशहाना अतिशय आनंद झाला. खान मुहंमद कौल याने वरील मजकुराचा लखोटा आणला होता. त्याला सव्वापाच होन बक्षीस देण्यात आले. बादशहा म्हणाले:—“किल्ला हाती आल्यावर अधिक बक्षीस देण्यात येईल”. हरकऱ्याला दोन होन बक्षीस देण्यात आले. बादशहा म्हणाले “बक्षीरुहुल्लाखान याने अमानुल्लाखाच्या पाशी असावे. तरबीयतखान वगैरेना आज्ञा करण्यात आली की, अमानुल्लाखान हा किल्ल्यावर हल्ला करील त्यावेळी त्यांनीही मोर्चातून बाहेर पडून किल्ल्यावर हल्ला चढवावा आणि चोरांना (मराठ्यांना) ठार मारावे. अमानुल्लाखानाच्या मोर्चात असलेल्या दमदम्याला गोळे व इतर सामान पाठवावे. असे छावणीचा कोतवाल सर्बराहखान याला बजावण्यात आले.

### मातबरखानाचा मृत्यू

गुलशनाबाद (नाशिक) येथील बातम्यांवरून कळले की, तेथील ठाणेदार मातबरखान हा वारला, त्याला अडीच हजार स्वार आणि अडीच हजार जात अशी मनसब होती.

### दहा मार्च १७०४

बादशहाने आज न्यायकचेरी केली. काल रात्रीचे एक प्रहर अन् तीन घटिका झाल्या असता हमीदोद्दीनखान बहादूर याने फत्तेदौलत कौल याच्या बरोबर हुजुरात पत्र पाठवले. पत्रात पुढील मजकूर होता. “तोरणा किल्ल्याचे चोर (मराठे) म्हणत आहेत की, किल्ला बादशहाचा आहे आम्हाला अपराधाची माफी मिळावी. जिवाचे अभय मिळावे. आम्ही किल्ला सोडून जाऊ”. एक घटकेनंतर हरकाऱ्यांनी मोर्चाचा प्रमुख तरबीयतखान याचा पुढील निरोप आणला.—“किल्ल्यातील चोर (मराठे) जिवाच्या भयाने किल्ल्यातून बाहेर पडून तरबियतखानाला भेटले. बादशाही अधिकारी किल्ल्यात दाखल झाले.

तरबियतखानाचा झेंडा किल्ल्याच्या दरवाज्यावर लावण्यात आला. किल्ल्याच्या बंदोबस्ताची खबरदारी घेण्यात येत आहे. यावेळी तरबियतखानापाशी सुमारे साडे तीनशे, सत्तर चोर (मराठे) हे कैदी म्हणून आले आहेत. काय आज्ञा?

बादशहाने आज्ञा केली की दीड तासपर्यंत नौबती झडण्यात याव्या. तरबियतखानाला आज्ञा करण्यात आली की, चोरांना (मराठ्यांना) सोडून द्यावे. त्यांना हवे असेल तिकडे जाऊ द्यावे. तोरणा किल्ल्याचे नाव बदलून मिफ्ताहुल गैब असे ठेवण्यात आले. नगारखान्याचा दारोगा मुहंमद अमीन याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. पुढील मंडळीनी येऊन किल्ला फत्ते झाल्याबद्दल बादशहाला अभिवादन केले:—

(१) बक्षी रुहुल्लाखान, (२) अमीरउलउमरा जुम्दतुलमुल्क (मुख्य प्रधान), (३) हमीदोद्दीनखान बहादुर, (४) सियादतखान, (५) मतलबखान, (६) तहव्वुरखान, (७) खानाजादखान वगैरे यांनी बादशहाला नजरा दिल्या. बादशहाने म्हटले—"चांगली कामगिरी करण्यात आली. सेवा रुजू झाली. मतलबखान, हमीदोद्दीनखान वगैरेना बक्षीसे देण्यात आली. कुणाला हत्ती, कुणाला शीरपेच, तर कुणाला खिलातीची वस्त्रे अशा वस्तू देण्यात आल्या.

झुल्फिकारखानाने राजगड फत्ते झाल्याबद्दल अभिनंदन पत्र आणि निसार (ओवाळणी) च्या पाचशे अश्रफ्या पाठविण्यात आल्या होत्या त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. काल अमानुल्लाखान याने दोन कैदी जिवंत आणि चार चोरांची (मराठ्याची) डोकी अबू मुहंमद दस्तगीर याच्या बरोबर हुजुरात पाठवली. बादशहा म्हणाले—अमानुल्लाखानाची सेवा रुजू झाली. अबू मुहंमदला बक्षीस म्हणून चार अश्रफ्या देण्यात आल्या. अमानुल्लाखान हा चाकणचा ठाणेदार होता. तो आणि त्याचा भाऊ अताउल्ला यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. बादशहाने विचारले येथून चाकण किती लांब आहे. सतरा कोस लांब असल्याचे बादशहाना सांगण्यात आले. बादशहा म्हणाले "आम्ही त्या प्रदेशात छावणी करू".

बादशहाने आज्ञा केली की, कामबख्शाचा मीर बक्षी, नुश्रतखान याने काफिला अहमदनगर पर्यंत नेऊन पोहोचवला. त्याने सांगितले माझी आणि शाहजाद्यांची पथके तोरण्याहून आली नाहीत. ती आल्यावर मी उद्या जाईन. बादशहाने मान्य केले.

कोरखान्याचा दारोगा तहवुरखान याने विनंती केली की, चाळीस ढाली नव्याने विकत घेऊन मोर्चात पाठविण्यात आल्या होत्या. त्याची किंमत मिळावी, बादशहाने आज्ञा केली की, खजिन्यातून किंमत देण्यात यावी. ढाली परत मागवून घेण्यात येऊन कोरखान्यात ठेवण्यात याव्या.

[यापुढील नोंद दोन दिवसांपूर्वीची आहे म्हणजे आठ मार्च १७०४ ची आहे.]

काल रात्री बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. हमीदोपीनखान बहादूर व मतलबखान हे अमानुल्लाखानाच्या ठाण्याकडे गेले आहेत. रात्रीच्या वेळी त्यांनी तोरणा किल्ल्याच्या तटावर दोर टाकले होते. चोर (मराठे) सावध झाले. त्यांनी दोर कापले. यांत पाच-सहा माणसे ठार झाली. हे ऐकल्यावर बादशहानी, मुहंमद आरिफ कौल याच्याकडे अठ्ठावन ढाली दिल्या आणि म्हटले, ढाली हमीदोद्दीनखानाकडे तू पोहोचवून परत ये.

अनुक्रमणिका

बागलाण्याचा वाकेनवीस मुहंमद हाशिम याला सुरत बंदरचा वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले होते. तो हुकूम रद्द करण्यात आला.

फकीर मुहम्मद शायर (संभाजीराजांच्या दासीची मुलगी हिचे औरंगजेबाने याच्याशी लग्न लावून दिले होते.) याचा पुतण्या सद्रुद्दिन बेग याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

हैद्राबाद कर्नाटक वरील हकिकतीवरून कळले, ते असे, जगदेवच्या इलाख्यातील मुहम्मद मसउद वगैरे किल्लेदार हे आपल्या किल्ल्यातून दारुगोळा बाहेर काढून पाळेगार आणि इतर यांच्याकडे विकण्यासाठी पाठवतात. यासंबंधी मीरबख्शीचा नायब मतलबखान याने त्यांना ताकिदपत्रे पाठवावीत अशी आज्ञा करण्यात आली.

**अकरा मार्च १७०४**

गोविंद हरकारा याच्या तोंडून पुढील हकिकत कळली. नेमा (नेमाजी शिंदे) वगैरे बंडखोरांनी मालोदा हे गाव लुटून उध्वस्त केले. त्यांनी सिरोंज गावाला (माळव्यात) वेढा घातला. उम्दतुल्मुल्क खान फिरोजजंग हा सैन्य घेऊन तेथे पोहोचला. लढाई झाली बादशहाच्या कृपेने शत्रुपैकी अनेक लोकांना नरकाला पाठविण्यात आले. अनेकांना जखमी करण्यात आले. घोडे, नगारे, झेंडे, उंट, हत्ती हे शंत्रूंचे आपल्या हाती पडले हे हत्ती, घोडे वगैरे रुस्तुमखानाकडून शत्रूने घेतले होते पुष्कळ गुरे-ढोरे सोडविण्यात आली अशारीतीने आपल्याला मोठा जय मिळाला. शत्रू पराजित झाला आणि बुंदेलखंडाच्या वाटेने गढ (गढ मंडला) कडे पळून गेला. खान फिरोजजंग हे शत्रूला मार देत चालले आहेत. बादशहा म्हणाले, "फिरोजजंगाची सेवा मान्य झाली." बातमीचे पत्र हमीदुद्दीनखान यांच्याकडे पाठविण्यात आले. त्याने ते वाचून बख्शी रुहुल्लाखानाकडे पाठवावे अशी आज्ञा झाली.

काल दिवस मावळता शहाजादा मुहम्मद कामबख्श हा आपली मुले सुलतान मुहीउल्ला आणि सुलतान फिरोजमंद यांना बरोबर घेऊन बादशहाकडे आला. तोरणा फत्ते झाल्याबद्दल त्याने बादशहाचे अभिनंदन केले आणि नजरा दिल्या.

शमशीरबेग याचे लग्न नरकवासी रामा (राजाराम महाराज) याच्या मुलीशी ठरले होते. तो बादशहाकडे मुजरा करण्यासाठी आला. बादशहाने त्याला एक घोडा, खिलातीची वस्त्रे आणि मुंडावळ (सेहरा) या वस्तू त्याला दिल्या आणि त्याला आपल्या तंबूकडे जाण्यासाठी निरोप दिला.

**बारा मार्च १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. काल रात्री बादशहानी मुगलखान यांस बोलावू पाठविले. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे त्याने बादशहाच्या वास्तव्यासाठी कोरेगांव, चाकण, खेड आणि शिकरापूर या गावातील योग्य (तळासाठी) अशा जागांचे नकाशे तयार करून आणले होते. ते बादशहानी पाहिले. बादशहा म्हणाले, "अमानुल्लाखान याने खान मुहम्मद करावल व पन्नास गुर्जबर्दार यांना बरोबर घ्यावे आणि आमच्या छावणीसाठी खेड, चाकण, आणि शिकरापूर येथे जागा पहाव्या.

अनुक्रमणिका

गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार मातबरखान हा वारला होता. त्याच्या जागेवर माहुली (कल्याणजवळ) चा किल्लेदार आणि फौजदार याची नेमणूक करण्यात आली. माहुलीचा किल्लेदार आणि फौजदार मातबरखानाचा मुलगा अबु मुहम्मद खान याची नेमणूक करण्यात आली. दोघांच्या ही मनसबी वाढविण्यात आल्या. गुर्जबर्दाराच्या द्वारे त्यांच्याकडे खिलातीची वस्त्रे व नेमणूकीची फर्माने पाठविण्यात आली. त्यांना आपापल्या कामाच्या जागेवर पोहचवून यावे असे गुर्जबदारांना बजावण्यात आले.

किल्लेपट्टा (विश्रामगड) चा किल्लेदार व फौजदार लोदीखान याला बेनीशाहगड (राजगड) चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. पट्ट्याच्या किल्ल्यावर मानसिंग याची नेमणूक करण्यात आली. तोरण्याच्या किल्ल्यावर लोदीखानाचा मुलगा अब्दुला याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, “आम्ही तोरण्यावरून कूच करण्यापूर्वी अमीरुलउमरा यांनी पुढे जाऊन पुण्याच्या घाटाच्या पलिकडे लष्करच्या सुरक्षिततेची व्यवस्था करावी”

बादशहाने आज्ञा केली की, “तोरणा किल्ला फत्तेझाल्याबद्दल नगारच्यांना पंधरा हजार दाम बक्षीस म्हणून देण्यात यावेत. तोरणा किल्ल्याचे नाव बदलून मिफताहुलगैब असे ठेवण्यात आले होते ते आता बदलून फत्तेहुलगैब ठेवावे अशी आज्ञा करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, अहदियानचा तनबख्शी (तनखा वाटणारा बख्शी) बाकरखान याने काफिल्याबरोबर अहमदनगरला जावे.

**तेरा मार्च १७०४**

बादशहाने आज न्यायकचेरी (अदालत) केली. फराजखान्याचा अधिकारी अब्दुलहादी याला बादशहाने आज्ञा केली की, पेशखाना (आघाडीचे तंबू) उद्या पुढे रवाना करा.

बादशहाने मंदीखान (मिअदी खानही असू शकेल) यांस खिलातीची वस्त्रे देऊन त्याला जाण्यासाठी निरोप दिला. बादशहा त्याला म्हणाले.—“तोरण्याचा नवीन किल्लेदार लोदीखानाचा मुलगा अदुब्ला हा तोरण्याला येऊन पोहचेपर्यंत तुम्ही किल्ल्याबद्दल खबरदारी बाळगा. तो (अब्दुल्ला) आल्यावर किल्ला त्याच्या हवाली करून तुम्ही हुजुरात या.” अब्दुल्लाखानाच्या नावे नेमणुकीचे फर्मान काढण्यात आले. त्याचा मुलगा मुहम्मद हसन याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. तोरणा फत्ते झाल्यावर तोफखान्याचा अधिकारी (मिर आतिष) तरबियतखान हा किल्ला दखनच्या तोफखान्याचा अधिकारी मन्सूरखान याच्याकडे देऊन हुजुरात आला होता. तो बादशहाना भेटला.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला खानआलम याने बादशहाकडे विनंती अर्ज (अर्ज दाश्त) पाठविला होता, तो बादशहाच्या नजरेखालून गेला.

अबदालखान, अब्दुलअलीखान व वलीबेग यांनी तोरण्याच्या वेढ्यात तोफखान्याच्या खात्यात चांगली कामगिरी केली होती. यांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

लोमजी वगैरे पाच मावळे यांनी वेढ्यात चांगली कामगिरी केली. यापैकी लोमजीला एक हत्ती आणि अब्दुलकरीम वगैरेना खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मुहम्मद शफी याने पण अमानुल्लाखानाबरोबर वेढयात कामगिरी केली. त्याला एक घोडा आणि खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

सलीमबेग रोजबहानी याला गुळकोंड्याचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. खान-ए-आलमचा भाऊ अब्दुल कादर (संभाजी राजाना धरणारा मुकरबखान याचा मुलगा) याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

तोरणा किल्ला फत्ते करण्यात अमानुल्लाखान हा झटला याबद्दल त्याची मनसब वाढविण्यात आली.

सरबेग यसावल याने तोरण्याच्या वेढ्यात कामगिरी बजावली होती. त्याच्या मनसबीत सवलती देण्यात आल्या. जवाहिर बाजारचा शिरस्तेदार राजाराम याची मनसब वाढविण्यात आली.

मुगलखान हा बहादुरगडाकडे चालला होता. त्याने विनंती अर्ज पाठविला की. "हुजुरात पाठविण्यासाठी म्हणून मी बहादुरगड येथे खरबुजांची लागवड केली आहे. त्याचा सांभाळ करावा अशी आज्ञा बहादुरगडचा किल्लेदार अब्दुल गफुरखान याला देण्यात यावी. मी नवाब जीनतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी यांना मुजरा करण्यासाठी त्यांच्या देवडीवर जाईन त्यावेळी किल्लेदाराच्या माणसाने मला मना करू नये.

बादशहाने आज्ञा केली की, "बेगमसाहेब या गोष्टीची सूचना देतील."

कामगारखान (औरंगजेबाचा मावसभाऊ) हा औरंगाबादेत होता. तो हुजुरात येत होता. त्याची मनसब काढून देण्यात येऊन त्याला तीस हजार रुपयाचे वर्षासन नेमून देण्यात आले.

**चौदा मार्च १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. खान फिरोजजंग आणि मुहम्मद अमीनखान यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या. फिरोजजंगाच्या सैन्यात असलेले हामिदखान (फिरोजजंगाचा भाऊ) वगैरेंनी नेमाजी शिंद्यांच्या लढाईत कामगिरी केली होती. त्यांच्या हुद्याबद्दलची माहिती मागवावी अशी आज्ञा झाली. फराजखान्याचा अधिकारी अब्दुल हादी याने पेशखाना पुढे पाठविला असे कळले. काल बादशहांनी चाकणचा किल्लेदार अमानुल्लाखान याला एक हत्ती बक्षिस दिला आणि खेड व चाकण या ठिकाणी बादशहाच्या छावणीसाठी जागा पहावी, अशी त्याला आज्ञा केली त्याच्या बरोबर खान मुहम्मद करावल याला देण्यात आले. अमानुल्लाखानाने एक मजलेपर्यंत पेशखान्याच्या बरोबर जावे, अशी आज्ञा करण्यात आली. बेनीशाहगड (राजगड) येथील रसदेचा अधिकारी मुहम्मद हाशिम याची मनसब वाढविण्यात आली. बहादुरगडच्या तळाचा रक्षक मिर्झा सदरुद्दिन मुहम्मद खान याचा विनंती अर्ज बादशहाने नजरेखालून घातला.

**पंधरा मार्च १७०४**

दिवसाचा एक प्रहर झाला असता बादशहा हे तख्तेखां (वाहून नेणारे सिंहासनाचे वाहन) वर बसून निघाले. तोरणा किल्ल्याजवळून निघून ते एक कोस आणि दहा साखळ्या (जरेब) प्रवास करून दिवसाचा एक प्रहर आणि चार घटका झाल्या असता ते घाटाच्या पायथ्याशी असलेल्या आपल्या निवासस्थानात दाखल झाले.

आज दिवाणचे काम बंद होते. गाजीउद्दिनखान बहादूर फिरोजजंग याने सिरोंज (माळवा) ला वेढा घालणाऱ्या नेमाजी शिंद्यावर जय मिळवला होता. याबद्दल त्याला बादशहाने सिपाहसालार ही पदवी दिली. बादशहाने आज्ञा केली की, त्याला देण्यासाठी पुढील स्वस्तू वेगळ्या काढन ठेवण्यात याव्यात.—(१) खास खिलातीची वस्त्रे, (२) एक हत्ती, (३) एक रत्नखचित शिरपेच आणि एक कमरपट्टा. हामिदखानाच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

आबिदखान ऊर्फ शेख अहमद हा गुलशनाबाद (नाशिक) येथे तैनात होता. त्याला जैनुद्दिन अलिखान याच्या जागी माहुलीचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

दिना (दसा) वंजारी हा मराठ्याच्या कैदेत होता. तेथून सुटून तो आला. तो बादशहाना प्रवासात भेटला. त्याने सात आश्रफ्यांची नजर दिली. बादशहाने आज्ञा केली की, अमानुल्लाखान यांजकडे दहा घोडे देण्यात यावेत. अमानुल्लाखानाच्या सहकाऱ्यांपैकी ज्यांनी तोरण्याच्या विजयांत कामगिरी केली. त्यांना अमानुल्लाने हे घोडे द्यावेत अशी आज्ञा झाली. मेहदीखान याला नविन किल्लेदार येईपर्यंत तोरणा सांभाळण्याचे काम देण्यात आले होते. बादशहाने त्याला तीन हजार रुपये आणि दोन घोडे दिले.

सिद्दियाकूतखान (जंजिऱ्याचा सिद्दि) याने कलिंगडाच्या चार आणि खरबुजाच्या दोन करंड्या पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

काल गोविंदराव हरकारा याच्या बातम्यांवरून खालील हकिकत कळली.—"शव्वाल महिन्याच्या पंधरा तारखेस (१० फेब्रुवारी १७०४) खान फिरोजजंग हा बंडखोर सत्रसाल (छत्रसाल) याचा मुलगा हरी याच्यावर चाल करून गेला. तो धामोनी (सागरजवळ) व चंदेरीच्या वाटेने गढ या स्थळाकडे गेला. (धामगढ असे स्थळाचे नाव दिले आहे.) बारा कोस कूच करून त्याने मुक्काम केला. खान फिरोजजंगाचे आघाडीचे सरदार हे म्हणजे खंजरखान, खुशखबरखान, रहिमउद्दिनखान, व मल्हारराव वगैरे होते. ते शत्रूच्या पाठीवर होते. धामोनीच्या जवळ नेमा (नेमाजी शिंदे) वगैरे शत्रू हे गाफिल होते. वरील मोगल सरदार त्यांच्यावर तुटून पडले. शत्रूंपैकी अनेक जण ठार आणि अनेक जण जखमी झाले. हत्ती, घोडे, शस्त्रे, वगैरे विजयी सैन्याच्या हाती पडले. शत्रूचा पराजय झाला. आपल्या (मोगल) सैन्यापैकी अनेक जण ठार व जखमी झाले. शव्वालच्या सोळा तारखेस (११ फेब्रुवारी १७०४) खंजरखान वगैरेनी लुटीचा माल खान फिरोजजंगकडे आणला. पूर्वी खान फिरोजजंगाच्या फौजेत धान्याचा भाव रुपयाला दीड शेर होता. तो आता वीस शेर झाला आहे. खान फिरोजजंग याने आपल्या खंजरखान वगैरे सरदारांना सांगितले, "तुमच्यापैकी प्रत्येकावर कृपा व्हावी अशी मी बादशहांना विनंती करीन" बादशहा म्हणाले, "फिरोजजंगाची सेवा मान्य झाली".

**सतरा मार्च १७०४**

अनुक्रमणिका

आज बादशहाने न्याय कचेरी केली. पेशखाना हा मागील मुक्कामावरून आला होता. तो पुढे पाठविण्याची आज्ञा झाली. मन्सूरखान हा तोरण्याहून येऊन बादशहांना भेटला. बादशहाच्या आज्ञेने त्याने तोरणा किल्ला हा मेहदीखान यांचकडे दिला होता. मुहम्मद अमीनखान बहादूर याला घाटाच्या मार्गाच्या रक्षणासाठी पुढे पाठविण्यात आले. भूपतराम उर्फ मुहम्मदअलीखान यांची मुले मुहम्मद आकरम व मुहम्मद आस्लम यांना मनसबी देण्यात आल्या. (भूपतराम हा नाशिक - कल्याणचा अधिकारी मातबरखान याचा वकील असून तो मुसलमान झाला झोता.) दिलेरखान हा खान फिरोजजंगाच्या सैन्यात तैनात होता. त्याला सात हजारी मनसब होती. मनसबीत वाढ करण्यात आली.

रुहुल्लाखान याने विनंतीअर्ज पाठविला की, “येथे सरकारी कामे तुंबली आहेत. कोणाचीही नेमणूक झाल्यास बरे!” बादशहाने आज्ञा केली की, “विजापूर-कर्नाटकचा फौजदार खुदाबन्दाखान याला लिहून विचारावे. त्याला मान्य असल्यास छावणीत त्याची नेमणूक करण्यात येईल. राव गोपाळसिंग याला मदत म्हणून दोन हजार रुपये देण्याची आज्ञा झाली.

बादशहाने आज्ञा केली की, “खान फिरोजजंगकडे पाचशे घोडे पाठविण्यात यावेत. नेमा (नेमाजी शिंदे) यांचबरोबरच्या लढाईत ज्यांनी चांगली कामगिरी केली त्यांना हे घोडे देण्यात यावेत.

**अठरा मार्च १७०४**

आज बादशहा तोरण्याजवळच्या घाटाखालून निघाले. ते तख्तेखांवर स्वार होते. सव्वादोन कोसाची मजल मारून दुपारच्या सुमारास ते बक्षिंदाबख्श (सिंहगड) किल्ल्याच्या पलिकडे आले. किल्ल्याचा (सिंहगड) किल्लेदार देवीसिंग याने किल्ल्यावरील तोफांना सरबत्ती दिली. अमीरुल्उमरा (मुख्यप्रधान) वगैरे बादशहांना प्रवासात भेटले. मुहम्मद अमीनखान बहादूर हाही त्यांना भेटला. बादशहाने फकीर मुहम्मद शायर खानी याला होनाची एक पिशवी बक्षिस दिली.

**एकोणवीस मार्च १७०४**

सईदखान हा नुसरतजंग (जुल्फीकारखान) याच्या फौजेत तैनात होता.त्याची मनसब वाढविण्यात आली. त्याची दोन मुले महम्मद आसफ व मुहम्मद मसूद यांच्याही मनसबी वाढविण्यात आल्या.

**वीस मार्च १७०४**

बादशहाने आज्ञा केली की पेशखान्याचे तंबू मागच्या मजलेवरुन आले की, पुढे पाठविण्यात यावेत.बादशहाने आज बख्शीरुहुल्लाखान आणि मतलबखान यांना बोलावू पाठविले. बादशहांना कळविण्यात आले की, रुहुल्लाखान आजारी आहे. मुजऱ्यासाठी येऊ शकत नाही.

ठाणेदार ख्वाजाखान (वाई प्रांताचा) याने विनंती अर्ज पाठविला की, “माझा मुलगा हुजुरात आहे त्याला माझ्यापाशी तैनात केल्यास योग्य होईल.” विनंती मान्य करण्यात आली. काल रात्री बादशहांनी ख्वाजाखानाच्या मुलाला बोलावू पाठवून त्याला एक हत्ती आणि दोन हजार रुपये देऊन त्याला आपल्या बापाकडे पाठविले.

अनुक्रमणिका

मातबरखान (कल्याण-भिवंडीचा दिवंगत फौजदार) याच्या बहिणीचा मुलगा सैफुल्ला याला बऱ्हाणपूरचा बख्शी व वाकेनवीन म्हणून नेमण्यात आले.

इरादतखान हा नबीशाहगड (राजगड) चा किल्लेदार होता. त्याला हुजूरात बोलावण्यात आले. त्याचा नायब म्हणून देवीसिंगकडे राजगड किल्ला सांभाळण्याचे काम देण्यात आले.

रसुलाबाद उर्फ शिवापूरचा ठाणेदार हश्मतुल्ला हा होता. त्याला बक्षिंदाबख्श (सिंहगड) चा देवीसिंगचा नायब म्हणून नेमण्यात आले. बादशहानी फर्मान आणि खिलतीची वस्त्रे ख्वाजा मिर्झा गुर्जबर्दार याच्याकडे दिली. आणि त्याला आज्ञा केली की, “या वस्तू अहमदनगर येथे सय्यद जाफर पिरजादा याच्याकडे नेऊन द्या.” बादशहानी निरुबेग वगैरे दोन गुर्जबर्दार यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—— “बऱ्हाणपूर परिसरात चोर (मराठे) पसरले आहेत. माळव्याचा सुभेदार शाहिस्ताखान (थोरल्या शाहिस्ताखानाचा मुलगा) हा आहे. शत्रूच्या पारिपत्यासाठी तुम्ही जाऊन शाहिस्ताखानाला माळव्याहून बऱ्हाणपूराकडे पोहोचवा.”

मांडवगडचा फौजदार नवाजिशखान याला मांडवगडहून काढून शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत पोहोचवून या.

गुजरातचा सुभेदार शहाजादा आजम (औरंगजेबाचा मुलगा) हा होता. त्याच्यातर्फे त्याचा नायब म्हणून सरअंदाजखान हा अजमीर येथे काम करीत होता. ही नेमणूक बादशहाने केली आणि त्याची मनसब वाढविली.

गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनूल आबिदिनखान याने बादशहाकडे पुढील विनंती अर्ज पाठविला. “अबू मुहम्मदखान याने आपण मरहूम मातबरखान याचे पुत्र आहोत असे हुजुरात सांगून मनसब मिळविली आहे. पण अबू मुहम्मदखान हा मातबरखानाचा दत्तक मुलगा आहे”. बादशहाने आज्ञा केली की, “अबु मुहम्मदखान आणि मरहूम मातबरखान याचे कारभारी यांना हुजुरात आणावे.” “माहुलीचा किल्ला आबिदखानाच्या हवाली करा.” असे फर्मान जैनुद्दिन अलिखानाकडे पाठविण्यात आले. बादशहाने ताकिद केली की, गुर्जबरदारांनी आबिदखानाला गुलशनाबादेहून (नाशिक) माहुलीकडे पोचवावे आणि जैनुद्दिन अलिखानाला माहुलीहून गुलशनाबादच्या ठाणेदारीवर पोचवावे.

खान फिरोजजंग याने नेमा (नेमाजी शिंदे) वर जय मिळविला होता. त्याच्या पुढील सहकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली ती अशी.—(१) राजा इंद्रसिंग, खिलातीची वस्त्रे व एक हत्ती, तीन हजारी मनसबीत वाढ, (२) फरजामखान, खिलातीची वस्त्रे व घोडा, मनसबीत वाढ.

खान फिरोजजंगच्या अधिकाऱ्यांत थकलेली पगारबाकी वाटण्यात यावी, अशी आज्ञा करण्यात आली.

**एकवीस मार्च १७०४**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते. सकाळी बादशहाना कळविण्यात आले की, बख्शी रुहुल्लाखान हा आजारी आहे. बादशहाच्या आज्ञेने हमीदुद्दीन खान बहादूर आणि हकीम हाजकखान यांनी जाऊन बख्शीरुहुल्लाखान याला पाहून यावे. त्याप्रमाणे ते दोघे जाऊन आले. हमीदुद्दीनखानाने येऊन सांगितले की, रुहुल्लाखानाचा आजार वाढला आहे. बादशहांनी आपल्या वास्तव्याजवळ असलेल्या पवित्र अवशेषांचा (आसार) प्रसाद (तबररुक) हाफिजबख्तावर यांच्या हस्ते पाठवून त्याला आज्ञा केली की, “हा प्रसाद बख्शीरुहुल्लाखानाला खाऊ घाला. रुहुल्लाखानाला म्हणावे की, आसारशरीफ (पवित्र अवशेषगृह) च्या सेवकांसाठी दोन हजार रुपये पाठवून द्या.” (औरंगजेबाकडे कोणीतरी पैगंबराच्या काही वस्तू, अवशेष, आणून दिल्या होत्या. त्यांना आसारशरीफ म्हणजे पवित्र अवशेष असे म्हणत. औरंगजेब हा नेहमी त्या वस्तुंसाठी वेगवेगळे निवासस्थान तयार करून छावणीत ठेवीत असे. तो त्या अवशेषांचे मोठ्या भक्तीभावाने दर्शन घेई. तेथे कुराण-पठण आदि कार्यक्रम चालत.) रुहुल्लाखान याने आज्ञेप्रमाणे केले. याशिवाय त्याने (रुहुल्लाखानाने) आपल्यातर्फे एक हत्ती आणि एक घोडा हे दान म्हणून दिले. दुपारच्या वेळी बादशहाना कळविण्यात आले की, रुहुल्लाखानाचा आजार कमी झाला. (पोटशुळाची व्यथा असावी) पण अशक्तपणा आहे. उद्या येथेच मुक्काम करावा अशी त्याची विनंती आहे. बादशहाने मान्य केले.

### बावीस मार्च १७०४

बादशहाने आज न्यायकचेरी केली. आज अमीरुल्उमरा (मुख्य प्रधान) हे बादशहांना भेटले. परत जाताना रुहुल्लाखानाची प्रकृती पाहून जा असे बादशहाने त्यांना सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी केले. रुहुल्लाखानाने अमीरुल्लउमराच्या तंबूवर एक हत्ती आणि चार घोडे पाठविले. पण ते म्हणाले या वस्तू आम्ही तुम्हाला माफ केल्या आहेत.

बादशहाना कळविण्यात आले की, मुहम्मद अमीनखान बहादूर याचा भाऊ नजीरखान हा वारला.

### तेवीस मार्च १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

### चोवीस मार्च १७०४

आज दिवसाचा एक प्रहर आणि एक घटक झाली असता, बादशहा हे बक्षिंदाबख्श किल्ल्याच्या (सिंहगड) पायथ्याशी असलेल्या आपल्या निवासस्थानाहून तख्तेखांवर बसून निघाले. पावणेदोन कोसाची मजल मारुन ते किल्ल्याच्या पलीकडे पोहोचले. पुढील मंडळी ही बादशहांना त्यांच्या प्रवासात भेटली.— (१) कामयाबखान, (२) शेख अब्दुल कादर, (३) फिदायीखानाचा मुलगा मुहम्मद सलाह, (४) मिरमेहमूद, (५) मुहम्मदवासे, (६) मुहम्मदमुराद, (७) खान मुहम्मद.

तरबियतखान हा पिछाडीला होता तो येऊन बादशहाना भेटला. खान फिरोजजंग आणि त्याचे सहकारी यांना नेमा (नेमाजी शिंदे) वर विजय मिळवल्याबद्दल पुढीलप्रमाणे बक्षिसे पाठविण्यात आली.— (१) फिरोजजंग : घोडा, सोन्याच्या हाजासहित, (२) हामिदखान (फिरोजजंगाचा भाऊ)—खिलतीची वस्त्रे व हत्ती, (३) वहीमुदहीनखान (भाऊ)—खिलतीची वस्त्रे, हत्ती व मनसबीत वाढ, (४)

सरअंदाजखान—खिलतीची वस्त्रे, हत्ती व मनसबीत वाढ. पुढील मंडळीना मनसबीत वाढ देण्यात आली—फरजामखान, खंजरखान, महामदखान, अब्दुलनबीखान, रियायतखान, खुशखबरखान, असमाजी (याला चार हजारी मनसब होती), अर्जुनसिंग, दिलेरखान, जानोजी (पाच हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती), मल्हारराव याला पाच हजार जात व पाच हजार स्वार अशी मनसब होती), राजा इंद्रसिंग, ख्वाजा इत्तिमास.

### सव्वीस मार्च १७०४

हमीदुद्दीनखान याने बादशहाच्या पहाणीसाठी पाग्यातून घोडे आणले होते. बादशहाने त्यापैकी एक घोडा सहा हजार रुपयाचा, एक चार हजार रुपयाचा आणि एक तीन हजार रुपयाचा असे तीन घोडे शहजादा आजम (गुजरातचा सुभेदार) याच्यासाठी निवडले. एक घोडा तीन हजार रुपये किंमतीचा खान फिरोजजंग याच्यासाठी निवडला. त्यांच्याकडे पाठविण्यासाठी हे घोडे वेगळे काढून ठेवावेत अशी बादशहाने आज्ञा केली. मुलतानचा सुभेदार शहाजादा मुईजोद्दिन (औरंगजेबाचा नातू, मोठ्या मुलाचा मुलगा) याने डाळिंबाच्या चार करंड्या पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

बादशहाच्या छावणीसाठी योग्य जागा निवडावी म्हणून खान मुहम्मदकरावल व बहरावर खूषमंजिल हे दोघे खेड (आता राजगुरुनगर, जिल्हा पुणे) येथे गेले होते, ते परत आले त्यांनी सांगितले की, “खेड हे भीमेच्या काठी आहे. छावणीची जागा भीमेच्या पलिकडच्या काठावर आहे. खेड येथून साडेतेरा (१३½) कोसावर आहे आणि येथून खेडला पोहचण्यासाठी सात मजला असे मुक्काम होतील.

### सत्तावीस मार्च १७०४

मागाहून आलेला पेशखाना पुढे पाठवावा अशी बादशहाने आज्ञा केली.

शहाहुसेन दरवेश याला बादशहाने एक हत्ती अडीच हजार रुपये किंमतीचा बक्षीस म्हणून दिला. (दरवेश म्हणजे साधुपुरुष).

बादशहाने आज्ञा केली की, हमीदुद्दिनखान आणि खानाजादखान यांनी बख्शीरुहुल्लाखानाकडे जाऊन त्याच्या प्रकृतीची चौकशी करावी. त्याप्रमाणे ते जाऊन चौकशी करून आले. ते म्हणाले, “रुहुल्लाखान हा फार आजारी आहे. तापामुळे त्याला फार अशक्तपणा आला आहे. बादशहाने आज्ञा केली की, “हकीम हाजकखान याने जाऊन रुहुल्लाखान याच्यावर औषोधोपचार करावेत.

### अठ्ठावीस मार्च १७०४

आज हकीम हाजकखानाने येऊन बादशहाना सांगितले की, रूहुल्लाखानाच्या आजारात उतार होतो आहे. बादशहानी त्याला रूहुल्लाखानाकडे औषधोपचारासाठी पुन्हा पाठविले.

तिसरा बख्शी याचा नायब खानाजादखान याने हमीदुद्दिनखानाबरोबर पाठविण्यासाठी पाच हजार स्वारांच्या सैन्याची यादी (योजना, तुमार) तयार केली होती. ती पाहून बादशहा म्हणाले “मिफताहगड

वगैरे किल्ले घेण्याच्या वेळेस मरहूम बख्शी बहरामंदखान याच्याबरोबर किती सैन्य देण्यात आले होते" खानाजादखानाने उत्तर दिले की, "सहा हजार स्वारांचे सैनिक" यांवर बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली, "राजमाचीगड (लोणावळ्याजवळ) चा किल्ला जिंकून घेण्यासाठी हमीदुद्दीन खानापाशी सहा हजार चारशे स्वार अशी सैन्याची यादी (तुमार, मस्टर रोल) तयार करा. या सैन्यात तरबियतखान मिर आतिष, अमानुल्लाखान, अताउल्लाखान आणि शिवसिंग वगैरे मंडळी असतील". त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली., "गुलशनाबाद (नाशिक) येथील ठाणेदार जैनुद्दिन अलिखान आणि त्या प्रांतातील ठाणेदार व फौजदार यांनी आपल्याजवळ असलेल्या पथकांपैकी निम्मी पथके हमीदुद्दीनखानाच्या सैन्यात आणावीत. सिद्दी अंबर (सिद्दी याकूतखानाचा दत्तक मुलगा) याने आपले सैन्य हमीदुद्दीनखानापाशी द्याव आणि स्वतः हजुरात रहावे. बादशहाने आज्ञा केली की जास्तीच्या तोफा पूनागड (पुरंदर) येथे पोहचवण्यात याव्या. तोफखाना मात्र बादशाही छावणीबरोबर राहील.

शिवापूरचा ठाणेदार अज्मतुल्ला याला मनसब देण्यात आली. तरबियतखानाच्या सैन्यातील भिकारीदास (गुरुदासाचा मुलगा) याला मनसब देण्यात आली.

**बारा एप्रिल १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. आघाडीचे तंबू पुढे पाठवण्यात यावेत अशी आज्ञा झाली. बहरावर खूषमंजिल याने विनंती केली की, आज्ञेप्रमाणे मी नदीच्या (भीमा) काठावर बादशाही छावणी व बादशहांचे निवासस्थान यांच्यासाठी खेड येथे जागा पाहून आलो आहे. कोणालातरी पाठवून ती जागा पाहून येण्यास आज्ञा व्हावी. बादशहानी हमीदुद्दीनखान व मतलबखान यांना आज्ञा केली की, "तुम्ही जाऊन जागा पाहा आणि छावणीची आखणी करून या." मुहम्मद अमीनखान याने चार चोर (मराठे) कैद करून आणले होते. बादशहाच्या आज्ञेने खानाजादखान याने त्यांना बादशाही छावणीचा कोतवाल सरबहराहखान यांजकडे पाठविले. बादशहाची आज्ञा होती की, त्यांपैकी दोघांना ठार मारण्यात यावे.

मरहूम रुहुल्लाखान (बख्शी रुहूल्लाखान हा खेडकर बादशहाचा प्रवास चालू असताना वाटेत मरण पावला.) त्याच्या जड-जवाहिरांचा तपशील बादशहानी पाहिला. रुहल्लाखानाचा कारभारी ख्वाजाइकबाल याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, खान सामान याचा कारभारी फैजुल्ला आणि मिर्झा सद्रुद्दिन मुहम्मद खान यांनी बहादूरगडाहून हुजुरात यावे. आजमगड (पुरंदर) चा किल्लेदार जानबादखान याने विनंती अर्ज पाठविला की, "बादशहा माझ्या हाताखालील प्रदेशातून (पुणे जिल्ह्यातून) प्रवास करीत आहेत. हुजुरात येऊन विनंती करण्याची मला परवानगी असावी." बादशहाने आज्ञा केली की, "पुरंदर किल्ल्यावरील तोफखान्याचा अधिकारी (दारोगा) मिरमुहम्मद याला किल्ल्यावर आपली कामे सांभाळण्यास देऊन तुम्ही हुजुरात यावे." बादशहांना कळविण्यात आले की, "मंगळवेढ्याचा अमीन फौजदार चिंतू चिमणा हा मरण पावला."

**तेरा एप्रिल १७०४**

अनुक्रमणिका

आज बादशहा चाकणहून तख्तेरवांवर बसून निघाले. (सिंहासन—वजा वाहून न्यावयाचे वाहन, रवां म्हणजे वाहते तख्तेरवां म्हणजे तख्तवाहन) दोन कोसाची मजल मारुन ते खेडला येऊन पोहोचले. काल हमीदुद्दीनखान आणि मतलबखान हे बादशहाच्या आज्ञेने छावणीसाठी आणि बादशहाच्या निवासस्थानासाठी भीमेच्या पलिकडे जागा पाहून आले होते. त्यांनी येऊन अर्ज केला की नदीच्या पलीकडे छावणीसाठी जागा चांगली आहे. बादशहाने आज्ञा केली की, "पेशखाना बरोबर रहावा." काल बादशहानी सरफराजखान याला बोलावू पाठविले, त्याला आज्ञा केली की, अहमदनगरला जा आणि तेथून काफिला घेऊन या." बादशहा म्हणाले, "आम्ही उद्या येथे मुक्काम करू, पेशखाना तसाच राहू द्या."

काल बादशहाना कळविण्यात आले की, "चोरांची माणसे (मराठे) यांनी चाकण येथे येऊन गुरेढोरे लुटून नेली. तेथील किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान हा त्यांच्या पाटलागावर गेला आणि त्याने त्यांचे पारिपत्य करून गुरेढोरे सोडविली." पुढील मंडळी बादशहाना प्रवासात भेटली— (१) अजीजखान, (२) सरकारखान, (३) गोपाळराय चौधरी, (४) यक्काताजखान वगैरे.

बादशहाने आज्ञा केली की, लोदीखान येईपर्यंत मुहम्मद कारुण याने शाहगड किल्ल्याबद्दल खबरदारी बाळगावी.

बादशहाने आज्ञा केली की, कडूस (पुणे जिल्हा) चा ठाणेदार निजामराव याने तरबियतखानाबरोबर राहून काम करावे. कामीलबेग याला रतनगडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

मुहम्मद अमीनखान बहादूर याने विनंती केली की, "आज्ञा होत असेल तर नवाब जीनतुन्निसा.बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिच्या देवडीवर मुजऱ्यासाठी जाईन." विनंती मान्य करण्यात आली.

**चौदा एप्रिल १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. काल हमीदुद्दिनखान व मतलबखान हे छावणीसाठी जागा पाहून आले होते. त्यांनी येऊन सांगितले की, निवडलेली जागा चांगली आहे, पण बादशहाच्या निवासस्थानापासून नदी (भीमा) ही एक कोसावर आहे. लोकांना पाण्याचा त्रास हाईल. भेलगावजवळ (बहलगाव) जागा आहे. तीही नदीपासून लांबच आहे. बादशहा म्हणाले, "पुन्हा जा, चार/पाच कोसात जागा पाहून या, काल दिवस मावळता हमीदुद्दीनखान व मतलबखान जागा पाहून आले. ते जागेचा नकाशा करवून घेऊन आले होते. त्यांनी सांगितले की, जागा खडकाळ आहे. तेथून चाकण अर्धाकोस राहील. जागा काही उंच सखल अशी आहे. हे ऐकून बादशहा नाराज झाले. ते म्हणाले, 'भीमा जेथे वळण घेते तेथे जागा पाहून या."

फकीर मुहंमद शायर याच्या भाऊबंदांना ख्वाजा अब्दुल कादर याच्याकडे देण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

**पंधरा एप्रिल १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे छावणीसाठी जागा पाहावी म्हणून हमीदोद्दीनखान व मतलबखान हे भीमा नदीकडे गेले होते. भीमेच्या पलीकडे सव्वाकोसावर त्यांनी छावणीसाठी जागा निवडली. त्यांनी तो मजकूर बादशहाकडे लिहून पाठविला. रात्री बादशहाने त्यांना बोलाविले आणि त्यांना म्हटले की, उद्या सकाळी पेशखाना पाठवा. तुम्ही त्यांच्याबरोबर जा. तेथे छावणी आणि चबुतरे (ओटे) यांची उभारणी करवा. तुम्ही आपल्या बरोबर बेलदार आणि लाकूड तोडे यांचा अधिकारी, फिदाईअमान याचा मुलगा कादरअमान याला घेऊन जा.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १६ एप्रिल इ. स. १७०४ ते १३ मे १७०४

### सोळा एप्रिल १७०४

आज बादशहाने न्याय कचेरी केली. दक्षिणच्या तोफखानाचा अधिकारी (दारोगा) मन्सूरखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली. त्याला बेनी शाहगड (राजगड) व फुतुहुल्ल गैब (तोरणा) या किल्ल्याच्या संरक्षणासाठी पाठविले. बादशहा त्याला म्हणाले—"या किल्यावर लोदीखान वगैरे किल्लेदार नेमले आहेत, ते येऊन रुजू होईपर्यंत किल्ल्याचा सांभाळ करावा आणि किल्ल्यातील मोडतोड झालेला भाग नीट करून आणि किल्ल्यात रसद आणि सरंजाम याचा साठा करून परत यावे. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद जफर याची मनसब वाढविण्यात आली आणि त्याला बापाबरोबर पाठविण्यात आले.

खान फिरोजजंग याच्या फौजेचा दिवाण मुहंमद काजिम याची मनसब वाढविण्यात आली बादशहाने अजीजाखानाची आठवण केली. मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) तहब्बूरखान याने विनंती केली कीं, अजीजखान हा हमीदोद्दीनखानाच्या बरोबर पुढील मजलेवर गेला आहे. बादशहा म्हणाले—"आघाडीच्या फौजेतील सैनिकांना हमीदोद्दीनखानाकडे पाठवून द्या. आणि त्या पथकातील सैनिकांच्या नावाची प्रत (तूमार) बक्षीच्या कचेरीतून घ्या."

### सतरा एप्रिल १७०४

आज बादशहा सकाळी आपल्या निवासस्थानातून निघाले. त्यावेळी सकाळचा एक प्रहर झाला होता. ते तत्खतेखांवर स्वार झाले. सव्वा कोसाची मजल मारून ते एक प्रहर पाच घटिका झाल्या असता माकरी (खेड्याचे नाव कदाचित पागरी असावे) या गावाजवळील आपल्या निवासस्थानात दाखल झाले. बादशहाच्या प्रवासात (१) अमानुल्लाखान, (२) मरहूम अलावर्दीखान याचा नातू मुहंमद मीर, (३) शाहजादा कामबक्ष याचा कर्मचारी मुहंमद रहीम, (४) छावणीतील सावकार गोपाळसिंग यांनी बादशहांना भेटून त्यांनी भेटीच्या वस्तू दिल्या. बादशहाने पुढील मंडळींना मनसबी दिल्या आणि काहीच्या वाढविल्या.—भास्करराव हरकारा यांच्या मुलांचा नायब कल्याण, मरहूम रुहुल्लाखानाची माणसे मुहंमद बाकरबक्षी, कृपाराम वकील, माधोराम सोमात, जमीलबेग आणि खोजा याकूत. सामानगड (कोल्हापूर जिल्हा) चा माजी किल्लेदार नेमत आला अब्दुल रहमानच्या ऐवजी रतनगडचा किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. गुलबर्ग्याचा किल्लेदार नूरुद्दीनखान हा होता. त्याला विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याचा नायब म्हणून सैफखान याच्या जागेवर नेमण्यात आले. सैफखानाला गुलबर्ग्याचा फौजदार व किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

### अठरा एप्रिल १७०४

बादशहा यांनी मीर बक्षीचा नायब मतलबखान याला म्हटले— "दुय्यमबक्षीचे काम बंद पडले आहे. त्या खात्याचे चे अर्ज वगैरे ठेवावयाचे ते काम तुम्ही करा. याशिवाय अजून काही काम निघाल्यास ते तुम्ही

अनुक्रमणिका

करावे. यावर मतलबखानाने बादशहाना नम्रपणे मुजरे केले. दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान याचा नायब म्हणून त्याचा मुलगा मुहंमद जफर याची नेमणूक करण्यात आली."

विजापूर, कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले. त्याप्रमाणे विजापूरच्या सुभेदाराच्या नावे फर्मान आणि दाऊदखानाच्या नावे आज्ञापत्रे (हस्‌बुलहुकम) ही पाठविण्यात आले. इनायतउल्लाखान (बादशहाचा चिटणीस) याच्या विनंतीवरून त्याच्या खात्यातील हिशेब तपासनीस (मुस्तोफी) गिरिधारीलाल याची मनसब वाढविण्यात आली.

कायनातखान याने विनंती केली की, दारुगोळा पुण्याकडे पाठविण्यासाठी (ठाणे मुहियाबाद हे पुण्याचे नाव) तयार करण्यात आला आहे. संरक्षक पथक देण्यात यावे. मतलबखानाने ती व्यवस्था करावी अशी आज्ञा करण्यात आली.

गुर्जबर्दारांनी अबदुल अजीजखान जुन्नरचा फौजदार व किल्लेदार यांच्याकडून मावळे सैनिक आणले होते. त्यांना (मावळे) अमानुल्लाखानाकडे पाठवावे अशी आज्ञा झाली.

हैद्राबादच्या भोवतालच्या भागातून धान्याची रसद आणण्यासाठी हाजी जोराकासी याची नेमणूक झाली होती. ती रद्द करण्यात आली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—रुद्रपंडीतचा भाऊ आणि मंगळवेढ्याचा अमीन चिंतो चिमणा हा मरण पावला आहे. त्याचा भाऊ सुतकात बसला आहे. बादशहाने आज्ञा केली की, त्याला एक दुखवट्याची शाल देण्यात यावी आणि बाबू पंडित याने त्याला सुतकातून उठवून हुजुरात आणावे. त्याप्रमाणे करण्यात आले.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—एका गुर्जबर्दाराने मुहंमद अमीनखान बहादूर याला बहादुरगडला पोहोचवावे आणि तेथून मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याला हुजुरात घेऊन यावे.

बादशहाने हाफिज सरकारखान याला आज्ञा केली की, "खेडपासून नऊ लाख उंबऱ्यापर्यंत आठ ठाणी बसविण्यात यावी."

"गुलबर्ग्याचा नवीन किल्लेदार व फौजदार याची मनसब वाढविण्यात यावी."

बादशहाने आज्ञा केली कीं, "शिकारीसाठी राखून ठेवलेले जंगल (रमना शिकारगृह) याचे रक्षण करण्यात यावे व त्यासाठी शंभर बंदूकची नेमण्यात यावे.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.—"छावणीमधे अदालत (न्याय कचेरी) च्या समोर गंज व सराफा ही कायम करण्यात आली आहेत. पण तिथे पाण्याचे दुर्भिक्ष फार आहे. विनंती अशी कीं, हे दोन्ही (गंज व सराफा) हे मौजे खेडच्या दिशेने छावणीच्या मागे कायम करावे." बादशहाने विनंती मान्य केली.

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली कीं, छावणीत बेलदारांनी विहिरी खणाव्या.

**एकोणीस एप्रिल १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**वीस एप्रिल १७०४**

बागलाणचा फौजदार आणि सुरतेचा कारभारी नजाबतखान याची मनसब वाढविण्यात आली.

चाकणचा बक्षी व वाकेनवीस गुलाम मुइयोद्दीन याची मनसब वाढविण्यात आली.

खान फिरोजजंग याच्या विनंतीवरुन मोहिमेच्या खर्चापैकी म्हणून त्याला दहा हजार रुपये द्यावे, अशी आज्ञा करण्यात आली.

कडूस (पुणे जिल्हा) चा ठाणेदार निजामराव याला अमानुल्लाखान याजबरोबर तैनात करण्यात आले. निजामराव याला एक हजार जात व सहाशे स्वार अशी मनसब होती.

पट्टा किल्ल्याचा माजी किल्लेदार लोदीखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला:—

> "माझी नेमणूक नबीशहागड (राजगड) चा किल्लेदार म्हणून झाली आहे. माझ्या कुटुंबाच्या योगक्षेमासाठी केनवल (?) चा परगणा माझ्याकडे लावून देण्यात आला होता, पण अलीकडे तो परगणा किशगसिंग या माजी जहागीरदाराला देण्यात आला आहे. तो पूर्वीप्रमाणे मला तनखा जागीर म्हणून देण्यात यावा. मी माझ्या कुटुंबियांना तेथे ठेवून हुजूरात येईन आणि निरोप घेऊन आपल्या कामावर (राजगडाच्या किल्लेदारीवर) जाईन. माझी दुसरी विनंती अशी आहे.—मातबर खान (कल्याण, भिंवंडी आणि नाशिकचा फौजदार) याच्याकडे सिन्नर (नाशिक जिल्हा) चा परगणा होता. मातबरखान मरण पावला आहे. त्यामुळे सिन्नरचा परगणा आता सरकारात पायबाकी (इतरांना देण्यासाठी मोकळा) म्हणून आला आहे. तो मला देण्यात यावा." बादशहाने आज्ञा केली की, केनवलचा परगणा लोदीखानाला देण्यात यावा पण सिन्नरचा परगणा पायबाकीच रहावा. पण त्याबरोबरच लोदीखानाला तो व्यवस्थेसाठी देण्यात यावा.

**एकवीस एप्रिल १७०४**

बादशहाना कळविण्यात आले की, झुल्फिकारखानाचा मुलगा हयातउल्ला हा दोन महिन्यांचा होता. तो वारला.

**बावीस एप्रिल १७०४**

अनुक्रमणिका

बाबू पंडीत रुद्रा हा बिजापूर सुभ्याचा कानूनगो होता. त्याचा भाऊ चिंतो चिमणा हा वारला. त्याच्या सुतकातून त्याला बाहेर काढून बादशहाने त्याला हुजुरात बोलावून त्याला दुखवट्याची शाल दिली.

शेख गुलाम मुहंमद याने शिवदत्त याला हुजुरात आणले—तो मुसलमान झाला. त्याचे नाव अब्दुल्ला ठेवण्यात आले. त्याला मनसब देण्यात येऊन खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मरहूम कहुल्लाखान यांची मुले खलीलउल्लाखान व ऐतिकातखान यांना बादशहा म्हणाले “तुम्ही दुपारच्या नमाजासाठी माझ्या हुजुरात येत चला. सियातदखान (हा पुढे अहमदनगरचा किल्लेदार झाला) याला न्यायखात्याचा प्रमुख (सदर) मुहंमद अमीन खानबहादुर याचा नायब म्हणून नेमण्यात आले. सहुल्लाखानाच्या मृत्यूबद्दल त्याचा भाऊ नेमतउल्लाखान (बंगालमध्ये अधिकारी) याच्याकडे दुखवट्याची वस्त्रे पाठविण्यात आली.

मुहमद मुरादखान (इतिहासकार खाफीखान याचा मित्र) याचा भाचा सुल्तान हसन याला बादशाही छावणी (खेड जवळील) आणि राजमाचीचा किल्ला या मधील प्रदेशाची ठाणेदारी देण्यात आली. त्याला निरोप देताना बादशहान आज्ञा केली की, शाहजादा कामबक्षाच्या सैनिकापैकी दीडशे स्वार व पन्नास पायदळ सैनिक हे सुलतान हसन याजबरोबर देण्यात यावे याशिवाय वीस मनसबदारही त्याच्याबरोबर देण्यात यावे.

मुहंमद रशीद हा नुकताच विलायतेहून (मध्य आशिया) हुजुरात आला होता. त्याला नव्याने मनसब देण्यात आली.

गोपाळसिंग याला कौलास (आन्ध्र प्रदेश) ची किल्लेदारी देण्यात आली. ती शाहजादा कामबख्श याच्या विनंती वरून, त्याला खिलातीची वस्त्रे द्यावी अशी आज्ञा करण्यात आली. गोपाळसिंग याला दोन हजार जात आणि आठशे स्वार अशी मनसब होती.

मरहूम सहुल्लाखान याचा मालमत्तेपैकी सहा घोडे बादशहाच्या पाहणीसाठी आणण्यात आले. याची योग्य निगा राखावी अशी बादशहाने आज्ञा केली.

विजापूरचा सुबेदार चीनकुलीजखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले——“मुहंमद सलीम हा जरातीखान (किल्ल्याचे नाव लागत नाही) किल्ल्याचा किल्लेदार व फौजदार आहे.”

अलीकुली हा नाथली (किल्ल्याचे नाव लागत नाही) किल्ल्याचा किल्लेदार आहे. या दोघांचे चोरांशी (मराठ्यांशी) अंतस्थ संबंध आहेत. या शिवाय यांच्यापाशी पथके सुद्धा नियमाप्रमाणे बाळगलेली नाहीत. जरातखानचा पूर्वीचा किल्लेदार जाबिताखान हा चांगला बंदोबस्त राखीत होता. विनंती अशी की, त्या दोघांना काढून टाकण्यात येऊन जाबिताखानाची पुन्हा नेमणूक करण्यात यावी. पत्राप्रमाणे अमलबजावणीचे कागदपत्र तयार करून आपल्या समोर आणावेत अशी इनायत उल्लउल्लाखान याला आज्ञा करण्यात आली.

दौलताबादेच्या तोफखान्याचा अधिकारी अहंमदबेग हा होता. त्याच्याऐवजी मुहंमद सादिकचा मुलगा मुहंमदअली याची नेमणूक करण्यात आली आणि अहंमदबेग याला हुजूरात बोलावून घेण्यात आले.

## तेवीस एप्रिल १७०४

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. काल बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

"इस्लामाबाद उर्फ चाकणचा किल्लेदार आणि फौजदार, अमानुल्लाखान हा राजमाचीचा किल्ला घेण्यासाठी गेला होता. वाटेत चोरांचा (मराठ्यांचा) सुळसुळाट होता. अमानुल्लाखानाने त्यांच्या पैकी सात प्रमुख माणसांचे गळे कापून हुजुरात पाठविले आहेत"

बादशहा म्हणाले—सेवेचा मुजरा झाला. (सेवा मान्य झाली).

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले.—"चोर (मराठे) हे अहमदनगरकडे पसरले होते त्यांच्या पारिपत्यासाठी कामगारखान व शफतीकारखान गेले आहेत, ते अद्याप परत आले नाहीत."

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

"हाफिज सरकारखान करावल याने छावणीच्या परिसराचा नकाशा नीट काढून हमीदोद्दीन खानाकडे न्यावा. हमीदोद्दीन खानाने नकाशा पाहून बादशाही छावणीच्या भोवती काटेरी कुंपणे घालावीत".

नजफकुली, मुहंमद वल्लद मजक, रूहुल्लाखानाच्या खोजा तरबियत वगैरेच्या मगसबी वाढविण्यात आल्या. अबदुल्ला विजापुरी त्याचा मुलगा शेख अहमद ह्याला नव्याने मनसब देण्यात आली. ५६२ खानफिरोज जंगाच्या सैन्यातील ५६३ पुढील मंडळीच्या मनसबी वाढविण्यात आल्या:—

(१) दिलेरखानाचा मुलगा अबदुलफताह याला मनसब वाढीबरोबर खान ही पदवी देण्यात आली, (२) ऐवजखान, (३) मरहूम वजीरखानाचा मुलगा मुहंमद अली, (४) मुस्ताफाकुली बेग, (५) फकीर मुहंमद, (६) मरहूम पुरदिलखानाचा मुलगा मुहंमदमीर, (७) मरहूम कादरदादखान याचा मुलगा नुरुल्ला, (८) खंजरखानाचा मुलगा ख्वाजाजाहिद वगैरे.

## चोवीस एप्रिल १७०४

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

## पंचवीस एप्रिल १७०४

बागलाणचा फौजदार व सुरतेचा मुतसद्दी (कारभारी) याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले:—

"मलिक मोईजोद्दीन याचा जांवई मुहंमद सलाह मनसब देऊन माझ्यातर्फे साल्हेरच्या (?) किल्ल्यावर नायब म्हणून नेमण्यात यावे." विनंती मान्य करण्यात आली.

अनुक्रमणिका

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली. नरकवासी रामा (राजाराम महाराज) याचा मुलगा आणि त्या मुलाची आई व इतर पाचजण यांना एका सेवकाने विष दिले. त्यामध्ये ती माणसे मेली. मुलगा व आई अतिशय आजारी पडले. (ही अफवा असावी.)

बादशहांना कळविण्यात आले की,—"नेमाजी शिंदे वगैरे शत्रू हे मांडवगडकडे पसरले आहेत त्या भागात छावणी करावी असा त्यांचा बेत आहे."

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली:—

> "खान फिरोजजंग याची आई वारली. (हिची कबर सोलापूरच्या दक्षिणेस भीमेच्या काठावर असून तेथे वसलेले गाव म्हणजे बेगमपुरी होय, बेगमपुरी हे सोलापूरपासून अठ्ठावीस मैलावर आहे. तेथील कबर ही औरंगजेबाच्या मुलीची नसून, फिरोजजंगाच्या आईची आहे.) दुखवटा व्यक्त करण्यासाठी शाहजादा बेदारबख्त हा ब्ऱ्हाणपूरला गेला आणि फिरोज जंगाच्या तंबूवर जाऊन तो फिरोजजंगला भेटला."

## श्रीरंगपट्टण

मीर बक्षीचा नायब मतलबखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला,—"श्रीरंगपट्टणचा हरकारा व समानेनवीस (वृत्तांत लेखक) अबदुल्‌रहमान याने मला लिहिले आहे की,—"मला अपराध नसताना बदलण्यात आले आहे."

अबदुल्‌रहमान हा सध्या बहादुरगड येथे पोहोचला आहे. तो म्हणतो की, आपल्याला पूर्वीच्या जागेवर बहाल करण्यात यावे. (श्रीरंगपट्टणच्या राजाकडून) मी खंडणी दाखल एक हत्ती आणला आहे. त्याबद्दल आज्ञा व्हावी. बादशहाने आज्ञा केली की, "अबदुल्‌रहमान याला बहाल करण्यात येते. त्याला दोनशे जात अशी मनसब देण्यात येते. खंडणीचा हत्ती सरकारात घ्यावा. अबदुल्‌रहमानच्या जागी श्रीरंगपट्टण येथे नेमलेला हरकारा मुहंमद बाकर याला हुजूरांत बोलावून घ्यावे."

हतगड (तालुके बागलाण—जिल्हा नाशिक) चा किल्लेदार आणि नूरअलीचा मुलगा मीर मुहंमद आकिल याची मनसब वाढविण्यात आली.

## औरंगाबादची बातमी

औरंगाबाद येथे असलेल्या हरकाऱ्याच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले. झुल्फिकारखान याने गनिमांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी पुढील सरदार पाठविले:—

(१) रामसिंग (हाडा)

(२) रावदलपत बुंदेला. (इतिहासकार भीमसेन—सक्सेनाचा मित्र.)

अनुक्रमणिका

(३) राव—कान्हो. (कान्होजी जेधे)

(४) नवरोज बेगखान

(५) रुस्तुम बेगखान

हे लोक सुभे खानदेशाच्या परगणे दहेजगाव (धरणगाव) येथे शत्रूचा सरदार खंडो (खंडोजी दाभाडे) व इतर सरदार तीन हजार स्वारासहित होते. तेथे उभयपक्षांची लढाई झाली. शत्रूंपैकी अनेकजण जखमी व अनेक जण ठार झाले. शत्रूची घोडी, शस्त्रे वगैरे बरीच लूट आपल्या हाती लागली बादशहा म्हणाले.—"सेवा मान्य झाली."

(आधल्या दिवशीची नोंद येथे आली आहे.)

## चोवीस एप्रिल १७०४

आजमगड उर्फ पुरंदर येथील किल्लेदार जानबाजखान हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहास भेटला. मीर आतिश तराबियत खान हा आजारी होता, तो बरा झाल्यावर येऊन बादशहांना भेटला.

पुढील मंडळीकडे छावणीच्या चौक्यांची व्यवस्था पुढीलप्रमाणे देण्यात आली. पहिली चौकी अमीरउल्‌उमरा, (मुख्य प्रधान), दुसरी चौकी मरहूम रुहुल्लाखानाच्या ऐवजी तरबियतखान तिसरी चौकी, तरबियतखानाच्या ऐवजी मिर्जा सद्‌रुद्दीन मुहंमदखान, चौथी चौकी मुहंमद अमीनखानाच्या ऐवजी— मतलबखान, पाचवी चौकी मतलबखानाच्या ऐवजी सियादतखान.

## संभाजी राजांची मुलगी

नरकवासी संभा (संभाजी राजे) यांच्या मुलीचे लग्न फकीर मुहंमद शाईर याचबरोबर ठरविण्यात आले होते. ते बदलण्यात आले. आता तिचे लग्न सिकंदरखान मरहूम (विजापूरचा शेवटचा बादशहा सिकंदर आदिलशहा) याचा मुलगा गुलाम मोईयोद्दिन याजबरोबर ठरविण्यात आले.त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

मोलीगड (?) चा देशमुख सामांजी हा आपल्या सहकाऱ्यांना सोडून कायनातखान याच्या मध्यस्थीने हुजूरात आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मुहंमद फारूखखान जहानी याला शाह डोंगर (अधोनी, तालुका करनूल, जिल्हा आंध्रप्रदेश) येथे किल्लेदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला निरोप देण्यात आला.

बऱ्हाणपूर येथे असलेल्या हरकाऱ्याच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले.—खान फिरोज जंग हा शव्वाल महिन्याच्या चौदा तारखेस (नऊ फेब्रुवारी १७०४) बऱ्हाणपुरास आला.

अनुक्रमणिका

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूत (याकूत) खान याच्या विनंतीवरून शेख याकब याला मनसब देण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले ते असे.—हाफिज सरकारखान करावल याने आज्ञेप्रमाणे छावणीच्या मागे रमण्यासाठी (कुरण) मौजे अनाळा (?) येथे जागा नेमली होती. माणसे गवत आणावयास गेली होती पण रमण्याच्या अधिकाऱ्याने त्यांना परतवून लावले. बादशहा म्हणाले मतलबखान करावल बेगी याने हबीबउल्ला रमणादार याला ताकीद करावी की, गवत कापण्यास मना करू नये पण शिकार करू देऊ नये.

**एक मे १७०४**

बादशहाच्या आज्ञेने बाकरखान याला त्याचा भाऊ मरहूम सहुल्लाखान याच्या सुतकातून काढून हजूरात आणण्यात आले. त्याला शोकवस्त्रे देण्यात आली. त्यानंतर बाकरखान याला अहमदनगरला जाऊन मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याला घेऊन येण्यासाठी पाठविण्यात आले. हमीदोद्दीनखान आजारी होता, तो बरा होऊन हुजूरात आला आणि बादशहाला भेटला. शाहजादा मुअज्जम याचा दिवाण मुनीमखान याला काबुल सुभ्याचा दिवाण म्हणून नेमण्यात आले (हाच पुढे मोअज्जम—; बहादुरशहा याचा मुख्य प्रधान झाला.)

सलीम बेग याला गुरमकुंडा येथे किल्लेदार म्हणून नेमण्यात आले होते. तो हुकूम रद्द करण्यात येऊन त्याला कामबक्षच्या सैन्याच्या तोफखान्याचा प्रमुख म्हणून नेमण्यात आले. रावमानसिंग याला माणिक दौंड येथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले.

इराणच्या बादशहाचा भाचा अलीतकी हा हिंदुस्थानात आला होता. तो हुजुरात येत होता. त्याच्यासाठी राहण्याचे ठिकाण आणि इतर भेटी निवडून ठेवाव्या अशी आज्ञा करण्यात आली.

दुर्गादास राठोडचा भाऊ खेमकरण हा शहाजादा आजमपाशी तैनात होता. त्याला मनसबीवरून बडतर्फ करण्यात आले.

**दोन मे १७०४**

तोरणा किल्ला जिंकून घेतल्याबद्दल दण्डराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूतखान याने ओवाळणी म्हणून पन्नास अश्रफ्या पाठविल्या होत्या. त्या यारअली बेग याच्या मार्फतीने बादशहासमोर ठेवण्यात आल्या.

**तीन मे १७०४**

ओरीसाचा माजी सुभेदार कामगारखान (औरंगजेबाचा मावसभाऊ, माजी मुख्य प्रधान मुहंमद जाफर याचा मुलगा आणि बागलाणचा माजी फौजदार नामदारखान याचा सख्खा भाऊ) हा आपली मुले घेऊन हुजूरात येऊन बादशहांना भेटला.

अनुक्रमणिका

सर्फराजखान हा काफिला घेऊन येण्यासाठी गेला होता. तो परत येऊन बादशहांना भेटला.

अकलूज उर्फ असदनगरचा किल्लेदार व फौजदार म्हणून ईहसिशामखान याचा नातू आणि शेख हामिद याचा मुलगा अब्दुल वहाब याला नेमण्यात आले होते. त्याला अकलूजकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

भास्करराव हरकारा याची किशनराव वगैरे मुले औरंगाबादेहून काफिल्याबरोबर आली होती. ती वडिलांच्या सुतकात बसली होती. त्यांना सुतकातून उठविण्यासाठी आणि हुजूरात घेऊन येण्यासाठी बाबूपंडित यास पाठविण्यात आले. पुढील मंडळींकडे बादशहाची फर्मान पाठविण्यात आली.—(१) गुजराथचा सुभेदार आज़म, (२) मुल्तान व ठठ्ठा येथील सुभेदार शाहजादा मोईजोद्दिन, (३) अलाहाबादचा सुभेदार सिपहदारखान.

नायब बक्षी मतलबखान याचा मुलगा मीर असद्उल्ला हा आपला भाऊ मुहंमद हसन याच्या लग्नासाठी औरंगाबादेस गेला होता. तो परत येऊन बादशहाला भेटला.

**चार मे १७०४**

आज मोहरमचा दहावा दिवस. बादशहाने सात अनाथ मुलांना आपल्या हुजूरात बोलविले, त्यांच्या मस्तकावर हात ठेवला आणि त्यांना सोने-नाणे देऊन परत पाठविले. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—मिर्जा बेग गुर्जबर्दार हा मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान यांस आणण्यासाठी अहमदनगरला गेला आहे. त्याने (गुर्जबर्दार) तेथून पुढे जावे आणि खान फिरोजजंग सिपहसालार याला घेऊन बेदार बख़्शापाशी पोहोचावे.

मांदूनगड (मांडवगड) येथे चोरांनी (मराठ्यांनी) छावणी घातली आहे. बेदारबख़्त आणि खान फिरोजजंग यांनी एक होऊन त्यांचे पारिपत्य करावे. गुर्जबर्दारला एक घोडा बक्षीस देण्यात यावा. चोर (मराठे हे निंबगावच्या दिशेने बादशाही छावणीच्या प्रदेशात) पसरले होते. त्यांचे पारिपत्य करावे म्हणून सर्फराजखान यांस बरोबर पथके देऊन पाठविण्यात आले. त्याच्याबरोबर रायभानला पाठविण्यात आले. रायभानच्या संरक्षणासाठी दोन बंदूकची आणि जल्लूखास (बादशाहाच्या खाशांचे) माणसे देण्यात आली. त्यांना निरोप देण्यात आला.

**पाच मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते.

**सहा मे १७०४**

अनुक्रमणिका

इरादतखान मीरतुजक हा बेनिशाहगड (राजगड) च्या संरक्षणासाठी मागे राहिला होता. मन्सूरखान हा तेथे जाऊन पोहोचल्यावर इरादतखानाने मन्सूरखानाकडे किल्ला सोपविला आणि तो आपल्या मुलासहित बादशहाच्या हुजूरात येऊन त्यांना भेटला.

इराणच्या बादशहाचा भाचा अलीतकी याला गुर्जबर्दार सुरतेच्या बंदरावरून हुजूरात घेऊन आले.

भास्करराव हरकारा याची मुले कन्हैयाजी व अस्करन यांना शोकवस्त्रे देण्यात आली.

मरहूम अर्शदखान (माजी महसूल मंत्री) याचा मुलगा मुहंमद अली याची मनसब वाढविण्यात आली.

मरहूम शरीफखान याचा मुलगा सय्यद अब्दुल रहीम याला वऱ्हाड सुभ्याच्या जिजियाकर गोळा करण्याचा अमीन (अधिकारी) म्हणून नेमण्यात आले. इराणच्या बादशहाचा नातू (मुलीचा मुलगा) अली तकी याचे स्वागत नुस्रतखान मीर तुजक याने दिवाणेखास पासून रेहकलाबार (शस्त्रे ठेवण्याची जागा) पर्यंत करावे अशी आज्ञा झाली. अली तकीला देण्यासाठी एक हत्तीण काढून ठेवण्यात आली होती, ती बादशहाने नजरेखालून घातली.

रायरी (रायगड) चा किल्लेदार व पुण्याचा ठाणेदार शिवसिंग हा हुजूरात होता. मिर्जा सदरुद्दीन मुहमदखान याला घेऊन येण्यासाठी, त्याला बाकरखान यांजबरोबर पाठवावे अशी आज्ञा झाली. ख्वाजा मिरकचा मुलगा मुहंमदरजी याला मुहंमदरजाच्या ऐवजी हलकी (हलसंगी?) चा फौजदार म्हणून नेमण्यात आले. मरहूम अमानत खान याचा मुलगा मुहंमद तकी (मासिरउल्‌उमराचा कर्ता शहानबाजखान याचे घराणे) याला पूर्वीप्रमाणे बऱ्हाणपुरच्या वाकेनवीसीच्या जागेवर बहाल ठेवण्यात आले.

मुहंमद फारुकखान जहानी हा शहादुर्गचा किल्लेदार होता. त्याने काही विनंत्या केल्या होत्या त्या मान्य करण्यात आल्या.

आजमगड उर्फ पुरंदरचा किल्लेदार जानबाजखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली:—

(१) किल्ल्यात तैनात असलेले बंदूकची पगार न दिल्यामुळे आणि धान्याच्या महागाईमुळे कठिण परिस्थितीत आहेत. त्यांचा पगार मिळावा. बादशहाने आज्ञा केली की, दक्षिणच्या तोफखान्याचा अधिकारी मन्सूरखान याचा नायब मुहंमद जफर याच्याबरोबर पगार बाकीची रक्कम पाठविण्यात यावी, म्हणजे जागेवर जाऊन पगार वाटून देता येईल.

(२) किल्लेदाराची दुसरी विनंती अशी की, “माझे कुटुंबीय आणि माझी सरंजाम सामुग्री ही ठेवण्यास सोईचे जावे म्हणून मुहिआबाद उर्फ पुणे हे ठाणे माझ्याकडे देण्यात आले होते. पण अलीकडे त्या मार्गाच्या रक्षक म्हणून (राहदार) शिवसिंग याची नेमणूक झाली आहे. मी आज्ञा करतो की, मौजे चिंचवड वगैरे ही काही अटीवर मला तनखा जहागीर म्हणून देण्यात यावी. विनंती मान्य झाली नाही.

अनुक्रमणिका

**सात मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

मरहूम कदीमकुलीखान याचा मुलगा जाफर बेग याची मनसब वाढविण्यात आली. तरबियतखान मीर आतिश हा आजारी आहे असे कळले. हकीम हाजतखान याने त्याच्यावर उपचार करावे अशी आज्ञा झाली.

**आठ मे १७०४**

गुलबर्गाचा पीरजादा सय्यद हसन शहीद याचा भाऊ सय्यद मंझली याने पेशकश आणि अर्जदास्त पाठविली होती. ती यार अलीबेगच्या मार्फतीने बादशहाच्या समोर ठेवण्यात आली. पेशकशीत कुराणाची प्रत, धनुष्यबाण इत्यादि वस्तू होत्या. (इथे सय्यद हसनचा उल्लेख शहीद असा केला आहे. त्याअर्थी तो कोणत्या तरी प्रकरणात मारला गेला असावा.)

बादशहांना कळविण्यात आले की, सदरुद्दीन मुहंमदखान हा बादशाही छावणीपासून सहा कोसावर आलेला आहे. त्याला आणण्यासाठी बाकरखान गेला होता. तो त्याच्याबरोबर आहे काफिल्याला बारनेर (?) येथे ठेऊन तो सदरुद्दीनच्या बरोबर आला आहे.

अत्तरे बनविणाऱ्या मुहंमद अमीनला (खुशबूसाज) एक हत्ती द्यावा अशी आज्ञा झाली.

**नऊ मे १७०४**

सदरुद्दीन मुहंमदखान याच्यातर्फे विनंती करण्यात आली की, आपण छावणीजवळ आलो आहोत. छावणीत येण्यासाठी आपल्याला दस्तक (प्रवेशपत्र) देण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली. मरहूम रूहुल्लाखानाच्या तळावर त्याने उतरावे अशी आज्ञा झाली.

इराणच्या बादशहाचा नातू (मुलीचा मुलगा) अली तकी आजारी असल्याचे कळले. हकीम हाजकखान याने त्याच्यावर उपचार करावे अशी आज्ञा झाली.

**बसवा पट्टणचा फौजदार**

रुस्तुमबेग हा कर्नाटकचा दिवाण आणि बसवा पट्टणचा (दक्षिण कर्नाटक-शिमोग्या जवळ) फौजदार होता. त्याला किफायतखान ही पदवी देण्यात आली. आणि त्याची मनसब वाढविण्यात आली.

शेख गुलाम मुहंमद उर्फ बाकीराम याची बायको इस्लामकुंवर हिचे नाव बादशहाने रहिमउन्निसा आणि मुलीचे नाव उमतुन्निसा असे ठेवले.

अनुक्रमणिका

खंडोजीचा मुलगा महादाजी हा शत्रूला (मराठ्यांना) सोडून हुजूरात आला होता. जजियाचा अमीन मुहंमद गौस याच्या मध्यस्थीने तो मुसलमान झाला. त्याचे नांव गालिब इस्लाम असे बादशहाने ठेवले. त्याला दोनशे जात व वीस स्वार अशी मनसब देण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे द्यावीत अशी आज्ञा झाली.

**दहा मे १७०४**

चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी सर्फराजखान हा मंचर या खेड्याकडे गेला होता. त्याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"माझी आर्थिक परिस्थिती चांगली नाही. कृपा व्हावी." त्याला दहा हजार रुपये द्यावेत अशी आज्ञा झाली. कल्याण आणि नाशिकचा अधिकारी मातबरखान हा वारला होता. त्याचा मुलगा अबूमुहंमदखान हा वडिलांची मालमत्ता घेऊन गुलशनाबाद (नाशिक) हून निघाला. तो जुन्नर पर्यंत पोहोचला. चोरांनी (मराठ्यांनी) जुन्नर जवळ त्याची वाट अडविली आहे. सर्फराजखानाने जाऊन अबू मुहंमदखानाला हुजूरांत घेऊन यावे अशी आज्ञा झाली.

मुगलखान हा बहादुरगडहून सदरुद्दीन मुहंमदखानाच्या बरोबर आला होता. तो बादशहाना भेटला. बादशहांनी त्याला फळफळावळे दिली. त्याच्या विजयाबद्दल प्रार्थना केली आणि त्याला सर्फराजखानाकडे पाठविले.

चोरांशी (मराठ्यांशी) झालेल्या युद्धांत मरहूम फकीर मुहंमदच्या भाऊबंदांनी कामगिरी केली होती. त्यांना मदत म्हणून त्यांच्यामध्ये तीस घोडे वाटून देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

**अकरा मे १७०४**

मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याला मरहूम रुहुल्लाखान याच्या जागी बक्षी म्हणून (दुसऱ्या क्रमांकाचा) नेमण्यात आले. तो येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याला अडीच हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. मरहून अरबखानाचा मुलगा हशमतउल्ला हा रसूलाबादचा ठाणेदार होता. त्याला शिवसिंगाच्या ऐवजी पुण्याचा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद गजनफर याला औरंगाबादचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले.

मरहूम कादरदादखान याचा मुलगा फत्तेउल्ला याची मनसब वाढविण्यात आली.

बागलाण्यातील जोलहर किल्ल्याचा किल्लेदार मुहंमद गजनफर याची मन्सब बागलाण्याचा फौजदार नजाबतखान याच्या शिफारशी वरून वाढविण्यात आली.

नईमबेग व कादबेग हे जिजी व हैद्राबाद कर्नाटकचा फौजदार (नायब) दाऊदखान पन्नी याचकडे फर्मान घेऊन गेले होते. ते तेथून दाऊदखानाचे विनंतीपत्र घेऊन आले. दाऊदखानाने त्यांच्याबरोबर पंधरा हजार रुपये, तंजावरचे जमिनदार व इतर पाळेगार यांच्याकडून वसूल केलेले आणि जडजवाहिऱ्यांनी भरलेल्या दोन पेट्या पाठविल्या होत्या. मतलबखानाने बादशहाच्या समोर ठेवल्या.

मल्हाररावाचा मुलगा शंकराजी (शंकराजी मल्हार) हा मराठ्यांच्या गोटांतील होता. त्याला आपल्याकडे वळवून घेऊन दाऊदखानाने बादशहाच्या हुजूरात पाठविला होता. त्याला देण्यासाठी खिलातीची वस्त्रे, एक हत्ती आणि पांच हजार रुपये वेगळे काढून ठेवण्यात यावे अशी आज्ञा झाली.

गजपत कंबू उर्फ अब्दुल माबूद याची मुले शत्रूच्या (मराठ्यांच्या) कैदेतून सुटून वाई प्रांतात आली आहेत. असे बादशहांना कळविण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, गुर्जबर्दारांनी पाईने विलायत (वाई प्रांत) चा ठाणदार खाजाखान याच्याकडे आज्ञापत्र घेऊन जावे आणि अब्दुलमाबूदची मुले आणि शाईरखान मरहूम याचा नातू शमशीर बेग यांना आपल्याबरोबर आणावे.

**बारा मे १७०४**

बादशहाने आज्ञा केली की, ख्वाजा मसबूद महली याने खेड येथे आपल्या देखरेखीखाली एक बाग तयार करावी.

**तेरा मे १७०४**

सर्फराजखान व मुगलखान हे मरहूम मातबरखान याचा मुलगा अबू मुहंमदखान याला मातबर खानाच्या मालमत्तेबरोबर हुजूरांत घेऊन आले. मालमत्तेत दोन लक्ष चार हजार रुपये, बारा घोडे, दोन हत्ती, आठ उंट आणि इतर सरंजाम होता. बादशहाने आज्ञा केली की, सगळी मालमत्ता कारखान्यांत (संबंधीखात्यांत) जमा करण्यात यावी. मरहूम मातबरखानाच्या कारभाऱ्यांनी दिवाणांच्यापाशी रुजू व्हावे.

यारअलीबेग याने पुढील मजकूराचे पत्र पाठविले:—

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान आणि इतर मुगल पथके यांनी तुंगच्या किल्याला वेढा घातला होता. बादशहाच्या कृपेने किल्ला ताब्यात आला आहे. पत्र आणून देणाऱ्याला (खान मुहंमद) याला चार होन आणि हेरांना होन देण्यात आले.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १३ मे इ. स. १७०४ ते ५ जून १७०४

### तेरा मे १७०४

अहमदनगरच्या रस्त्याचा मार्गरक्षक (राहदार) मुगलखान याचा नायब आणि मरहूम करमुल्लाखान याचा मुलगा रहमतउल्ला याची मनसब वाढविण्यात आली. राहिरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग हा पुण्याचाही ठाणेदार होता. पुण्याहून त्याला बदलल्यामुळे तितक्यापुरती त्याची मनसब कमी करण्यात आली.

### चौदा मे १७०४

बादशहाचा नातू सुल्तान बुलंद अख्तर (बंडखोर शाहजादा मुहंमद अकबर याचा मुलगा) याचा तंबू गुलालबारच्या बाहेर होता. तेथून काढून तो रेहकलाबारमध्ये लावावा अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणे करण्यात आले. अमानुल्लाखान याने तुंगचा किल्ला जिंकून घेतला होता. त्याच्या किल्ल्या अमानुल्लाखानाचा बक्षी सैफुल्लाखान आणि मुहंमद शफी हे घेऊन आले होते. ते बादशहाला भेटले. त्यांनी बादशहाला पुढीलप्रमाणे सांगितले.—“अमानुल्लाखानाने बादशहाच्या कृपेने तुंगचा किल्ला जिंकून घेतला आहे. आता राजमाचीच्या किल्ल्याला वेढा घालावा अशी त्याची इच्छा आहे.” यावर बादशहाने आज्ञा केली कीं, राजमाचीचा किल्ला तडजोडीने हाती येण्याची बोलणी चालू आहेत, तूर्त वेढ्याचे राहू द्या.

### पंधरा मे १७०४

काबुलच्या सुभ्याची डाक असलेली तीनशे चार नळकांडी, काश्मीरचा सुभेदार इब्राहिमखान याने पाठविलेली फळफळावळाची करंडी ही चोरांच्या (मराठ्यांच्या) उपद्रवामुळे अडकून पडली होती, ती छावणीत आली आणि यार अलीबेग याने ती बादशहाच्या समोर ठेवली. सिद्दी याकूतखान याने आंब्याच्या चाळीस करंड्या पाठविल्या होत्या. त्या यारअली बेगच्या मार्फतीने बादशहाच्या नजरेखाली घालण्यात आल्या.

### सोळा मे १७०४

कालतुंग किल्ल्याच्या फत्तेबाबतच्या किल्या बादशहासमोर ठेवण्यात आल्या. त्याबाबत मुहंमद शफी याच्याकडे खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, ही वस्त्रे अमानुल्लाखानाकडे देण्यात यावी.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—“छावणीतील माणसे गवत वगैरे आणण्यासाठी बाहेर जातात. चोर (मराठे) त्यांच्यावर आक्रमणे करतात.” बादशहाने आज्ञा केली की, पाळीपाळीने एक दिवस

तरबियतखान आणि एक दिवस मतलबखान यांनी टेहळणीसाठी जात असावे. त्यांच्यापैकी प्रत्येकाबरोबर दोन दोन हजार स्वार देण्यात यावेत. त्यांची यादी (तूमार) तयार करून आपल्याला दाखविण्यात यावी. त्याप्रमाणे करण्यात आले.

एतिबारखान उर्फ मुहंमद ऐवज हा सुरतेचा कारभारी होता. तो हुजुरात आला आहे. त्याची पदवी काढून घेण्यात आली.

**सतरा मे १७०४**

पुढील मंडळी बादशहांना भेटली:—

(१) अहमदनगरचा रस्त्याचा मार्गदर्शक—मुगलखान.

(२) त्याच्याबरोबर आलेला ख्वाजा कुलीखान.

बादशहाने आज्ञा केली की, बेनिशाहगड (राजगड) चा किल्लेदार लोदीखान याच्यासाठी खिलातीची वस्त्रे वेगळी काढून ठेवण्यात यावीत.

बादशहाने आज्ञा केली की, इराणच्या बादशहाचा नातू (मुलीचा मुलगा) हा भेटीच्यावेळी जेव्हा गुलालबारमध्ये येईल तेव्हा त्याने पालखीतून यावे.

**अठरा मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. काल मतलबखानाने बादशहाना विनती केली की, कामगारखान (औरंगजेबाचा मावसभाऊ) याचे नाव चौकीवरील अधिकारी म्हणून लिहिण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहा म्हणाले.—त्याची मनसब काढून घेऊन त्याला वर्षासन देण्यात आले आहे. ते किती आहे ते चौकशी करून कळवा.

**एकोणवीस मे १७०४**

काल रात्री हेराने बातमी आणली ती अशी.—पंधरा हजार चोर (मराठेस्वार) बादशहा छावणीपासून एकोणीस कोसांवर घोड नदीच्या भागात गोळा झाले आहेत. त्यांचा हेतु कुटिल दिसतो. (धामधूमचा).

रात्रीच्या चार घटका गेल्यानंतर बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीन खान, तरबियतखान, अजीजखा वगैरेच्या बरोबर बंडखोरांचे पारिपत्य करण्यासाठी आठ हजार तीनशे वीस स्वार यांचे तूमार (यादी, तपशील) तयार करण्यात यावी.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. बादशाही छावणीत महागाई फार वाढली आहे. गहू वगैरे धान्याचा भाव रुपयाला अडीच शेर झाला आहे. छावणीतील माणसे अतिशय हैराण झाली आहेत. रात्री चार घटिका गेल्या असता बादशहाने गंज (बादशाही बाजार) चा करोडा (अधिकारी) शेख सादुल्ला याला बोलावून या बाबतीत खूप ताकीद केली.

बादशहाने हमीदोद्दीनखान यांना बक्षीसे देऊन, शत्रूंच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी रवाना केले. ही मंडळी अशी:—

(१) हमीदोद्दीनखा, याला शाह अब्दुल लतीफ (साधू) दरवेश याचे वस्त्रे (पागोटे).

(२) तरबियतखान याला १५० रु. चा खंजीर.

(३) इरादतखान याला २०० रु. चा खंजीर.

(४) इरादतखानाचा मुलगा हिदायतउल्ला याला ५० रुपयांचा खंजीर.

अहदियान (शिलेदार) चे बक्षी अजीजखान व बाकरखान आणि कामबक्ष याचा बक्षी मीर महंमद यांनीही हमीदोद्दीनखानाबरोबर जावे अशी आज्ञा झाली.

दिवसाच्या शेवटी बादशहाने कौलखान वगैरेंना हमीदोद्दीन खानाबरोबर जाण्यास निरोप दिला. कौलखान आणि ख्वाजमकुलीखान यांना शंभर शंभर रुपयांचे खंजीर बक्षीस म्हणून देण्यात आले. दिवसाच्या शेवटी यार अलीबेग याने हेरांनी आणलेली पुढील बातमी बादशहाच्याकडे लिहून पाठविली.— "चोरांचे (मराठ्यांचे) सैन्य पंचवीस (सुमारे) हजारांचे होते. त्यांनी जुन्या बादशाही मुलखातून चौथाई वसूल केली आणि इतर लूट मिळविली. हे सैन्य आता छावणी घालण्यासाठी पुण्याच्या वाटेने जात आहे." बादशहाने आज्ञा केली की, हेरांना हमीदोद्दीन खान याजकडे पाठविण्यात यावे.

**वीस मे १७०४**

पुढील मंडळींच्याकडे फर्माने व आज्ञा पत्रे पाठविण्यात आली. बेदारबख्ताच्या नावे फर्मान खान फिरोज जंग याने बेदारबख्ताला जाऊन मिळावे अशी शत्रूचे पारिपत्य करावे अशा अर्थाचे आज्ञापत्र.

माळव्याचा सुभेदार शाइस्ताखान, मांडवगडचा किल्लेदार व फौजदार नवाजिशखान, नरवरचा फौजदार शेर अफगनखान, ग्वालेरचा फौजदार जाननिसारखान यांच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली.

अमानुल्लाखान याने तुंगीचा किल्ला जिंकून घेतला होता. त्याला अलावर्दीखान ही पदवी देण्यात आली. बादशहाने म्हणाले—तुंगीगड किल्ल्याचे नाव, बंगीगड ठेवावे. अमानुल्लाखान हा येऊन बादशहाना भेटला. बीरशहागड (राजगड) चा किल्लेदार लोदीखान हा बादशहांना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात येऊन निरोप देण्यात आला. खान फिरोजजंग याचा बक्षी आणि वाकेनवीस जैनुलाद्दीन याला निरोप देण्यात आला.

अनुक्रमणिका

दाऊदखान पन्नी याने पाठविलेला शंकराजी (शंकराजी मल्हार) हा येऊन बादशहांना भेटला त्याने पेशकर म्हणून पाच हजार रुपये किंमतीचा एक हत्ती नजर केला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. महदाजी हा मुसलमान झाला. त्याला इस्लाम गालिब हे नांव देण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. दालचंदाचा मुलगा खुशालचंद हा मुसलमान झाला. त्याचे नाव अब्दुल हादी ठेवण्यात आले. मुख्तखरखान मरहूम याचा मुलगा जैनुलाद्दिन यांस सय्यद अलीखानाच्या जागी खान फिरोजजंग याचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

अमानगडचा किल्लेदार आणि करतालदासचा मुलगा कुंवरमल यास तुंगी उर्फ बंकीगडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

दुर्गादास राठोड याचे पुतणे देवकरण व दोलकरण यांना मनसबिवरून बडतर्फ करण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की, बादशहाच्या निकटच्या नोकरांपैकी हैदरचा मुलगा लष्कर आणि इब्राहिमचा मुलगा अफझल हे दोघे छावणी सोडून फरारी झाले आहेत.बादशहांना काल कळविण्यात आले ते असे.—खान जमान फत्तेजंग मरहूम (संभाजी राजांना धरणारा मुकर्रबखान) याचा मुलगा अब्दुल कादर हा नरकवासी संभा (संभाजी महाराज) यांच्या मुलीशी लग्न करीत आहे. नौबती झडविण्याची त्याला परवानगी देण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहा म्हणाले "तीन दिवस" नौबती वाजविल्या जाव्या अशी आज्ञा देण्यात आली.

**पंचवीस मे १७०४**

सकाळी यार अलीबेग याने हेरांच्या तोंडून आलेला निरोप लिहून बादशहाकडे पाठविला. त्यात पुढीलप्रमाणे म्हटले होते—"हमीदोद्दीन खान बहादूर व तरबियतखान मीर आतिश हे अठ्ठावीस मोहरम (बावीस मे १७०४) रोजी (?) च्या घाटाजवळ पोहोचले. अजीजखान व कामयाबखान यांना बाकरखान व मुहंमद मीर बक्षी (कामबक्षाचा) पाशी जुन्नर जवळ सोडून पुढे चालून गेले. चोरांपैकी (मराठे) अनेक जण जखमी व अनेक जण ठार झाले. चोर (मराठे) पराजय पाऊन पळून गेले. घोडे, शस्त्रे वगैरे लूट आपल्या हाती लागली." पत्र वाचून बादशहाने हरकाऱ्याला चार होन बक्षीस दिले आणि हमीदोद्दीनखान याला देण्यासाठी पाचहजार रुपये किंमतीचा अलंकार काढून ठेवण्याची आज्ञा केली. नेमाजी शिंद्याचा पराजय केल्याबद्दल खान फिरोजजंग याला देण्यासाठी त्याच्या वकीलाकडे असाच अलंकार देण्यात आला.

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान, सूरतचा कारभारी नजाबतखान, जुन्नरचा किल्लेदार अब्दुल अजीजखान, दौलताबादेचा किल्लेदार सय्यद (मुबारक) इत्यादिची राजगडच्या फत्तेबाबत अभिनंदनाची पत्रे आणि भेटी आल्या.

शमशीबेग हा बादशहाच्या आज्ञेने पाईने विलायत (वाई) हून येऊन बादशहांना भेटला. दाऊदखानाने पाठविलेल्या शंकराजी (शंकराजी मल्हार) चा मुलगा किसनराव यांस खिलातीची वस्त्रे देण्यात आली. कडूस (पुणे जिल्हा) च्या दोन इसमांना शाली देण्यात आल्या.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—कुंजवनचा काका आणि वऱ्हाड व खानदेशचा हिशेब अधिकारी (मुस्तोफी) हरराय हा वारला त्याच्या जागी कुंजवनचा मुलगा साहेबराम याची नेमणूक करण्यात आली. त्याला शाल बक्षीस म्हणून देण्यात आली.

रुस्तुमखान विजापूरी याचा मुलगा इलियासखान याने विनंती केली की, आपल्याला काही मदत मिळावी म्हणजे मी माझ्या वडिलांच्याकडे जाईन. रुस्तुमखान हा खान फिरोजजंग पाशी तैनात होता. बादशहाने आज्ञा केली की, त्याचा मुलगा इलियास खान याने बादशाही छावणीत राहावे.

कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान याला शाहगड हे गांव इनाम म्हणून देण्यात आले होते. तेथील फौजदारी आपल्याला मिळावी म्हणून त्याने विनंती केली. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली. रायरी (रायगड) चा किल्लेदार शिवसिंग, रसूलाबाद (शिवापूर) व पुणे येथील ठाणेदार हश्मतउल्ला पाईने विलायतचा ठाणेदार ख्वाजाखान यांनी बेनिशाहगड (राजगड) चा किल्लेदार लोदीखान याच्याकडे धान्याची रसद पाठवीत जावी. बादशहाने आज्ञा केली की, मतलबखान याने बादशाही छावणीतील ठाण्यातून गस्त आणि टेहाळणी करीत जावी. तुंगीगडच्या किल्ल्यावर कुंवरमल ची नेमणूक झाली होती. ती रद्द करण्यात येऊन त्याच्या जागी अभयराम याची नेमणूक करण्यात आली.

**सव्वीस मे १७०४**

बादशाही छावणीत शाहजादा मुहंमद कामबख्श याला त्याची बायको मनोहर पुरी हिच्याकडून एक मुलगी झाली. (खेड मुक्कामी) कामबख्शाने, त्या प्रीत्यर्थ बादशहांना पाचशे अशर्फ्या नजर केल्या. बादशहाने त्यापैकी शंभर अशर्फ्या ठेऊन घेतल्या व बाकीच्या परत केल्या.

चोरांशी (मराठ्यांशी) झालेल्या युद्धांत मराठ्यांचा अधिकारी नागो थोरात हा मारला गेला होता. त्याचे डोके कापून हमीदोद्दीन खान आणि तरबियतखान यांनी ते बादशहाकडे पाठविले. बादशहाने डोके आणणाऱ्यांना (बशीरबेग व मुहंमद अमीन बेग मनसबदार) बक्षिसे दिली. डोके छावणीच्या कोतवालाच्या हवाली करण्याची आज्ञा झाली. दिवसाच्या शेवटी हमीदोद्दीनखान आणि तरबियतखान यांनी चोरावरील युद्धांत विजय मिळाल्याबद्दल वृत्तांत आणि नजरा पाठविल्या होत्या त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. ते पाहून बादशहा म्हणाले धन्य आहे त्यांची. त्यानी मिर्जा मुहंमद याला खिलातीची वस्त्रे दिली. बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीन आणि तरबियतखान ह्यांच्यासाठी खिलातीची वस्त्रे काढून ठेवावी अशी आज्ञा झाली. त्या दोघांनी हुजूरात यावे अशी आज्ञापत्रे त्यांच्याकडे रवाना झाली.

**सत्तावीस मे १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. कामगारखान यास एक खंजीर, तीनशे रुपये किंमतीच बक्षीस म्हणून देण्यात आला.

अनुक्रमणिका

सिद्दी याकूतखान (जंजीरा) याचा दत्तक मुलगा सिद्दी अंबर याने छावणीत धान्याची रसद आणली होती. तो येऊन बादशहाला भेटला. हकीम हाजकखान याचा गुरु अबुल हसन हा तळावरुन (पेडगांव) आला होता, तो बादशहाना भेटला.

अईजखानाचा नातू शमशीरबेग (याला राजारामाची मुलगी देण्यात आली होती) याची मनसब वाढविण्यात आली.

अबदुर्रहीम हा वऱ्हाड सुभ्याच्या जजियाच्या वसूलीचा अमीन (अधिकारी) होता. त्याच्या विनंतीप्रमाणे त्याचा भाऊ अब्दुल हकीम याला त्याजपाशी तैनात करण्यात आले.

असद्नगर (अकलूज) चा फौजदार व किल्लेदार म्हणून बलीबेगचा मुलगा अब्दुलवहाब हा काम करीत होता. त्याच्या विनंतीप्रमाणे मुहंमद नजीब, नायब किल्लेदार मलंगूर याची मनसब वाढविण्यात आली आणि त्याला हुजूरांत बोलावण्यात आले.

मुहंमद मोहसीन हा विश्रामगडचा किल्लेदार होता. त्याने विनंतीकरून मनसबीत सवलती मागितल्या आणि किल्ल्यावर हशम शिबंदी म्हणून पन्नास सैनिक मागितले. विनंती मान्य करण्यात आली.

**अठ्ठावीस मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. हमीदखान उर्फ मुहंमद इब्राहिम विजापूरी हा बेळगांवचा माजी फौजदार, सैफखान याजपाशी तैनात होता. त्याने लिहून पाठविले की, "सैफखान याची नेमणूक गुलबर्गा उर्फ अहसनाबाद येथे किल्लेदार व फौजदार म्हणून झाली आहे आणि मी तर त्याच्या तैनातीत आहे. तर मी आता काय करावे." बादशहाने आज्ञा केली की,—"तुम्ही बेळगांवचा फौजदार किलीचखान याजपाशी तैनात व्हावे आणि त्याच्या तर्फे बेळगांवमध्ये काम करावे." हमीदखान उर्फ मुहंमद इब्राहिम याला तीन हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती.

**एकोणतीस मे १७०४**

मरहूम अमीरखान (रुहुल्लाखानाचा भाऊ आणि काबुलचा सुभेदार) याची बायको आणि मीर खान व मुहंमद हादी यांची आई ही शाहजानाबाद दिल्ली येथे वारली असे कळले दोन्ही मुले बादशाही छावणीत होती. बादशहाच्या आज्ञेने तहबुरखान मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) दोघा भावांना घेऊन आला. बादशहाने त्यांचे सान्त्वन केले आणि त्यांना बालाबद व शाली शोकवस्त्रे म्हणून द्यावी म्हणून आज्ञा केली.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

"हमीदोद्दीनखान बहादुर, तरबियतखान, मीरआतिश, आणि मुगलखान हे चारांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठीं गेले होते. ते आज छावणीच्या चौकीवर येतील."

अनुक्रमणिका

मतलबखान याने पत्र पाठवून पुढीलप्रमाणे कळविले—"येथे भीमेचा पूर कमी आहे. कडूसचे ठाणे नदीच्या पलीकडे आहे. शमशीरबेग याची नेमणूक उजव्या फळीच्या आघाडीवर करण्यात आली तर बरे होईल." विनंती मान्य करण्यात आली.

शाहजादा मुहंमद मुइझुद्दीन हा मुल्तान येथे सुभेदार होता. (औरंगजेबचा नातू आणि मुअज्जम बहादुरशहा याचा मुलगा हा पुढे जहांदारशहा या नावाने बादशहा झाला.) त्याचा दूध भाऊ अलिमर्दानखान (हा पुढे जहांदारशहाचा मुख्य प्रधान झाला.) याची मनसब वाढविण्यात आली.

मीर सईदोद्दीन याचा मुलगा मीर कवामोद्दीन हा बऱ्हाणपूर सुभ्यात खजिन्याचा अधिकारी होता. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

**तीस मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. ऐवजखानाचा मुलगा आणि बसवापट्टणचा फौजदार मुहंमद शफी याचे पत्र बादशहाकडे आले.

हमीदोद्दीनखान, तरबियतखान इत्यादि मंडळी चोराच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी गेली होती. ती येऊन बादशहांना भेटली. त्यांनी बादशहांना नजरा दिल्या आणि बादशहाने त्यांना खिलातीची वस्त्रे बक्षीसे आणि पदव्या दिल्या. त्या मंडळींची नावे पुढीलप्रमाणे आहेत. इ. सन १७०४ मध्ये औरंगजेबाच्या शेवटच्या काळात बादशाही छावणीत त्याच्याजवळ कोणत्या दर्जाचे कोण अधिकारी होते याची कल्पना येईल:—

(१) हमीदोद्दीनखान—खिलातीची वस्त्रे

(२) तरबियतखान—खिलातीची वस्त्रे व बहादुर ही पदवी

(३) अहमदनगरचा मार्गरक्षक, मुगलखान—मगसबीत वाढ

(४) अजीजखान—खिलातीची वस्त्रे

(५) ख्वाजम कुलीखान—मनसबीत वाढ

(६) इरादत खान-मीर तुज्क—(शिष्टाचाराचा अधिकारी आणि सुप्रसिद्ध आत्मचरित्रकार)

(७) इरादत खानाचा मुलगा, हिदायतउल्ला

(८) सिद्दीबलालखान,

अनुक्रमणिका

(९) सय्यदखान.

(१०) कामियाब खान. (तरगियत खानाचा भाऊ.)

(११) शिलेदारांचा पगार अधिकारी, बाकरखान.

(१२) वरील मोहिमेवर गेलेल्या मोगल फौजेचा बक्षी व वाक्नीस मुहंमद मझहर.

मक्केच्या शरीफ (अधिपती) चा राजदूत सय्यद अबदुल्ला हा येऊन बादशहांना भेटला. त्याने मक्केहून अनेक भेटी आणल्या. काब्याच्या मंदिरातील लाल कापड, मंदिराबाहेरिल काळे कापड, झम्झम्च्या विहिरीचे पवित्र पाणी, इराकी घोडा, अरबी घोडा इत्यादि भेटी त्याने आणल्या. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे आणि बक्षीस म्हणून एक हजार रुपये दिले.

गुलशनाबाद (नाशिक) येथील पीरजादा सय्यद कुतुबोद्दिन याच्या विनंतीवरून बादशहाने माहुलीच्या किल्याचे नाव अहसन हसीन असे ठेवले.

औरंगाबाद व बऱ्हाणपूर येथील फौजदार रफीखान आणि त्याचा भाऊ यांची मनसब वाढविण्यात आली.

नूरुदीन हुसेन जाफरखानी याची मुले सुल्तान हुसेन, मुबारक हुसेन, बुऱ्हाणउद्दीन हुसेन आणि बहाबुद्दीन हुसेन यांना मनसबी देण्यात येऊन त्यांना माळवा सुभ्यात तैनात करण्यात आले.

ख्वाजा खानाचा भाऊ तुर्कताजखान हा हुजूरात येऊन बादशहांना भेटला. त्याने निसार (ओवाळणी) म्हणून पांच मोहरा बादशहा पुढे ठेवल्या. बादशहांना कळविण्यात आले की, बक्षी उल्लमुल्क मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान हा आजारी असल्यामुळे मुजऱ्यासाठी दरबारात येऊ शकला नाही.

बादशहाच्या आज्ञेने काल इराणच्या बादशहाचा भाचा सफवीखान उर्फ अली नकी याला काम बक्षाचा बक्षी नुस्रतखान याने अमीरउल्उमरा (मुख्यप्रधान असद्खान) याजकडे नेले. त्याने त्याचा आदरसत्कार केला आणि दोन घोडे, वस्त्रे व फळफळावळे देऊन अली नकीला आपल्या तंबूकडे पाठविले.

**एकतीस मे १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहांना कळविण्यात आले की, तूराण (मध्य आशियातील तुर्कस्थान) चा राजदूत आला आहे. त्याला यक्काताजखान याच्या तंबूजवळ उतरवावे अशी आज्ञा झाली.

तरबियतखानचा भाऊ कामियाबखान आजमगड (पुरंदर) चा किल्लेदार जानबाजखान, मेहदीखानाचा मुलगा आणि कल्याणीचा फौजदार व किल्लेदार मिर्जा मुहंमद यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

अनुक्रमणिका

मरहूम सिद्दीमसूदखान (विजापूरचा माजी मुख्यप्रधान) यांची मुले, ही खान फिरोज जंगापाशी तैनात होती. ठरलेली पथके न बाळगण्याबद्दल त्यांच्या मनसबी कमी करण्यात आल्या.

गढनमून्याचा (कर्डे निमोणे) माजी ठाणेदार अबदुल् रसूलखान याला हुजूरात बोलावण्यात आले. त्यांची मनसब कमी करण्यात आली आणि त्याची खान ही पदवी काढून घेण्यात आली.

कल्याणीचा फौजदार व किल्लेदार मिर्जा मुहंमद याला खान ही पदवी देण्यात आली.

**एक जून १७०४**

काल बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. धान्याच्या रसदेच्या गोण्या लादलेले वीस हजार बैल हे बागलाण आणि सुरतेहून बादशाही छावणीत येत आहेत. ते गोदावरीच्या दक्षिणेस पोहोचले आहेत. बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली. सर्फराजखान याने जाऊन वंझाऱ्याना हुजूरात आणावे. त्याच्याबरोबर तीन हजार पाचशें स्वारांची तुकडी देण्यात यावी. सुरतेचा कारभारी व बांगलाण्याचा फौजदार नजाबतखान याच्याकडे आज्ञापत्रे रवाना झाली.

**चार जून १७०४**

मुगलखान (अहमदनगरच्या मार्गाचा रक्षक) याच्या फौजेचा बक्षी आणि वाकनेवीस बहाबुद्दीन याची मनसब वाढविण्यात आली.

सर्फराजखान आणि कामियाबखान यांच्याबरोबर देण्यात येणारी फौज तयार ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**पाच जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, चौथ्या कामगारखान याने मतलबखान याच्या जागी काम पहावे. आणि मतलबखानाने सियादतखानाच्या जागी पाचव्या चौकीवर काम पहावे.

इराणच्या बादशहाचा भाचा सफवीखान उर्फ अली नकी याला पालखीतून रेहकलाबार मधे येणे-जाणे करण्यास परवानगी देण्यात आली.

**शाहूचे लग्न**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली — "नरकवासी संभा (संभाजी महाराज) यांचा मुलगा राजा शाहू याचे लग्न बहादुरजी (जाधव) ची मुलगी हिच्याशी करण्याचे ठरले आहे. त्यासाठी मदत म्हणून राजा शाहुला विवाहाचा खर्च म्हणून पाच हजार रुपये अंतःपुरातील खजिन्यातून देण्यात यावे."

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## ५ जून इ. स. १७०४ ते ३१ जुलै १७०४

### पाच जून १७०४

कौलासचा माजी किल्लेदार मीररुहुल्ला याला त्याच जागेवर पूर्ववत बहाल करण्यात आले. अष्टीचा किल्लेदार सिकंदरजंग आणि कोरंगचा किल्लेदार किशनसिंग हे हुजुरात होते. त्यांना माणसे बरोबर देऊन त्यांच्या नोकरीच्या जागेवर पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले कीं, तळावरचा (पेडगाव अगर ब्रम्हपुरी) बाजाराचा अधिकारी बाजीद हा मरण पावला.

### सहा जून १७०४

बल्ख (मध्य आशिया) चा राजदूत ख्वाजाजाहिद याला यक्काताजखानाने आज्ञेप्रमाणे हुजुरात आणले. त्याने बल्खच्या अधिपतीकडून आणलेले पत्र बादशहाकडे दिले. त्यानंतर राजदूताने आणलेल्या भेटी बादशहाने पाहिल्या. बादशहाने राजदुताला खिलातीची वस्त्रे आणि पाच हजार रुपये दिले. बल्खुहून आलेल्या भेटीत घोडे, ऊंट इत्यादी वस्तूंचा समावेश होता. बादशहाने सर्फराजखान याला सातहजार रुपये किंमतीचा एक हत्ती बक्षीस दिला. सुभे औरंगबादच्या कामावर त्याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने सांगितले कीं, पाचहजार पाचशे नव्वद स्वार आणि पायदळ इतके सैन्य सुभे औरंगाबादेत तैनात करण्यात आले आहे. यात तिकडील फौजदारांचाही समावेश आहे.तसदीक बेग व मुहंमदअलीबेग गुर्जबर्दार हे सर्फराजखानाबरोबर जातील. सैन्य आणि सुभ्यातील फौजदारांना ते सर्फराजखानाकडे घेऊन येतील.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली —"दाऊदखान पन्नी याने पाठविलेला शंकराजी (शंकराजी मल्हार) याचा मुलगा व्यंकटराव हा होता. शंकराजी आणि व्यंकटराव यांची तैनाती खान नुस्रतजंग (झुल्फिकार खान) याच्या सैन्यात होती. त्या दोघांनी आपल्या तैनातीच्या जागेवर जावे म्हणून खिलातीची वस्त्रे देऊन त्यांना निरोप देण्यात आला.

इराणच्या बादशहाच्या भाच्याचा मुलगा सफवीखान याला एक तलवार बक्षीस देण्यात आली. याला सातहजार जात आणि एकहजार स्वार अशी मनसब होती.

बादशहांना कळविण्यात आले ते असे.—– अटलसिंग हा गुलशनाबाद (नाशिक) येथे तैनात होता. त्याने जबरदस्तीने काही मुसलमानांचा माल बळकविला आहे. अमानुल्ला गुर्जबर्दार याने तेथे जाऊन मुसलमानांना त्यांचा माल परत देववावा आणि अटलसिंगला हुजुरांत आणावे.

बादशहाने आज्ञा केली कीं, "अहमदाबादेहून खजिना येत आहे तो तेथून आणण्यासाठी जुल्फिकार बेग इत्यादी पाच गुर्जबर्दारांनी अहमदाबादेस जावे आणि खजिना घेऊन यावा."

अनुक्रमणिका

मिर्जा सफवीखान याने विनंती केली कीं, फिरंग्यांनी जहाजावर आपला माल लुटला. बादशहाने दोन गुर्जबर्दार नेमले आणि त्यांना आज्ञा केली की, त्यांनी सुरतेला जाऊन या प्रकरणाची चौकशी करुन फिरंग्यांच्याकडून माल परत मिळवून द्यावा.

बादशहांना कळविण्यात आले कीं, गंजअली बेगचा मुलगा आणि माहुलीचा किल्लेदार अबदुल बाकी याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मनसब होती. तो मरण पावला.

सर्फराजखान याला औरंगाबादेच्या बंदोबस्तासाठी जाण्यास निरोप देण्यात आला. त्याला सहा हजारी मनसब होती. शंकराजी मल्हारचा मुलगा व्यंकटराव याची मनसब वाढविण्यात आली. (तीन हजार जात व एक हजार स्वार) अश्रफोद्दीन याला नळदुर्गचा सवाने निगार म्हणून नेमण्यात आले.

**सात जून १७०४**

गोपाळसिंग चंद्रावत याला पंधराशे जात, पाचशे स्वार अशी मनसब होती. बादशाही जनावरांच्या निगाबाबतचे सरकारातील देणे (खुराक व दुआब) हे त्याला एक वर्षासाठी माफ करण्यात आले.

बादशाहाजादा कामबक्ष हा हुजुरात आला. बादशहाने आपल्या विश्रामग्रहाचा (आरामगाह) पडदा सरकविला. त्यांनी हमीदोद्दीनखान व हाफिज अंबर महली यांची आठवण केली. ते आल्यावर बादशहा म्हणाले —"बादशहा जाद्यासाठी खास स्वारीचे घोडे ठेवले आहेत ते पाहण्यासाठी घेऊन या. त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान आणि तबेल्याचा अधिकारी अबदुल हादी हे दहा घोडे घेऊन आले. बादशाहाने हाफिज अंबर महलीला एक हजार रूपये दिले.

**आठ जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. काल दिवस मावळता सिकंदरखान विजापूरी याचा (विजापूरचा शेवटचा बादशहा सिकंदरआदिलशहा) मुलगा मुहंमद मुहियुद्दीन हा बादशहाच्या हुजुरात आला. नरकवासी संभा (संभाजी महाराज) यांच्या मुलीचे लग्न फकीर मुहंमद अईज मरहुम (दिवंगत) याच्याशी ठरले होते. तिच्याशी मुहंमद मुहियुद्दीनचे लग्न ठरले. मुहंमद मुहियुद्दीनने हुजुरात येऊन बादशहांना एक अलंकार (पदक) भेट म्हणून नजर केला. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्रे, तीन रत्नखचीत अंगठया, एक मोत्याची माळ, सोनेरी साज असलेला घोडा (२०० दोनशे मोहरांच्या किंमतीचा) व मोत्यांचा तुरा या वस्तू दिल्या. बादशहा म्हणाले—गुलालबारच्या आणि दौलतखानच्या दरवाजावर नौबती झडू द्या. हमीदोद्दीन खान बहादूर यांचा झेंडा बरोबर राहु द्या. मिरवणूक देवडीपर्यंत येऊ द्या. काजी अक्रमखान, (बादशाही छावणीतील मुख्य काजी) मुहंमद गौस, मुहंमद आकिल यांनी निका पढवावा आणि साक्षीदार म्हणून काम पहावे. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली. बादशहाने काजी अक्रमला शंभर अश्रफ्या आणि एक माळ बक्षीस म्हणून दिल्या.

बादशहाने शाहजादा मुहंमद कामबक्ष याला पंधरा घोडे बक्षीस म्हणून दिले.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्ला खान याला तुंगच्या किल्ल्याच्या फत्तेनंतर अल्लावर्दीखान ही पदवी देण्यात आली होती. ती पदवी आता काढून घेण्यात आली.

औरंगाबादच्या रक्षणासाठी सर्फराजखान याला पाठविण्यात आले. निरोपाच्या वेळी त्याला मदत म्हणून पाच हजार रुपये देण्यात आले.

**नऊ जून १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**दहा जून १७०४**

शंकराजीचा (शंकरजी मल्हार) मुलगा व्यंकटराव हा आपल्या बापाबरोबर आपल्या तैनातीच्या जागी म्हणजे खान नुस्रतजंग (झुल्फिकार खान) याच्या छावणीकडे रवाना झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले: रसुलाबाद (शिवापूर) च्या ठाण्यावर चोरांच्या (मराठयांच्या) सैन्याने हल्ला केला असून तेथील ठाणेदार हश्मतउल्ला याच्याबरोबर त्यांचे युद्ध चालू आहे. बादशहांनी हशमत्उल्लाच्या मदतीसाठी कामियाबखानाला रवाना केले. कामियाबखानाच्या बरोबर असलेल्या सैनिकांना पगार बाकी म्हणून पाचशे अश्रफ्या द्याव्या म्हणून आज्ञा झाली.

**अकरा जून १७०४**

काबुलचा सुभेदार शाहजादा मोअज्जम बहादुरशहा याला बादशहाने दोन हजार किंमतीचे हत्तीचे पिल्लू दिले. ते काबुलकडे पाठवावे म्हणून मोअज्ज़मचा वकील मुहंमद इखलास याला सांगण्यात आले.

काल सर्फराजखानाचा भाऊ मखसूसखान आणि पुतण्या मुहमंद आरिफ हे दोघे आपल्या भावाकडे (औरंगाबादेस) रवाना झाले. मखसूसखानाला अडीच हजार जात आणि दोनहजार स्वार अशी मनसब होती. सर्फराजखानाची मुले, अब्दुल कादर, असदउल्ला आणि कासिम यांना त्यांच्या बापापाशी तैनात करण्यात आले.

झुल्फिकारखानाकडे भेट म्हणून पाठविण्यासाठी सुरमा आणि सुरमादाणी ही यार अलीबेग यांजकडे देण्यात आली.

**बारा जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

बाधूचा मुलगा अली (धर्मांतरित) हा तळकोकणचा चौधरी होता. त्याची मनसब वाढविण्यात आली. त्याचा मुलगा अबईर्रहमान याला नव्याने शंभरची मनसब देण्यात आली.

अनुक्रमणिका

करडे निमोणे येथील माजी ठाणेदार अबदुर्रसूल याला हुजूरात बोलावण्यात आले होते. त्याला मुहंमद अमीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**तेरा जून १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. मिर्जा सफवीखान याला मतलबखानाच्या ऐवजी पाचव्या चौकीचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले. मतलबखान हा पहिला चौकीचा अधिकारी झाला.

पातोड्याचा जमिनदार आणि किरपाजीचा मुलगा शंकरजी हा सदरुसुदूरचा (मुख्य न्यायाधीश) कारभारी ख्वाजा मुसा याच्या मध्यस्थिने मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याचे नांव अब्दुल करीम ठेवण्यात आले.

इनायतउल्लाखान (औरंगजेबाचा चिटणिस आणि पत्रलेखक) याचा कारभारी केशवदास याची मनसब वाढविण्यात आली.

रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग याला कामियाबखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**चौदा जून १७०४**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

> “यासीनखान याच्या जहांगिरी खानदेश सुभ्यात आहेत. पाईने विलायत (वाई प्रांत) येथील महसूलाबाबत यासीनखानाकडे तीस हजार रुपये देणे आहे. मुहंमद अमीन गुजबर्दार याने खानदेशात जाऊन यासीनखानाच्या ताब्यात असलेल्या जहागीरीतून तीस हजार रुपये वसूल करावे आणि बऱ्हाणपुरच्या खजिन्यात त्याचा भरणा करावा.

**राजे शाहू यांचे लग्न**

राजा शाहू यांचे लग्न बहादुरजी (जाधव) याच्या मुलीशी ठरले. त्यानिमित्त राजे शाहू यास मदत म्हणून तेरा हजार रुपयाचे अलंकार देण्यात आले. आपल्या मुलीच्या अंगावर घालण्यासाठी म्हणून बहा रजी याला तेराशे रुपयांचे अलंकार देण्यात आले.

**पंधरा जून १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. काल (चौदा जून) दिवस मावळता नरकवासी संभा (संभाजी महाराज) याचा मुलगा राजा शाहू हा स्वतःचे लग्न ठरविल्यामुळे बादशहाच्या हुजूरात आला. त्याने बादशहाला मुजरा केला. बादशहाने त्याला मुंडावळीसाठी म्हणून माणकाचा शिरपेच (हजार रुपये किंमतीचा) रत्नजडित कमरपट्टा (तेराशे रुपये किंमतीचा) व खिलातीची वस्त्रे दिली. बादशहा म्हणाले

दौलत खान्यापासून बहादुरजीच्या तंबूपर्यंत नौबती वाजविण्यात याव्यात. राजा शाहूच्या स्वारीसाठी सरकारातील लाल अंबारीचा छत्र असलेला हत्ती देण्यात यावा. वरातीमध्ये पुढील मंडळींनी राजा शाहूच्या बरोबर राहावे. छावणीचा कोतवाल सरबराह खान, नगारखान्याचा दारोगा (अधिकारी) मुहंमद अमीन, फत्ते दौलतकौल, हमीदोद्दीन खानाची फौज, फरासखान्याचा मुश्रफ (अधिकारी) मुहंमद हादी, नाजिर (सुपरिन्टेन्डेन्ट) (किंवा निरिक्षक), खिदमतगार खान याचा नायब हाजी सुहेल.

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

बादशहाने हमीदोद्दीनखान यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—"मला सुभे माळवा, अलाहबाद, अकबराबाद (आग्रा) व अजमेर यांचे नकाशे काढून पाहिजेत. या सुभ्यात शत्रूंनी (मराठे, रजपूत, बुंदेले, अफगाण इ.) कुठे कुठे छावण्या घातल्या आहेत आणि त्यांचे तळ कोणत्या फौजदारीत (जिल्ह्यात) व जामिनदारीत कुठे कुठे आहेत हे नकाशात दाखविण्यात यावे. असे नकाशे तयार करुन माझ्यासमोर ठेवा.

रहीमबेगचा मुलगा रुस्तुमबेग हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला दोनशे पन्नासची मनसब देण्यात आली.

आदिलाबाद (भुसावळ जवळील एदलाबाद) येथील फौजदार अब्दुल वहाबखान याची मनसब कमी करण्यात आली. बादशहांना कळविण्यात आले की, माहुरचा किल्लेदार आणि मरहूम कादर दादखान याचा मुलगा हा मरण पावला. बादशहाने आज्ञा केली की, इनायतउल्लाखान याने त्या जागेवर सजावारखान याचा मुलगा मुबारकरू याची नेमणूक करावी. त्या किल्ल्याबाबत पन्नास हजाराची पेशकश घ्यावी. त्याने कबूल केल्यास बरे, नाहीतर उदाजीराम याची किल्लेदार म्हणून नेमणूक करावी आणि त्यांच्यावर ती पेशकश घालावी. अशा प्रकारचे नेमणुकीचे कागद तयार करुन माझ्यासमोर आणावे.

मुबारकरु यांस चारशे जात आणि शंभर स्वार अशी मनसब होती. तर उदाजीराम यांस तीनशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती.

मुहंमदाबाद (बहुधा बीदर) चा किल्लेदार जलालउद्दीनखान याजपाशी त्याचा पुतण्या अमानतुल्ला याला तैनात करण्यात आले.

**सोळा जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.— दियानतरावाचा भाऊ रामसिंग उर्फ रामजी, हमीदोद्दीखानाचा नोकर अबदुस्सलाम आणि राजा शाहुचा नोकर सटवा (सटवाजी) हे राजमाचीच्या किल्ल्यातील माणसाबरोबर किल्ल्यात गेले होते. त्या तिघांच्या बरोबर मुगल छावणीतील वीस सैनिक होते. त्यांच्याबरोबर हमीदोद्दीनखान, तरबियतखान आणि राजा शाहू याचे झेंडे होते. हे सर्व घेऊन ते किल्ल्यात गेले.

**सतरा जून १७०४**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते. नकदअलीबेग गुर्जबर्दार याला दुर्गादास राठोड यांस घेऊन येण्यासाठी अहमदाबादेस पाठविण्यात आले होते. पण आता दुर्गादासला बोलावण्याची जरूर नाही. गुर्जबर्दाराने परत यावे अशी आज्ञा करण्यात आली.

अबदुलगनी याला पाईने विलायतचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

रायभान (रायभान भोसले तंजावरकर नाही) याच्या भाऊबंधांपैकी मुहंमद आजमचा मुलगा दिलावर याला एक हजार जात व दोनशे मनसब होती. त्याला सर्फराजखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

कल्याणीचा माजी फौजेदार अहसनखान याला फुलंब्री (औरंगाबाद जिल्हा) चा फौजेदार आणि औरंगाबाद ते फर्दापूर या मार्गाचा रक्षक म्हणून नेमण्यात आले. त्या जागेवर या पूर्वी मरहूम मामूरखान याचा जावई सय्यद मन्सूर हा काम करीत होता. त्याला औरंगाबादेत तैनात करण्यात आले.

नजमुद्दीन हा औरंगाबाद सुभ्याचा जजिया वसुलीचा अमीन (अधिकारी) होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

मुहंमद मुरादखानाचा (इतिहासकार खाफिखान याचा मित्र) भाचा मुहमंद खलील हा बऱ्हाणपूर येथे पेठेवर अधिकारी (अमिन) होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**अठरा जून १७०४**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. मिर्झा सफवीखान उर्फ अली नकी याला तीनशे रुपये किंमतीचा मीनाकाराचा खंजीर आणि बल्खचा राजदूत याला दोनशे अश्रफीच्या वजनाची एकच अश्रफी बक्षीस म्हणून देण्यात आली.

सजावार खानाचा मुलगा मुबारकरू याला माहुरची किल्लेदारी व फौजेदारी देण्यात आली. पेशकषीचे पन्नास हजार रुपये माफ करण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

ख्वाजा मुसा याच्या मध्यस्थतीने जोधराज हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. बादशहाने त्याचे नाव अब्दुल मोमीन असे ठेवले.

अमानतखान हा संगमनेर व गंगापूर येथे अमीन व फौजदार होता. [हाच पुढे मुबारिजखान या नावाने हैद्राबादचा सुभेदार झाला, व निजामउल्मुल्काबरोबरच्या लढाईत मारला गेला. (इ.स.१७२४)].— याच्या मनसबीत सवलती देण्यात आल्या.

मरहूम खानजमान फत्तेजंग (संभाजी महाराजांना पकडणारा) याचा मुलगा अब्दुलकादर याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

**एकोणवीस जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते.

सियालकोट (पंजाब) येथे शहाजादा मोअज्जम बहादुरशहा यांच्या अधिकाऱ्यांनी मौलवी अबदुल्ला यांची अबदुल हफीज वगैरे मुले यांना कैद करून ठेवले होते. बादशहाने यांना सोडवण्यासाठी मुहंमदअश्रफ गुजबर्दार याला पाठविले. आज्ञेप्रमाणे त्याने सियालकोटला जाऊन त्यांची सुटका करविली. त्यानंतर तो परत आला. त्याची मनसब वाढविण्यात आली.

**वीस जून १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

**कंधार (जिल्हा नांदेड)**

सय्यद हुसेन हा कंधारचा किल्लेदार व फौजदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर हुजराखान मरहूम याचा मुलगा असदउ—ला याची नेमणूक करण्यात आली. त्याला चारशे जात व शंभर स्वार अशी मनसब होती. तीत शंभर जात व दीडशे स्वार अशी भर घालण्यात आली.

सुरत बंदरातील जहाजाचा (जहाजाचे नाव लागत नाही.) नाखुदा (कप्तान, अधिकारी) हा येऊन बादशहाना भेटला. त्याने घोडा, तलवार, नमाजाची सतरंजी, कलमदान, पानदान, दालचिनी व लवंग याचे अर्क इत्यादी वस्तू भेट म्हणून दिल्या. त्यापैकी लवंग, दालचिनीचे तेल घेऊन बाकीच्या वस्तू बादशहाने परत केल्या.

अमाबुल्लाखान हा राजमाचीचा किल्ला जिंकून घेण्यासाठी गेला होता. त्याच्या नावे आज्ञापत्र रवाना झाले.

पाईन विलायत (वाई प्रांत) चा ठाणेदार ख्वाजाखान याला सरकारी देण्यातून काही सवलती देण्यात आल्या. ख्वाजाखानाकडे शिरोळचेही ठाणे होते. आग्र्याचा बाकीखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले.—आग्र्याची हवा मला मानवत नाही. आज्ञा असल्यास माझा मुलगा हिंदायतउल्ला याला मी येथे आपला नायब म्हणून ठेवीन व आपल्या हुजुरात येईन. ते शक्य नसल्यास, मला दिल्ली येथे कोणत्यातरी जागेवर नेमण्यात यावे. बादशहाने स्वतःच्या सहीने पत्र पाठवून कळविले की, मी किल्लेदार पाठवीत (दुसरा कुणीतरी) बादशहाने काही नावे बक्षी मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान याजकडे पाठवून त्यांचा दर्जा काय आहे याचा वृत्तांत मागितला ती नावे अशी .— (१) मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी), इरादत खान, (२) मुरीदखान, (३) बीदरचा किल्लेदार व फौजदार जलालउद्दीनखान, (४) काबुलहून बोलावण्यात आलेला सफीखान आणि (५) वजीहुद्दीनखान वगरे.

अनुक्रमणिका

बादशहाने आज्ञा केली की, पोलादबेग गुर्जबर्दार याने सजावारखानाचा मुलगा मुबारकरू याला, त्याच्या नेमणुकीच्या जागेवर माहूरला घेऊन जावे, आणि माजी किल्लेदाराची बायकामुले यांना हुजुरात आणावे.

दुर्जनसिंग हा खान फिरोज जंगाच्या फौजेत तैनात होता. तो स्वदेशी गेला होता. शाहजादा बेदारबख्त याने बंडखोराच्या पारिपत्यासाठी नर्मदा ओलांडली की, गुर्जबर्दाराने दुर्जनसिंगाकडे जाऊन त्याला रजेवरून परत आणून बेदारबख्ताकडे पोहोचवावे आणि अशी आज्ञा झाली.

बादशहाना कळविण्यात आले की, अर्जमपल्लीचा माजी किल्लेदार आणि अर्जुनगौडचा मुलगा याला हुजुरात बोलावण्यात आले होते. तो अद्याप आला नाही. त्याची मनसब (जहागीर) काढून घेण्यात यावी अशी आज्ञा झाली. त्याला चारशे जात आणि पन्नास स्वार अशी मनसब होती. त्याचा मुलगा हैबतराव याला दीडशे जात व वीस (२०) स्वार अशी मनसब होती.

**एकवीस जून १७०४**

बादशहाना कळविण्यात आले की, अमानुल्लाखान याने राजमाचीचा किल्ला ताब्यात आणला आहे. बादशहाने किल्ल्याचे नांव मफतूहुल हसन असे ठेवले आणि आज्ञा केली की, "मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद जफर व मीर आतिश तरबियतखान याचा कारभारी (पेशदस्त) दियानतराव यांनी जाऊन किल्ल्यात (राजमाची) खबरदारी बाळगावी."

मीर खानाजादखान याने बादशहांना पुढीलप्रमाणे कळवले.—"मीर तुजक इरादतखान हा आर्थिक अडचणीमुळे त्रस्त आहे. तो कर्जबाजारी झाला आहे. तो ओटगस्तीत दिवस काढीत आहे. आपल्यावर कृपा होईल अशी आशा बाळगून आहे." बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—"इरादतखान याला त्याच्या जहागीरीचे उत्पन्न येऊ लागेपर्यंत महिन्याला एक हजार रुपये सरकारातून देण्यात यावे."

सफवीखान याचा पगार राजपूर, शिराढोण आणि परळी या खालसा महालातून देण्यात यावा, अशी आज्ञा करण्यात आली.

औरंगाबादचा माजी बक्षी व वाकेनवीस अब्दुलहसन याला शाहजादाबेदारबख्त याजकडे तैनात करण्यात आले.

**सत्तावीस जून १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**अठ्ठावीस जून १७०४**

बादशहाने हमीदोद्दीन यास बोलावून त्याला खिलातीची वस्त्रे दिली. बादशहा त्याला म्हणाले.—— "तुम्ही बंगालचा सुभेदार मुहंमद अजीम (अजीमुश्शान) याला पुढीलप्रमाणे पत्र लिहा.—अरसलान

अनुक्रमणिका

खानाचा मुलगा आणि मरहूम अलावर्दीखानाचा नातू मुहंमद तकी हा जर गुणी असेल तर त्याला हुजूरात पाठवावे. त्याची आर्थिक स्थिती चांगली नसल्यास त्याला एक हजार रुपये मदती दाखल द्यावे.

पेमगडचा किल्लेदार आणि शेखज महमूदचा मुलगा शेख मुहंमद याला किल्लेदारीच्या जागेवर पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले. त्याला अडीचशे जात व दीडशे स्वार अशी मनसब होती.

फुतूहुल हसन (राजमाची) च्या किल्लेदारीसाठी मुहंमद तकी याचे नाव लक्षात ठेऊन बादशाहीने याच्या मनसबीची चौकशी केली.

## कोल्हापूरचा ठाणेदार

कोल्हापूरचा ठाणेदार नाहरखान हा आपला मुलगा मुहंमद बहादुर याला ठाण्यावर आपला नायब म्हणून ठेऊन स्वतः बादशाही छावणीत आला. त्याला भेटीची परवानगी देण्यात आली.

मुहंमद मुराद ईरजी याला नलगुंड्याचा (आंध्र प्रदेश) किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले.

कामगारखान याची मुले मुहंमद काजिम, मुहंमद आसिम, मुहंमद हैदर व इस्लाममुल्ला यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

इस्लामगडच्या किल्लेदारीवर मुहंमद फाजिल याची त्याच्या दिवंगत बापाच्या जागी नेमणूक करण्यात आली.

लालजी हेर, याच्याकडून कळले की, अईजखानाच्या मुलीचा मुलगा आणि आशुरखानाचा मुलगा अब्दुल्ला बेग हा परवानगीशिवाय औरंगाबादेस गेला आहे. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

## एकोणतीस जून १७०४

शंकराजी वगैरे मंडळींना खान नुस्रतजंगच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. त्यांनी (शंकराजी मल्हार) हुजुरात राहावे अशी आता आज्ञा झाली. सईदखान हा खान नुस्रतजंग याच्या फौजेत तैनात होता. त्याला दोन हजार जात व आठशे स्वार अशी मनसब होती. तो मरण पावला. त्याची सादतखान आदि मुले यांचे हुद्दे कळविण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

## तीस जून १७०४

मरहूम सईदखान यांच्या मुलांना मनसबी देण्यात आल्या. मोठा मुलगा मुहंमद अर्शद याला खान ही पदवी देण्यात आली.

बादशाही छावणीचा प्रमुख काजी काजीउल्कजात अक्रमखान याला चार हजार रुपये किंमतीचा हत्ती बक्षीस देण्यात आला. तोफखानाचा अधिकारी अब्दुल अलीखान याला चाळीस मोहरा देण्यात आल्या.

अनुक्रमणिका

लाल डगलेवाल्याचा (सुर्खपोषान्) अधिकारी अब्दुल हादी याला विजापूर सुभ्याच्या तोफखान्याचा दारोगा व कोतवाल म्हणून नेमण्यात आले.

कामगारखान याला बंगाल सुभ्यात तैनात करण्यात आले.

**विजापूर –कर्नाटक**

खान नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याच्या तर्फे दाऊदखान (पन्नी) हा हैद्राबाद-कर्नाटकचा फौजदार म्हणून काम पाहात होता. विजापूर-कर्नाटकावर खुदाबंदाखान (शाईस्ताखानाचा मुलगा आणि औरंगजेबाचा मामेभाऊ) हा फौजदार म्हणून काम करीत होता. त्याच्या जागेवर विजापूर-कर्नाटकच्या फौजदारीवर दाऊदखानाला हैद्राबाद-कर्नाटकच्या जोडीने फौजदार म्हणून नेमण्यात आले. खुदावंदाखानाला बादशहाने हुजुरात बोलाविले.

मांडवगडचा (माळवा) किल्लेदार व फौजदार नवाजिसखान याची तैनाती बंगाल सुभ्यात करण्यात आली.

रुस्तुमराव (जाधव) हा रोषनगाव (औरंगाबाद जिल्हा) चा ठाणेदार आणि औरंगाबाद ते जालना या दरम्यानचा राहदार (मार्ग रक्षक) होता. त्याला सातशे जात आणि सहाशे स्वार अशी मनसब होती. बादशहानी दोनशे जात व पांचशे स्वार अशी त्याची मनसब कमी करून त्याला (रुस्तुमरावाला) तेथून बदलावे अशी आज्ञा केली.

माहुलीचा किल्लेदार आदिदखान याच्या मुलांना मनसबी देण्यात आल्या. मुलगा मुहंमद हुसेन, पुतण्या मुहंमद अली, सदरुद्दीन, बदरुद्दीन अशी आदिदखानाच्या आप्तांची नावे आहेत.

**१ जुलै १७०४**

काल बादशहाने नवाब झिन्नतुन्निसा बेगम हिच्यासाठी आंब्याच्या चार करंड्या काढून ठेवल्या– यारअली बेगला आज्ञा करण्यात आली की, जासूदांच्याबरोबर करंड्या झिन्नतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) कडे पाठविण्यात याव्या.

दाऊदखानाने पाठविलेला शंकराजी (शंकराजी मल्हार) याला बादशहाने सहाय्य म्हणून पाच हजार रुपये दिले.

कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) व बारामती येथील ठाणेदार सुलेमानखान याने पत्र लिहून विनंती केली की, "दारुगोळ्यासाठी मी विनंती केली होती ती मान्य झाली नाही. या ठिकाणी शत्रूशी (मराठ्यांशी) नेहमी युद्ध प्रसंग येतो. तोफांचा सरंजाम आवश्यक आहे. आसपासचे ठाणेदार युद्धाच्या प्रसंगी माझी मदत करत नाहीत, तर दारूगोळा पुरविण्यात यावा आणि आसपासच्या ठाणेदारांना हुजुरांतून माणसे पाठवून ताकीदी देण्यात याव्यात, म्हणजे चोरांचे (मराठ्यांचे) खरेखुरे पारिपत्य होईल". बादशहाने आज्ञा केली की,

अनुक्रमणिका

दक्षिणेच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान व मीर आतिश ह्यांनी दारूगोळा पाठविण्याची व्यवस्था करावी; आणि ठाणेदारांना ताकीदी देण्यासाठी हुजुरांतून माणसे पाठविण्यात यावीत.

बादशाही छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याने विनंती केली की, सैन्यातील सैनिक यांना घेऊन मी बंदोबस्तासाठी कोरेगावाला गेलो होतो. तेथील ठाणेदार अब्दुल गफार याने माझ्या सोबतीस असलेल्या माणसावर हल्ला केला आणि त्यांना जखमी केले. बादशहाने आज्ञा केली की, ठाणेदार बदलावा व त्याचा हुद्दा कळवावा.

**दोन जुलै १७०४**

यार अलीखान याने कळविले की, अमानुल्लाखान याने किल्ले मरकगड (मार्गगड) हे स्थळ शत्रूकडून (मराठ्यांकडून) जिंकून घेतले आहे.

विजापूर-कर्नाटकच्या फौजदारीवर दाऊदखानाची नेमणूक झाली. त्याला खास खिलातीची वस्त्रे देण्यासाठी म्हणून वेगळी काढून ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**तीन जुलै १७०४**

पावसामुळे आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाने आज्ञा केली की, आज आम्ही पवित्र अवशेषांचे (आसार शरीफ) दर्शन व प्रदक्षिणा करणार आहोत. आमच्या दौलतखान्यापासून (बादशहाचे वास्तव्यस्थान) त्या स्थळापर्यंत कनातीचे पडदे उभे करा.

जैनुल आबिदीन ह्याला खान ही पदवी होती. त्याला एक हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब होती. त्याला दाऊदखानाच्या फौजेत तैन्यात करण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, दुर्गादासाचे पुतण्यांना बडतर्फ करण्यात आले होते. ती मुले दुर्गादासाची आहेत असे समजून; पण चूक कळल्यावर खेमकरण याची मनसब आणि दलकरण याची मनसब बहाल ठेवण्यात आली. खेमकरण हा जसकरणाचा मुलगा होय. असे सांगण्यात आले.

**चार जुलै १७०४**

आज बादशहा पवित्र अवशेषांच्या दर्शनासाठी आणि प्रदक्षिणेसाठी गेले. बादशहा तेथे दोन घटिकांपर्यंत होते. त्या ठिकाणी ते फातेहा (प्रार्थना) पढले. अवशेषांसमोर एक हजार रुपये आणि एकशेपन्नास अश्रफ्या ठेवल्या. त्यानंतर ते आपल्या वास्तव्यस्थानाकडे परत आले.

दियानतखान याचा मुलगा अली नकी (मासिरउल् उमराचा कर्ता शहानवाजखान याचे घराणे) हा मुहंमदाबाद उर्फ बिदर या सुभ्याचा दिवाण होता. त्याला तेथून बदलण्यात आले आणि त्याची नेमणूक सिराजउद्दीनच्या जागी सुभे बुऱ्हाणपूरचा दिवाण म्हणून करण्यात आली.

अनुक्रमणिका

**पाच जुलै १७०४**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. अमानुल्लाखान याला हुजुरात येण्याविषयी आज्ञा पत्रे रवाना झाली.

गजपत उर्फ अबदुल माबूद याची मुले मुसलमान झाली. त्यापैकी जगपत याला अबदुल मोजद हे नाव देण्यात आले आणि रघुपत याला अबदुल वदूद हे नाव देण्यात आले. बादशहाने त्यांना मनसबी आणि खिलातीची वस्त्रे दिली.

मिर्जा सफवीखान याला पाचू आणि माणिक याच्या अंगठ्या देण्यात आल्या. अर्ज समोर ठेवण्याच्या खात्याचा अधिकारी हाफिज अंबर याला चार हजार रुपये किंमतीचा हत्ती देण्यात आला.

मुहंमदअली बेग याला खिलातीची वस्त्रे देऊन नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मरहूम रुहुल्लाखान याचा खलीलउल्लाखान, हा शागीर्द पेशाचा अधिकारी होता. तो आजारातून बरा होऊन बादशहांना भेटला.

बादशहाने हिदायत केश वाकेनिगार याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—"हजरत आला (शहाजहान) च्या कारकीर्दीपासून आजपर्यंत दक्षिणचे सुबेदार कोणकोण होऊन गेले ह्यांची नावे लिहून माझ्यासमोर ठेवा."

मुहंमद तकी याला राजमाचीची किल्लेदारी व नवलाख उमऱ्याची ठाणेदारी देण्यात आली. त्या ठाणेदारीवर पूर्वी निजामराव हा काम करीत होता. निजामराव हा आता कडूसच्या ठाणेदारीवर काम करू लागला.

बादशहाने आज्ञा केली की, विजापूर-कर्नाटकाच्या फौजदारीच्या नेमणुकीचे फर्मान दाऊदखान याच्या नावे पाठविण्यात यावे.

**सहा जुलै १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. तरबियतखान याजबरोबर देण्यासाठी सैन्य आणि अधिकारी यांची यादी तयार करण्यासाठी मतलबखान यास सांगण्यात आले होते. त्याप्रमाणे मतलबखानाने यादी (तूमार) तयार केली. एकंदर सैन्य चार हजार एकोणसत्तर स्वार असे भरले. या सैन्यात अधिकारी पुढीलप्रमाणे:—

(१) अजीजखान—अडीच हजार जात व एक हजार स्वार.

(२) शिवसिंग—दीड हजार जात व एक हजार स्वार,

अनुक्रमणिका

(३) रायभान—(तंजावरकर भोसले) सहा हजार जात व दोन हजार स्वार.

(४) सय्यदखान—एक हजार जात व दोनशे पन्नास स्वार.

(५) निजामराव—एक हजार जात व आठशे स्वार.

(६) शाकिरउल्ला—सातशे जात व दोनशे स्वार.

(७) शाहजादा कामबक्षाच्या सैन्यातील स्वार, संख्या ३०० (तीनशे).

वरील सैन्याचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून (ख्वाजा) मूहंमद अफजल याची नेमणक करण्यात आली.

रात्रीच्या चार घटका झाल्या असता बादशहाने तरबियतखानाला बोलावू पाठविले. तो आल्यावर बादशहाने त्याच्या योगक्षेमाची प्रार्थना केली. त्याच्याकडे दोन कामे देण्यात आली होती. एक, शत्रूंचे (मराठ्यांचे) पारिपत्य, दुसरे, मनचर (पुणे जिल्हा) येथे गढी बांधून ठाणे बसविणे.

वरील कामासाठी तरबियतखानाला निरोप देण्यात आला.

**सात जुलै १७०४**

आज दिवाणाचे काम बंद ठेवण्यात आले. किल्ले सखरलना उर्फ खेळणा (विशाळगड) येथील बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले:—

> “येथे किल्ल्याच्या बंदोबस्तासाठी नेमण्यात आलेल्या सैनिकांपैकी पाचशे इसम नोकरी सोडून निघून गेले आहेत. किल्ल्यात शिबंदी सरंजामाची आवश्यकता आहे.”

बादशहाने आज्ञा केली की, तोफखान्याचा अधिकारी मन्सूरखान याने सातशे पायदळ शिपाई भरती करून विशाळगडाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

बादशहाने आज्ञा केली की, सुलेमानबेग गुर्जबर्दार याने धान्याची रसद वगैरे सरंजाम बादशाही छावणीतून नेऊन किल्ले आजमगड (पुरंदर) येथे पोहचवून यावे.

बंगालचा खजिना आणण्यासाठी मुहंमद आरिफ वगैरे दोन गुर्जबर्दार यांना नेमण्यात आले. छावणीतील चौक्यांवर पुढील मंडळींच्या नेमणुका करण्यात आल्या.— (१) नेकनामखान, (२) तहब्बूरखान, (३) मन्सूरखान, (४) रहमतउल्लाखान, (५) मुहंमदबेगखान मरहूम याचा मुलगा फजललुल्सा हा बैंगनपल्लीचा (?) फौजदार होता. त्याच्या हुद्याला जोडूनच जलहलमला (?) ची किल्लेदारी पण देण्यात आली. तेथील किल्लेदार हा मरण पावला होता.

## आठ जुलै १७०४

आज बादशहाने न्याय कचेरी केली. बादशहाने हमीदोद्दीनखान ह्यास आज्ञा केली की, “आठ हजार रुपये किंमतीचा एक हत्ती विजापूर-कर्नाटकचा फौजदार दाऊदखान यांजकडे पाठविण्यात यावा,” तरबियतखानाचा भाऊ कामियाबखान याला त्याच्या भावाचा नायब म्हणून नेमण्यात आले.

तरबियतखानाच्या सैनिकांना पगारबाकी पैकी एक हजार अश्रफी व दहा हजार रुपये देण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली. मार्गगडकिल्ला घेतल्याबद्दल सोन्याच्या किल्ल्या व विनंतीपत्र अमानुल्लाखान याने पाठविले होते. ते बादशहाच्या नजरेखालून गेले. या वस्तू मुहंमद शफी याने आणल्या होत्या.

सुरत बंदरच्या टंकसाळीवर मिर्झाखान मरहूम याचा मुलगा मुहंमद नजीम हा होता. हा अधिकारी होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर हाजी अन्वरचा मुलगा जानजहान याची नेमणूक करण्यात आली. त्याच्याकडे जजिया वसुलीचा अधिकार (अमीन) पण देण्यात आला. हे सगळे सुरत बंदरचा कारभारी नजाबतखान याच्या विनंतीवरुन झाले. जानजहानची मनसब वाढविण्यात आली.

## श्रीरंगपट्टण

श्रीरंगपट्टण येथील हरकारा अबदुर्रहमान ह्याला सुभे माळवा येथील हरकारा म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. श्रीरंगपट्टणच्या हरकारेगिरीवर व्यंकटराव याची नेमणूक करण्यात आली.

## कोल्हापूर

कोल्हापूरचा ठाणेदार नाहरखान याने कळविले ते असे.—“येथील सवानेह निगार (बातम्या लिहून पाठविणारा) याचे माझ्याशी वितुष्ट आहे. तो माझ्याविरुद्ध गाऱ्हाणी लिहून हुजुरात पाठवित असतो. तो माझ्याकडून एक हजार तीनशे रुपयाची लाच मागत आहे. ते मला देणे शक्य होत नाही. त्याच्या जागी इतर कुणाची तरी नेमणूक व्हावी. माझ्या काही विनंत्या आहेत. परवानगी असल्यास मी येथे आपला नायब ठेऊन हुजुरात येईन”. विनंती मान्य करण्यात आली.

हैद्राबाद-कर्नाटकच्या बातम्यावरून कळले ते असे.—“शत्रूंनी तुमलान (किल्ल्याचे नाव लागत नाही) चा किल्लेदार पकडला असून किल्ला ताब्यात घेतला आहे.” बादशहाने आज्ञा केली की किल्ला परत सोडवून घेण्यासाठी दाऊदखानाला लिहिण्यात यावे.

बादशहाने आज्ञा केली की, राजमाचीच्या किल्ल्याच्या बंदोबस्तासाठी किल्ल्यात तीनशे सैनिकांची शिबंदी ठेवण्यात यावी.

## कंधार (जिल्हा नांदेड)

कंधारचा माजी किल्लेदार व फौजेदार सय्यद हुसेन याला हुजुरात बोलावण्यात आले.

अनुक्रमणिका

## कोरेगाव

कोरेगांवचा ठाणेदार अब्दुल गफार हा होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर तुर्कताजखान याची नेमणूक करण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, तुर्कताजखानापाशी फकीर, मुहंमद अईज मरहूम याच्या पथकातील ब्यांशी (८२) सैनिक तैनात करण्यात यावे. तोफखान्याचा सरंजाम पण तुर्कताजखानाला देण्यात यावा.

## वऱ्हाड

सुभे वऱ्हाडचा सवानेनिगार अब्दुलअजीज याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले.—“वऱ्हाडचे नायब सुभेदार हे शत्रूच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी जातात. त्यावेळी सुभ्याच्या ठिकाणी कुणालातरी आपल्यातर्फे ठेऊन आपण नायब सुभेदादाबरोबर जावे म्हटले तर माझे आप्तांपैकी येथे कोणी नाही. माझा भाऊ अब्दुल गफार हा हुजुरांत आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. त्याची विनंती मान्य करण्यात आली.

## नऊ जुलै १७०४

आज दिवाणाचे काम बंद होते. शाहजादा कामबक्ष हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहांना भेटला. ख्वाजा इशरत महली याने बादशहाना रातराणीची फुले नजर केली. ती बादशहाने कामबक्षाला दिली.

बादशहाला कळविण्यात आले ते असे.— पाईन विलायत (वाई प्रांत) प्रांतात, (वाई पासून) अडीच कोसांवर (विराटगड) किल्ला आहे. चोरांच्या (मराठ्यांच्या) सैन्याने येऊन किल्ल्याला वेढा घातला. तेथील किल्लेदाराला कैद केले आणि किल्ला ताब्यात घेतला. (शत्रूनी) म्हणजेच मराठ्यांनी.

बादशहांनी मीर जाफरचा मुलगा, खुदानजर गुर्जबर्दार याला नेमून तिकडे पाठविले. बादशहानी आज्ञा केली की, कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमान आणि पाईने विलायत (वाई प्रांत) चा ठाणेदार ख्वाजाखान यांना त्या किल्ल्याकडे न्यावे. त्यांनी शत्रूचे (मराठ्यांचे) पारिपत्य करून किल्ला परत जिंकून घ्यावा.

तरबियतखानाच्या फौजेत अजीजखान हा तैनात होता. तो आजारी पडला. बादशहाने आज्ञा केली की, तैनाती रद्द पण त्याची पथके तरबियतखाना बरोबर राहतील.

बादशहाना कळविण्यात आले की, बालमकोंडा (पालमकोंडा) चा किल्लेदार सय्यद मुहंमद (सय्यद आरिफचा मुलगा) मरण पावला.

## दहा जुलै १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. काबुलचा सुभेदार माअज्ञम याने बेनिशाहगड (राजगड) फत्ते झाल्याबद्दल निसार (ओवाळणी) म्हणून एक हजार अश्रफ्या पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या. बादशहाने आज्ञा केली की, शहाजादा बेदारबख्त आणि अमीर उल् उमर (मुख्य प्रधान) यांना देण्यासाठी, पावसाळ्याचे अंगरखे काढून ठेवण्यात यावे.

**अकरा जुलै १७०४**

मेहदीखानाचा मुलगा मिर्जा मुहंमदखान हा कल्याणीचा किल्लेदार होता. त्याची मनसब कमी करण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की, किलीदेफतः (वसंतगड) चा किल्लेदार तुळशीराम हा असून नियमाप्रमाणे त्याने जितके पथक बाळगावयास पाहिजे तितके त्याच्याजवळ नाही. बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद शफी गुर्जबर्दार याने जावे आणि तुळशीरामाला नियमाप्रमाणे पथके ठेवण्यास लावावे, याशिवाय, किल्ल्याची डागडुजी करवून परत यावे.

**सातारा प्रातांतील ठाणेदार**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली.—(१) म्हसवडचा ठाणेदार नागोजी माने, (२) बुधपाचगावचा ठाणेदार पदाजी (घाटगे) आणि (३) खटावचा ठाणेदार किशनराव यांनी विराटगड जिंकून घेण्यासाठी कऱ्हाडाबादचा ठाणेदार सुलेमानखान याजपाशी जावे. या कामासाठी मीर अहमद गुजर्बदार याला पाठवून आज्ञा करण्यात आली की, त्याने सदर ठाणेदारांना सुलेमानखानापाशी पोहोचवून परत यावे.

दाऊदखानाच्या शिफारशीवरून पुढील मंडळींच्या मनसबी वाढविण्यात आल्या. दाऊदखानाचा मेहुणा (यजना) आणि सजावलाचा मुलगा बहादूर, त्याचा भाऊ खुदादिल आणि पीर अंदाजचा मुलगा बरकंदाज.

सदरुद्दीन मुहमदखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली.—अष्टीचा ठाणेदार संग्रामखान आणि जालनापूरचा ठाणेदार जंगजुईखान हे आपल्या ठाण्यात आपल्यातर्फे नायब ठेऊन काही विनंती करण्यासाठी छावणीत आले आहेत. त्यांना रेहकलाबारमध्ये येण्याची परवानगी आणि हुजुरात येण्याची आज्ञा व्हावी. अशी आज्ञा देण्यात आली.

**बारा जुलै १७०४**

शाहजादा बेदारबख्त याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले होते. त्याच्या उत्तरात त्याची अर्ज दास्ताई खान फिरोजजंग याच्या नावे फर्मान पाठविण्यात यावे.

हिंदायतुल्लाखान आजारी होता तो बरा होऊन बादशहांना भेटला.

मर्तूजाबाद (मिरज) चा किल्लेदार मुहमद मोसीन याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

मातबरखानाचा चुलत भाऊ (अम्मू जादा) आणि अबदुल्लाचा मुलगा, मुहंमद हुसेन याला जैनुलाआबिदीन अलीखान याच्या विनंतीवरून फुतूहुलहसन (राजमाची) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मनसब वाढिवण्यात आली.

राहेरी (रायगड) (उर्फ इस्लामगड) च्या ठाण्यावर, मुहंमद मुकीम हा तोफखानाचा दारोगा होता. त्याच्या जागेवर सुल्तान बेगचा मुलगा अबदुल्लाबेग लारी आणि (१) माहुरच्या ठाण्यावरील तोफखानाच्या अधिकारी याची नेमणूक करण्यात आली. हा बदल शिवसिंगाच्या विनंतीवरुन करण्यात आला. मिफताहाखान कोलार हैद्राबादी याला पन्नास कौलारा सहित (सैनिक) मुगलखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

गजपत कंबू उर्फ अबदुल माबूद आणि त्याची मुले यांना लाहोर सुभ्यात तैनात करण्यात आले.

कडूसचा ठाणेदार निजामराव याला नवलाखउमऱ्याच्या ठाणेदारीवर पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले. त्याला एक हजार जात आणि आठशे मनसब होती.

शाहबाज पन्नी हा खानफिरोज जंगाच्या फौजेत तैनात होता. त्याला बडतर्फे करण्यात आले. फिरोजजंगाच्या सांगण्यावरुन त्याला पूर्ववत बहाल करण्यात आले.

**तेरा जुलै १७०४**

शाहजादा कामबक्ष आणि (त्याचा मुलगा) सुल्तान-मुहिउल्ला यांना पावसाळ्यासाठी म्हणून अंगरखे देण्यात आले.

**चौदा जुलै १७०४**

बल्खचा राजदूत ख्वाजाजाहिद याचे सहकारी मुहमद शरीफ, गाजीबेग आणि तदबीरबेग यांना बक्षीसे देण्यात आली.

अबदुर्रहीमबेग याला कोरेगावच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, मरहूम फकीर मुहंमद अईज याच्या पथकातील ब्यांशी (८२) मुगलसनिक अबदुर्रहीम बेगपाशी तैनात करण्यात यावे. कोरेगावच्या ठाणेदारीवर तुर्कताजखानाची नेमणूक करण्यात आली होती, ती रद्द करण्यात आली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली —मुहियाबाद (पुणे) च्या ठाण्यातून चाळीस मन दारुगोळा काढण्यात यावा. ठाणेदार हश्मतउल्ला याने तो दारुगोळा शिरोळ (शिखळ) ला पोहचवावा तेथून पाईने विलायत (वाई प्रांत) चा ठाणेदार ख्वाजाखान याचा नायब याने तो दारुगोळा कऱ्हाडाबादचा ठाणेदार सुलेमानखान यांजकडे पोहोचवावा. हुजुरातून शंभर बाण हे सुलेमान खानाकडे पाठविण्यात यावे.

बादशहाच्या निकटच्या शागीर्द पेशाच्या खात्याचा (जल्लूखान) अधिकारी (दारोगा) खलीलउल्लाखान याने विनंती केली की, शागीर्दाच्या पगाराचे फार देणे राहिले आहे. काय आज्ञा?

बादशहा म्हणाले —खजिना येण्याची वाट पहा. हिदायतउल्ला याने युरोपियन पद्धतीचे शिकार पकडण्याचे मोठे जाळे बादशहाच्या समोर ठेवले. हे जाळे चौपन हात लांब-रुंद होते. बादशहाने ते पाहून त्याची किंमत एक हजार दहा रुपये अशी ठरवली.

छत्रमल हा खानसामांचा कारभारी होता. त्याला शहाजहानाबाद (दिल्ली) येथे तैनात करण्यात आले.

सर्फराजखान याला औरंगाबादच्या रक्षणासाठी (देखरेख) पाठविण्यात आले होते. आता बादशहाने आज्ञा केली की, सर्फराजखान याने तूर्त अहमदनगर येथे राहावे.

पुढील लोकांची पत्रे बादशहाच्या हुजुरात आली.—(१) माळव्याचा सुभेदार शाईस्ताखान, (२) औरंगाबाद आणि बऱ्हाणपूरचा फौजदार व कोतवाल रफीखान, (३) शिकाकोळ (आंध्र-श्रीकाकुलम) चा फौजदार सस्तुम दिल्खान.

माहुरचा फौजदार मुबारकरू याच्याबरोबर नजर मुहंमद वगैरेंना तैनात करण्यात आले. नजर मुहंमद आणि सर्फुद्दिन.

**पंधरा जुलै १७०४**

कोल्हापूरचा ठाणेदार नाहरखान हा हुजुरात आला. तो आणि त्याचा मुलगा गुलाम मुहियोद्दिन हे दोघे बादशहाना भेटले.

मुईनोद्दिन सादुल्लाखानी याला मार्गगडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. मिरमुहंमद रजा हा गुलशनाबाद (नाशिक) येथे बक्षी व वाकेनवीस होता. त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले. त्याच्या जागेवर इब्राहिमबेग याची नेमणूक करण्यात आली.

मरहूम शम्शुद्दीन मुहंमदखान (कंधारचा किल्लेदार इ.स.१७०१ मध्ये मिरजेच्या लढाईत मारला गेला) याचा मुलगा मीर अहमद आणि मीर अहमदची मुले मिर्जा मुहंमद आणि मुहंमद कामियाब यांना विजापूर सुभ्यात तैनात करण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले की, मुबारकरू, सोहबत यसावल व शाकिरउल्लाखान याच्यात आपसात शिवीगाळ झाली. बादशहाने मनसब कमी केली.

अमीरखान मरहूमचा मुलगा मरहमतखान हा दुपारच्या नमाजाच्या वेळी हुजुरात आला होता. बादशहाने त्याला मना करुन न्याय कचेरीत येणे जाणे ठेवावे असे सांगितले.

**सोळा जुलै १७०४**

वरिष्ठ अधिकाऱ्यांना पावसाळी कपडे देण्यात आले. त्यात शाहजादा बेदारबख्त, विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान (भावी निजामउल्मुल्क) समावेश होता.

मार्गगड किल्ल्याचे नाव मर्दगड ठेवावे अशी आज्ञा झाली.

**सतरा जुलै १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. मन्चर (पुणे जिल्हा) येथे गढी बांधण्यासाठी तरबियतखान गेला होता. तो येऊन बादशहाला भेटला.

खाजाबाबा ह्याला हैद्राबादचा काजी म्हणून नेमण्यात आले.

माळव्याचा सुभेदार शाइस्ताखान याने राजिनामा दिला. बादशहाने त्या जागेवर नेमणूक करण्यासाठी म्हणून कामगारखान (औरंगजेबचा मावसभाऊ) व मांडवगडचा माजी किल्लेदार नवाजिसखान यांच्या हुद्याची चौकशी केली.

तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान बहादूर याने पुढीलप्रमाणे विनंती केली.—"माझ्यातर्फे, माझा मुलगा मुहंमद इसहाक हा अहमदनगर येथे किल्लेदार व फौजदार आहे. त्याचे लग्न ठरले आहे. त्याला हुजुरात यावयाचे आहे. त्या ठिकाणी नायब म्हणून मीर लष्करीचा मुलगा मीर अस्करी याची नेमणूक करण्यात यावी. बादशहाने विनंती मान्य केली आणि आज्ञा केली की, खिलातीची वस्त्रे देण्यात यावी.

**विजापूर—कर्नाटक**

शिकाकोळ (श्रीकाकुलम) चा फौजदार रूस्तुम दिल्खान हा होता. विजापूर—कर्नाटकचा फौजदार खुदाबंदाखान हा होता. बादशहाने खुदाबंदाखानाच्या जागेवर विजापूर-कर्नाटकचा फौजदार म्हणून रूस्तुम दिल्खान याची नेमणूक केली.

श्रीकाकुलमचा कारभार कामबक्षाच्या अधिकाऱ्याकडे देण्यात आला. रूस्तुमदिल खानाची मुले दिलेर दिल् व हरीर दिल् यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

मरहूम हैदरखान याचा मुलगा मुहंमद मोहसिन हा विश्रामगडचा किल्लेदार होता. त्याने विनंती पत्र लिहून पाठविले की "माझी आर्थिक परिस्थिती चांगली नाही, काही मदत देण्यात यावी." बादशहाने आज्ञा केली की, "किल्ला सिद्दी याकूतखान याजकडे देण्यात यावा."

बीदरच्या सुभ्याच्या दिवाणीबाबत खालील अधिकाऱ्यांच्या हुद्याबाबत बादशहाने चौकशी केली.

मरहूम अमानतखानाचा नातू सय्यद अहमद, किफायतखानाचा नातू मुहंमदसर (मीर), लाहोरचा माजी कोतवाल हसनरजा.

**अठरा जुलै १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. काल बादशहाने जलालउद्दीनचा भाऊ शेख साबिर शेख अजमतउल्ला, शेख अहमद आणि शेख हबीब यांना मनसबी दिल्या.

**एकोणवीस जुलै १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. बक्षी मिर्जा सदरुद्दीनखान याने विनंती केली की, बक्षीच्यापाशी रिसाल्याला जोडून तीस-चाळीस मनसबदार तैनात असतात. त्यापैकी काही जण तरी माझ्याकडे तैनात करण्यात यावे.

बादशहा म्हणाले—“वीस मनसबदार तुमच्याकडे तैनात करून घ्या.”

मीर लष्करीचा मुलगा मीर अस्करी याला तरबियत खानातर्फे अहमदनगरचा नायब किल्लेदार आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले.

**वीस जुलै १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**एकवीस जुलै १७०४**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. अष्टीचा ठाणेदार संग्रामखान ह्याचा भाऊ जंगजुईखान आणि धाकटा भाऊ घोरीखान हे येऊन बादशहाला भेटले.

मुहंमद अस्करीला खिलातीची वस्त्रे देण्यात येऊन अहमदनगरकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

हाजी हिदायतुल्लाचा मुलगा लुत्फुल्ला याला मावळे सैनिकांचा मुश्रफ (हिशेब अधिकारी) म्हणून नेमण्यात आले.

सिद्दी अंबर हा धान्याची रसद घेऊन येण्यासाठी दंडराजपुरीकडे रवाना झाला. त्याला पन्नास मोहरा किंमतीचा घोडा देण्यात आला. अमानुल्लाखानाचा भाऊ अताउल्लाखान याला तीन हजार रुपये किंमतीचा हत्ती देण्यात आला.

मरहूम अमानतखानाचा मुलगा मीर अहमद हा विजापूर येथे तैनात होता. त्याला सुभे मुहंमदाबाद बीदरचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

बादशाही छावणीपासून अहमदनगरच्या रस्त्याचा रक्षक मुगलखान याला बहादुरगडाच्या संरक्षणासाठी, बहादुरगडात (पेडगाव) तळ देऊन राहण्याची आज्ञा करण्यात आली.

मीर मस्करीचा भाऊ मुहंमद बाकर याची मनसब वाढविण्यात आली.

शाइस्ताखानाच्या जागेवर मांडवगडचा किल्लेदार व फौजदार नकाजिसखान याची माळव्याचा सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

**इरादतखान**

मांडवगडच्या किल्लेदारी व फौजदारीवर शिष्टाचाराचा अधिकारी इरादतखान याची नेमणूक करण्यात आली. त्याच्या जागेवर मुखतारखानाचा मुलगा इफ्तिकारखान याची नेमणूक करण्यात आली.

**तेवीस जुलै १७०४**

बंगालचा सुभेदार शाहजादा अजिम (अजिमुश्तान) याचा मुलगा सुल्तान फरुखसियार याला मुलगी झाली. (फरुखसिअर हा पुढे इ.स. १७१३ मध्ये मुगल सम्राट झाला.) त्याबद्दल अजिमुश्याननने ओवाळणीच्या अठरा मोहरा पाठविल्या.

काल रात्रीचा एक प्रहर झाला असता बादशहानी बक्षी सदरुद्दीन मुहंमदखान यास बोलावून त्याच्याबरोबर खलबते केली.

मरहूम मुखलिसखान याचा मुलगा मुहंमद हसन हा औरंगाबादेत होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

मार्गगड उर्फ मर्दगड याचा किल्लेदार मुईनोद्दिन याला आपल्या किल्ल्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

कामगारखान याला बाकीखानाच्या जागी अकबराबाद (आग्रा) ची किल्लेदारी देण्यात आली.

भानगडचा जमिनदार कामगार याला बरखुर्दारखान अशी पदवी होती. त्याला आता किल्लेदारखान अशी पदवी देण्यात आली.

खैराबादचा फौजदार सय्यदखान उर्फ फरुखफाल याच्या पत्रावरून पुढीलप्रमाणे कळले.— येथील माजी फौजदार खुशहाल याला हुजूरात बोलावण्यात आले आहे. त्याला तशी ताकीद देण्यात आली आहे. पण तिकडे तो लक्ष देत नाही. येथे एक बंडखोर अफगान संजर याला मी त्याच्या किल्ले हैदरपूर मधून हाकलून लावले. तो बंडखोर आता मनसबदाराच्या जहागिरीत जाऊन बसला असून खुशहालचे त्याचे

अंतःस्थ सूत्र आहे. हुजुरातून गुर्जबर्दार नेमण्यात यावे. त्यांनी आसपासच्या फौजदारांना पथकासहित माझ्याकडे आणावे म्हणजे बंडखोराचे पारिपत्य होऊ शकेल.

बादशहानी गुर्जबर्दार नेमले. त्यांनी खुशहालला हुजूरात आणावे आणि बंडखोराचे बंड मोडण्यासाठी फौजदारांना सईदखानाकडे पाठवावे अशी ताकीद देण्यात आली.

**चोवीस जुलै १७०४**

दिवसाचा एक प्रहर अन् चार घटिका झाल्या असता, बादशहाना हरकाऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले.—नूरगांव आणि मन्चर या भागात चोरांचे (मराठ्यांचे) चार हजार स्वारांचे सैन्य जमा झाले आहे. हत्तींना चारा आणण्यासाठी बादशाही छावणीजवळ माणसे गेली होती. त्यांच्यावर छावणीपासून दीड कोस अंतरावर चोरांच्या (मराठ्यांच्या) स्वारांनी हल्ला केला. उभय पक्षाची माणसे जखमी झाली.

खुसरौखान करावल हा आपल्या भाऊबंधासहित तेथे पोहोचला. चारपाच माणसे जखमी झाली. खुसरौखानाच्या फौजेचा बक्षी सय्यद असदउल्ला याचा घोडा ठार झाला. बादशहानी हमीदोद्दीनखान व तरबियतखान यांची आठवण केली. आज्ञेप्रमाणे ते दोघे आले. बादशहाने विश्रामगृहाचा पडदा सरकविला. त्यांनी तरबियतखानाबद्दल यशाची प्रार्थना केली. (फातेहा) आणि चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी त्याला मौजे नूरगावकडे जाण्यासाठी निरोप दिला.

आग्र्याचा माजी किल्लेदार बाकीखान याला हुजुरात बोलावण्यात आले.

खैराबादचा फौजदार फरुखफाल उर्फ सईदखान याला सादत ही पदवी देण्यात आली.

**अरकॉटच्या नबाबाचे पूर्वज**

हैद्राबाद-कर्नाटकचा दिवाण सादतउल्लाखान याची खान ही पदवी काढून घेण्यात आली. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी पदवी होती.

**पंचवीस जुलै १७०४**

बादशहाने आज न्याय कचेरी केली.

**महिपतगड**

किल्ले महिपतगड हा प्रतापगडापासून सात कोसावर आहे. तो किल्ला सिद्दी याकतखान ह्याने जिंकून घेतला. काल रात्री त्याने विनंतीपत्र आणि सोन्याच्या किल्ल्या पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

अनुक्रमणिका

बादशहांना कळविण्यात आले की, हमीदोद्दीनखान बहादूर व मतलबखान हे आज्ञेप्रमाणे सकाळी बादशाही छावणी भोवती टेहाळणी करण्यासाठी गेले आहेत.

बादशहाने आज्ञा केली की, बक्षी सदरुद्दीन याने आपली मोहोर (शिक्का) ख्वाजा अंबरच्या हातून काढून घ्यावी आणि आपला कारकून मीर आबिद याच्या हाती द्यावी. ख्वाजा अंबरला बडतर्फ करण्यात आले.

काल बादशहांना कळविण्यात आले ते असे —"कोरेगावचा ठाणेदार अबदुर्रहीम बेग याच्यावर चोरांनी (मराठ्यांनी) हल्ला केला. या चकमकीत शत्रूंची तीन माणसे मारली गेली. त्यांची डोकी कापून हुजूरात आणण्यात आली. याजबरोबर तीन घोडे पकडण्यात आले. बादशहांनी लुटीचा माल आणणाऱ्यांना बक्षिसे दिली. या नंतर हरकऱ्यांच्या तोंडून कळले की, अब्दुलरहीम याने गरिबांची डोकी कापली आहेत यांवर बादशहाने आज्ञा केली की, यार अलीबेग याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा.

हिंदायतकेश वाकेनवीस याचा कारकून घाशीराम याची मनसब वाढविण्यात आली.

सुरतबंदरचा कारभारी नजाबतखान याने वंझाऱ्यांना कैद केले होते, त्याची मन्सब पाचशेनी कमी करण्यात आली.

अब्दुल नबीखान यांना (पठाण) हा दाऊदखानापाशी तैनात होता. त्याची मनसब कमी करण्यात आली.

सुबे हैद्राबादेतील सरकारी मालमत्तेचा (बयूतात) अधिकारी आणि हाजी शफीखान याचा जावई मीर काशीम याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले:—

"येथील नायब सुबेदार हा चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी बाहेर गेला होता. बंडखोरांना ही संधी सापडली. चार हजार स्वार आणि पायदळ असे शत्रूंचे सैन्य आले. त्यांनी शहराला वेढा घातला. येथे तैनात असलेले कारभारी आणि मुत्सदी हे चहूकडे पसरून चोरांशी (मराठ्यांशी) युद्ध करु लागले. मीही शहराच्या एका भागांत (नाव लागत नाही) प्रतिकार केला. शत्रूंपैकी काहींना ठार मारले. काही पायदळ शिपायांना पकडले. त्यांच्याकडून नगद आणि जिन्नस असे पाच हजार रुपये काढून घेण्यात आले. काय आज्ञा?" बादशहाने स्वतःच्या सहीने हुकूम लिहून पाठविला की, "गनिमांची लूट वाटून घ्यावी. सैनिक मारण्यात यावेत आणि धान्य गोळा करण्यात यावे. ज्याने हा वृत्तांत पाठविला त्याची मनसब वाढविण्यात यावी."

बादशहांना कळविण्यात आले, ते असे— कुतूहुल हसन उर्फ राजमाची येथील किल्ल्यात असलेला माल पुढीलप्रमाणे जप्त करण्यात आला आहे—एक लोखंडी तोफ, चार रेहकले (लहान तोफा), दारुगोळा, तोफांचे गोळा दहा, लोखंडी गोळे एकशे बारा, तांदूळ एकशे बारा मण (?) साळी दहा मण पंचवीस शेर (?) पुढचे दोन शब्द लागत नाहीत.

अनुक्रमणिका

दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा (अधिकारी) मन्सूरखान याला त्याच्या हुद्याला जोडून तरबियतखानाच्या खात्यावर नायब म्हणून नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद जफर याने चारशे स्वार व पायदळ बरोबर घेऊन आजमगड (किल्ले पुरंदर) ला जावे आणि किल्ल्याच्या शिबंदीला पगार वाटप करुन परत यावे.

**सव्वीस जुलै १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. अबदुर्रहीम हा कोरेगावला ठाणेदार होता. त्याने गरीब आणि निर्दोष लोकांचे गळे कापून, घोडे लूट म्हणून आणले होते, याची चौकशी हरकाऱ्यांनी आज्ञेप्रमाणे केली. आरोप खरा ठरला. (गरिबाचे गळे कापले गेले) बादशहाने बक्षीस म्हणून पाच अश्रफ्या व आठ होन वगैरे अबदुर्रहीमला दिले होते ते त्याच्या कडून परत काढून घ्यावे, अशी आज्ञा झाली. अबदुर्रहीमला कोरेगावच्या ठाण्यावरून बदलण्यात येऊन, त्याच्या जागेवर तुर्कताजखान याची नेमणूक करण्यात आली. तुर्कताजखान याला एक हजार जात व चारशे स्वार अशी मनसब आहे.

खान फिरोजजंगाच्या नावे फर्मान पाठविण्यात आले.

**सत्तावीस जुलै १७०४**

आज बादशहांनी दिवसाचा एक प्रहर अन् पाच घटिका झाल्या असता आपल्या विश्रामगृहाचा पडदा बाजूला सारला. सियादतखान याने त्यांच्या समोर कागदपत्र ठेविले. बादशहाना कळविण्यात आले की, चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान हा भेटण्यास आला असून हमीदोद्दीनखानाच्या तंबूत बसला आहे. त्याने फुतूहलहसन (राजमाची) चा किल्ला जिंकून घेतला होता. आज्ञेप्रमाणे तो येऊन बादशहाना भेटला. त्याने ओवाळणी (निसार) म्हणून पाच अश्रफ्या ठेवल्या. बादशहाने त्याची तारीफ केली आणि त्याला निरोप दिला. यानंतर दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी तरबियतखान हा नूरगावला गेला होता. त्याने हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

आपल्यापाशी छावणीत किती सैन्य आहे, याचा तपशील लिहून कळवावा, अशी बक्षी उल्मुक मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान यांस आज्ञा करण्यात आली. त्याप्रमाणे, बक्षीने हुजुरात असलेली फौज, ठाणेदारांची नावे, अमानुल्लाखानची पथके, तोफखाना आणि पंचवीस हजार स्वार असा सैन्याचा तपशील देऊन बादशहांना सादर केला. (१७०४ च्या जुलैत औरंगजेबाच्या खेड येथील छावणीत पंचवीस हजाराहून अधिक सैन्य शिल्लक राहिले नव्हते. तेही अमानुल्लाखान आणि ठाणेदारांची पथके जमेस धरून, हे आपल्या लक्षात येईल. मनूची हा आकडा पंधरा हजाराचा देतो.)

वऱ्हाडचा बक्षी व वाकेनवीस मुहंमद इब्राहिम याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

## अठ्ठावीस जुलै १७०४

हमीदोद्दीनखान बहादूर आणि मतलबखान हे टेहळणीसाठी सकाळी छावणीच्या बाहेर गेले होते. ते संध्याकाळी छावणीत परत आले होते.

## एकोणतीस जुलै १७०४

आज बादशहाने न्याय कचेरी केली. महिपतगडचा किल्ला जिंकून घेतल्याबद्दल नंदराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दीयाकूतखान याच्या नावे फर्मान व खिलातीची वस्त्रे काढून ठेवण्यात आली. ती याकूतखानाचा दत्तक मुलगा सिद्दीअंबर यांजपाशी देऊन याकूतखानाकडे पोहोचविण्यात यावी, अशी बादशहांनी मतलबखानाला आज्ञा केली. (सिद्दी अंबर हा बादशाही छावणीत होता.) मराठ्यांच्या पथकावर (बादशहाच्या सेवेतील) इरादतखान हा अधिकारी होता. ती जागा अमानुल्लाखान याला त्याच्या पूर्वीच्या हुद्याला जोडून देण्यात आली.

शाहजादा मोअज्जम बहादुरशहा याचा वकील इखलास हा छावणीत होता. त्याच्या मध्यस्थीने (खटपटीने) सिरमल् याचा मुलगा दयाराम हा मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. हकीम मुहंमद मोहसीन याने मिर्जा सफवीखान याच्यावर औषधोपचार केले होते. त्याला ४० अश्रफ्यांच्या वजनाची एक अश्रफी बक्षीस म्हणून देण्यात आली.

अमानुल्लाखानाचा भाऊ अताउल्लाखान आणि मेहुणा मुहंमद शफी हे येऊन बादशहाना भेटले.

सुरत बंदरातील जहाजांचा अधिकारी (नाखुदा) मुहंमद फाजिल याने दोन घोडे पाठविले होते, ते घेण्यात आले नाहीत. ते अद्याप तबेल्यात आहेत. बादशहाने आज्ञा केली की, ते घोडे पाहण्यासाठी घेऊन या. बादशहाने घोडे पाहिले. बादशहा म्हणाले, “त्यांच्या किंमती ठरवा.” एक घोड्याची किंमत एक हजार रुपये आणि दुसऱ्या घोड्याची किंमत सहाशे रुपये ठरविण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, “घोडे छावणीत पाठविले तर खरेदी करा. नाही तर परत करा. ”

परगणे शिराढोण व राजपूर हे सफवीखान याच्या जहागिरीत होते. त्या परगण्यांची फौजदारी पण सफवीखानाकडे देण्यात आली.

इखलासखान मियाना (पठाण) हा विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्या पाशी तैनात होता. त्याने काही विनंत्या लिहून पाठविल्या. त्याची कमी केलेली मनसब बहाल करण्यात आली. त्याचा मुलगा अब्दुल अजीज आणि पुतण्या अबदुस्समद यांना फरारी म्हणून ठरविण्यात आले होते. त्यांना बहाल करण्यात आले.

## तीस जुलै १७०४

बादशहाने दिवाणचे काम आज बंद ठेवले. दिवसाच्या शेवटी सियादतखान याने प्रकरणाचे कागदपत्र आणले. (फायली-मिसल) बादशहाने विश्रामग्रहाचा पडदा सारून ती कागदपत्रे पाहिली. नंतर बादशहांना कळविण्यात आले की, तरबियतखान हा भेटण्यासाठी आला आहे.

## एकत्तीस जुलै १७०४

तरबियतखानाने कळविले, "मी चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य केले, शंभर घोडे आणि नऊ चोर (मराठे) जिवंत पकडले, चोरांच्या (मराठ्यांच्या) हातून गुरे-ढोरे सोडवून ती मालकाकडे परत करविली." बादशहाने त्याच्याबद्दल धन्योद्ग्रोर काढले. लुटाचा माल सैनिकात वाटून द्यावा आणि कैद्यांना कोतवालाच्या हवाली करावे अशी आज्ञा करण्यात आली.

खाननुश्रतजंग (झुल्फिकारखान) याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले—माझ्या छावणीत सुजानसिंग हा तैनात आहे. त्याचे इंद्रसिंग शिसोदिया याच्या मुलीशी लग्न ठरले आहे. त्या गोष्टीला पाच वर्षे झाली. लग्न लवकर उरकून घ्या म्हणून इंद्रसिंग आपल्या मागे लागला आहे, असे सुजानसिंगाचे म्हणणे आहे. त्याला एक वर्षाची रजा हवी आहे. बादशहाने विनंती मान्य केली नाही. बादशहाने आज्ञा केली की, दुसरा एखादा मुहुर्त धरण्यात यावा. सुजानसिंग याला एक हजार जात, एक हजार स्वार, त्यापैकी पाचशे दुघोडी अशी मनसब होती.

## फोंडा

अलीरजाचा भाऊ सय्यद मुजफ्फर याला कोकणातील फोंड्याचा ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्याबरोबर पुढील पथके तैनात करण्यात आली. शाहाजादा कामबक्षाच्या सैन्यातील शंभर स्वार, पन्नास बरकंदाज, शिलेदार पन्नास, तीनशे पायदळ शिपाई.

बादशहाने आज्ञा केली की, मुगलखान याने बहादुरगडाहून येण्याची जरूरी नाही. खजिना जेव्हा औरंगाबादेहून अहमदनगरपर्यंत येईल तेव्हा त्याने हुजुरात यावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले कीं, गदग आणि इतर परगणे हे जुमलाच्या फौजदारीत होते. फौजदाराच्या संगनमताने चोरांची (मराठ्यांची) वर्दळ त्या प्रांतात चालू आहे. हे ऐकून बादशहाने फौजदाराची बदली विजापूर-कर्नाटक प्रांतात केली. फौजदाराला तीन हजार जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब होती. त्याच्या मनसबीत आठशे स्वार दुघोडी होते. बादशहाने आठशे स्वारांनी त्याची मनसब कमी केली.

बादशहाना कळविण्यात आले की, परगणे गदग हा दिलेरखानाच्या जहागिरीत आहे आणि दिलेरखान हा खान फिरोजजंगाच्या फौजेत तैनात आहे. त्यांच्या जहागिरीत मराठ्यांची वर्दळ चालू असते. दिलेरखानाला सात हजारी मनसब होती. त्यांतून पाचशे स्वार कमी करण्यात आले. ग्वालेरचा फौजदार जान निसारखान याच्या लिहिण्यावरून राजा अनूपसिंग याची मनसब कमी करण्यात आली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—मरहूम लोदीखान याचा मुलगा आणि मिफताहुल्फ़ुतूह उर्फ कोटला (कोथळज?) चा किल्लेदार मुहंमद जमाल याने मौजे करढा (करोहा?) येथे जावे आणि तेथे ठाण मांडून बसावे. हुजुरांतून शंभर पायदळ शिपाई त्या ठिकाणी तैनात व्हावेत. एक दारोगा आणि बेलदार (दहा) पाणी वाहणारे यांनी कावीदचे (?) ठाणे दुरुस्त करून परत यावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे चौकशी केली——नर्मदेपासून आलमगड उर्फ भिरसा, दोराहा या वाटेने धामोणीपर्यंत काय अंतर आहे.

अहमदाबादेहून धामोणीपर्यंत किती टप्पे होतात व अंतर काय आहे? आज्ञेप्रमाणे हिदायत केश वाकेनिगार याने माहिती बादशहाच्या समोर आज ठेवली.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १ ऑगस्ट इ. स. १७०४ ते ५ सप्टेंबर १७०४

### एक ऑगस्ट १७०४

हाजी शर्फुद्दीन हा फरास खान्याचा माजी अधिकारी मक्केच्या यात्रेला गेला होता. त्यांनी केलेल्या विनंतीवरून त्याच्या मुलांच्या मनसबीत वाढ करण्यात आली. मतलबखानाने काल बादशहाना कळविले की, बादशाही कुराणात आमच्या टेहळणीच्या लोकांना एक नीलगाय आढळली. तिचा माग काढून तिच्या जाण्या-येण्याच्या खुणा पाहून साखळीने मोजून कळवावे, त्याप्रमाणे करण्यात आले.

### दोन ऑगस्ट १७०४

बादशहाने आज न्याय कचेरी केली. पुढील मंडळीच्या नावे पत्रे रवाना करण्यात आली: हैद्राबाद-कर्नाटकाचा फौजदार दाऊदखान, माजी किल्लेदार हातिमखान व नविन किल्लेदार सय्यद वहीदोद्दीनखान (किल्ल्याचे नाव लागत नाही), कुमायूचा राजा, राजा ज्ञानचंद.

तरबियतखानाचे पुढील सहकारी येऊन बादशहाला भेटले—(१) इफ्तीकारखान, (२) बाकरखान (३) शाकीरउल्लाखान, (४) अजीजोद्दीन.

मिर्जा सफवीखान याची मालमत्ता जहाजावर (फिरंग्याच्या हातून) नाहीशी झाली होती. तिचा मोबदला म्हणून त्याला दोन हजार मोहरा देण्यात आल्या.

मरहूम आकिदतखान याचा चुलत भाऊ फरीदूनहुसेन हा मध्य आशीयातून आला होता. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मन्सूरखान याचा मुलगा मुहंमद जफर हा पगार वाटप करण्यासाठी आजमगड (पुरंदर) कडे रवाना झाला. त्याला चाळीस मोहरांच्या किंमतीचा एक घोडा देण्यात आला.

### इरादतखान

इरादतखान याला मांडवगडचा किल्लेदार व फौजदार नेमण्यात आले. त्याला एक हजार जात आणि सहाशे स्वार अशी मनसब होती. तीत चारशे स्वारांची भर घालण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी सदरुद्दीन हा आजारी आहे, त्यामुळे मुजऱ्यासाठी आला नाही.

उत्तर हिंदुस्थानात काम करणाऱ्या अमीर उमरवांच्याकडून सरकारी देणी वसूल करण्यासाठी दहा गुर्जबर्दार नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

मरहम मातबरखान याचा भाचा मुहंमद हुसेन याला, फुतुहलहसन (राजमाची) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याला गुलशनाबाद (नाशिक) हून किल्ल्याकडे (राजमाची) पोहोचवावे. यासाठी गुजर्बदाराची नेमणूक करण्यात आली. गुलशनाबाद (नाशिक) ठाणेदार जैनुद्दीन अलीखान याच्या नावे पुढील आज्ञा पाठविण्यात आली—"तुम्ही किल्ले-मजकूर (राजमाची) यासाठी शिबंदी, धान्य, रसद वगैरेची व्यवस्था करून किल्ल्याकडे पाठवावी."

अमानुल्लाखान वगैरे मुजऱ्यासाठी न्याय कचेरीच्या मार्गाने आले होते. त्यांनी दिवाणेखासच्या मार्गे यावे अशी आज्ञा झाली.

**तीन ऑगस्ट १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

**बेदारबख्त**

शाहजादाने बेदारबख्त हा सुभे औरंगाबाद व बऱ्हाणपूरचा सुबेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. आणि शाइस्ताखानाच्या ऐवजी माळव्याचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले.

नबाजिसखान याला माळव्याच्या सुबेदारीवरून बदलण्यात आले.

**हिंदुंच्यावर नियंत्रण**

फत्तेदौलत कौलचा मुलगा शेख फत्तेनुस्रत याने कळविले की, काही हिंदु (लष्करातील) हे अधिकाऱ्याच्या परवानगीच्या आधारावर पालख्यातून स्वारी करीत फिरत आहेत. काय आज्ञा? बादशहा म्हणाले, "त्यांना मना करण्यात यावे."

कामगारखान (ओरंगजेबाचा मावस भाऊ) याला अकबराबादच्या (आग्रा) किल्लेदारीवर पाठविण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

बल्खचा आधिपतीचा राजदूत ख्वाजा जाहिद याने आपल्या सोबत्यासहित बादशहाचा निरोप घेतला.

मरहूम अर्शदखान याचा मुलगा मुहंमद कुली याला औरंगाबाद येथे तैनात करण्यात आले.

**चार ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सामानगड**

अनुक्रमणिका

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले. मूर्तजाबाद (मिरज) जवळ सामानगडचा किल्ला आहे. शत्रूंच्या जमिनदारांनी (त्या प्रांतातील मराठ्यांनी) तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला. तेथील किल्लेदार शहामीर हा पळून गेला.

### पुरंदर

बादशहाना कळविण्यात आले की, आजमगड (पुरंदर) चा किल्लेदार जानबाजखान याजपाशी पथके नाहीत. बादशहाने आज्ञा केली, ती अशी—"सदरबेग गुर्जबर्दार याने तेथे (पुरंदरला) जावे आणि जानबाजखानापाशी नक्की पथके किती आहेत व किल्ल्यात शिबंदी किती आहे याची चौकशी करावी. या शिवाय रसूलाबाद (शिवापूर) व मुहियाबाद (पुणे) येथील ठाणेदार हश्मतउल्ला याच्या पथकाची चौकशी करावी व परत यावे.

### पाच ऑगस्ट १७०४

आज बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले.

मरहूम अमीरखान याच्या मुलांना बडतर्फ करण्यात आले. रूहुल्लाखानाच्या भावांना कमी करण्यात आली. रूहुल्लाखान याची मुले आणि बायको यांच्या मनसबी आणि माहवारही कमी करण्यात आली. मुलांची नावे खलीलुल्लाखान आणि एतीकादखान. हे सर्व अंगठीची देवघेव दाबून ठेवण्याच्या प्रकरणावरून घडले.

रूहुल्लाखानाच्या पथकातील अनेक माणसांना बडतर्फ करण्यात आले.

मुहंमद तकीचा मुलगा मुहंमद अहमद (हकीम) याला सर्फराजखानाबरोबर तैनात करण्यात आले.

नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याने लिहून पाठविले की, फत्तेजंगखान मरहूम याचा मुलगा ताज याची आर्थिक परिस्थिती चांगली नाही. त्याचे खुराक आणि दवाब याबाबतचे सरकारी देणे माफ करण्यात यावे. ही विनंती माफ करण्यात आली.

सादतखान यांच्या पथकातील लोकांना पगार वाटप म्हणून दहा हजार रुपये खजिण्यातून देण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

### विजापूर —कर्नाटक

मीर रूहुल्ला यास विजापूर-कर्नाटकचा फौजदार रूस्तमदिलखान याजपाशी तैनात करण्यात आले. खालील पथके पुढीलप्रमाणे ठरलेल्या स्थळावर पाठविण्यात यावी अशी तहबूरखान याला आज्ञा करण्यात आली:—

अनुक्रमणिका

(१) सय्यद मुहंमद मुराद ईरर्जा—किल्लेदार, नलगुंडा.

(२) शेख मुहंमद माह—किल्लेदार, गुरमकोंडा.

(३) हमजाखान मरहुमचा मुलगा अबदुल्ला—किल्लेदार व फौजदार किल्ले—कंधार.
(४) मार्गगडचा किल्लेदार—शेख मुईनुद्दीन.

**सहा ऑगस्ट १७०४**

बादशहासमोर अर्जी ठेवणारा अधिकारी—सियादतखान हा आजारी आहे, असे कळले. त्याचे काम तनबक्षी बाकरखान याने पहावे अशी आज्ञा झाली.

**प्रतापगड**

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दीयाकूतखान याने प्रतापगडचा किल्ला जिंकून घ्यावा. त्याच्या दिमतीला तीन हजार पायदळ सैन्य असावे. प्रत्येक शिपायाला दरमहा सहा रुपये पगार देण्यात यावा. या तीन हजारांपैकी दोन हजार शिपाई प्रतापगडचा किल्ला जिंकून घेण्याच्या कामावर लावावे व उरलेले एक हजार शिपाई महिपतगड (उर्फ याकूतगड) याच्या रक्षणासाठी ठेवावे. याकूतखानाला खिलातीची वस्त्रे द्यावयाची ती त्याच्या वकीलाकडे द्यावी, अशी आज्ञा झाली.

यार अलीबेग याने कळविले की, सिद्दीयाकूतखान याने महिपतगडचा किल्ला जिंकून घेतला. त्याला नगारे नौबतीचा मान हवा आहे. बादशहाने आपल्या हाताने पत्रावर लिहिले, “इन्शाल्ला ताल्ला” (परमेश्वर करील तर) प्रतापगडचा किल्ला जिंकून घेतला तर! (१७०४ मध्ये औरंगजेब प्रतापगड जिंकून घेण्याच्या विचारात होता. ही माहिती अगदी नवीन आहे).

सिद्दी याकूतखान याला तीन हजार पाचशे जात व एक हजार पाचशे स्वार अशी मनसब होती. त्यापैकी पाचशे स्वार दुघोडी होते.

बादशहाची मुलगी मेहेरउन्नीसबेगम ही शहाजानाबाद (दिल्ली) येथे होती. तिला बादशहाने पुढील अलंकार पाठविले —मोत्याची माळ, औरंगाबादी महाल (दिवंगत) च्या वस्तुंपैकी किंमत तीन हजार तीनशे रुपये. लाल माणिके बसविलेली अंगठी किंमत दोनशे, हिऱ्याची अंगठी किंमत दोनशे रुपये.

**सात ऑगस्ट १७०४**

अलाहबादचा सुबेदार म्हणून सिपेहदारखान याची (बहादूरखानाचा मुलगा) नेमणूक करण्याता आली. मरहूम अमीरखान यांच्या मुलांना बहाल करून बंगालच्या सुभ्यात तैनात करण्यात आले.

अनुक्रमणिका

मार्गगडचा किल्लेदार मुईनोद्दीन याने विनंती केली की, किल्ल्याची निशाणी देण्यात यावी—१ घोडा आणि एक हजार रुपये मदत म्हणून देण्यात यावी. माझ्या चुलत भावावर कृपा व्हावी (मनसब वाढवावी) विनंत्या मान्य करण्यात आल्या.

**आठ ऑगस्ट १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. मीर खानाज दखान याला अमीरखान अशी पदवी देण्यात आली.

तरबियतखान हा येऊन बादशहाना भेटला. हैद्राबाद-कर्नाटकाचा दिवाण मुहंमद सईद याला सादतउल्लाखान ही पदवी होती. त्याची मनसब वाढवून त्याला मुहंमद सईदखान अशी पदवी देण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, कामगारखान याच्या नेमणुकीच्या सनदा तयार होईपर्यंत दरबारात मुजऱ्यासाठी येत जात असावे.

**इरादतखान**

इरादतखान याची मांडवगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमणूक झाली होती. बादशहाने त्याला खिलातीची वस्त्र, शंभर मोहरा किंमतीचा घोडा या वस्तू दिल्या. बादशहा म्हणाले—रविवारी, तुम्ही यथून निरोप घ्या. इरादतखानाला एक हजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब होती.

औरंगाबाद येथील हरकारा केशव याने पुढीलप्रमाणे कळविले—नकदअलीबेग गुर्जबर्दार हा दुर्गादास राठौड याला आणण्यासाठी हुजुरात अहमदाबादेकडे गेला होता तो औरंगाबादपर्यंत पोहोचला आणि तेथे मरण पावला (गुर्जबर्दार).

**नऊ ऑगस्ट १७०४**

हैद्राबाद-कर्नाटकचा फौजदार दाऊदखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—"धना (धनाजी जाधव), बहरा (बहिर्जी हिंदुराव घोरपडे) यांच्या अधिपत्याखाली काफरांचे (मराठ्यांचे) सैन्य या प्रांतात पसरले होते. मी (दाऊदखान) मुहंमद सईद वगैरेना सैन्य बरोबर देऊन त्यांच्या पारिपत्यासाठी पाठविले. हे सैन्य गोळकुंडा सुभ्यातील कौलार येथे पोहोचले. त्याने शत्रुंचा पाठलाग केला. शत्रूच्या सैन्याला कळले की, आमची फौज त्यांच्यावर चालून येत आहे. शत्रू हे गोळकुंडा कर्नाटकात बरेच दिवसापासून पसरले होते. ते रायदुर्ग आणि तुंगभद्रेच्या वाटेने पळून गेले."

दाऊदखानाच्या पत्रावरुन कळले की, तमलाचा किल्ला शत्रुंच्या ताब्यात गेला होता. तो परत जिंकून घेण्यात आला. या किल्यावर आंकिबत महमूदचा मुलगा मोहंमद सालेह यांची नेमणूक करण्यात यावी, अशी विनंती करण्यात आली. बादशहाने दाऊद खानाची विनंती मान्य केली.

अनुक्रमणिका

झुल्कदरखान मरहूम याचा मुलगा जफरुल्ला हा पूर्वी त्या किल्ल्यावर किल्लेदार होता. त्याला बडतर्फ करण्यात आले.

**दहा ऑगस्ट १७०४**

आज दिवाणाचे काम बंद ठेवण्यात आले.

दंडराजपुरीचा फौजेदार सिद्दी याकुतखान याने विनंती लिहून पाठविली की, याकूतगड उर्फ महिपतगड येथील किल्लेदारीवर सिद्दी जौहर याची नेमणूक करण्यात यावी. त्याप्रमाणे नेमणूक करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, सदरुद्दीन मुहंमदखान बक्षी याने पाबळाच्या ठाणेदारीसाठी योग्य माणसाचे नाव सुचवावे.

मरहूम अमानतखान याचा मुलगा सय्यद अहमद याला अलितकिच्या जागेवर मुहंमदाबाद बीदरच्या सुभ्याचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

बुऱ्हाणपुरचा माजी दिवाण आणि गुलाम मोईणोद्दीनचा मुलगा शेख सिराजउद्दीन याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

आजमगड (किल्ले पुरंदर) च्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले—तेथील किल्लेदार जानबाजखान याने राजिनामा दिला असून तो हुजुरात पाठविला आहे. काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, रामसिंग याचा मुलगा केशवदास याचा हुद्दा काय आहे? चौकशी करून कळविण्यात यावे.

बक्षी सदरुद्दीन मुहंमदखान याला आज्ञा झाली की, एक हजार स्वार, प्रत्येक स्वाराला महिना वीस रुपये पगार व दीड हजार पायदळ, प्रत्येक शिपायाला पाच रुपये महिना पगार असे सैन्य सरकारात ठेवण्यासाठी भरती करण्यात यावे. (ही नोंद चार ऑगस्ट १७०४ ची आहे).

बादशहाने मागे आज्ञा केली होती की, बाग तयार करण्यासाठी खिदमतराय याने थोरगांव (?) कडे जावे. आता आज्ञा झाली की, त्याने कडूसयेथील बाग दुरुस्त करावी. थोरगावसाठी इतर कुणाला तरी पाठवावे. ही नोंद आठ ऑगस्ट १७०४ ची आहे.

इरादतखानाच्या जागेवर दुय्यम चौकीचा अधिकारी म्हणून मुरीदखान याची नेमणूक करण्यात आली.

**नऊ ऑगस्ट १७०४**

आजमगड, पुरंदरच्या किल्लेदाराने राजिनामा दिला होता. बादशहाने आज्ञा केली की, नलगुंड्याचा माजी किल्लेदार आणि रामसिंगचा मुलगा केशवराम हा खजिन्याच्या बरोबर हुजुरात येत आहे. तो येऊन भेटल्यावर त्याचा हुद्दा मला कळविण्यात यावा.

फतेहाबाद उर्फ अळंदचा किल्लेदार मरहूम औरंगखान उर्फ बाबा बेग याचा मुलगा रुस्तुमबेग हा होता. त्याच्या जागेवर शहाबुद्दीन कुलीचा मुलगा मुहंमद तकी याची नेमणूक करण्यात आली. हा बादशाहाच्या छावणीत फौजदार होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

## तंजावार

हैद्राबाद-कर्नाटकचा दिवाण आणि तंजावरच्या राजाकडून खंडणी वसूल करणारा तहसिलदार मुहंमद-सईदखान हा होता. त्याची मनसब वाढविण्यात आली.

दाऊदखानाने पुढीलप्रमाणे विनंती पत्र पाठविले—किल्ले तमला (?) हा शत्रुंनी जिंकून घेतला होता. विजापूर प्रांतातील कोसी पाळेगार याच्याकडून तो परत जिंकून घेण्यात आला आहे. त्या किल्याच्या किल्लेदारीसाठी आकिबत महमूदचा मुलगा आणि सईदखानाचा भाचा मुहंमद सालेह याचे नाव मी सुचवितो. दाऊदखानाची विनंती मान्य करण्यात आली आणि मुहंमद सालेह याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाच्या आज्ञेने बांधकाम खात्याचा अधिकारी शुकरुल्ला हा अहमदनगरला गेला होता. अहमदनगर यथील फरुखबाग व मशीद दुरुस्त करण्यासाठी त्याला पाठविण्यात आले होते. त्याने त्या कामाबाबत चार हजार रुपये खर्चाचा आराखडा आणला होता. त्याप्रमाणे सदर इमारतींच्या दुरुस्तीसाठी त्याला रक्कम देण्यात यावी, अशी आज्ञा झाली.

अमानुल्लाखान याच्या भाऊबंधांपैकी अब्दुल लतीफ याचा मुलगा आकिबत महमूद याची मनसब वाढविण्यात आली.

शाइस्ताखानाचा मुलगा अबुल खैरखान हा बादशाही छावणीत होता. त्याला सदरूद्दीन खानाच्या बरोबर चौकी सांभाळण्याचे काम देण्यात आले.

## दहा ऑगस्ट १७०४

खंबायत बंदराचा अधिकारी आणि अबुल फतहचा मुलगा मुहंमद काजिम याला तेथून काढून हुजुरात बोलावण्यात आले.

## अकरा ऑगस्ट १७०४

बादशहाजादा कामबक्ष याला दोन हजार दोनशे रुपयाच्या पाच अंगठ्या बक्षीस म्हणून देण्यात आल्या. शहाजादा बेदारबख्त याची माळव्याच्या सुभेदारीवर नेमणूक झाली होती. त्याला देण्यासाठी

फर्मान, खिलातीची वस्त्रे आणि सहा हजार रुपये किंमतीच्या दोन अंगठ्या या वस्तू देण्यासाठी गुर्जबर्दाराच्या हवाली करण्यात आल्या.

**बारा ऑगस्ट १७०४**

फुतूहअल्‌गैब (तोरणा) जिंकून घेतल्याबद्दल शाहजादा मोअज्म बहादुरशहा याने एक हजार अश्रफ्या आणि विनंतीपत्र ही पाठवली होती. ती बादशहाच्या नजरेखालून गेली.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—मुहंमद कामबक्षच्या सैन्यातील मीरसामान महमूदबेग आणि ख्वाजा तरबियत रुहुल्लाखान यांना बडतर्फ करण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, गर्जबर्दारांनी त्या दोघांना सुरतेला न्यावे आणि तेथे त्यांना जहाजात बसवून मक्केला पाठवून द्यावे. त्यांच्या घरावर बादशाही छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याने चौक्या बसवाव्या.

मिर्जा सफवीखानाने पुढीलप्रमाणे अर्ज केलाः ——

> 'महंमद ऐवज उर्फ एतबारखान हा सूरत बंदराचा मुत्सद्दी (कारभारी)' याच्या कारकीर्दीत फिरग्यांनी जहाजावरील माझा सुमारे चार लाख रुपयांचा माल सुरतेजवळ लुटून नेला होता. मुहंमद ऐवजने तो माल मिळवला असून तो दाबून बसला आहे. तो माल मी सरकारात भेट म्हणून देऊ इच्छितो. इनायतउल्ला याला आज्ञा करण्यात यावी की, सदर माल मुहंमद ऐवजकडून वसूल करावा आणि सरकारात घ्यावा. बादशहाने आज्ञा केली की, लौकरात लौकर माल वसूल करण्यात यावा.

**तेरा ऑगस्ट १७०४**

**अमानतखान**

संगमनेरचा फौजदार अमानतखान हा आज्ञेप्रमाणे हुजुरात येऊन बादशहाना भेटला. सिद्दी याकूतखान याचा वकील सय्यद हसन (?) याला एक शाल बक्षीस देण्यात आली. जुन्नर येथे अबदुल अजीजखान हा किल्लेदार आणि फौजदार होता. हरसलच्या किल्ल्यावर सिकंदर जंग हा किल्लेदार होता. अब्दुल अजीजखानाच्या लिहिण्यावरुन बादशहाने हरसलच्या किल्ल्यावर अबदुल अजीज खानाचा नायब म्हणून, त्याच्याच भाऊबंधापैकी हसनअली याची नेमणूक केली.

बल्खच्या राजदूताचे सहकारी बादशहाच्या नोकरीत प्रविष्ट झाले, त्यांना यक्काताजखानाच्या पथकात सामील करण्यात आले. त्यांची नावे तैमूरबेग, खुशालबेग, अब्दुल्लाबेग, मुहंमद सालेह ख्वाजा आलम.

**चौदा ऑगस्ट १७०४**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. दिवसाच्या शेवटी बादशहांना कळविण्यात आले, ते असे—कोरेगावचा ठाणेदार तुर्कताजखान याने शत्रूचे (मराठ्यांचे) तीन स्वार जिवंत पकडून आणले व एकाचा गळा कापून आणला. ते छावणीत आले आहेत. काय आज्ञा? बादशहान आज्ञा केली की, सिरहिंद (पंजाब) चा फौजदार बझीरखान याच्या सांगण्यावरुन त्याचा कारकून करमचंद याची मनसब वाढविण्यात आली. चोरांना (मराठ्यांना) कोतवालाच्या हवाली करण्यात यावे. घोडे सैनिकांना वाटून घ्यावे. या शिवाय बादशहांनी तुर्कताजखानाच्या पथकाला पाच अश्रफ्या तीस मोहरा आणि इतर बक्षिसे दिली.

**पंधरा ऑगस्ट १७०४**

बादशहाने आज न्याय कचेरी केली. अमानतुल्ला खानाचा भाऊ अताउल्लाखान हा उमदी (?) येथे ठाणेदार होता.

पाबळ येथे हसनखान हा ठाणेदार होता. हसनखानाला बदलण्यात आले आणि त्याचे ठाणे अताउल्लाखानाकडे त्याच्या उमदीच्या ठाण्याला जोडून देण्यात आले.

**इरादतखान**

इरादतखानाचा मुलगा हिदायतउल्लाखान याला कोठारी, तिराया व काकरुर (बुंदेलखंड सागर जवळ) येथील फौजदारीवर नेमण्यात आले. तेथे यापूर्वी आजमकुली हा फौजदार होता. त्याची (हिदायतउल्ला) ची मनसब वाढविण्यात आली.

खुदाबंदाखान याला विजापूर कर्नाटकाच्या फौजदारीवरुन बदलण्यात आले होते. त्याच्या बरोबर त्याचा मुलगा मुहंमदी आणि सहकारी मुआलीखान आणि अबदुर्रहमान वगैरेंनी हुजुरात यावे अशी आज्ञा केली.

**सोळा ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते.रुहुल्लाखानाच्या आप्तांपैकी, मुहंमद कुलीखान याची मनसब कमी करण्यात आली आणि त्याच्या पथकातील पुढील मंडळींना बडतर्फ करण्यात आले. मरहूम सबशिकनखान याचे आप्त, मीर मुहंमद युसुफ व मुहंमद असगर, शहाबुदीन, मुहंमद कुली, रजाबेग, इब्राहिम, मुहंमद काजिम, मूर्तजाकुली, ख्वाजा असलम, मुहंमद अली, इब्राहिम बेग, मुहंमद इस्माईल, (मरहूम रुहुल्लाखान ह्यांच्या वारसांवर औरंगजेब अतिशय चिडलेला दिसतो. रुहुल्लाखान हा औरंगजेबाच्या मावस भावाचा मुलगा, हे लक्षात ठेवावे).

रुस्तमखान विजापुरी (सर्जाखान) याचा मुलगा इलियासखान हा हुजुरात होता. त्याला एक जात, दोनश स्वार अशी मनसब होती. बादशहाने त्यात पाचशे जात व तीनशे स्वारांची भर घातली होती. ती बादशहाने रद्द केली.

**सतरा ऑगस्ट १७०४**

अनुक्रमणिका

बक्षी उल्मुल्क झुल्फिकार खान बहादूर नुस्रतजंग याला सहा हजार जात आणि सहा हजार स्वार अशी मनसब होती. त्यापैकी दोन हजार स्वार दुघोडी होते. त्यापैकी एक हजार स्वार आणि दहा लाख होन हे हैद्राबाद-कर्नाटकाच्या फौजदारीबाबत होते. त्यापैकी शिबंदीमधून बादशहानी दोन लाख होन कमी केले.

तरबियतखानाच्या आप्तांपैकी मनसबदार मुहंमद वारिस याला पुढीलप्रमाणे आज्ञा देण्यात आली—"तुम्ही जाऊन अलाहबाद, चुनारगड, रोहतासगड आणि कालंजरगड या किल्ल्यात प्रत्यक्षात तोफा किती आहेत ह्याची चौकशी करून नोंद घेऊन यावे."

गदग वगैरे परगण्याची अमीनी आणि फौजदारी शेरखान (शमीरखान?) याजकडे होती. त्याच्या जागेवर जमशीदखान याची नेमणूक करण्यासंबधी काय आज्ञा? जमशीदखानाला शेरखानाच्या वेळच्या पद्धतीप्रमाणेच महसूलाचा आणि खालसा व पायबाकी जमिनीबाबतचा हिशेब द्यावा लागेल. बादशहा म्हणाले की "तेथील शिबंदी आणि सध्याचा वसूल चीनकुलीजखानाकडे देण्यात काटकसर होईल काय? ही चौकशी करून कळवावे. जमशीदखान याला पाच हजार जात आणि तीन हजार स्वार अशी मनसब होती. त्यापैकी एक हजार स्वार दुघोडी होते. शेरखान याला तीन हजार जात आणि एक हजार स्वार अशी मनसब होती. त्यापैकी तीनशे स्वार दुघोडी होते.

दाऊदखान हा हैद्राबाद-कर्नाटकचा फौजदार होता. त्याच्या विनंतीवरून पुढील मंडळींच्या मनसबी वाढविण्यात आल्या—भाऊ बहादुरखान, अडीच हजारी, महनोजी पाच हजारी, माधवो कोन्हेर (?) दोन हजारी, अबदुल गनीखान मियाना (पठाण).

शेरगड उर्फ वल्लभगडचा किल्लेदार शेर मुहंमद याची मनसब वाढविण्यात आली.

### अठरा ऑगस्ट १७०४

यक्काताजखान मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) याचा भाऊ अताउल्ला याचे लग्न ठरले. त्याला खिलातीची वस्त्रे, घोडा, मोत्यांची मुंडावळ वगैरे वस्तू देण्यात आल्या.

### एकोणीस ऑगस्ट १७०४

गुजराथचा सुभेदार बादशहाजादा आजम याच्याकडे फर्मान रवाना झाले. फर्मानच्याबरोबर दोन अंगठ्या पाठविण्यात आल्या. एक हिऱ्याची अंगठी किंमत सतरा हजार रुपये आणि दुसरी लाल माणकाची अंगठी किंमत सात हजार रुपये.

### वीस ऑगस्ट १७०४

सियादतखान हा सरकारी प्रकरणाचे कागदपत्र घेऊन आला. बादशहाने आरामगाहचा पडदा बाजूला सरकविला आणि चार प्रकरणांची (फाईल) कागदपत्रे पाहिली. त्यानंतर हमीदोद्दीन खान व

अनुक्रमणिका

तरबियतखान हे आज्ञेप्रमाणे कामयाबखानाला (तरबियतखानाचा भाऊ) हुजुरात घेऊन आले. बादशहाने कामियाबखानाला स्फटिकांची मूठ असलेला शंभर रुपये किंमतीचा खंजीर बक्षीस दिला आणि चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी त्याला जुन्नरकडे रवाना करण्यात आले. बादशहा म्हणाले—(चोरांचे) मराठ्यांचे पारिपत्य करून झाल्यानंतर तुम्ही अहमदनगरला जा, तेथे काफिला आणि खजिना ही आली आहेत ती तेथून हुजुरात घेऊन या.

**एकवीस ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. काल रात्रीच्या सहा घटिका एक प्रहर झाला असता मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान बक्षी याला बोलावू पाठविले. बादशहा त्याच्याबरोबर मध्यरात्रीपर्यंत बोलत होते. त्यानंतर त्यांनी त्याला निरोप दिला.

**शियाचा सुन्नी**

काल रात्री बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले, ते असे —दिवाणेखासचा मुश्रफ (अधिकारी) हाजी मुहंमद अलीखान याने आपल्या धर्माचा (शिया पंथाचा) त्याग केला असून तो सुन्नी (मजहबे चहार) पंथाकडे वळला आहे. त्यानंतर बादशहाने त्याला आपल्या हुजुरात बोलाविले. त्याला पन्नास रुपये किंमतीचा खंजीर बक्षीस दिला. बादशहा म्हणाले त्याचा हुद्दा काय आहे ते चौकशी करून कळविण्यात यावे.

कामगारखान किल्लेदार अकबराबाद (आग्रा) याचा मुलगा मुहंमद काजिम याला धौलपूरचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. तेथे पूर्वी गोपाळसिंग हा फौजदार होता.

आग्र्याचा माजी किल्लेदार बाकीखान याला लाहोरच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

**खानदेश**

रावेरचा फौजदार अबदुल बहाबखान याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले—भिल्ल आदी बंडखोर हे बऱ्हाणपूरच्या पुऱ्यावर आक्रमण करून आले.

शाहजादा मुहंमद बेदारबख्त याने त्यांचे पारिपत्य करण्यासाठी मला दोनशे स्वार व तीनशे पायदळ बरोबर दिले होते, ते घेऊन मी त्याच्यावर चालून गेलो. अनेकदा ठार मारण्यात आले.पन्नास माणसे जिवंत पकडण्यात आली. पंचावन्न लोकांची डोकी कापून ती कोतवालाच्या हवाली करण्यात आली. कृपा व्हावी. बादशहाने आज्ञा केली की, लिहून येईल तेव्हा कृपा होईल.

बादशहाने आज्ञा केली की, शेख अताउल्ला शिक्षक (मुदरिस) याला दोन हजार रुपये देऊन हुजुरात पाठविण्याबद्दल शाहजहानाबाद (दिल्ली) च्या दिवाणला लिहा.

**तेवीस ऑगस्ट १७०४**

दिवाणाचे काम बंद ठेवण्यात आले. शाहजादा मुईदोद्दीन (मुल्तानचा सुभेदार आणि औरंगजेबाचा नातू), नवाब गोहर आरा बेगम (औरंगजेबाची मुलगी) यांच्या नावे पत्रे पाठविण्यात आली.

मन्सूरखान याला तरबियतखानाच्या नायब म्हणून नेमण्यात आले. तरबियतखानाला तीनशे रुपये किंमतीचे एक कडे बक्षिस देण्यात येऊन ते त्याच्याकडे पाठवावे, अशी आज्ञा देण्यात आली.

**चोवीस ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. मुल्तानपासून शेख फरिदुद्दिन गंज शकरचे समाधी स्थळ पाकपटण हे किती लांब आहे ते कळवावे अशी आज्ञा झाली. ते एकशे एक कोस लांब आहे असे कळविण्यात आले.

ताथवाडे (सातारा जिल्हा) चा माजी किल्लेदार मुहंमद युनूस याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

सुभे वऱ्हाडच्या डाग देण्याच्या (घोड्यांना) कागदपत्रांचा अधिकारी (मुश्रफ) म्हणून हररामचा मुलगा देवीदास याची तोलारामच्या जागेवर नेमणूक करण्यात आली.

**पंचवीस ऑगस्ट १७०४**

दिवाणचे काम बंद. पुढील मंडळींना तरबियतखानापाशी तैनात करुन निरोप देण्यात आला शाकिरउल्लाखान व उमीरउल्उमरा (मुख्य प्रधान) चा अधिकारी सय्यद मुजफर.

काल संध्याकाळी सियादतखान हा प्रकरणाचे कागदपत्र घेऊन आला असता बादशहाने त्याला एक पगडी बक्षीस दिली (पगडी दत्तार पागोटे) आणि त्याला सांगितले "हिंदुस्तानी पध्दतीने हे बांधत चला. (आतापर्यंत सियादतखान हा मध्य आशियातील तुर्कांच्या पध्दतीने पागोटे बांधत असावा.)

ख्वाजा मसऊदअली याने बदशाही छावणीपासून खेड गावातील बादशाहाने लावलेल्या बागेपर्यंतचे अंतर मोजून बादशहांना कळविले की, अंतर अर्धा कोसाचे आहे.

**सव्वीस ऑगस्ट १७०४**

भास्करराव हरकारा (दिवंगत) याचा मुलगा कृष्णा हरकारा याला चार होन बक्षीस म्हणून देण्यात आले.

अकबराबाद (आग्रा) चा दिवाण याने लिहून पाठविले की, मरहूम हसनअलीखान याचा मुलगा हुसेनअली हा शाहजादा आजम याच्या तैनातीत होता. तो बऱ्याच दिवसापासून आग्रा येथे आहे. बादशहाने आज्ञा केली की, त्याने आपल्या तैनातीच्या जागेवर जावे, नाहीतर त्याला बडतर्फ करण्यात येईल.

अनुक्रमणिका

## पुन्हा चोवीस ऑगस्ट १७०४ ची नोंद

गुलशनाबाद (नाशिक) चा जमिनदार रयाजी हा अमानुल्लाखानाच्या मध्यस्थीने येऊन बादशहाना भेटला.

बादशहानी तरबियतखान, त्याचा भाऊ कामियाबखान, राजा शिवसिंग वगैरेना तीन हजार साहशे स्वारांची फौज बरोबर देऊन अहमदनगरहून खजिना आणण्यासाठी तिकडे (अहमदनगरला) पाठविले. बादशहा म्हणाले——सर्फराजखान याने खजिन्याबरोबर हुजुरात यावे आणि तरबियतखानाच्या तैनातीत असलेला इफ्तिकारखान याने हुजुरात रहावे.

मरहूम फत्तेजंगखान याचा नातू कादरदादखान याला पालीकोटच्या (पालमकोटा?) किल्ल्यावर उमराच्या जागेवर नेमण्यात आले. उमरची नेमणूक मुहंमद युनेसच्या जागेवर मानोऱ्याच्या किल्ल्यावर करण्यात आली.

बादशहाने हिदायतकेश वाकेनवीस ह्याला आज्ञा केला की, बादशाही छावणीपासून पारनेरच्या वाटेने अहमदनगर किती लांब आहे, लिहून कळवा. चोवीस कोस दहा साखळ्या अंतर आहे, असे बादशहांना कळविण्यात आले. यावर बादशहाने आज्ञा केली की, उस्मान खान करावल याने अहमदनगरच्या मजलांची चौकशी करून यावे.

बादशहानी काल रात्री सर्रबराहखान कोतवाल याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली —"दिवाणीचा माजी कारकून चतुर्भुज, सराफ्याचा चौधरी आणि बादशाही छावणीतील सराफ यांना कैद करून कोतवालीत ठेवण्यात यावे.

सूरत येथील जहाजाचा व्यापारी अबदुल गफूर याने सात घोडे पाठविले होते ते बादशहाच्या नजरेखालून गेले. बादशहाने आज्ञा केली ती अशी —"बादशाही छावणी आणि जुन्नरच्या मधील इलाखा हा कामियाबखान, शिवसिंग, नाहरखान यांनी दोनशे स्वार आणि तीनशे पायदळ घेऊन सांभाळावा."

चौकशीनंतर आढळून आले की, शहाजानाबादच्या (दिल्ली) सरकारच्या वाकेनविसाच्या बदलीच्या प्रकरणात चतुर्भुजचा हात नव्हता. चतुर्भुजला सोडून द्यावे, अशी आज्ञा करण्यात आली.

## सत्तावीस ऑगस्ट १७०४

शाहजादा बेदारबख्त (माळव्याचा सुभेदार) याच्या नावे पत्रे पाठविण्यात आली. बादशहानी अबदुर्रहीमखान याली (सार्वजनिक मालमत्तेचा अधिकारी) आज्ञा केली की, बारबरदारी (ओझी वाहण्याची वाहने, जनावरे वगैरे) हे सामान बादशाही छावणीत किती आणि औरंगाबादेत किती ह्याची यादी करून माझ्या समोर ठेवावी.

बादशहाने आज्ञा केली की, हत्तीखान्यात लिहून पाठवा, या महिन्याच्या शेवटापर्यंत हत्ती छावणीत आले पाहिजेत.

तरबियतखानाचा कारकून दिनायतराम याचा जावई बहाचंद याची मनसब वाढविण्यात आली. फोंड्याचा ठाणेदार सय्यद गजनफार याने बादशहाचा निरोप घेतला.

### इरादतखान

बादशाहाने आज्ञा केली की, फत्तेदौलत कौल याने मांडवगडचा किल्लेदार व फौजदार इरादतखान याच्या सनदा व्यवस्थितपणे करुन घ्यावा.

बादशाही छावणीच्या भोवती दक्षिणच्या तोफखान्याचे शंभर हशम (पायदळ शिपाई) तैनात करण्यात यावे, अशी आज्ञा करण्यात आली.

### अठ्ठावीस ऑगस्ट १७०४

बादशहानी अबदुर्रहीम (नायब खानसासा पुरवठा अधिकारी) याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली— "तुम्ही औरंगाबादच्या बयूतात (सार्वजनिक मालमत्ता) च्या अधिकाऱ्याला शुतरखाना (उंट), गांवखाना (बैल) हे ओझी वाहणारे (बारबरदारी) सरकारात आहेत. त्यांचा सरंजाम करून (बरोबर लागणारे सामान देऊन) हे उंट खाने आणि बैलखाने सरकारात पाठवा. बक्षी उल्मुल्क झुल्फिकारखान हे हत्तीखाना बरोबर घेऊन येतील. त्यांच्याबरोबर हे उंट आणि बैल व त्यांचा सरंजाम पाठवून द्यावे. जर नुस्रतजंग झुल्फिकारखानाच्या येण्यामध्ये दिरंगाई झाली तर वाट न पाहता बारबरदारीचे सामान हुजुरात पाठवावे म्हणजे ते या महिन्याच्या शेवटी बादशाही छावणीत दाखल होईल.

### एकोणतीस ऑगस्ट १७०४

मंगळवेढ्याचा माजी अमीन व फौजदार सहरखान, बादशहांना येऊन भेटला.

मरहूम इस्लामखान (दक्षिणचा माजी सुबेदार?) याचा नातू मुहंमद शुजा हा बादशहाला येऊन भेटला.

उत्तर हिंदुस्तानाचा खजिना दक्षिणेत येत होता. ग्वालेरपर्यंत जाऊन तो घेऊन यावा अशी मीर अजीमउल्ला याला आज्ञा करण्यात आली. मीर नेमतउल्ला याला गुलशनाबाद (नाशिक) चा बक्षी व वाकनवीस म्हणून नेमण्यात आले. अनेक अधिकाऱ्यांना पावसाळ्यानिमित्त अंगरखे (जामाबारांनी) देण्यात आले.

बादशहाना कळविण्यात आले, ते असे ——मरहूम फौरोजखान याचा मुलगा सय्यद हसन हा हुजूरातून रजा घेऊन देशी गेला. तेथे त्याने पाचशे स्वार व पायदळ बाळगून धामधूम करण्यास सुरवात केली आहे. बादशहाने आज्ञा केली की, माणसे पाठवून त्याला हुजुरात बोलावून घ्यावे. या बाबतीत दिल्लीचा सुबेदार मुहंमद यारखान आणि फौजदार मुहंमद सईद यांना लिहिण्यात यावे. सय्यद हसनची

मनसब कमी करण्यात आली. मरहूम एतमादखानाचा मुलगा मुहंमद बक्ष हा खंबायतचा कारभारी (मुत्सद्दी) झाला होता. त्याची एतमादखान ही पदवी पूर्वीप्रमाणे बहाल करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, मुगलखानाच्या फौजेत तैनात असलेला (पद्मनाभ?) याचा मुलगा आणि तीन हजारी मनसबदार शामराज हा मरण पावला.

**तेवीस ऑगस्ट १७०४**

ताळिकोटचा ठाणेदार आणि गुलाम मुहंमदचा मुलगा उमर याला त्याच्या जागेवर पूर्ववत बहाल ठेवण्यात आले.

कादरखान याला बडतर्फ करण्यात आले.

मित्रसेन (मित्रसेन बुंदेला) (याचा उल्लेख परमानंदाच्या शिवभारतात आला आहे), याचा नातू महासिंग वगैरेंना कल्याण-भिवंडीचा ठाणेदार झैनुद्दिन अलीखान याच्या सांगण्यावरून नव्याने मनसबी देण्यात आल्या आणि त्यांना ठाणेदाराबरोबर तैनात करण्यात आले. महासिंगाच्या बरोबर दुसरा नातू बिरसेन यालाही मनसब देण्यात आली.

शेख इनायत याचा मुलगा शेख गुलाम मुहंमद अक्रम याला लोणारचा (विदर्भ) बक्षी व वाकेनवीस नेमण्यात आले.

[**या पुढील नोंदी ऑगस्ट आणि सप्टेंबर तारखांच्या नोंदी मागे पुढे देण्यात आल्या आहेत. त्या जशाच्या तशा पुढे देत आहे. तारखांवरून कोणत्या दिवसाचा वृत्तांत आहे हे कळून येईल**.]

**तेरा ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते. हमीदोद्दीनखान हा चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी गेला होता. तो आज्ञेप्रमाणे येऊन बादशहाना भेटला.

बापू पंडित याची तैनाती बंबालच्या सुभ्यात करण्यात आली. त्याला तैनातीच्या जागेवर पोहोचविण्यात यावे म्हणून माणसे नेमण्यात आली.

**चौदा ऑगस्ट १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते.

**पंधरा ऑगस्ट १७०४**

अनुक्रमणिका

आज बादशहाने न्याय कचेरी केली. बादशहांना कळविण्यात आले, ते असे—“काल रात्रीच्या दोन घटिका झाल्या असता एक सशस्त्र माणूस दिवाणेखासच्या दारात आला. दिवाणेखासमध्ये तो जाऊ इच्छित होता. चोपदारांनी त्याला पकडून आणले आहे. बादशहाने आज्ञा केली की, त्याला कोतवालीत ठेवावे आणि तो कां आला होता याची चौकशी करण्यात यावी.

संगमनेर आणि गंगापूरचा फौजदार व अमीन, अमानतखानाचा हा हुजुरात आला होता. त्याला आपल्या तालुक्यावर जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

मुहंमद साक्रीचा मुलगा मुहंमद बक्ष याला बऱ्हाणपूर सुभ्याच्या जजियाचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले.

## पुरंदर

हेरांच्या कडून पुढीलप्रमाणे कळले—किल्ले आजमगड (पुरंदर) येथील शिबंदी (हाशम) पायदळ सैनिकाचे सर्व लोक धान्याच्या महर्गतेमुळे किल्ला सोडून निघून गेले आहेत. किल्ल्यात सहाशे माणसे आहेत. त्यांना उपासमारीमुळे रात्रीचा पहारा देववत नाही. रोज जवळजवळ एक हजार माणसे रोहिडा किल्ल्याची, शिबंदी पैकी किल्ल्याभोवती घेराव घालून बसतात. किल्ल्यामध्ये एक शेर धान्य जाऊ देत नाहीत. पुरंदरचा किल्लेदार जानबाजखान याने लिहिले आहे की, किल्ल्यामध्ये धान्य, तेल वगैरे काहीही नाही. हुजुराततून जर धान्याची रसद आली तरच किल्ल्याची खबरदारी ठेवणे शक्य होईल, नाहीतर किल्ला हातचा निघून जाईल.

बादशहाने आज्ञा केली की, जानबाजखानाला लिहून विचारा की, राजिनामा देण्याचे कारण काय?

दक्षिणच्या तोफखानाचा दारोगा मन्सूरखान याने पुरंदर येथील शिबंदीसंबंधी चौकशी करून कळवावे, अशी आज्ञा झाली.

### सहा सप्टेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

### सोळा सप्टेंबर १७०४

शंकराजी (शंकराजी मल्हार) यांच्या मुलांना आणि भावाला पुढीलप्रमाणे मनसबी देण्यात आल्या. त्याचा मुलगा व्यंकटराव याला तीन हजार जात व दोन हजार स्वार, मुलगा त्रिंबकराव याला दोन हजार जात व पाचशे स्वार, भाऊ किशनराव एक हजार जात व पाचशे स्वार.

### सतरा सप्टेंबर १७०४

अनुक्रमणिका

ख्वाजा मुहंमद अमीन याला ताजुद्दीनच्या जागी ग्वालेरचा दिवाण म्हणून नेमण्यात आले. गंजी कोटा किल्ल्याचा किल्लेदार मुहंमद जाफर हा होता. त्याच्या जागेवर कोलाचा (?) किल्लेदार व फौजदार सय्यद मुहंमद आबिद याची नेमणूक करण्यात आली. मुहंमद जाफरला हुजुरात बोलावून घेण्यात आले. कोळीच्या किल्लेदारी व फौजदारीवर कमरूद्दीन याची नेमणूक करण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, दोन गुर्जबर्दार नेमण्यात यावेत. येथून नावा भीमानदीतून घेऊन जाऊन बाहादुरगडापर्यंत त्यांनी पोहोचवून यावे.

पुढील मंडळींना मनसबी देण्यात आल्या:—

(एक) भागोजी—पाच हजार जात व दोन हजार स्वार.

(दोन) बाळाजी किशन—एक हजार जात व दोनशे स्वार.

(तीन) गोपाळरावजी—सातशे जात व शंभर स्वार.

(चार) गोविंदराव—सातशे जात व शंभर स्वार.

(पाच) हरीराव—चारशे जात व शंभर स्वार.

### अठरा सप्टेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाने आपल्या आरामगाहाचा पडदा ओढून, सिदायतखान याने आणलेली चार प्रकरणे पाहिली. यानंतर पडदा बंद करून काम बंद केले.

तळावरून (पेडगाव किंवा ब्रम्हपुरी) आलेल्या बातम्यावरून कळले की, खिदमतगारखान हा तोषकखाना व जवाहिरखाना खाजगीचा अधिकारी होता. तो मरण पावला. त्याच्या जागेवर हमीदोद्दीनखान याची त्याच्या पूर्वीच्या जागेला जोडून नेमणूक करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले ते असे.—दर वर्षी रज्जब महिन्याच्या पंचवीस तारखेस फिरदौस आशियानी (शहाजहान) यांची पुण्यतिथी येथे त्यांच्या समाधीच्या जागेवर (ताजमहाल) पुण्यतिथी साजरी करण्यासाठी दहा हजार रुपये खर्च दरवर्षी करण्यात येतो. (कुराण पठण आदिसाठी) यंदाच्या पुण्यतिथीसाठी (१३ नोव्हेंबर १७०४) खर्चासंबधी काय आज्ञा?

बादशहा म्हणाले——रोजच्या (ताजमहाल) चा मुतवल्ली (व्यवस्थापक) खिदमतखान याला लिहा की, दरवर्षीप्रमाणे कार्यक्रम अंमलात यावा. रुहुल्लाखानाची बायको आणि मुलगी यांना दर महिन्याला देण्यात येणारी रक्कम बहाल करण्यात यावी.

अनुक्रमणिका

बादशहाना पुढील हकीकत कळविण्यात आली.——शाकिरउल्लाखान काश्गरी हा घोड्यावर स्वार होऊन आपल्या तैनातीच्या जागेवर म्हणजे तरबियतखानाकडे जात होता. तंबूच्या जवळ जात होता. हा तंबू मरहूम रिआयतखान याचा पुतण्या मुबारकरू याचा होता. त्याचे आणि शाकिरउल्लाखान याचे वाकडे होते. मुबारकरूच्या नोकराने शाकिरउल्लाखानावर तलवारीने हल्ला केला. जखमी अवस्थेत त्याला त्याच्या डेऱ्यात पोहोचविण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, मुमताजरू आणि त्याचा भाऊ यांना त्यांच्या मनसबीवरून बडतर्फ करण्यात यावे.

**वीस सप्टेंबर १७०४**

जुन्नरचा ठाणेदार कामियाबखान हा येऊन बादशहाना भेटला.

शाइस्ताखानाचा मुलगा अबूनसरखान याला शाइस्ताखान ही पदवी होती. त्याचा मुलगा अबू खैरखान याला खिलातखान्याचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

**एकोणीस सप्टेंबर १७०४**

काल रात्री बादशहाने मतलबखान याला (मीर बक्षीचा नायब) बोलावून एकांतात त्याच्याशी खलबते केली.

शाकिरउल्लाखानावरील हल्ल्याचा तपशील असा—काल दिवस मावळता शाकिरउल्लाखान हा तरबियतखान मीर आतिश याच्या बरोबर कामासाठी म्हणून बादशाही छावणीत येत होता. तो मुबारकरू जसावल त्याच्या डेऱ्यापाशी पोहोचला तेव्हा मुबारकरू आणि त्याच्या बरोबरच्या वीस पंचवीस माणसांनी त्याची वाट अडविली आणि त्याच्यावर हल्ला केला. शकिरउल्लाखानाल तलवारीच्या सात जखमा झाल्या. बादशहा हे सर्रबराहखान कोतवाल याला म्हणाले.—"मुबारकरूच्या घरावर चौकी पहारे बसवा. दिवंगत दारोगा खिदमतगारखान याच्या मालमत्तेची काळजीपूर्वक चौकशी करावी अशी आज्ञा करण्यात आली.

**सत्तावीस ऑगस्ट १७०४**

मुहंमद हसनचा मुलगा शेखफरीद हा सुभे विजापूर-कर्नाटक मध्ये घोड्याला डाग देण्याच्या खात्याचा अधिकारी होता. त्या हुद्याला जोडूनच त्याला येथील तोफखान्याचा दारोगा (अधिकारी) म्हणून नेमण्यात आले.

शम्शुद्दीन मुहंमदखान शहीद (कंधारचा किल्लेदार, मिरजेच्या लढाईत मारला गेला.) याचा आप्त मुहंमद जाफर हा बडतर्फ झाला होता. त्याला बहाल करण्यात आले.

सय्यदखान मुहंमदचा मुलगा आणि फोंड्या (कोकण) चा ठाणेदार सय्यद गजनफर याने विनंती केली की, माझ्या जहागिरीची गावे गुलबर्ग्याकडे आहेत. ती माझ्या फौजदारीत देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात यावी.

अनुक्रमणिका

**एकोणतीस ऑगस्ट १७०४**

फिरोजनगर (रायचूर) याचा किल्लेदार, फौजदार व अमीन म्हणून नजफकुलीखान हा काम करीत होता. त्याच्या जागेवर कमरनगर (करनूल) चा किल्लेदार व फौजदार मुहंमद युसुफखान याला त्याच्या कमरनगरच्या हुद्याला जोडून नेमण्यात आले. नजबकुलीखान याला विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**शामराज पद्मनाभी**

पद्मनाभचा मुलगा शामराज (याने आणि तेलंगराव यांनी ९ जानेवारी १६८९ रोजी मातबरखान याजकडून लाच घेऊन त्र्यंबकचा किल्ला मोगलांना दिला होता) हा मुगलखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला तीन हजार जात व दोन हजार स्वार अशी मनसब होती. तो मरण पावला.

खानसामानचा कारकून फुकरदास याची मनसब वाढविण्यात आली.

**तीस ऑगस्ट १७०४**

बादशहानी माळव्याचा व बऱ्हाणपुरचा सुबेदार शाहजादा बेदारबख्त याला कळविले की, आम्ही अहमदनगरला येऊ तेव्हा तुम्ही आम्हाला येऊन भेटावे.

बादशहाना कळविण्यात आले ते असे.—सुरतेचा माजी दिवाण मुहंमद ऐवज उर्फ एतिबारखान याच्यावर मिर्जा सफवीखान याने लुटीचा माल दाबून ठेवल्याबद्दल दाबा लावला होता, त्यावर बादशहाच्या आज्ञेप्रमाणे एतिबारखानाला दिवाणेआलाच्या कचेरीत नजर कैदेत ठेवण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, त्याला हुजुरात आणावे. त्याप्रमाणे कालरात्रीच्या एक प्रहर अन् दोन घटिका झाल्या असता फत्तेदौलत कौल याने एतबारखानाला आणले आणि बादशहाने कळविले की, आजारामुळे त्याला आपली भेट घेण्यास शक्ती राहिली नाही. बादशहाने आज्ञा केली की, त्याला अमीर खानाच्या घरी घेऊन जा आणि त्याच्याकडून मुचलका लिहून घ्या. जर दाव्याची रक्कम आपल्यावर शाबित झाली तर मी त्याला जबाबदार राहीन. अशा प्रकारे मुचलका लिहून घेतल्यावर त्याला सोडण्यात यावे आणि मुहंमद हुसेन हकीम याने त्याच्यावर उपचार करावे.

बादशहांना कळविण्यात आले की, चोरांच्या (मराठ्यांच्या) टोळ्या बादशाही छावणीभोवती घिरट्या घालीत आहेत. बादशहाने आज्ञा केली की, दोन फौजा तयार कराव्या, एक हमीदोद्दीन खान बहादुरबरोबर व त्याच्या बरोबर मन्सूरखान वगैरे सरदार, स्वारांची संख्या एक हजार तीनशे पस्तीस, दुसरे सैन्य सदरुद्दीन मुहंमदखान याच्या बरोबर व त्याच्याबरोबर अजीजखान वगैरे सरदार, स्वारांची संख्या एक हजार आठशे पंच्याहत्तर.

कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान याचे विनंतीपत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

**एकतीस ऑगस्ट १७०४**

अनुक्रमणिका

सुगंधी द्रव्ये तयार करणारा (खुशबुईसाज) मुहंमद अमीन हा हुजुरात आला. त्याने अंबर अत्तरची एक कुपी, फितना अत्तराची एक कुपी आणि इतर अत्तरे बादशहाला भेट म्हणून (पेशकश) दिली. त्यावरून बादशहाने त्याला बेबदलखान अशी पदवी देऊन त्याच्या मनसबीत वाढ केली. औरंगजेबाच्या सार्वजनिक मालमत्तेचा अधिकारी सय्यद मुहंमद आणि मरहूम मुखलिसखान (बक्षी) याचा भाचा अलीजमान यांच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

जळगाव (खानदेश) चा फौजदारीत मोतिकदखान उर्फ नजीबखान याने विनंतीपत्र लिहून कळविले की, मी काही विनंती करण्यासाठी दोन आठवड्यासाठी हुजुरात येत आहे.

**एक सप्टेंबर १७०४**

बंगाल आणि बिहारचा सुभेदार मुहंमद अजीम (अजीमुश्शान, औरंगजेबाचा नातू) याची पत्रे हुजुरात आली.

दंडराजपुरीचा किल्लेदार आणि फौजदार सिद्दी याकूतखान आणि गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दीन अलीखान यांच्या नावे आज्ञा पत्रे रवाना झाली.

**दोन सप्टेंबर १७०४**

विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याच्याकडे गुर्जबर्दाराबरोबर फर्मान पाठविण्यात आले. त्यांना ताकीद करण्यात आली की,—

**तीन सप्टेंबर १७०४**

**नळदुर्ग**

कसबे नळदुर्ग याला चोरांनी (मराठ्यांनी) वेढा घातला आहे. चीनकुलीजखानाला नळदुर्गला पोहोचणे आणि त्यांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करावे शहाजादा बेदारबख्त आणि गाजिउद्दीन फिरोजजंग यांच्या नावे फर्माने रवाना करण्यात आली.

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान हा हुजुरात आहे. त्याला बादशहाने आज्ञा केली की, "तुम्ही आपल्या स्थळी जा आणि शत्रू (मराठे) जेथे जेथे पसरलेले आढळतील त्यांचे पारिपत्य करा.

**पन्हाळगड आणि कोल्हापूर**

रावतमल झाला हा शाहदुर्ग (पन्हाळगड) चा किल्लेदार व फौजदार होता. कोल्हापूरच्या ठाण्यावर नाहरखान हा ठाणेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले आणि कोल्हापूरचे ठाणे पण रावतमलकडे

अनुक्रमणिका

देण्यात आले. रावतमलला एक हजार जात व आठशे स्वार त्यापैकी सहाशे स्वार दुघोडी अशी मनसब होती. तीत तीनशे स्वारांची भर घालण्यात आली.

बरंगल (आन्ध्रप्रदेश) येथे मुहंमद सालेहचा मुलगा अलीअकबर हा अमीन व फौजदार होता. त्याच्या जागेवर मुहंमद ताहिर हिंमतखानी याची नेमणूक करण्यात येऊन अलीअकबरला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

पुढील मंडळींच्या बरोबर बर्कंदाजाच्या (बंदूकची) पुढीलप्रमाणे नेमणुका करण्यात आल्या. उस्मानखान करावल याला अहमदनगर पर्यंतचे प्रवासाचे टप्पे ठरविण्यासाठी पाठविण्यात आले त्याच्याबरोबर वीस बरकंदाज, पन्नास गुर्जबर्दार आणि शंभर बहेलिये (गाड्या चालविणारे).

बादशाही छावणीच्या भोवती आठ कोस बंदोबस्त ठेवण्यासाठी ठेवलेला ठाणेदार अताउल्लाखान याच्याबरोबर पन्नास बरकंदाज आणि दोनशे बहेलिये देण्यात आले.

किलीदे-पतह (वसंतगड कऱ्हाड पासून सहा मैल) चा किल्लेदार बलराम याच्या लिहिण्यावरून फिरोजजंगाच्या फौजेत तैनात असलेला आणि महारामाचा मुलगा मोहनसिंग याची मनसब आठ स्वारांनी कमी करण्यात आली.

**चार सप्टेंबर १७०४**

सियादतखान आजारी आहे असे बादशहांना कळविण्यात आले त्याच्यावर उपचार करावे अशी अशी आज्ञा झाली. त्याच्या जागी बाकरखान याने बादशहासमोर प्रकरणांचे (फायली) कागदपत्रे आणले. बादशहाने आरामगाहाचा पडदा बाजूला सारून प्रकरणे पाहिली.

तरबियतखान हा अहमदनगरहून खजिना आणण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला. मुगलखान हा खजिन्याच्या बरोबर आला होता.

बादशाही छावणीतून काफिला नेणे आणि अहमदनगरहून बारबरदारीचा सरंजाम घेऊन येणे यासाठी त्याला निरोप देण्यात आला.

दियानतखान हा औरंगाबादेहून आला. औरंगाबाद सुभ्याच्या दिवाणीवर मोतिमदखानाच्या जागेवर त्याची नेमणूक करण्यात आली.

**इरादतखान**

मांडवगडाचा फौजदार आणि किल्लेदार इरादतखान याला बादशहाने निरोप दिला. इरादतखानाचा मुलगा हिदायतउल्ला याला कोटरी पिराया (बुंदेलखंड) ची फौजदारी देण्यात आली होती. त्याला आणि त्याचा मुलगा अताउल्ला यांना खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

## पाच सप्टेंबर १७०४

बादशहाने आज न्याय कचेरी केली. अकबराबाद (आग्रा) चा किल्लेदार कामगारखान याला आग्र्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

बंदूकच्यांचा कोतवाल दयानाथ हा अमीरखानाच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. त्याचे नाव इस्लामयार ठेवण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक हा अहमदनगरहून येऊन बादशहाला भेटला.

उदेपुरीमहल (औरंगजेबाची बायको) हिचा मानलेला मुलगा मुहंमद शुजा हा तळावरून (पडेगाव) येऊन बादशहांना भेटला.

तरबियतखानाच्या बरोबर आलेला इफ्तिरकारखान, मुगलखान आणि त्याचे सोबती ख्वाजमकुलीखान व बहाबुद्दीन बक्षी हे बादशहांना भेटले. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद जफर हा आजमगड (पुरंदर) किल्ल्यावरून येऊन भेटला.

धोडप (नाशिक जिल्हा) च्या किल्लेदारीवर अबुल हसन हा होता. त्याच्या ऐवजी त्याचा भाऊ आणि चांदवडचा किल्लेदार अबुल बरकातखान याची नेमणूक करण्यात आली.

अबुल हसनला हुजुरात बोलावून घेण्यात आले. ताथवड्याचा माजी किल्लेदार मुहंमद युनुस याला चांदवडचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## ६ सप्टेंबर इ. स. १७०४ ते १५ डिसेंबर १७०४

### सहा सप्टेंबर १७०४

दोह प्रहरानंतर हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे.—छावणीतील माणसे घासदाणा आणण्यासाठी छावणीच्या बाहेर गेली होती. सुमारे पाचशे चोरांच्या स्वारांनी (मराठेस्वार) बाहेर पडून हल्ला केला आणि छावणीतील माणसांचे बैल आणि उंट ही पळवून नेली. बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीन खान बहादुर, मतलबखान, अमानुल्लाखान वगैरेनी जाऊन शत्रूंचे पारिपत्य करावे. हुजुरात असलेला जिजियाचा अमीन याला पावसाळी अंगरखा बक्षीस म्हणून देण्यात आला.

### सात सप्टेंबर १७०४

काल रात्री बादशहानी मिर्जा सदरुद्दीनखान बक्षी याला बोलावून त्याच्याशी खलबते केली.

बादशहाने आज्ञा केला की, हमीदोद्दीन आणि तरबियतखान यांनी पाळीपाळीने घासदाणा आणण्यास जावे.

माळव्याचा माजी सुबेदार शाइस्ताखान याची पदवी काढून घेण्यात आली.

यासीनखान हा बेदारबख्ताच्या फौजेत तैनात होता. त्याला सुल्तानपूर आणि नंदुरबार येथील फौजदारीवर बदलण्यात आले. यासीनखानाला दोन हजार जात व एकहजार स्वार अशी मनसब होती, तीत वाढ करण्यात आली.

नंदुरबारचा पूर्वीचा फौजदार मामूरखान याला बेदारबख्ताच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मांडवगडचा किल्लेदार व फौजदार इरादतखान याजकडे धारची किल्लेदारी व फौजदारी पण देण्यात आली. धारचा पूर्वीचा किल्लेदार व फौजदार असदउल्लाखान याला औरंगाबाद सुभ्यात तैनात करण्यात आले.

अबदुल वहाबखान हा एदलाबाद (भुसावळ जवळ) चा फौजदार होता. बेदारबख्तच्या सांगण्यावरून त्याची खुराक व दुआबही माफ करण्यात आली. अबदुल लतीफखान हा काश्मिरमध्ये तैनात होता. त्याला हुजुरात बोलाविण्यात आले.

### आठ सप्टेंबर १७०४

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहांना कळविण्यात आले की, चोरांची (मराठ्यांची) पथके बादशाही छावणीच्या भोवती घिरट्या घालीत आहेत. बादशहाने आज्ञा केली की, हमीदोद्दीन खान, तरबियतखान व मतलबखान यांनी जाऊन त्यांचे पारिपत्य करावे.

तूराणच्या राजदूताला शंभर रुपये वजनाचा एकच रुपया बक्षीस देण्यात आला.

मुहंमद अमीनखान बहादूर याच्या तैनातीत असलेले मोगल सैनिक ह्यांच्या पगार बाकीची रक्कम देण्यासाठी बादशहाने वीस हजार रुपये व दोन हजार अश्रफ्या मुगलखानाच्या हवाली केल्या आणि त्याला सांगितले “ही रक्कम बहादुरगडला पोहोचवा.”

**नऊ सप्टेंबर १७०४**

जैनुद्दीन अलीखान हा गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार होता. फुतूहअल् हसन (राजमाची) च्या किल्लेदारीवर मरहूम मातबरखान ह्याचा चुलत भाऊ मुहंमद हसन हा होता. मुहंमद हसनला राजमाचीहून बदलण्यात आले. राजमाचीची किल्लेदारी जैनुद्दीन अलीखान ह्याच्याकडे देण्यात आली. ही त्याच्या ठाणेदारीला जोडून होती. मुहंमद हसनला हुजुरात बोलावून घेण्यात आले. राजमाचीच्या किल्ल्यावर जैनुद्दीन अलीखानाचा नायब (डेप्युटी) म्हणून त्याचा पुतण्या फकरुद्दीन याची नेमणूक करण्यात आली.

**दहा सप्टेंबर १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. खान फिरोजजंग याने विनंतीपत्र पाठविले होते ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

वंझाऱ्याच्या लोकांना रस्त्यामध्ये अतिशय उपद्रव झाला. बादशहाने आज्ञा केली की, बाजाराचा करोडी शेख सादुल्ला याने चौकशी करावी.

तिबेट कडील सरदार आकिबत मसवूदखान याने विनंतीपत्र आणि कस्तुरी वैगेरे वस्तू भेटीदेखील पाठविल्या होत्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

**अकरा सप्टेंबर १७०४**

बादशहाने काल रात्री बक्षी सदरूद्दीन याला बोलावून त्याच्याशी खलबते केली.

गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दिन अलिखान वगैरेना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

सर्फराजखान हा अहमदनगरहून खजिन्याबरोबर आला होता. बादशहाने त्याला दुपारच्या नमाजानंतर बोलावून घेतले आणि त्याच्या यशाची प्रार्थना (फातेहा) पढून त्याला बादशाही छावणीतील काफीला अहमदनगरपर्यंत पोहोचविण्यासाठी निरोप दिला.

अनुक्रमणिका

रोषनाराबेगमचा कोका (दूधभाऊ) चा मुलगा मुहंमद अख्तर याला जुन्नरचा किल्लेदार नेमण्यात आले. निर्मल (आंध्रप्रदेश-निजामाबाद जिल्हा) येथील फौजदार आणि अब्दुल रहमानचा मुलगा अहमद रजा याची मनसब वाढविण्यात आली.

परगणे ईट (विटे?) हे सियादतखानाच्या जहागिरीत होते. त्याला त्या परगण्याची फौजदारी पण देण्यात आली. त्याला दोन हजार जात व तीनशे स्वार अशी मनसब होती.

धोडपचा किल्ला, अबुल हसनचा पुतण्या अबुल गैस याला आज्ञा करण्यात आली की, किल्ला अबुलबरकातखानाच्या हवाली करावा.

गदगचा फौजदार शेरखान याला विजापूर-कर्नाटकमध्ये तैनात करण्यात आले होते. त्यांच्या बरोबर चीनकुलीजखान (विजापूरचा सुभेदार) याच्या फौजेतील काही अधिकारी यांनाही विजापूर कर्नाटकमध्ये पाठविण्यात आले.

मतलबखान हा चोरांच्या (मराठ्यांच्या) पारिपत्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला. शेख गुलाम मुहमंदचा पुतण्या गोपालराम हा लग्नासाठी औरंगाबादेस गेला होता. तो येऊन भेटला.

बादशहाने आज्ञा केली की, शिष्टाचाराचा अधिकारी तहब्बुरखान याने मुद्दाम माणसे नेमून हमीदोद्दीनखानाच्या तैनातीत असलेली पण त्याला अद्याप जाऊन न मिळालेली माणसे यांना हमीदोद्दीनखानाकडे पाठवावे.

नौकादलाचा प्रमुख सैफुल्लाखान हा खिलातखान्याचाही अधिकारी होता. त्याला मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) हे कामही देण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, आम्ही जमादि-उस्सानी महिन्याच्या पहिल्या तारखेस अहमदनगरकडे जाण्यास निघू. बारबरदारी (वाहने वगैरेसाठी) दोन हजार अश्रफ्या आणि चाळीस गुर्जबर्दार हे औरंगाबादेस मोहरमखान याजकडे पाठविण्यात यावेत.

उस्मानखान करावल याला अहमदनगरपर्यंतच्या प्रवासाचे टप्पे निवडण्यासाठी रवाना करण्यात आले.

**तेरा सप्टेंबर १७०४**

बादशहाने आज्ञा केली की (कालरात्री), हमीदोद्दीनखान बहादूर हा चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी गेला होता. तो खेडजवळ आला आहे. त्याला हुजुरात येण्यासाठी लिहिण्यात यावे.

शेख इनायतउल्लाचा मुलगा शेख मुहंमद अक्रम याला पूरनार (पवनार?) चा बक्षी व वाकेनिगार म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

बीरसेनचा मुलगा महासिंग हा अळंद येथे किल्लेदार होता. गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दीन अलीखान याच्या शिफारशींवरून महासिंग आणि त्याचा मुलगा रतनसिंग यांना मनसबी देण्यात आल्या.

तािळकोटच्या किल्लेदारी व फौजदारीवर गुलाम मुहंमदचा मुलगा उमर याला पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले.—

—कादरखान याची त्या जागेवर झालेली नेमणूक रद्द करण्यात आली.

सुप्याचा ठाणेदार दलसिंग याच्या शिफारशीवरून तिरुमलरावाचा मुलगा हरिराव याला मनसब देण्यात आली. त्याच्या बरोबरच दलसिंगच्या भाऊबंधापैकी भूपतसिंग याची मनसब वाढविण्यात आली.

राजा शाहूच्या जहागिरीतील माजी अमीन आणि अबुलकासिमचा मुलगा अबुलफतह याची मनसब कमी करण्यात आली.

दक्षिणच्या सुभ्याचा दिवान मोतमदखान याची मनसब कमी करण्यात आली.

पवनारचा (पोरनार?) चा माजी बक्षी व वाकेनवीस याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

**चौदा सप्टेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, सदरुद्दीन मुहंमदखान बक्षी आणि तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक याने घासदाणा आणण्यासाठी जावे.

कामयाबखान हा चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी आणि ठाणी बसवण्यासाठी जुन्नरकडे गेला होता. जुन्नरचा किल्लेदार आणि फौजदार अबदुल अजीजखान याच्या नावे आज्ञापत्र रवाना झाली.

हैद्राबाद सुभ्याचा माजी कानूनगो बापू पंडित याला बंगालमध्ये तैनात करण्यात आले होते. पण अद्याप तो तेथे गेला नव्हता. बादशहाने आज्ञा केली की, सजावली (गुर्जबर्दार किंवा अंमलबजावणी खात्याचे अधिकारी) नेमण्यात आले आणि बापू पंडित याला त्याच्या तैनातीच्या स्थळी पोहोचवून परत यावे अशी त्यांना आज्ञा करण्यात आली.

सर्फराजखान यास मदत म्हणून दहा घोडे देण्यात आले. त्यांच्या किंमती प्रत्येकी दोनशे पासून पन्नास मोहरापर्यंत होत्या.

**पंधरा सप्टेंबर १७०४**

रात्री दोन घटिका दिल्या असता एक सशस्त्र माणूस दिवाणखासच्या आवारात घुसला होता. दिवाणेखासच्या पायदळ शिपायाने त्याला पकडले होते. फत्तेदौलत कौलने त्याला ताब्यात घ्यावे आणि

चौकशी करावी अशी आज्ञा झाली होती. त्या इसमाला पायदळ शिपायाच्या पगारात दोन रुपयाची वाढ करण्यात आली.

### सोळा सप्टेंबर १७०४

फिरोजनगर (रायचूर) च्या किल्लेदारी व फौजदारीवर युसुफखान (करनूलचा किल्लेदार) त्याची नेमणूक झाली होती. त्याबद्दलचे फर्मान युसुफखानाचा भाऊ मन्सूरखान (हा हुजुरात होता) कडे देण्यात आले. ते युसुफखानाकडे पाठवावे अशी त्याला आज्ञा झाली.

संगमनेरचा फौजदार अमानतखान याला संगमनेरकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. मुहंमद मोसीन याला बऱ्हाणपूर जजियाच्या हिशेब अधिकारी मुश्रफ म्हणून नेमण्यात आले.

अष्टीचा ठाणेदार संग्रामखान याला त्याच्या जागेकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

### सतरा सप्टेंबर १७०४

बादशाही छावणीतील नावा बहाददूरगडला पोहोचविण्यात याव्या.

बादशहाना कळविण्यात आले की, हाजी अबदुलगफूर नावाचा दरवेश (साधु) हा इनायतउल्ला खानाच्या तंबूपाशी राहात आहे. त्याला स्वारीला घोडा नाही व त्याच्यापाशी सरंजाम नाही, ते पुरविण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

### अठरा सप्टेंबर १७०४

गंजाकोटचा माजी किल्लेदार मुहंमद जाफर याला हुजुरात बोलावून घेण्यात आले. कोली (गुत्ती) चा किल्लेदार सय्यद आबिद हा होता. त्याला गंजीकोटचा किल्लेदार करण्यात आले. गुत्तीच्या किल्ल्यावर सखीखानाचा मुलगा आणि हमेली (किल्ल्याचे नाव लागत नाही) चा किल्लेदार कमरुद्दीन याची नेमणूक करण्यात आली आणि हमेलीच्या किल्ल्यावर शफीचा मुलगा सय्यद मीर याची नेमणूक करण्यात आली.

संगमनेरचा फौजदार अमानतखान याचे सहकारी शेखअन्वर आणि दिलदार यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

शंकराजी याला मदतीदाखल दोनशे अश्रफ्या देण्यात आल्या. त्याचे भाऊ यांना पुढीलप्रमाणे मनसबी देण्यात आल्या:—

(१) बाळाजी किशन—एक हजारी जात व दोनशे स्वार.

(२) गोपाळ दादाजी व गोविंदराव—प्रत्येकी सातशे जात व शंभर स्वार.

(३) हरिराव—चारशे जात व शंभर स्वार.

## वीस सप्टेंबर १७०४

चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी आणि ठाणी बसवण्यासाठी कामियाबखान हा जुन्नरकडे गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला.

माळव्याचा माजी सुबेदार अबुनसरखान याचा मुलगा अबूखैरखान याला खिलातखान्याचा अधिकारी नेमण्यात आले.

## फिरंगोजी भांडवलकर

बादशहाना कळविण्यात आले की, सहाव्या चौकीवरचा फिरंगोजी भांडवलकर हा सतत गैरहजर राहतो. काय आज्ञा? बादशहाने आज्ञा केली की, त्याला फरारी म्हणून जाहीर करावे. त्याला अडीच हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती.

मीर तुजक तहबुरखान हा हमीदोद्दीनचा नायब हाजी सुहेल हे दोघे छावणीतून निरोप घेऊन गेले. उस्मानखान वगैरेंना छावणीकडे पाठवावे म्हणून आज्ञा झाली. हाजी सुहेल बरोबर नेमतखानाने जावे अशी आज्ञा करून बादशहाने ताकीद केली की, खुदाबंदाखान (विजापूर-कर्नाटकचा माजी फौजदार, बादशहाचा मामेभाऊ आणि शाइस्ताखानाचा मुलगा) हा बहादुरगडाला पोहोचला असला तर नेमतखानाने, खुदाबंदाखानाबरोबर हुजुरात यावे. नसेल तर नेमतखानाने बहादुरगड येथे सदरुसुदूर (सरन्यायाधीश) मुहंमद अमीनखान याच्याबरोबर बहादुरगड येथे राहावे.

उस्मानखान करावल याने आपल्या सहकाऱ्यापैकी दोन माणसे बहादुरगडला पाठवावीत. त्यांनी बहादुरगडहून अहमदनगरपर्यंत प्रवासाचे टप्पे ठरवावेत कारण नवाब झिन्नतउन्नीसाबेगम (औरंगजेबाची मुलगी, ही पुढे बहादुरगड उर्फ पेडगाव येथे होती.) ही अहमदनगरला येणार आहे.

बादशहाने आज्ञा केली की, राजा शाहू याचा दिवाण शेख गुलाम मुहंमद याच्या ज्या काही मागण्या असतील त्या हाजी सुहेल यांनी मांडाव्या. तूर्त त्याचा नायब ख्वाजाईशरत याने ते काम पाहावे.

मुबारकरू यसावल (सोहबत) याने शाकिर उल्लाखानावर हल्ला केला होता. त्याची मनसब काढून घेऊन त्याला बडतर्फ करण्यात आले. त्याची शस्त्रास्त्रे काढून घ्यावी, अशी छावणीचा कोतवाल सर्रबराहखान याला आज्ञा करण्यात आली. सर्रबराहखानाने या कामासाठी आपला नायब मुहंमद बाकी याला पाठवला. त्याचे एक तलवार, एक ढाल, एक बंदूक, चार धनुष्ये, दोन भाते हे सगळे काढून घेण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, शस्त्रे शस्त्रागारात, घोडे तबेल्यात ठेवावेत आणि त्या इसमाने कुठेही जाऊ नये म्हणून खबरदारी बाळगावी.

अनुक्रमणिका

यापूर्वी बादशहाने आज्ञा केली होती की, गुलाम मुहंमद उर्फ बाळीराम याच्या विनंत्या हाजी सुहेल यांनी मांडत जाव्या. आता बादशहाने आज्ञा केली की, हे काम हाजी सुहेलचा नायब ख्वाजा अरब याने करत जावे.

बादशहाने आज्ञा केली की, नेमतखान याने हाजी सुहेलच्याबरोबर जावे आणि हाजी सुहेलला बहादुरगड उर्फ पेडगाव येथे पोहोचवावे. त्यानंतर नेमतखानाने खुदाबंदाखानाबरोबर हुजुरात यावे.

बादशहाने आज्ञा केली की, हाजी सुहेल व उस्मान यांच्या सहकाऱ्यांना तहब्बुरखान याने माणसे पाठवून रवाना (बहादुरगडकडे) करावे.

मजलांची (प्रवासाचे टप्पे) व्यवस्था करणारा अधिकारी (खुशमंजिल) सादतउल्ला याला एक घोडा बक्षीस देण्यात आला.

**एकवीस सप्टेंबर १७०४**

बादशहानी हमीदोद्दीनखानला आज्ञा केली की, कसबे वाकिनखेडा (तालुके सुरपुर, जिल्हा गलबर्गा-कर्नाटक सध्याचे नाव वागिणगिरी) व नुस्रताबाद उर्फ सगर (जिल्हा गुलबर्गा) याचे नकाशे तयार करण्यात यावे ते हिदायतकेश वाकेनिगार आणि रुद्रराव कानूनगो, विजापूरचा यानी व्यवस्थित करून आपल्यासमोर ठेवावेत.

फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीरशाही (हा विशाळगडच्या वेढ्यात कामगिरीकरून प्रसिद्धीस आला होता.) याला काबुल सुभ्यात तैनात करण्यात आले होते. काबुलकडे तो जात असताना त्याने बऱ्हाणपूरच्या लोकांवर जुलुम केला होता. म्हणून त्याची मनसब कमी करण्यात आली होती. ती आता बहाल करण्यात आली.

जोंद (नाशिक जिल्हा) चा किल्लेदार आणि माधवसिंग कछवाहाचा मुलगा शामराव याची मनसब जुन्नरचा किल्लेदार व फौजदार अबदुल अजीजखान याच्या शिफारशीवरून वाढविण्यात आली.

**बावीस सप्टेंबर १७०४**

सुभे दक्षिणचा दिवाण अमानतखान याची मनसब वाढविण्यात आली.

**तेवीस सप्टेंबर १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. आपल्या आरामगा ह (विश्रामगृह) चा पडदा बाजुला सरकवून बादशहाने सादतखान याने आणलेले प्रकरणाचे कागदपत्र नजरेखालून घातले.

बादशहानी बक्षी सदरुद्दीन मुहंमदखान आणि हमीदोद्दीनखान यांना बोलावून त्यांच्याशी बोलणे केले. दीड घटिकानंतर आरामगाहचा पडदा बंद करण्यात आला.

अनुक्रमणिका

मुहंमदरजा वगैरे व्यापाऱ्यांनी तक्रार केली की, बंगालहून सुरतकडे येणारे आपले जहाज टोपीवाल्यांनी (फिरंगी) लुटून आठ लाख रुपये नेले. त्यांच्याकडून माल परत देण्याविषयी नजाबतखान (सुरतेचा कारभारी) याला मुद्दाम मनुष्य पाठवून ताकीदपत्र लिहिण्यात आले.

**गुलबर्गा**

अहसनाबाद उर्फ गुलबर्गा येथे नुरुद्दीन हा किल्लेदार होता. त्याच्या ऐवजी त्याच्या जागेवर तरबियतखानाचा भाऊ कामियाबखान याची नेमणूक करण्यात आली.

चोरांच्या (मराठ्यांच्या) जमाती अंकोजीच्या नेतृत्वाखाली गढ नमुना (कर्डे निमोणे) जवळ छावण्या घालून होत्या. कोरेगावचा ठाणेदार तुर्कताजखान हा त्यांच्यावर चाल करून गेला. त्याने एकशेपंचवीस घोडे, दोनशे गुरेढोरे शत्रुंच्याकडून सोडविली आणि ताब्यात घेतली.

मोहरमखानाने औरंगाबादेहून लिहून कळविले की, मुहंमद शफीचा भाऊ हकीम सदरुद्दीनखान याने माझ्यावर चांगले औषधोपचार केले. त्याला माझ्याबरोबर राहण्याची परवानगी देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

गुलशनाबाद (नाशिक) कल्याण-भिवंडीचा ठाणेदार जैनुद्दीन अलीखान याच्या शिफारशीवरून मीर मुहंमद रजाचा मुलगा मीर मुहंमद कासिम याची मनसब वाढविण्यात आली.

**चोवीस सप्टेंबर १७०४**

कोरेगावचा ठाणेदार तुर्कताजखान हा येऊन बादशहाला भेटला. त्याची मनसब वाढविण्यात आली. त्याच्याबरोबर मरहूम अईजखान याचा नातू शमशीरबेग हा ही बादशहाना भेटला. त्याला सिपरखान ही पदवी देण्यात आली.

सय्यद मीरवा मुलगा सय्यद अबदुल्ला हा मक्केच्या यात्रेवर निघाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, लाहोरचा किल्लेदार बाकीखान याच्याबरोबर वीस मनसबदार तैनात आहेत. त्यापैकी त्याची मुले वगैरेनी बाकीखानापाशी राहावे. बाकीच्यांनी हुजुरात यावे.

हैद्राबाद सुभ्याच्या बातम्यांवरून पुढील प्रकारे कळले—हसन कुलीखानाचा पुतण्या आणि दाऊदबेगचा मुलगा सुलेमान बेग याला चोरांनी (मराठ्यांनी) कैद केले होते, तो आता सुटून आला आहे. बादशहाने आज्ञा केली की, त्याची पाचशे जात व पन्नास स्वार अशी पूर्वीची मनसब पूर्ववत बहाल समजण्यात यावी.

किशनसिंगची मुले अचलसिंग आणि रतनसिंग यांच्या मनसबी बहाल करण्यात आल्या.

गदगचा फौजदार शेरखान याला हमीदखान ही पदवी देण्यात आली.

यार अली बेग याने बादशहाना पुढीलप्रमाणे कळविले—हेरांनी बातमी आणली आहे की, धना जाधव (धनाजी जाधव), बहिर्जी (बहिर्जी हिंदुराव घोरपडे) वगैरे शत्रूंचे सरदार हे मोठे सैन्य घेऊन हैद्राबाद-कर्नाटक मध्ये पोहोचले. दाऊदखान फौजदार हा त्यांच्यावर चालून गेला. चोरांशी (मराठ्यांशी) युद्ध झाले. बादशहाच्या कृपेने शत्रूंपैकी अनेक लोक ठार झाले. अनेक जखमी झाले आणि शत्रुंचा पराजय झाला. शत्रुंची छावणी लुटण्यात आली. बहिर्जीचा जावई याला नरकात पठविण्यात आले. खुद्द बहिर्जीला बाणाची एक जखम झाली. शत्रू आठ कोस पलीकडे पळून गेला. आमचा विजय झाला.

वरील मजकूर पाहून बादशहा म्हणाले सेवेचा मुजरा झाला (सेवा मान्य झाली.)

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे हमीदोद्दीनखान आणि मतलबखान यांना वाकिणखेडा किल्ल्याचा नकाशा आणि बादशाही छावणीपासून नुस्रताबाद उर्फ सगरपर्यंतचा मार्गाचा नकाशा तयार केला होता बादशहांनी तो नजरेखालून घातला.

**पंचवीस सप्टेंबर १७०४**

चोरांची (मराठ्यांची) पथके भीमेच्या पलीकडे जमली होती. त्यांचे पारिपत्य तरबियतखान याने केले. तो बादशाही छावणीपासून चार कोसावर आला आहे. बादशहाने आज्ञा केली की, तरबियतखानाने आठवड्यातून दोन वेळा मजुऱ्यासाठी येत जावे.

तर्कताजखान याची मनसब वाढविण्यात आली. खटाव (जिल्हा सातारा) येथे किशनराव हा ठाणेदार होता. याला दोन हजार जात व दीड हजार स्वार, त्यापैकी पाचशे स्वार दुघोडी अशी मनसब होती. सुलेमानखानाच्या सांगण्यावरून त्याची मनसब पाचशेनी कमी करण्यात आली.

**सव्वीस सप्टेंबर १७०४**

काल दिवस मावळला बादशहाने आरामगाहचा पडदा बाजूला सारून सिदायतखान याने आणलेले कागदपत्र पाहिले. काल संध्याकाळी तरबियतखान मीर अतिश हा येऊन बादशहाना भेटला. नंतर बादशहाने त्याला त्याच्या तळाकडे जाण्यास निरोप दिला.

**सवाई जयसिंग**

बादशहाना कळविण्यात आले ते असे—शाहजादा मुहंमद बेदारबख्त बहादूर याने माळव्याच्या सुभ्यावर आपला नायब (डेप्युटी) म्हणून राजा जयसिंग याची नेमणूक करून त्याला माळव्याकडे पाठविले.

**मातबरखान**

औरंगाबाद येथील बयूतात (सार्वजनिक मालमत्तेचे खाते) कडून पुढीलप्रमाणे कळले, मरहूम मातबरखान याच्या मालमत्तेपैकी या ठिकाणी चोवीस हजार अश्रफ्या सापडल्या त्या खजिन्यात दाखल करण्यात आल्या.

बादशाही छावणीचा कोतवाल याने आज्ञेप्रमाणे (सर्रबराहखान) मुबारकरू सोहबत यसावल याला कैद करून कोतवाली चबुतऱ्यात ठेवले.

तरबियतखानाने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले— "माझा तळ आहे हे सरकारी शिकारवन आहे. वाघाच्या शिकारीची जागा आहे. याची व्यवस्था काय करावी?" बादशहाने आज्ञा केली की, मतलबखान याने करावल पाठवून जागेची आखणी करावी आणि तेथे शिकार होऊ देऊ नये.

मरहूम सईदखान याची मुहंमद सिद्दीक वगैरे मुले लाहोरात होती. त्यांना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

### सत्तावीस सप्टेंबर १७०४

(बादशहाने आज न्यायकचेरी केली). बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—सरकारी घोड्यांची पागा अहमदनगर येथे आहे.

औरंगाबादेहून बारबरदारीचा सरंजाम बादशाही छावणीत येईल त्यावेळी त्याबरोबर अहमदनगर येथील घोड्यांची पागाही बरोबर पाठवावी. अशा अर्थाचे पत्र अहमदनगर येथे असलेला सरकारी तबेल्याचा अधिकारी (करोडी) नूरमुहंमद याच्या नावे लिहिण्यात यावे.

बादशहाने आज्ञा केली की, अहमदनगरच्या मार्गाचा रक्षक (राहदार) याने बारबरदारीचा सरंजाम घेऊन त्वरित हुजुरात यावे.

### चांद्याचा (चंद्रपूरचा) राजा बीरसिंग

चांद्याचा जमिनदार राजा बीरसिंग याने पाठविलेली अर्जदास्त (विनंतीपत्र) बादशहाच्या नजरेखालून गेली.

(यावरुन सत्तावीस सप्टेंबर १७०४ पर्यंत तरी चांद्याचा राजा बीरसिंग हा जिंवत होता असे दिसून येते.)

### औसा (लातूर जिल्हा)

सजावारखान याला औश्याची (लातूर जिल्हा) किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली. त्याला एक हजार जात व पांचशे स्वार अशी मनसब होती. तीत शंभर स्वारांची वाढ करण्यात आली.

अनुक्रमणिका

गढी संख (जत तालुका, सांगली जिल्हा) चा ठाणेदार राजी मुहंमद होता. त्याच्या जागेवर हरानखान याची नेमणूक करण्यात आली. राजी मुहंमदला हुजुरात बोलावून घेण्यात आले गुलबर्ग्याचा माजी किल्लेदार नुरउद्दीनखान याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

नवाजिसखान हा माळवा सुभ्यात तैनात होता. त्याला आज्ञापत्र पाठविण्यात आले की, सुभ्यात खबरदारी बाळगावी, शत्रूंची पथके जेथे जेथे आढळतील तेथे तेथे त्यांचे पारिपत्य करावे.

### अठ्ठावीस सप्टेंबर १७०४

बऱ्हाणपूर आणि माळव्याचा सुभेदार याच्या नावे तातडीचे फर्मान पाठविण्यात आले.

### खिदमतगार

मरहूम खिदमतगारखान याचे कारकून शऊर, पुरूषोत्तमदास, दीनानाथ व उग्रसेन हे बहादुरगड येथे होते. त्यांना हुजुरात आणण्यासाठी गुर्जबर्दारांना नेमण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, अब्दालखान तोफची बासी (तोफखान्याचा अधिकारी) याने पुण्यात (?) असलेल्या तोफा आणि सरंजाम बहादुरगडावर पोहोचवाव्या आणि नंतर हमीदोद्दीन खानाच्या भावाबरोबर जावे.

### एकोणतीस सप्टेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. दिवस मावळता हेरांच्याकडून पुढील बातमी कळली——किल्ले सादिकगड उर्फ वर्धनगड (मर्दानगड लिहिले आहे) याच्यावर बेडर सैनिकांनी या महिन्याच्या पाच तारखेस ताबा मिळविला. त्यांनी किल्लेदार किशोरसिंग याला कैद केले. बादशहानी दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान याला आज्ञा केली की, तयार रहा. किल्ला परत घेण्यासाठी मी तुम्हाला पाठवीत आहे.

### तीस सप्टेंबर १७०४

दिवसाचा एक प्रहर अन् सात घटिका झाल्यावर बादशहाच्या आरामगाहाचा पडदा बाजुला सारला गेला. शिष्टाचाराचा अधिकारी (मीरतुजक) तहब्बुरखान ह्याने मन्सूरखान याला हुजुरात आणले. बादशहाने त्याला एक खंजीर, शंभर रुपये किंमतीचा बक्षीस देऊन सादिकगड (वर्धनगड) जिंकून घेण्यासाठी त्याला निरोप दिला.

तरबियतखान हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहाना भेटला. नेमा शिंदे (नेमाजी शिंदे) वगैरे शत्रू हे माळवा सुभ्यात पसरले होते. त्याचे पारिपत्य करण्यासंबंधी खान फिरोजजंग याच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली.

अनुक्रमणिका

खानचंदाचा मुलगा दलसिंग हा सुपे (पुणे जिल्हा) येथे फौजदार होता. त्याला सय्यद जान बाजखान याच्या ऐवजी आजमगड उर्फ पुरंदरची किल्लेदारी आणि किल्ल्याभोवतीच्या दोन कोसापर्यंतच्या प्रदेशाची फौजदारी या हुद्यावर नेमण्यात आले. त्याची मनसब वाढविण्यात आली. नेमणुकीचे फर्मान लालबेग व मुहंमद आकिल गुर्जबर्दार यांच्याकडे देण्यात येऊन त्यांना ताकीद करण्यात आली की, त्यांनी दलसिंगाला सुप्याहून काढून आजमगड (पुरंदर) वर पोहोचवावे आणि माजी किल्लेदार सय्यद जानबाजखान याला हुजुरात आणावे.

यारअलीबेग याने पत्र लिहून पुढील हकीकत कळविली—सुरतेचा माजी कारभारी (मुत्सद्दी) मुहंमद ऐवज याच्यावर बनवारी नावाच्या इसमाने दीड लाख रुपयाचा दावा लावला आहे. बनवारीचे म्हणणे असे आहे की, मुहंमद ऐवजने येथे नऊ लाख रुपयाची अफरातफर केली असून तो ते पैसे दाबून बसला आहे. सावकारांच्या वहीखात्यावरुन मी हे सिद्ध करुन देईन. दोन गुर्जबर्दार नेमण्यात यावे. बादशहांनी विंनती मान्य करून या कामावर सिद्दीकबेग व मुहंमद सईद या गुर्जबदारांची नेमणुक केली.

**एक ऑक्टोबर १७०४**

काल रात्री हेरांकडून बादशहांना कळले की, चोरांची (मराठ्यांची पथके) ही साल्प्याचा घाट आणि चंदनवंदन किल्ल्याचा परिसर यात पसरली आहेत. बादशहाने दुपारच्या नमाजानंतर हमीदोद्दीनखान व तरबियतखान यांना आपल्या प्रार्थनागृहात (तहबीहखाना—माळ जपण्याची जागा) बोलविले आणि तरबियतखान याला एक धनुष्य व एक भाता बक्षीस देऊन प्रार्थना (फातेहा) पढून साल्पे आणि चंदनवंदनकडे पसरलेल्या चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी रवाना केले.

बादशहा मतलबखानाला म्हणाले:——

> तरबियतखानाच्या बरोबर सहा हजार सहाशे सहा स्वार देण्यात यावे. या सैन्याबरोबर अजीजखान व बाकरखान वगैरे सरकारी अधिकारी असावेत. कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) वगैरेचे ठाणेदार यांनी तरबियतखानाच्या बरोबर राहावे. मन्सूरखान हा सादिकगड (वर्धनगड) जिंकून घेण्यासाठी गेला आहे. त्यानेही तरबियतखानाबरोबर राहावे. चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य झाल्यावर त्याने (मन्सूरखानाने) सादिकगड (वर्धनगड) जिंकून घेण्यासाठी जावे.

उदेपुरी महाल (औरंगजेबाची बायको) या बहादुरगडात आहेत. त्यांच्या नावे बादशहाचे फर्मान रवाना झाले.

नळदुर्ग (जिल्हा उस्मानाबाद) चा माजी किल्लेदार व फौजदार मोहतशम्खान याची मनसब काढून घेण्यात आली. त्याला वर्षासन देण्यात येऊन त्याला अजमीरला जाण्याची आज्ञा करण्यात आली.

**दोन ऑक्टोबर १७०४**

गुजराथचा सुबेदार शाहजादा आजम याच्या नावे फर्मान रवाना झाले. बऱ्हाणपूर व माळवा येथील सुबेदार शाहजादा बेदारबख्त आणि हैद्राबाद-कर्नाटकाचा नायब फौजदार दाऊदखान यांची पत्रे आली. ती

अनुक्रमणिका

बादशहाच्या नजरेखालून गेली. चौकीखासच्या सैनिकांसाठी बादशहाने अकरा घोडे मन्सूरखानाच्या विनंतीवरून दिले. हाफिज मसऊदमहली याचा याला चार हजार रुपये किंमतीचा हत्ती बक्षीस म्हणून देण्यात आला.

बादशहाने आज्ञा केली की, तरबियतखानाच्या फौजेत तैनात असलेल्या सैनिकांना तहबुरखान मीर तुजक याने माणसे पाठवून त्यांच्या तैनातीच्या जागेवर पोहोचवावे.

अमानुल्लाखान नावाचा सरदार मागे विजापूरच्या मोहिमेत ठार झाला होता. त्याचा उल्लेख यापुढे शहीद असा करण्यात यावा, अशी आज्ञा करण्यात यावी.

### शिंदखेडचे जाधव मानसिंग

जगदेवराव (शिंदखेडचे जाधव) ह्यांचा मुलगा मानसिंग हा मुगलखानाच्या फौजेत तैनात होता. मुगलखान हा अहमदनगरच्या मार्गाचा रक्षक होता. मानसिंग जाधव हा काफिला घेऊन अहमदनगरकडे येत होता. चोरांच्या (मराठ्यांच्या) पथकांनी अहमदनगरजवळ त्याच्यावर हल्ला केला. चकमकी झाल्या. मानसिंगजवळ पथक असे थोडेच होते. त्यामुळे त्याचा पराभव झाला. चोरांनी (मराठ्यांनी) काफिला लुटला. हा काफिला परगणे चांद्याहून (?) अहमदनगरकडे येत होता.

### बापू पंडित

हैद्राबादचा कानूनगो याला बंगालच्या सुभ्यात तैनात करण्यात आले होते. आता तरबियतखानाच्या विनंतीवरून तो हुकूम रद्द करण्यात आला आणि बापू पंडितला तरबियतखानापाशी तैनात करण्यात आले.

### कऱ्हाड

कऱ्हाडाबादचा ठाणेदार सुलेमानखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले—चोर (मराठे) हे चंदनवंदन किल्ल्याच्या परिसरात पसरले होते. सुलेमानखानाने त्यांच्याशी युद्ध केले. बादशहाच्या कृपेने शत्रूंपैकी साठ माणसांना नरकात पाठविण्यात आले. शत्रूंचा पराजय करण्यात आला.

### तीन ऑक्टोबर १७०४

मरहूम खानजमान फत्तेजंग, मुकरबखान (संभाजी राजे यांना पकडणारा) याचा मुलगा अबदुल कादर याला निजामउद्दीनखान अशी पदवी देण्यात आली. त्याला आठशे जात आणि दोनशेपन्नास स्वार अशी मनसब होती.

किल्ल्यातील शिबंदीच्या पगार वाटपासाठी दोन हजार अश्रफ्या मन्सूरखान याजकडे पाठविण्यात याव्या अशी बादशहाने फत्ते दौलतकौल याला आज्ञा केली.

अनुक्रमणिका

मुजफ्फरखान हा सुभे हैद्राबादचा नायब फौजदार आणि कोहीरचा फौजदार होता. त्याच्या द्वारे हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान याचा हुद्दा व इतर तपशील कळवावा, अशी बादशहाने आज्ञा केली.

काल रात्री बादशहाने अहदियान (शिलेदार) चा तनबक्षी (तनख्याचा बक्षी) बाकरखान याला बोलावू पाठविले आणि त्याला एक शस्त्र बक्षीस देऊन त्याला तरबियतखानाच्याबरोबर पाठविले.

रूहुल्लाखानाच्या बायकोचे निवृत्तीवेतन पूर्वीप्रमाणे बहाल करण्यात आले.

**परंडा**

ईज्ञतखान हा परंड्याचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमला होता. त्याला सातशे जात व तीनशे स्वार अशी मनसब होती. तीत तीनशे स्वारांची भर घालण्यात आली.

**नळदुर्ग**

नळदुर्गच्या किल्ल्यावर कासिमखान याची किल्लेदार व फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याच्या मनसबीत तीनशे स्वारांची वाढ करण्यात आली.

तरबियतखानाच्याबरोबर तळावर परत जाणारा सरदार बहनोजी (?) याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याला दोनशे जात व तीस स्वार अशी मनसब होती. तीत पन्नास जात आणि वीस स्वार अशी वाढ करण्यात आली.

इनायतउल्लाखानाचा मेहुणा मुहंमद फारुख याला नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याच्या फौजेचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

अबदुल अली याला बऱ्हाणपूर शहराचा किल्लेदार व तोफखान्याचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

त्रिबंक (?) चा माजी फौजदार आणि अमीन अलिअकबर याची मनसब कमी करण्यात आली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—या महिन्याच्या नऊ तारखेस औरंगाबादेहून हत्ती आणि इतर बारबरदारीचा सरंजाम रवाना झाला असून गंगेपर्यंत (गोदावरी) पोहोचला आहे.

**चार ऑक्टोबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. महिमानगडचा किल्लेदार किल्लेदारखान याचे पत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

दौंडचा ठाणेदार घोरीखान हा हुजुरात होता. त्याला दौंडकडे परत पाठविण्यात आले.

अनुक्रमणिका

(कर्नाटक) कोप्पळचा जमिनदार व्यंकट याला अहसनाबाद (उर्फ गुलबर्गा) येथील किल्लेदार व फौजदार कामियाबखान याजपाशी तैनात करण्यात आले. व्यंकटरावला एक हजार जात आणि दोनशे स्वार अशी मनसब होती.

**जतचे डफळे**

बादशहानी पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

सटवा (सटवाजी डफळे जतचा) चा नातू बाबाजी हा लग्नासाठी दोन महिन्याची रजा घेऊन हुजुरातून गेला आहे. रजा संपल्याबरोबर तो परत आला तर त्याची मनसब बहाल राहील. नाहीतर त्याला बडतर्फ करण्यात येईल. बाबाजी डफळे याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती.

कल्याणसिंगचा मुलगा हरनिहान हा इस्लामगड उर्फ रायरी (रायगड) येथे तैनात होता, तो येऊन बादशहाला काल भेटला. त्याला रायगडकडे परत पाठविण्यात आले. त्याला दीड हजार जात व पाचशे स्वार अशी मनसब होती.

अर्जीजीचा मुलगा अबदुल्ला याला इस्लाम स्वीकाराचा मान मिळाल्यानंतर पाचशे जात व शंभर स्वार अशी मनसब देण्यात आली.

बरणगावचा फौजदार मुहंमद सलीम ह्याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, विजापूरचा कानूनगो रुद्राजी पंडित याने न्याय कचेरीत येत-जात असावे.

अमीरउल्मरा (मुख्य प्रधान असदखान) याने विनंती केली की, —नंदरूप (?) व कासेगावचा माजी अमीन व नवरंगरायचा मुलगा अमरसिंग याला मी आपल्या खासगी कामावर नेमीत आहे, परवानगी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

**पाच ऑक्टोबर १७०४**

बादशहाने आज्ञा केली की, विजापूरचा सुभेदार चीनकुलीजखान याजपाशी तैनात असलेल्या सैनिकांना पगार म्हणून देण्यासाठी बादशाही खजिन्यातून चार हजार अश्रफ्या सिदायतखान याजकडे देण्यात याव्यात आणि ती रक्कम त्याने चीनकुलीजखानाकडे पाठवावी.

तरबियतखान हा चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी चंदनवंदनच्या किल्ल्याकडे गेला होता. त्याच्या नावे आज्ञापत्र रवाना झाली.

अनुक्रमणिका

**सहा ऑक्टोबर १७०४**

तरबियतखान आणि चंदनवंदन व वर्धनगडकडे गेलेला मन्सूरखान याच्या नावे आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान बक्षी याला बादशहा म्हणाले—बारबरदारीचा सरंजाम अहमदनगरला येऊन पोहोचला आहे. तुम्ही तयार रहा. तो (सरंजाम) छावणीत घेऊन येण्यासाठी मी तुम्हाला अहमदनगरला पाठवीत आहे.

बादशहाने आज्ञा केली की, सदरुद्दीनबरोबर एक हजार तीनशे स्वार असावेत आणि अमानुल्लाखान व शमशीरबेग उर्फ सिपरखान व शंभर गुर्जबर्दार हे बरोबर राहावेत. त्या हिशोबाने सैन्याची व्यवस्था करण्यात यावी.

उस्मानखान करावलबेगी याला अहमदनगर पर्यंतच्या प्रवासाचे टप्पे ठरविण्यासाठी पाठविण्यात आले होते. तो परत आला आणि हुजुरात कळविले की, येथून अहमदनगरपर्यंत चोवीस कोसांचे अंतर आहे प्रवासाच्या एकंदरीत नऊ मजला होतील.

**श्रीरंगपट्टण**

विजापूर-कर्नाटकाच्या बातम्यावरून कळले—श्रीरंगपट्टणहून बदललेला हरकारा अबदुर्रहमान हा तेथून हजुरात येत होता. वाटेत परगणे लोकास (?) येथे तो थांबला. तेथील लोकांशी त्याने मारामारी केली आणि एकाला जखमी केले, जखमी माणसाने त्याच्यावर दावा लावला. पण हा हरकारा अबदुर्रहमान कचेरीत रूजू झाला नाही.

बादशहाने त्याच्या दोनशे जात या मनसबीतून पन्नास जात कमी करावी आणि त्याच्यावरील आरोपाची यादी व प्रकरण काजी अक्रमखान (बादशाही छाणीतील मुख्य काजी) याजकडे पाठवावी.

**सात ऑक्टोबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. शम्शीरबेग ऊर्फ सिपरखान (वाचन शेरखानही होऊ शकेल.) याच्या सैनिकांना पगारबाकी म्हणून पाच हजार रुपये देण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—तरबियतखान मीर आतिश याचा कारभारी रामजी उर्फ दियानतराव हा तोफखान्याच्या कचेरीत असताना त्याचे आणि हजारी मनसबदार मणीराम याचे पगाराच्या बाकीवरून भांडण झाले. मणिरामच्या मुलाने दियानतराव व कचेरीचा मोहरीर (लेखक) तिरसेन यांच्यावर कट्यारीने हल्ला करुन त्यांना जखमी केले. याची चौकशी करुन वृत्तांत सादर करण्यात यावा अशी आज्ञा झाली.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार कामियाबखान याने विनंती केली की, सहा हजार रुपये किंमतीचा एक हत्ती देण्यात यावा, विनंती मान्य करण्यात आली. त्याच्या दुसऱ्या विनंत्या अशा होत्या:—

(१) येथे तोफखान्याचा अधिकारी मीर युसुफ हा आहे. त्याच्या जागी अबदुल वहाब याची नेमणूक करण्यात यावी, विनंती मान्य करण्यात आली.

चिंतो चिमणाचा भाऊ रूद्रा (रूद्राजी) व सटवा डफळेचा नातू बाबा (बाबाजी) यांना माझ्यापाशी तैनात करण्यात यावे.

चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य व जमिनदारांचा उपद्रव मोडून काढण्यासाठी मला किल्ल्याच्या बाहेर जाणे भाग पडेल. अशावेळी मी आपला भाचा मुहंमद बाकर याला किल्ल्यात आपल्यातर्फे नायब ठेवून जात राहील. त्याची मंजुरी देण्यात यावी.

कामयाबखानाच्या इतर विनंत्याही मान्य करण्यात आल्या.

**आठ ऑक्टोबर १७०४**

मोहरमखान हा औरंगाबादेहून हत्ती वगैरे आणीत होता. त्याच्या नावे आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

उस्मानखान करावल हा येऊन बादशहाना भेटला.

फारिस (पार्शिया-इराण) चा अधिकारी इसाम कुलीखान याचा नातू (मुलीचा मुलगा) अबदुल रझाक हा नुकताच आपल्या देशातून आला होता. तो बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे आणि तीनशेची मनसब देण्यात आली.

बादशहाने बेदारबख्ताकडे सफरचंदाच्या तीन करंड्या पाठविल्या.

औशाचा किल्लेदार सजावारखान याला खिलातीची वस्त्रे द्यावीत, अशी आज्ञा झाली.

रसूलाबाद (शिवापूर-पुण्याजवळ) चा ठाणेदार हश्मतउल्ला याला जानबादखानाच्या ऐवजी आजमगड (पुरंदर) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. ही किल्लेदारी त्याच्या ठाणेदारीला जोडून देण्यात आली.

दलसिंग याला आजमगडवर किल्लेदार म्हणून नेमण्यात आले होते. तो हुकुम रद्द करण्यात आला.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली— गुर्जबर्दारांनी औशाचा माजी किल्लेदार व फौजदार इज्जतखान याला परंड्याकडे पोहोचवावे आणि परंड्याचा फौजदार व किल्लेदार कासिमखान याला नळदुर्गच्या किल्लेदारी व फौजदारीवर पोहोचवावे. नळदुर्गचा माजी किल्लेदार मोहनशमखान याला

औरंगाबादच्या खजिन्यातून तीन हजार रुपये द्यावेत आणि गुर्जबर्दारांनी त्याला अजमीरला पोहोचवून परत यावे.

**नऊ ऑक्टोबर १७०४**

बादशहाने आरामगाहचा पडदा बाजूला सारून सियादतखानाने आणलेली काही प्रकरणे व कागदपत्रे पाहिली.

(पुरंदर) आजमगडचा किल्ला हशमत्उल्लाच्या हवाली करावा अशा अर्थाचे फर्मान तेथील (पुरंदर) किल्लेदार जानबाजखान याच्या नावे रवाना करण्यात आले. हशमत्उल्लाला रसूलाबाद (शिवापूर) च्या ठाण्यावरून आजमगड (पुरंदर) वर पोहोचवावे म्हणून गुर्जबर्दार नेमण्याची आज्ञा झाली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले ते असे —मराठ्यांनी औरंगाबाद सुभ्यात मौजे जामरूद (?) येथे एक गढी बांधली असून ते तेथे तळ देऊन आहेत. ते राजमार्गावर येऊन लोकांची वाट अडवतात आणि लोकांना लुटतात. बादशहानी आज्ञा केली की, मतलबखान याने नुस्रतजंग याजकडे गुर्जबर्दार पाठवावेत. नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याने चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करून गढी नष्ट करावी.

खटाव (जिल्हा सातारा) चा ठाणेदार किशनराव (कृष्णराव) याने सादिकगड (वर्धनगड) चा किल्ला चोरांच्याकडून (मराठ्यांच्याकडून) परत जिंकून घेतला. त्याला दीड हजार जात व एक हजार स्वारपैकी पाचशे स्वार दुघोडी अशी मनसब होती. तीत वाढ करण्यात आली.

दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान याच्या मनसबीत वाढ करण्यात आली.

अहमदनगरच्या बातम्यांवरुन कळले की, हत्तीखाना वगैरे बारबरदारीचा सरंजाम हा मौजे पोरगावपर्यंत पोहोचला आहे.

बादशहानी हिदायतकेश याला काल बोलावू पाठवले. त्याचा कारकून घाशीराम याने विनंती केली की, हिदायतकेश हा कडूसच्या ठाण्याला गेला आहे. बादशहाने विचारले “अहमदनगरहून पोरगाव किती लांब आहे.” अहमदनगरच्या पलीकडे ते सात कोसांवर आहे. असे कळविण्यात आले.

बादशहाने सदरुद्दीन मुहंमदखान यास आज्ञा केली की, अहमदनगरकडे जाऊन हत्तीखाना व बारबरदारीचा सरंजाम लवकर घेऊन या. त्याप्रमाणे सदरुद्दीन रवाना झाला.

सरहिंद (पंजाब) चा फौजदार वझीरखान याच्यासाठी एक ध्वज पाठविण्यात आला. (लातूर जिल्हा) औशांचा किल्लेदार सजावारखान याने निरोप घेतला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

खजिन्याचा हिशोब अधिकारी आनंदराम याचा मुलगा रामसिंग याला मन्सूरखानाचा मुख्य कारकून म्हणून नेमण्यात आले. त्या जागेवर पूर्वी सुजानसिंग हा होता. परंड्याचा किल्लेदार आणि फौजदार इज्ज़तखान याला गयूरखान ही पदवी देण्यात आली.

अनुक्रमणिका

मीर युसुफ याला शंभर सैनिकांबरोबर बक्षीपाशी तैनात करण्यात आले होते. त्याच्या सैनिकांच्या पगार बाकीसाठी एक हजार अश्रफ्या देण्यात आल्या.

ताळीकोटच्या किल्लेदारी व फौजदारीवर बेदारबख्ताच्या फौजेत तैनात असलेला कादरदादखान याला, मध्ये नेमलेला गुलाम मुहंमदचा मुलगा उमर याला बदलून पूर्ववत बहाल ठेवण्यात आले.

नसीराबाद उर्फ धारवाडचा किल्लेदार व फौजदार अलफखान याला खुराक आणि दुआब याबाबतीत सवलती देण्यात आल्या.

पुढील किल्ल्यांच्या माजी किल्लेदारांना हुकूम पाठवून त्यांनी नवीन नेमलेल्या किल्लेदारांना किल्ले सुपुर्द करुन हुजुरात यावे अशा अर्थाचे हुकूम रवाना झाले.

गंजीकोटचा माजी किल्लेदार मुहंमद जाफर तबरेजी याला हुजुरात आणावे अशी आज्ञा झाली.

गुत्तीचा माजी किल्लेदार मुहंमद आबिद याला गंजीकोटवर पोहोचवावे आणि हमेदी (नाव लागत नाही) चा किल्लेदार कमरुद्दीन याला गुत्तीला पोहोचवावे आणि मुहंमद शफीचा मुलगा सय्यद मीर याला हमेदीला पोहोचवावे.

**अकरा ऑक्टोबर १७०४**

बादशहाना कळविण्यात आले की, हत्तीखाना वगैरे घेऊन येणारा मोहरमखान हा आजारी पडला आहे. बादशहाने आज्ञा केली की, हकीम हाशिम याने जाऊन त्याच्यावर उपचार करावे. हाशिम बरोबर शंभर सैनिकांचे संरक्षक पथक (बदरका) देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

विजापूर-कर्नाटकचा माजी फौजदार खुदाबंदाखान हा छावणीच्या जवळ आला आहे त्याला छावणीत येण्याचे दस्तक (प्रवेशपत्र) द्यावे, अशी आज्ञा झाली.

पुढील प्रवासाचे टप्पे ठरविण्यासाठी हाफिज सरकार खानकरावल व सादतउल्ला खुशमंजिल हे गेले होते. बादशाही छावणीपासून इस्लामपुरी (ब्रम्हपुरी, सोलापूर जिल्हा) पर्यंतची वाट त्यांना पाहावयाची होती. त्यांनी बादशाही छावणीपासून बहादुरगड (पेडगाव) हे तेवीस कोसाचे अंतर पाहून त्याच्या सात मजला ठरविल्या आणि बादशहाकडे वृत्तांत सादर केला.

**बारा ऑक्टोबर १७०४**

दुपारच्या नमाजनंतर सियादतखान याने प्रकरणे आणि कागदपत्रे बादशहासमोर आणली. सियादतखानाबरोबर त्याचा पाच वर्षाचा मुलगा मुहंमद अमीन हा होता. बादशहने मुलाला जवळ बोलाविले आणि आपल्या हाताने त्याच्या डोक्यावर साठ रुपये किंमतीचा पोखराजचा शिरपेच बांधला. त्याला एक खंजीर बक्षीस देण्यात आला.

अनुक्रमणिका

अमीरखान, मतलबखान व मुहंमद अलीखान हे मुजरा करण्यासाठी बादशहाच्या हुजुरात आले.

मरहूम अमीरखानाचा मुलगा मरहमतखान याने सहा घोडे नजर केले. त्यापैकी तीन घोडे ठेऊन घेऊन बाकीचे परत करण्यात आले.

**उद्‌गीर**

उद्‌गीरचा किल्लेदार व फौजदार हिसामुद्दीन याला पाचशे जात आणि दोनशे पन्नास स्वार पैकी शंभर स्वार दुघोडी अशी मनसब होती. त्याने पत्र पाठवून विनंती केली की, माझा पुतण्या मुहंमद इसहाक याला मनसब देऊन माझ्यापाशी तैनात करण्यात यावे.

ताळीकोटीचा माजी फौजदार आणि इस्लाम मुहंमदचा मुलगा उमर याच्याकडे ताथवड्याची किल्लेदारीपण होती. किल्लेदारीवरून काढून त्याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

गुलबर्ग्याचा माजी किल्लेदार याच्या पथकातील मीरहशम, मीर अधम, कुतुबुद्दीन, मीर इमामुउद्दीन, मीर बदरुद्दीन, मीर मदन, मीर फकीरुल्ला वलीउद्दीन वगैरे अकरा माणसे यांच्या मनसबी कमी करण्यात आल्या आणि त्यांना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

**तेरा ऑक्टोंबर १७०४**

तरबियतखान व मन्सूरखान हे चंदना वंदनकडे गेले होते. त्याच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली.

**चौदा ऑक्टोंबर १७०४**

बेदारबख्ताचे पत्र आले, ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

दिवाणेआला (वरिष्ठ-उच्च-कचेरी) च्या कचेरीतील मरातिब नवीसीच्या कामावर कुंजमलचा मुलगा दोलराय हा होता. त्याला बदलण्यात आले. त्याच्या जागेवर अबदुल हादीची नेमणूक करण्यात आली.

परगणे मकाना, (नाव लावत नाही.) शंकराजी मराठा याच्या जहागिरीत तनखा म्हणून देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

मदनपल्ली (नाव स्पष्ट दिसत नाही) हे शंकराजीच्या जहागिरीत, त्याच्या कुटुंबियांच्या राहण्यासाठी म्हणून शंकराजीला देण्यात आले होते. पण त्याच्या सनदा अजून मिळाल्या नव्हत्या. बादशहाने आज्ञा केली की, मुद्दाम माणसे नेमून सनदा देण्यात याव्या.

**शंकराजी**

अनुक्रमणिका

शंकराजीला पाच हजारी जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब होती.

मुहंमद बेगचा मुलगा लतीफ बेग हा इन्डी (विजापूर जिल्हा) वगैरेचा अमीन व फौजदार होता. त्याच्या हुद्याला जोडून तिरकलबंड्यांची फौजदारी पण देण्यात आली.

**औसा, जिल्हा लातूर**

औशाचा किल्लेदार व फौजदार सजावारखान याचा पुतण्या आणि मुले यांच्या (पुढील) मनसबी वाढविण्यात आल्या:—

(१) मरहूम सोहराबखान याचा मुलगा (सजावारखानाचा पुतण्या) हफीजुल्ला.

(२) मुहंमद अली.

(३) मुहंमद मुराद.

(४) नेमतउल्ला.

**पंधरा ऑक्टोबर १७०४**

तरबियतखान व मन्सूरखान यांच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली.

मोहरमखान हा औरंगाबादेहून हत्ती, उंट इ. सरंजाम घेऊन आला होता. तो येऊन बादशहाला भेटला.

**सोळा ऑक्टोंबर १७०४**

विजापूर-कर्नाटकचा माजी फौजदार खुदाबंदाखान हा आपल्या मुलांसहित येऊन बादशहाना भेटला. त्याला खानसामानीच्या हुद्यावर नेमण्यात आले. त्याबद्दल त्याला खिलातीची वस्त्रे, चार हत्ती आणि इतर वस्तू देण्यात आल्या. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. त्याची दोन मुले मुहंमदी व मुहंमद जब्बाद ही पण बादशहांना भेटली. (खुदबंदाखान हा शाईस्तेखानाचा मुलगा व औरंगजेबाचा मामे भाऊ).

बक्षी सदरुद्दीन हा बारबरदारीचा सरंजाम घेऊन येण्यासाठी अहमदनगरला गेला होता सरंजाम घेऊन तो आणि त्याचे पुढील सहकारी हुजुरात आले.—(१) सय्यद जान, (२) मुहंमदशफी, (३) अमानुल्लाखान, (४) मुगलखान.

**जळगाव (खानदेश)**

अनुक्रमणिका

जळगावचा फौजदार मोतिकदखान हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहाना भेटला.

सुजानसिंगचा मुलगा बीरसिंग हाफिज अंबर ह्याच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. त्याचे नाव अबदुस्सलाम ठेवण्यात येऊन त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

हृदयरामचा मुलगा बालकिशन हा फत्ते दौलतच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. त्याचे नाव मुहंमद इस्लाम असे ठेवण्यात येऊन त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, हत्तीखान्याचा अधिकारी हमीदोद्दीनखान याने पाहाणीसाठी हत्ती समोर आणावे.

अकबराबाद (आग्रा) येथील सुभेदार मुख्तारखान याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले—मरहूम फिरोजखान याची मुलें दिलदार आणि दिलेर ही येथे तैनात होती ती येथून फरार होऊन बंदोख्याचा बंडखोर जमिनदार अनिरुद्ध याला जाऊन मिळाली आहेत. त्यांना मनसबीवरून बडतर्फ करण्यात आले.

**सतरा ऑक्टोबर १७०४**

आज बादशहाने हत्तींची पाहाणी केली. हमीदोद्दीन खान याने नौबती वाजवीत दलेला नावाचा हत्ती बादशहासमोर आणला. तो पाहून बादशहा म्हणाले. “हत्ती रोड आहे.” हमीदोद्दीन म्हणाला “मोहरमखान याने औरंगाबाद येथे याची चांगली निगा ठेवली पण याच्या अंगावर चरबी चढली नाही” बादशहा म्हणाले “बंगाल वगैरे सुभ्यांच्या कारभाऱ्यांना पत्रे लिहा. जेथे जेथे मोठमोठे हत्ती सापडतील ते घेऊन हुजुरात पाठवावेत”.

त्यानंतर बादशहाने हत्तींना गूळ वगैरे दिले. बादशहा म्हणाले——हत्तीवरून खैरात करा.

बादशहाने एकंदरींत आणखी बारा हत्ती नजरेखालून घातले.

खुदाबंदाखान खानसामा याची मनसब वाढविण्यांत आली. त्याची मुले मुहंमदी व मुहंमद जव्वाद याने न्याय कचेरीत येत-जात असावे अशी आज्ञा झाली.

**उदगीर**

उदगीरचा किल्लेदार व फौजदार हिसामुद्दीनखान याने लिहून कळविले की, मी आजारी आहे. येथे कोणी उपचार करणारा वैद्य किंवा हकीम नाही. उपचारासाठी मला औरंगाबादेस जाण्याची परवानगी मिळावी. बादशहाने आज्ञा केली की, मुलांना आपला नायब (डेप्युटी) म्हणून उदगीर येथे ठेवून तुम्हीं उपचारासाठीं औरंगाबादेस जावे.

**प्रतापगड जवळ मराठ्याचे बारा हजार सैन्य**

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठिवले.––चोरांचे (मराठ्यांचे) जवळ जवळ बारा हजार स्वारांचे सैन्य यापूर्वी कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) ज्या परिसरांत पसरले होते ते आता प्रतापगडाच्या परिसरात आले आहे. याकूतगड (महिपतगड) ला वेढा घालण्याचा त्यांचा बेत आहे. माझी मदत करण्यासाठी कोणातरी अधिकाऱ्याला आज्ञा व्हावी.

यावर बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—मीर मुहंमद बेग व मीर याकूब हे गुर्जबर्दार नेमण्यात यावे. त्यांनी जाऊन पुढील कामे करावीत.—

(१) गुलशनाबाद—(नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दीन अलीखान याचे निम्मे पथक,

(२) रामगीरचा जमिनदार—अबदुल करीम याचे निम्मे पथक,

(३) जव्हारचा जमिनदार श्रीपत (जव्हारचे राजे) यांचे निम्मे पथक,

ही सगळी पथके घेऊन याकूतगड (महिपतगड) ला नेऊन पोहोचवावीत.

**छावणीत खून**

काल रात्री बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले––अब्दुल मोमीन दरवेष हा संध्याकाळच्या नमाजानंतर मशीदींत बसून जप करीत होता. कोण्यातरी अज्ञात इसमाने त्याला तलवारीने ठार मारले.

बादशहाने आज्ञा केली की, सरबराहखान कोतवाल याने चौकशी करावी. त्याने चौकशी करून कळविले की, खुनी इसमाचा पत्ता लागत नाही.

आज कोतवालाचा नायब मुहंमद बाकी हा दरवेषाचे प्रेत (जनाजा) घेऊन पवित्र अवशेषाच्या (आसारे शरीफ) जागी आला. तेथे नमाज पढण्यात आली. आज्ञा होईल तेथे याला दफन करण्यात येईल, असे बादशहांना कळविण्यात आले. बादशहा म्हणाले—हा दरवेष हजरत ख्वाजा कुतुबुद्दीन (दिल्ली) यांच्या परंपरेचा दिसतो. शवपेटिका (ताबूत) दिल्लीला पाठवा.

**अठरा ऑक्टोबर १७०४**

बादशहाने आज्ञा केली की, राहिरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग याला त्याच्या तैनातीच्या जागेवर पोहोचविण्यात यावे. शिवसिंग हा हुजुरात होता. त्याने हमीदोद्दीन खान व मतलबखान यांना सांगितले की, माझ्या काही मागण्या आहेत. मला काही दिवसांचा अवसर मिळाला तर मी माझ्या विनंत्या बादशहापाशी मांडेन आणि नंतर माझ्या तैनातीच्या जागेवर (रायगड) ला जाईन. यावरून बादशहाना विनंती करण्यात आली. बादशहा म्हणाले––शिवसिंगच्या विनंत्या बक्षी सदरुद्दीन याने मांडाव्या. त्याचा निकाल लागल्यावर शिवसिंगाने आपल्या स्थळी जावे.

अनुक्रमणिका

सदरुस्सुदूर (न्याय खात्याचा प्रमुख) च्या तैनातीत अबदुल रसूद हा होता. त्याला पूर्वी खान अशी पदवी होती. त्याची मनसब वाढविण्यात आली.

वऱ्हाड सुभ्यातील कलमापुरी (कळमनुरी) येथे सिकंदरचा मुलगा मुहंमद शरीफ याची अमीन म्हणून नेमणूक झाली होती. त्याला तेथून बदलून हुजुरात बोलावण्यात आले होते. तो न आल्यामुळे त्याची जहागीर काढून घेण्यात आली.

बेदारबख्ताच्या नावे फर्मान पाठविण्यात आले.

## एकोणीस ऑक्टोबर १७०४

बादशहाने आज्ञा केली की, आम्ही सोमवारी बहादुरगडकडे जाण्यासाठी कूच करणार आहोत. पेशखाना (आघाडीचे तंबू) रविवारी रवाना करा. मतलबखान याने पुढे जाऊन पहिल्या टप्प्यावर आमच्या वास्तव्यासाठी जागा पाहून यावे त्याप्रमाणे करण्यात आले.

हमीदोद्दीनखान याने हत्तीखान्यातील हत्ती पाहणीसाठी बादशहासमोर आणले.

अहमदनगरच्या रस्त्याचा रक्षक (राहदार) मुगलखान हा निरोप घेण्यासाठी हजर झाला त्याला आज्ञा झाली की, बहादुरगडपर्यंत तुम्ही आमच्याबरोबर राहावे.

मूर्तूजाबाद (मिरज) चा बक्षी व वाकियानिगार म्हणून अबुल कासिमचा मुलगा मीर अब्बास याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक शाल देण्यांत आली.

जळगावचा फौजदार मोतिकदखान याला पुढीलप्रमाणे सांगण्यात आले—तुम्हीं हुजुरात आहात, तुम्ही आपल्या मागण्या अमीरखान याजपांशी लिहून द्या. तुमच्या मागण्यांचा निकाल लागल्यावर तुम्ही आपल्या जागी (जळगावला) जावे.

**टीप**—बादशहा हा खेडहून निघाला असून गुलबर्गा जिल्ह्यातील बेडरांचा वाकिणखेडा हा किल्ला जिंकून घेण्यासाठी तिकडे चालला आहे. बहादुरगडच्या अलीकडे दीड मैलावर भीमेच्या काठावर एक स्थळ आहे. मोगल कागदपत्रात या स्थळाला कोट दिलेरखान अगर गढी दिलेरखान असे म्हणतात. सध्या तेथे भीमेचे पाणी आसपासच्या शेतीला देण्याची सोय असून शेतीचे उत्पन्न चांगले होते. जुन्या बादशाही मोटांचे अवशेष आहेत. एकोणीस नोव्हेंबरला बादशहा तेथून पुढे निघाला. आता पुढची नोंद पहा.

## एकोणीस नोव्हेंबर १७०४

आज सकाळी दिवसाच्या एक प्रहर अन् दोन घटिका झाल्या असता, बादशहा हे गढी दिलेर खानाच्या जवळील आदल्या वास्तव्य स्थानातून निघाले ते आईनेदार अशा तख्तेखांवर बसले होते. (वाहून नेण्याचे सिंहासन) त्यांची स्वारी बहादुरगड किल्ल्याच्या नजदीक आली. तेथील किल्लेदार व फौजदार अबदुल गफूरखान हा बादशहाना भेटला. त्याने दोन मोहरा नऊ रुपये व एक तलवार बादशहांना नजर

केली. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे किल्ल्यावरील तोफांना सरबत्ती दिली. बादशहांनी किल्लेदाराला जवळ बोलविले. आणि त्याला म्हटले "तुम्हीं जावून किल्ल्याबद्दल खबरदारी बाळगावी." एकंदरींत दीड कोसाचा प्रवास करून बादशहा एक प्रहर सहा घटिका झाल्या असत्या बहादुरगड नजीकच्या आपल्या निवासस्थानांत दाखल झाले.

बहादुरगडच्या तळावर असलेल्या मंडळीपैकी पुढील इसम बादशहांना भेटले—

(१) नायब नाजिर—हाजी सुहेल,

(२) ख्वाजा फिरासत,

(३) तळावरचा काजी अबु तुराब,

(४) नायब कोतवाल—जैनुद्दिन,

(५) इज्ज़तखान,

(६) रहमान कुलीचा मुलगा—रुस्तुम,

(७) मुहंमद अमीनखान मरहूमचा नातू —सय्यद अहमद,

बादशहाने आज्ञा केली की, या वेळेपर्यंत बादशाही छावणीपासून, छावणीच्या पिछाडीच्या सैन्यापर्यंत (चंदावल) ची खबरदारी बाळगण्याचे काम खुदाबंदाखान याजकडे होते. ते काम आता मुहंमद अमीनखान बहादुर (निजाम उल्मुल्काचा चुलत चुलता) याने करावे. खुदाबंदाखानाने आपल्या तंबूत परत यावे.

बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली—छावणीच्या अंतःपुरात नवाब झिन्नतउन्निसा बेगम (औरगंजेबाची मुलगी) हिच्यासाठी एक तंबू उभा करा. बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याने जाऊन झिन्नतउन्निसा बेगम ह्यांना घेऊन यावे.

बादशहाने आज्ञा केली की, बहादुरगडचा किल्लेदार व फौजदार याला पुढीलप्रमाणे ताकीद देण्यात यावी.—बादशहाजादा मुहंमद कामबक्ष हा झिन्नतउन्निसा बेगम आणि उदेपुरी महल यांना घेवून जाण्यासाठी जेव्हा बहादुरगडच्या किल्ल्यात दाखल होतील तेव्हा त्यांच्याबरोबर वीस स्वार आणि छप्पन्न पायदळ शिपाई असतील. त्यांनाही आत जाऊ द्यावे.

नवाब झिन्नतउन्निसा बेगम ही आजारी आहे. बादशहाने आज्ञा केली की, हकीम हाजकखान यानें जाऊन तिला औषधोपचार करावा. आज्ञेप्रमाणे हकीम हा जाऊन तिला औषधे देऊन परत आला. बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याने विनंती केली कीं, बेगमजींना (झिन्नतउन्निसा) यांना घेऊन येण्यासंबंधी मला आज्ञा करण्यांत आली होती पण नायब नाजिर हाजी सुहेल याने त्यांचा निरोप आणला आहे कीं,

बेगमजींचे म्हणणे आहे कीं, मी अतिशय आजारी आहे. त्यांना अशा स्थितीत आणता येणार नाही. प्रकृती थोडी बरी झाली की, मी (बेगम) स्वतः सांगून पाठवीन. यावर काय आज्ञा. बादशहा म्हणाले, बेगम बोलावतील तेव्हा तुम्ही (कामबक्षानें) त्यांच्यापाशी जावे.

**वीस नोव्हेंबर १७०४**

बहादुरगड (पेडगाव) नजीक बादशहाचा मुक्काम. बादशहाने दिवाणचे काम बंद ठेवले. काल कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान याने विनंतीपत्र पाठवले की, बादशहा माझ्या इलाख्याच्या जवळ आले आहेत. परवानगी असल्यास येथे मी आपला नायब ठेवून हुजुरांत येईन. विनंती मान्य करण्यात आली.

तरबियतखान मीर अतिश याने हुजुरात यावे अशा अर्थाचे आज्ञापत्र त्याच्याकडे रवाना झाले. हमीदोद्दीनखान बहादुर याने वाकिणगड (वाकिणखेडा) चा नकाशा तयार केला होता. तो त्याने बादशहाच्या समोर ठेवला.

**एकवीस नोव्हेंबर १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. पुढील मंडळी येऊन बादशहाला भेटली. नजबकुलीखान, आजमगडचा माजी किल्लेदार जानबाजखान, तळाचा नायब नाजिर हाजी सुहेल सय्यद अहमद हा आशियातून आला होता. त्याचे लग्न खुदाबंदाखानाच्या मुलीशी ठरविण्यात आले. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

इनायत उल्लाखान (बादशहाचा चिटणीस) याचा जावई दिलावरखान याने न्याय कचेरीत येऊन बादशहांना मुजरा केला. (इनायत उल्लाचा दुसरा जावई हा दक्षिणचा सुबेदार म्हणून १७२४ मध्ये निजामउल्मुकाशी लढताना फत्तेखर्ड्याच्या लढाईत मारला गेला. दिलावरखानाचे उल्लेख शहानबाजखानाच्या पत्र व्यवहारात बरेच येतात).

चाकणचा किल्लेदार व फौजदार अमानुल्लाखान याची मनसब वाढविण्यांत आली.

बादशहाना कळविण्यात आले की खान फिरोजजंग हा वऱ्हाडच्या सुभ्यातून चौदा रज्जब रोजी बाहेर पडला असून नेमा शिंदे (नेमाजी शिंदे) व सत्रसाल बुंदेला (छत्रासाल) यांचे पारिपत्य करण्यासाठी हिंदुस्थान (उत्तर हिंदुस्तान) कडे रवाना झाला आहे.

**बावीस नोव्हेंबर १७०४**

बहादुरगडजवळ आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाने आज सकाळी अमीरउल्उमरा (मुख्यप्रधान असदखान) याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली:—

अनुक्रमणिका

"आज नवाब उन्नीसा बेगम व उदेपुरी बेगम वगैरे मंडळी बहादुरगडहून येत आहेत. बादशहाजादा मुहंमद कामबख्श, तुम्ही, हमीदोद्दीनखान बहादूर व मोहरमखान इत्यादी अधिकाऱ्यांनी किल्ल्यात जावे आणि बेगमसाहेबांच्या बरोबर यावे", त्याप्रमाणे अमीरउल्उमरा वगैरे मंडळी गेली. स्वारीच्या वेळी त्यांनी बेगमसाहेबांना मुजरे केले आणि त्यांना ओवाळणीचे म्हणून नजरा दिल्या.

अमीरउल्मरा (असद्खान) शंभर मोहरा, बेगमेने बक्षीस दिले. पानाचा विडा (बर्गे तंबूल) आणि अत्तर (खुशबुई).

खानबहादूर हमीदोद्दीन पाच मोहरा बक्षीस, पानाचा विडा.

छावणीच्या रेहकलाबार (शस्त्रे ठेवण्याची जागा) च्या दरवाजावर तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक याने बेगमसाहेबांना मुजरा केला आणि दोन मोहरा ओवाळणीच्या (निसार) नजर केल्या.

हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान हा फौजदार झुल्फिकारखानातर्फे नायब होता. हैद्राबाद सुभ्यावर कामबक्ष हा सुभेदार तर सय्यद मुझफ्फकारखान हा नायब सुभेदार. त्याला बदलण्यात आले आणि त्याच्या जागी दाऊदखानाला त्याच्या पूर्वीच्या फौजदारीला (हैद्राबाद-कर्नाटकच्या) जोडून सुभे हैद्राबादच्या नायब सुभेदारीवर नेमण्यात आले.

मुझफ्फरखानाला कोहिरच्या (आन्ध्र प्रदेश) फौजदारीवर नेमण्यात आले.

भगवतसिंगचा भाऊ रघुनाथसिंग याला नेमतच्या ऐवजी रतनगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

**भूषणगड**

भूषणगड (जिल्हा सातारा) चा किल्लेदार सय्यद उस्मान हा किल्ला सोडून हुजुरात आला होता. बादशहाने आज्ञा केली की, त्याची किल्लेदारी काढून घेण्यात यावी आणि ती किल्लेदारी कऱ्हाडाबादचा किल्लेदार सुलेमानखान आणि खटावचा ठाणेदार किशनराव (कृष्णराव) यांच्या कार्यक्षेत्रात देण्यात यावी.

बादशहाने आज्ञा केली की, नौलाख उंबरेचा ठाणेदार जानबाजखान याला ठाणेदारीहून बदलण्यात यावे. त्याने हुजुरात रहावे.

करडे निमोण्याचा माजी ठाणेदार अबुलकासीम याची मनसब कमी करण्यात आली. त्याला आज्ञा करण्यात आली की, "तुम्ही करडे निमोण्याला जाऊन आपल्या संबंधितांना घेऊन हुजुरात या."

रतनगडचा माजी किल्लेदार नेमत याची मनसब कमी करण्यात आली.

**तेवीस नोव्हेंबर १७०४**

अनुक्रमणिका

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

बीदरचा किल्लेदार व फौजदार जलालउद्दीनखान याची मनसब वाढविण्यात आली.

सुप्याचा ठाणेदार आणि खानचंदचा मुलगा दलसिंग याच्या मनसबीत सवलती देण्यात आल्या.

सुभे हैद्राबादचा नायब आणि हैद्राबाद-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान याच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली.

**चोवीस नोव्हेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. दुपारच्या नमाजानंतर बादशहा हे नवाब झिन्नतउन्नीसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) च्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठी गेले. बेगमने पांचशे अश्रफ्या ओवाळणीच्या नजर केल्या.

झिन्नतउन्निसा बेगमच्याबरोबर शाहजादा मुईजोद्दिन (औरंगजेबाचा नातू) ह्याच्या मुलीची मुले होती.

बादशहा बेगमबरोबर अर्धा घटिका राहिले. नंतर ते आपल्या आरामगाहकडे परतले. शाहजादा मुहंमद कामबक्ष हा हुजुरात आला. बादशहा म्हणाले—बेगमेला वेतनाची रक्कम द्यायची आहे. ह्या आठ हजार अश्रफ्या घ्या आणि तिच्याकडे पोहोचवून या. रकमांची वाटणी अशी.—

झिन्नतउन्निसा बेगम —पाचहजार मोहरा, कामबक्षाची मुलगी ह्यातुउन्निसा बेगमला एक हजार मोहरा आणि उदेपुरीमहाल हिला दोन हजार मोहरा.

बादशहाने आज्ञा केली की, बक्षी सदरूद्दीन आणि मतलबखान यांनी पाळीपाळीने छावणीच्या बाहेर टेहळणीसाठी जावे. त्यांच्याबरोबर प्रत्येकी तीन हजार स्वार नेमण्यात आले.

**पंचवीस नोव्हेंबर १७०४**

आज बादशहाने न्याय कचेरी केली. कालरात्री बादशहाने हिदायतकेश वाकेनिगार याला बोलावून विचारले, “आम्ही इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) हून मागे कूच केले त्याला किती वर्षे झाली? त्याची चौकशी करुन कळवा.” त्याने कळविले “पाच वर्षे तीन महिने दोन दिवस.”

कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान हा आज्ञेप्रमाणे हुजुरात येऊन बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन बादशहाने त्याला मतलबखानाच्याबरोबर जाण्यासाठी निरोप दिला.

करडे निमोण्याचा ठाणेदार जमाल याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

## सव्वीस नोव्हेंबर १७०४

शाहजादा मुहंमद मुईजोद्दिन बहादुर (मोअज्जमचा मुलगा, औरंगजेबाचा नातू, मुल्तानचा सुबेदार) याची मुलगी इफतार बेगम ही नवाब झिन्नतउन्नीसा बेगमबरोबर बहादुरगड येथे राहात होती. बादशहाच्या आज्ञेने ती बादशहाच्या अंतःपुरात येऊन ती राहू लागली.

बादशहाने झिन्नतउन्नीसाला याकूतची एक अंगठी (दोन हजार रुपये किंमतीची) व पाचशें रुपयांची पुष्कराजची अंगठी दिली. शाहाजादा कामबक्षची मुलगी ह्यातुन्निसा बेगम ही आज्ञेप्रमाणे कामबक्षाच्या तंबूवर आली.

सजावारखान हा नळदुर्ग येथे किल्लेदार व फौजदार होता.

बीदरचा किल्लेदार व फौजदार जलालुद्दीन हा होता, तो मरण पावला. त्याच्या जागेवर नळदुर्गचा किल्लेदार सजावारखान याची नेमणूक करण्यात आली.

कासिमखान हा परंड्याचा किल्लेदार व फौजदार होता. त्याला नळदुर्गची किल्लेदारी पण देण्यात आली. नळदुर्गवर कासिमखानाने राहावे आणि त्याचा नायब म्हणून त्याचा भाऊ मुहंमद शफी हा परंड्याच्या किल्ल्यावर नायब किल्लेदार व फौजदार म्हणून राहावा, अशी आज्ञा करण्यात आली.

## सत्तावीस नोव्हेंबर १७०४

बादशहाने आरामगाहचा पडदा बाजूला सारून सियादतखानाने आणलेले कागदपत्र पाहिले.

## तळ कोकण

तळकोकणचा दिवाण मुहंमद बाकर व जैनुद्दीन अलीबाग यांच्या मनसबी वाढविण्यात आल्या.

मरहूम जैनुलाद्दिन याचा नातू सय्यदअली याची मनसब वाढविण्यात आली.

## अठ्ठावीस नोव्हेंबर १७०४

बादशहाने आज्ञा केली की, बादशाही छावणी बहादुरगडला आहे तो पर्यंत बहादुरगडचा किल्लेदार अबदुल गफूरखान याने मुजऱ्यासाठी न्याय कचेरीत येत-जात असावे.

बादशहाना कळविण्यात आले की, सार्वातोर मळा (खानदेश?) चा फौजदार दिलदारखान हा मरण पावला.

मरहूम अमानुल्ला हा शिरसाळा वगैरेचा फौजदार होता. त्याचा मुलगा मुहंमद असदउल्ला याला शिरसाळा, शेवगाव व सोनखेड (?) ची फौजदारी देण्यात आली व इतर मुलांना मनसबी देण्यात आल्या.

अनुक्रमणिका

इम्तियाजगड (अधोनी) किल्ल्याचा दिवाण व अमीन याची मनसब वाढविण्यात आली.

सर्फराजखान हा सहा हजारी मनसबदार होता त्याने मनसबीचा राजीनामा दिला. राजीनामा मंजूर करण्यात आला.

आजमगड (पुरंदर) चा किल्लेदार व फौजदार याने विनंती करून काही मागण्या केल्या त्या अशा.—मुहंमद नजीर याला किल्ल्याच्या भोवतालच्या परिसराचा नायब फौजदार करण्यात यावे, माझा मुलगा अजमतुल्ला याला माझ्या तर्फे मुहियाबाद (पुण) चा नायब फौजदार म्हणून नेमण्यात यावे, विनंत्या मान्य करण्यात आल्या.

## एकोणतीस नोव्हेंबर १७०४

आज बादशहाने आरामगाहचा पडदा बाजूला सारून सियादतखानाने आणलेले कागदपत्र पाहिले. हमीदोद्दीनखान याने गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दीन अलीखान याचे पाच घोडे बादशहाच्या पाहणीसाठी आणले.

## मातबरखानाचा कारभारी

बादशहाने मीर फत्तेउल्ला वगैरे दोन गुर्जबर्दारांची नेमणूक करून त्यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केलीः—

> "मरहूम मातबरखान याच्या जहागिरीचा आमिल (कारभारी अधिकारी) वामन नाईक हा आपला धाकटा भाऊ रघु नाईक याच्याबरोबर कसबे एलोवा (?) येथे आहे. तुम्ही जाऊन त्याला हुजुरात घेऊन या."

दक्षिणच्या सुभ्याचा दिवाण दियानतखान याच्या विनंतीवरून सर्फराजखान याला मनसबीवर पुन्हा बहाल करण्यात आले. (त्याने राजीनामा दिला होता).

बादशहाना कळविण्यात आले की, खानसामान (पुरवठा मंत्री) खुदाबंदाखान हे जवाहिर खान्यात जवाहिरे पाहात आहेत. बादशहाने आज्ञा केली की, त्याने हुजुरात यावे. त्याप्रमाणे खुदाबंदाखान याने हुजुरात येऊन बादशहाला मुजरा केला.

## तीस नोव्हेंबर १७०४

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

आज बादशहाने अंतःपुरातील मंडळींना व जास्तीचा सरंजाम हा अहमदनगरकडे पाठविण्याचे ठरविल्याप्रमाणे, अमानुल्लाखान याला ही कामगिरी सांगितली आणि आज्ञा केली की, या कामगिरीसाठी

अबदुस्समदखान वगैरे अधिकारी यांनी अमानुल्लाबरोबर जावे. अमानुल्लाखानाच्या बरोबर एकंदरीत स्वारांचे सैन्य देण्यात यावे.

बहादुरगडचा बक्षी, वाकेनवीस आणि बागेचा अधिकारी अबदुल्ला हा येऊन बादशहाना भेटला.

खानसामाचा कारकून फजलुल्ला बेग हा अंतःपुराबरोबर रवाना झाला. त्याला निरोप देण्यात आला. यक्काताजखानाचा भाऊ मीर इनायतउल्ला याचे दियानतखानाची नात (मुलीची मुलगी) हिच्याशी लग्न ठरले.

बादशाही छावणीच्या चौकी पाहाऱ्याची रचना पुढीलप्रमाणे करण्यात आली—पहिल्या चौकीवर जुम्दतुल्मुल्क अमीरउल्उमरा (मुख्यप्रधान असदखान), दुसऱ्या चौकीवर मुहंमद अमीनखान बहादूर, तिसऱ्या चौकीवर बक्षी सदरुद्दीन मुहंमदखान, चौथ्या चौकीवर खुदाबंदाखान खानसामान, पाचव्या चौकीवर मिर्जा सफवीखान.

बहादुरगडचा किल्लेदार व फौजदार अबदुल गफूरखान हा हुजुरात आला. त्याला खिलातीची वस्त्रे द्यावी, अशी आज्ञा झाली.

### एक डिसेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते.

### दोन डिसेंबर १७०४

काल रात्री शबेबरातचा सण होता. हजरत (बादशहा) रात्रभर जाग्रण करुन जप करीत होते. सकाळी त्यांनी आसारे शरीफ (अवशेष मंदिर) मध्ये अत्तरे पाठवली. दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

लाहोरचा किल्लेदार बाब्रीखान याने हुजुरात पत्र लिहून विनंती केली की, या म्हातारपणात स्वामींचे चरण दृष्टीस पडावे, अशी इच्छा आहे. बादशहाने आज्ञा केली की हुजुरात या.

### तोरणा

फुतूहल गैब (तोरणा) चा किल्लेदार अबदुल् रहमान याची मनसब वाढविण्यात आली.

### तीन डिसेंबर १७०४

आज बादशहाने न्याय कचेरी केली.

मुरादाबादचा कानूनगो टीकाराम हा मुसलमान झाला. त्याचे नाव अबदुल् रहीम ठेवण्यात आले त्याची मनसब वाढविण्यात आली.

अनुक्रमणिका

विजापूर तालुक्यातील करकोलचा माजी ठाणेदार बहलोल हा हुजुरात आला. त्याची मनसब वाढविण्यात आली.

या महिन्याच्या चोवीस तारखेस आम्ही येथून कूच करू, असा आदेश बादशहाने दिले. त्या दृष्टीने बारबरदारीचा सरंजाम तयार करण्यात यावा, अशी खानसामान याला ताकीद करण्यात आली.

**चार डिसेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते.

हमीदोद्दीनखान आणि मतलबखान यांना आज्ञा झाली की आज काफिला अहमदनगरकडे रवाना होऊ द्या. तुम्ही जाऊन प्रवासाच्या पहिल्या टप्प्याची खबरदारी बाळगा. माणसे संध्याकाळपर्यंत रवाना होतील अशी व्यवस्था करा.

बादशहाना कळविण्यात आले की, तरबियतखान याने ठाणी बसविली असून तो आता छावणीनजीक आला आहे. छावणीत येण्याची परवानगी असावी.

पाईने विलायत (वाई) चा माजी ठाणेदार ख्वाजाखान हा छावणीजवळ आला. त्याला छावणीत येण्याची परवानगी देण्यात यावी, अशी आज्ञा झाली.

**पाच डिसेंबर १७०४**

तोरगल सरकारातील परगणे हरोल, खालश्यातून जहागिरीत बदलण्यात आले. त्यामुळे तेथील फौजदार कलीमुल्ला याची मनसब त्या प्रमाणात कमी करण्यात आली.

कुंजरगडचा किल्लेदार आणि मरहूम अबदुल अजीजखानाचा मुलगा अबूसईद याने विनंतीपत्रे पाठवून काही मागण्या केल्या त्यात एक मागणी होती ती बहमनवाड्याची ठाणेदारी मिळावी म्हणून. दुसरी मागणी अशी की, मला असलेल्या जहागिरीत चोरांच्या (मराठ्यांच्या) उपद्रवामुळे उत्पन्न येत नाही तर त्याच्याऐवजी जुन्नर परगण्यात मला जहागीर देण्यात यावी. तेथील जहागीरदार रघु याला बदलण्यात यावे. बादशहाने आज्ञा केली की, दियानतखान याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा.

अबुलसईदने आपले विनंतीपत्र पाठविताना शहा अबदुल लतीफ (बऱ्हाणपुरचा दिवंगत साधु) याचे पागोटे शिफारस म्हणून बादशहाकडे पाठविले होते. हे दैनंदिनींत मुद्दाम नमूद करण्यात आले आहे.

**सोळा डिसेंबर १७०४**

तरबियतखान बहादूर आपल्या सहकाऱ्यासहित तळकोकणातून हुजुरात आला. बादशहाने त्या सर्वांची तारीफ केली. त्याच्याबरोबर मन्सूरखान आणि मुगलखान हे होते. बक्षी सदरुद्दीन मुहंमदखान हा

घासदाणा आणण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहाना भेटला व कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याचा भाचा फज्‌लुल्लाखान भेटला.

मुहंमद अली याची नेमणूक जफ्‌राबाद उर्फ बीदरचा वाकियानिगार म्हणून करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले कीं, कुलगचा किल्लेदार किशनसिंग हा मरण पावला आहे. बादशहानी किशनसिंगचा मुलगा रघुनाथसिंग याला कुलंग (नाशिक जिल्हा) चा किल्लेदार म्हणुन नेमले. त्याचा धाकटा भाऊ मनोहरसिंग याची आणि रघुनाथसिंग याची मनसब वाढविण्यात आली.

**सतरा डिसेंबर १७०४**

पुढील मंडळींकडे खिलातीची वस्त्रे पाठविण्यात आली. खटाव व पाईने विलायत (वाई) चा (१) ठाणेदार—किशनराव (कृष्णराव), (२) बुधपाचगावचा ठाणेदार—पदाची घाटगे, (३) म्हसवडचा ठाणेदार नागोजी माने.

बादशहाने आपल्या सैन्यातील अधिकाऱ्यांच्या पुढीलप्रमाणे नेमणुका केल्याः—

(१) तरबियतखान—याने सैन्याची पिछाडी सांभाळावी. (चंदावल)

(२) बादशाही लष्कर आणि चंदावल यांच्यामधे खुदाबंदाखानाच्या ऐवजी मुहंमद अमीनखान बहादुर याने असावे.

(३) खुदाबंदाखान खानसामान—याने नबाब झिन्नतउन्निसा बेगम यांच्या स्वारीत असावे.

(४) दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा—मन्सूरखान याने सैन्यकूच करताना सैन्याच्या सरंजामाबरोबर असावे. त्यावर पूर्वी नेकनामखान हा होता.

ख्वाजा मुहंमद सादिक याचा दत्तक मुलगा मुहंमद आबिद याला सरहिंदचा फौजदार वजीरखान याच्यापाशी तैनात करण्यात आले.

तरबियतखान मीर आतिश याला पाच तोळे अत्तर बक्षीस म्हणून देण्यात आले.

**आठ डिसेंबर १७०४**

मतलबखान याला प्रवासाचा दुसरा टप्पा (मजल) ठरविण्यासाठी पाठविण्यात आले होते. पहिला टप्पा सव्वा दोन कोसाचा आणि दुसरा टप्पा, मौजे खेड जवळचा, असे टप्पे ठरवून तो आला आणि बादशहाना कळविले.

**नऊ डिसेंबर १७०४**

बादशहाने आज आरामगाहचा पडदा उघडून सियादतखानाने आणलेले कागदपत्र पाहिले.

हमीदोद्दीनखान, बक्षी सदरुद्दीन, दिवाणेखासचा मुश्रफ हाजी मुहंमद अली वगैरे येऊन बादशहाना भेटले.

जामोद (जामोद-जळगाव) चा फौजदार शेख इस्माईल याला अब्दुल बहाबखानाच्या ऐवजी शाहजादा बेदारबख्ताचा बऱ्हाणपुरातील नायब म्हणून नेमण्यात आले.

मकारमखानाचा मुलगा मुहंमद जाफर याला अमानुल्ला खानाच्या फौजेचा बक्षी व वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले. अमानुल्लाखान हा अंतःपुराला पोहोचवण्यासाठी अहमदनगरकडे गेला.

भूषणगड (सातारा जिल्हा) चा किल्लेदार मुहंमद उस्मान याची मनसब कमी करण्यात आली.

**त्रिंबकगड**

त्रिंबकगडचा किल्लेदार मुहंमद हुसेन याने अननसाच्या दोन करंड्या पाठिवल्या, त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

**दहा डिसेंबर १७०४**

बहादुरगडचा किल्लेदार व फौजदार अब्दुल गफूरखान याला अहमदनगरचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्यापूर्वी तेथे मीर अस्करी हा मीर आतीश तरबियतखान तर्फे नायब म्हणून काम करीत होता.

शमशाबादचा कानूनगो नयाराम हा गुलाम मुहंमदच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

मुगलखान याला औरंगाबादचा किल्लेदार आणि संरक्षक (हिरासत-कस्टडी) नेमण्यात आले.

मंगळवेढ्याचा माजी किल्लेदार याह्याखान ह्याला बहादुरगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले.

असीरगडचा किल्लेदार सय्यद शाहामतखान याची मनसब वाढविण्यात आली.

मतलबखान करावल बेगी याला पेशखानापुढे पाठविला की नाही? त्याने सांगितले की तयारी चालली आहे. खुदाबंदाखान खानसामान म्हणाला सगळे सामान भरले असून सामान पेशखानापुढे पाठविण्यात येईल.

**अकरा डिसेंबर १७०४**

आज सकाळी बहादुरगड जवळील आपल्या वास्तव्य स्थानातून बादशहा बाहेर निघाले ते तख्तखांवर बसून अकलूजच्या दिशेने असलेल्या सव्वादोन कोसाची मजल मारुन दोन प्रहरच्या सुमारास मौजे (भानओरा?) येथे मुक्कामावर पोहोचले.

आज दिवाणचे काम बंद होते. पाईने विलायत (वाई प्रांत) चा माजी ठाणेदार ख्वाजाखान हा येऊन बादशहाना भेटला.

पुढील मंडळी स्वारीच्या मुक्कामात बादशहाना येऊन भेटलीः—

(१) इराणच्या बादशहाचा भाचा (हमशीरा जादा).

(२) मीर अहमद.

(३) शेख गुलाम मुहंमद उर्फ बालीराम (शाहू राजे जहागिरीचा कारभारी).

(४) सुलेमान बेग.

बहादुरगडच्या किल्लेदारीवर याह्याखान याची नेमणूक झाली होती. त्याला खिलातीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

तरबियतखानाने चंदावल (पिछाडी) सांभाळावी अशी आज्ञा झाली.

फिरोजजंगाच्या सैन्यात तैनात असलेले मुहंमद शरीफचा मुलगा मीर सदरुद्दीन आणि खुषखबरखानाचा मुलगा ख्वाजा कलान यांना खिलातीची वस्त्रे देण्यात आली (संताजी घोरपडेच्या मृत्युची बातमी आणणारा आणि म्हणून पदवी मिळवलेला खुशखबरखान याचा हा मुलगा.)

मोहरमखान वगैरे मंडळी झिन्नतउन्निसा बेगम यांच्याबरोबर गेली होती ती परत आली.

**दौंड**

घोरीखान ठाणेदार, दौंड याला आपल्या ठाण्याकडे परत जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

रूस्तमखान (शर्जाखान) या सहा हजारी मनसबदाराची मनसब एक हजारानी कमी करण्यात आली. दिलेरखान या सात-हजारी मनसबदाराची मनसबही कमी करण्यात आली. तीरअंदाजखान याची मनसब बहाल करण्यात आली.

**बारा डिसेंबर १७०४**

अनुक्रमणिका

बादशहाचा मुक्काम भानपूर येथे. दिवाणचे काम बंद होते.

अबदुलगनीचा मुलगा मुहंमद मीरतकी याला घोरीखानाबरोबर दौंडच्या ठाण्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

औरंगाबादचा संरक्षक (हारिस) मुगलखान याच्यापाशी मुहंमदबेग अरब याला तैनात करण्यात आले.

तरबियतखानाने विनंतीपत्र पाठविले की, परगणे जाफराबाद (औरंगाबाद जिल्हा) मध्ये माझी जहागीर खेडी आहेत. तेथील फौजदारी मला देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

पाठीमागून आलेला पेशखाना पुढे पाठवून द्यावा, अशी आज्ञा झाली.

**तेरा डिसेंबर १७०४**

आज बादशहा भानपुरहून निघाले. मौजे खेड जवळ बादशहाची स्वारी पोहोचली. तेव्हा कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान हा हुजुरात होता. त्याची पथके बादशाहानी पाहिली. त्याचे पाचशे स्वार बादशहाच्या समोर आणण्यात आले.

सुलेमानखानने काही भेटी बादशहाना नजर केल्या. बादशहाने एकंदरीत तीन कोसाची मजल मारली आणि दुपारच्या वेळी ते मौजे खेड येथे पोहोचले.

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले. सुप्याचा ठाणेदार दलसिंग हा हुजुरात होता. त्याला सुप्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

**चौदा डिसेंबर १७०४**

बादशहाचा मुक्काम जिंतीजवळ (भीमेच्या काठावर)

**लोहगड**

लोहगडच्या किल्ल्यावर सेनापत हा किल्लेदार होता. त्याला तेथून बदलण्यात आले. त्याच्या जागेवर खानचंद दानगी (दान्गी) (पुरंदरचा माजी किल्लेदार आणि आता फिरोजजंगापाशी तैनात असलेला) याची नेमणूक करण्यात आली.

या ह्याचा मुलगा अल्लादादखान याची परतूर व रोषनगावचा फौजदार आणि औरंगाबाद ते जालना या मार्गाचा रक्षक (राहदार) म्हणून नेमणूक करण्यात आली. त्या जागेवर रूस्तमराव (जाधव) हा होता.

त्याला सातशे जात आठशे स्वार त्यापैकी तीनशे दुघोडी अशी मनसब होती. त्याची मनसब दोनशे जात व पाचशे स्वारांनी कमी करण्यात आली.

अहमदचा मुलगा मुहंमद जमाल ह्याला करडे निमोण्याच्या ठाणेदारीवरून काढण्यात येऊन हुजुरात घेण्यात आले.

**पंधरा डिसेंबर १७०४**

बादशहाचा मुक्काम जिंतीजवळ.

संगमनेरचा फौजदार अमानतखान याने लिहून कळविले की, लिंब वगैरेचे ठाणेदारी माझ्या फौजदारीत आहेत. ठाणेदारीवर मरहूम सरबुलंदखान याचा नातू (मुलीचा मुलगा) मुहंमद ईसा याची नेमणूक व्हावी. बादशहानी आज्ञा केली की, तो वयाने लहान आहे सबब, अमानतखानाचा भाऊ रहमत उल्लाखान याची नेमणूक करण्यात येत आहे.

मानसिंग (जाधव) ठाणेदार याचा नायब (जाधव, शिंदखेड) दत्ताजी याची मनसब दोनशे जात व शंभर स्वार होती ती पन्नास स्वारांनी कमी करण्यात आली.

मुहंमद रूस्तम याला बेदारबख्ताच्या शिफारशीवरून मनसब मिळाली होती. त्याने कळविले कीं, मराठे सरदारांच्या कबिल्याला औरंगाबाद भागातील जमिंदारांनी आश्रय दिला आहे. मला याची माहिती आहे. औरंगाबादच्या अधिकाऱ्यांच्या नावे आज्ञा व्हावी की, मी शोध लावून देईन तेव्हा अशा लोकाना पकडण्यात यावे. बादशहाने आज्ञा केली की, मुहंमद रूस्तमने मुगलखान याजबरोबर खान नुस्रतजंग (झुल्फिकारखान) याजकडे जावे.

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १६ डिसेंबर इ. स. १७०४ ते २ जानेवारी १७०५

### सोळा डिसेंबर १७०४

आज बादशहा जिंती जवळील आपल्या मुक्कामावरुन निघून दोन कोसाची मजल मारून दुपारी मौजे पळसदेव (दौंडजवळ) जवळील आपल्या मुक्कामात दाखल झाले.

तरबियतखान हा आजारातून बरा होऊन बादशहाना भेटला. त्याला पिछाडीचे (चंदावल) रक्षण करण्यासाठी पाठविण्यात आले.

हमीदोद्दीनखान याने हुजुरात राहावे अशी आज्ञा झाली.

कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याला कऱ्हाडकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याला एक हत्ती बक्षीस म्हणून देण्यात आला. सुलेमानखानाचा भाचा फजलुल्लाखान याला शंभर मोहरा किंमतीचा घोडा देण्यात आला. सुलेमानखानाच्या पथकातील मुहंमद मुजाहिद, मुहंमद याकुब आणि अबदुरहमान यांच्या मनसबी वाढविण्यात येऊन त्यांना निरोप देण्यात आला.

पुरदिल्खान हा चंदावलमध्ये तैनात होता. त्याला अमीरउल्उमरापाशी तैनात करण्यात आले. त्याच्याऐवजी संग्राम चव्हाण. तीन हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब असलेल्या इसमाची चंदावल (पिछाडी) वर नेमणूक करण्यात आली.

### सहा डिसेंबर १७०४

तरबियतखान हा तळकोकणातून येऊन बादशहाना भेटला. तो मन्सूरखान आणि मुगलखान हे तिघेही बादशहाना भेटले तेव्हा बादशहानी त्यांची (चंदनवंदनच्या व वर्धनगडच्या मोहिमेबद्दल) तारीफ केली.

### यादगारहुसेन

मरहूम अश्रफखान याच्या मुलीचा मुलगा आणि शाहजादा मुईजोदिन याच्या सैन्याचा माजी बक्षी आणि वाकेनवीस यादगार हुसेन हा येऊन बादशहाना भेटला. (यादगार हुसेन हा मागे बेळगावचा किल्लेदार होता. याचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे).

### सात डिसेंबर १७०४

कूच करतेवेळी बादशहाची लष्कराची काय व्यवस्था असावी याबद्दल बादशहाने आज्ञा केली की, तरबियतखानाने पिछाडी संभाळावी. मन्सुरखानाने पेशखाना सांभाळावा आणि अमीनखानाने बादशहाबरोबर राहावे.

मरहूम बक्षी बहरामंदखान याच्या कचेरीची व्यवस्था (हा बहादुरगड येथे वारला होता) पाहण्याचे काम बहादुरगडचा बक्षी व वाकेनवीस अबदुल्लाबेग याजकडे सांगण्यात आली.

**चौदा डिसेंबर १७०४**

रोषनगावची फौजदारी आणि औरंगाबाद ते जालना मार्गाची राहदारी (रक्षण) या जागेवरुन रुस्तमराव (जाधव) याला काढण्यात आले होते. त्याला औरंगाबाद येथे तैनात करण्यात आले.

**सुलेमानखान**

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे हिदायतकेश याने कऱ्हाडचा ठाणेदार सुलेमानखान याच्या पथकातील सैनिक मोजले. त्याने बादशहाना कळविले की, सुलेमानखानाचे चारशे सैनिक हजर आहेत. बादशहाने सुलेमानखानाला विचारले “तुम्ही काही अभ्यास, वाचन केले आहे काय”? त्याने सांगितले “की कुराण आणि थोडेसे फारसी मी पढलो आहे”. बादशहाने विचारले “फजलुल्लाखान याच्याशी तुमचे काय नाते आहे?” त्याने सांगितले तो माझा भाचा आहे. जेव्हा बादशहाने आणखी एक प्रश्न विचारला. त्याचे उत्तर त्याने दिले.

करडे निमोणेचा ठाणेदार मुहंमद जमाल याची नेमणूक रद्द करण्यात आली.

**सर्फराजखान**

सर्फराजखान व त्याची मुले यांना मनसबी वरुन बडतर्फ करण्यात आले. बादशहा म्हणाले त्यांना वर्षासन हवे असल्यास देता येईल. त्यांच्या मनसबी पुढीलप्रमाणे होत्या.—

(१) सर्फराजखान सहा हजार जात, पाच हजार स्वार त्याची मुले.—

(१) सय्यद अबदूल्कादर दीड हजार जात व तीनशे स्वार.

(२) सय्यद असदुल्ला एक हजार जात व दोनशे स्वार.

(३) सय्यद कासिम एक हजार जात व दोनशे स्वार.

**सुर्याजी पिसाळ**

अनुक्रमणिका

पाईन विलायत (वाईप्रांत) चा देशमुख शेख फत्तेउल्ला उर्फ सूर्याराम (सूर्याजी पिसाळ) हा बादशहाच्या नोकरीतून पळून गेला असून रामा (राजाराम महाराज) ची बायको (महाराणी ताराबाई) कडे गेला आहे. असे बादशहाना कळविण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, फरारी म्हणून त्याची नोंद करण्यात यावी. त्याला एक हजार जात आणि चारशे स्वार अशी मनसब होती.

अहमदनगर येथे असलेला तरबियतखानाचा नायब, मुहंमद अस्करी याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

बादशहाने आज्ञा केली की, ख्वाजाखान याने मुहंमद अमीन खानाच्याबरोबर राहावे. मुहंमद अमीनखानाच्या फौजेचा बक्षी सय्यद इमामउद्दीनखान याने पुढील रस्ता दुरुस्त करण्यासाठी उस्मानखान याच्याबरोबर बेलदार व जंगल तोडणारे (तबरदार) यांना द्यावे.

मरहूम इस्लामखान रुमी याची बायको, नवाजिसखान (वऱ्हाडचा माजी सुबेदार) याची आई ही मक्केच्या यात्रेहून परत आली. तिने एक स्मरणी मक्केची भेट म्हणून पाठविली. ती बादशहाच्या नजरेखालून गेली.

## मुक्काम पळसदेव

## पंधरा डिसेंबर १७०४

तरबियतखान याला मागे एक हत्ती देण्यात आला होता. आता त्याच्या ऐवजी दहा हजार रुपये किंमतीचा दुसरा हत्ती देण्यात आला.

अमानुल्लाखान हा काफ्रिला आणि घोडे घेऊन अहमदनगरहून आला आहे, असे कळले. त्याला भेटीस येण्याची परवानगी देण्यात आली.

## सतरा डिसेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. शाहजादा कामबक्ष, हमीदोद्दीनखान, अमीरखान, मुहरमखान वगैरे हुजुरात आले. रमजानची पहिली तारीख सुरू झाली. बादशाहाच्या राज्यकारभाराला एकूण पन्नासावे वर्ष सुरू झाले. त्याबद्दल वरील मंडळींनी बादशहाला नम्रपणे अभिवादन केले.

## रमजानची पहली तारीख

## सतरा डिसेंबर १७०४

आज बादशहा पळसदेवहून निघाले. सव्वादोन कोसाची मजल मारुन ते मौजे आटवली (शब्द लागत नाही) जवळच्या मुक्कामावर दाखल झाले.

जुम्दतुल्मुल्क अमीरउल्उमरा (मुख्य प्रधान असदखान), बक्षी सदरूद्दीन मुहंमदखान, मतलबखान, खुदाबंदाखान, सियादतखान, सफवीखान वगैरे अमीरांनी प्रवासातच बादशहाच्या कारकिर्दीच्या एकूण पन्नासाव्या वर्षाची सुरुवात झाल्याबद्दल बादशहाचे नम्र अभिवादन केले.

अमानुल्लाखान वगैरे मंडळी ही अंतःपुरातील मंडळींना अहमदनगरपर्यंत पोहोचविण्यासाठी गेली होती, ती परत आली. अमानुल्लाखान व त्याचा भाऊ अताउल्लाखान हे दोघे येऊन बादशहाना भेटले.

दाऊदखान याला हैद्राबाद सुभ्याची नायब सुभेदारी देण्यात आली होती. त्याच्या नावे फर्मान आणि खिलातीची वस्त्रे गुर्जबर्दाराच्या बरोबर पाठवावी अशी आज्ञा झाली.

**रायभान भोसले, तंजावरकर**

रायभान (भोसले, तंजावरकर) हा मीर आतिश तरबियतखान याच्याबरोबर हुजुरात आला, तो येऊन बादशहाना भेटला.

मुगलखानाचा मुलगा आणि इंदापूरचा ठाणेदार बहरामंद हा येऊन बादशहाना भेटला.

अमीरउलउमरा याच्या पथकातील ख्वाजा होशमंद याला मनसबीवरुन बडतर्फ करण्यात आले होते. तो मुजऱ्यासाठी आला. बादशहा हमीदोद्दीनखानाला म्हणाले "माझ्या आज्ञेशिवाय याला मुजऱ्यासाठी का येऊ दिले"? बादशहानी मिरतुजक (शिष्टाचाराचे अधिकारी) व सोहबत यसावल (निकटचे शरीर रक्षक) यांना ताकीद केली की, ओळख असल्याशिवाय कुणालाही मुजऱ्यासाठी समोर येऊ देऊ नये.

[तीस नोव्हेंबर १७०४ ची नोंद यापुढे आली आहे.]

बादशहानी पुढील राजपुत्र, राजकन्या आणि अमीर मंडळींना इत्रुल्लतीफ (लतीफ नावाचे उंची अत्तर) वाटले अगर बक्षीस म्हणून पाठविले:—

(१) शाहजादा मअज्जम—काबुलचा सुभेदार—शंभर तोळे.

(२) शाहजादा आजम, गुजराथचा सुबेदार—शंभर तोळे.

(३) गोहर, आराबेगम (औरंगजेबाची मुलगी, मुक्काम दिल्ली)—शंभर तोळे.

(४) नबाब झिन्नतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी, मुक्काम अहमदनगर)—साठ तोळे.

(५) शाहजादा कामबक्ष, मुक्काम बादशाही छावणी—चाळीस तोळे.

(६) जहांजेबबानू बेगम (आजमची बायको व दाराची मुलगी औरंगजेबाची सून)—पन्नास तोळे.

अनुक्रमणिका

(७) शाहजादा मुईजुद्दिन (मुअज्ज़मचा मुलगा, औरंगजेबाचा नातू, मुल्तानचा सुभेदार)—पस्तीस तोळे.

(८) शाहजादा बेदारबख्त (आजमचा मुलगा औरंगजेबाचा नातू, माळव्याचा सुभेदार)—चाळीस तोळे.

(९) शाहजादा वालाजाह (आजमचा मुलगा)—तीस तोळे.

(१०) ताज सुल्तान—दहा तोळे.

(११) ह्यातुन्निसा बेगम—(कामबक्षची मुलगी)—नऊ तोळे.

(१२) हमराजबानू बेगम—पाच तोळे.

**तीन डिसेंबर १७०४**

बादशहा म्हणाले — मागे आम्ही अजमीरहून दक्षिणेकडे कूच करण्यास निघालो त्यावेळी (इ.स.१६८१) रमजान महिन्याची कोणती तारीख होती. हिदायतकेशने सांगितले, रमजानच्या पाच तारखेस अजमीरहून दक्षिणेकडे बादशहाने कूच केले होते.

खुदाबंदाखानाने पुढीलप्रमाणे पत्र पाठविले:—

बादशहाने आज्ञा केली की, “अंतःपुराचा सरंजाम औरंगाबादकडे पाठवावा. त्यासाठी बारबरदारीची तयारी चालली आहे. आता बादशहाची स्वारी कूच करून पुढे जाते आहे काय आज्ञा”? (बारबरदारीची दोन्हीकडे व्यवस्था कशी करावी) यावर बादशहाने आज्ञा केली की, अहमदनगर शहराची तटबंदी चांगली आहे. बादशहाला म्हणावयाचे होते की, अंतःपूर अहमदनगरमध्ये राहू द्यावे. औरंगाबादकडे पाठविण्याची गरज नाही.

**एकोणतीस ऑक्टोबर १७०४**

बादशहा आज मौजे मिसल गांव (नाव लागत नाही) येथून निघाले ते सव्वादोन कोसाची मजल मारून मौजे ठाणे पाबळ (खेडहून निघून) बहादूरगडच्या वाटेवर बादशहा आहेत.

मरहूम अबदुल रजाकखान याचा मुलगा मुहंमद मासूम हा येऊन बादशहाना भेटला.

हमीदोद्दीनखान याला पिछाडीचे (चंदावल) रक्षण करण्यासाठी पाठविण्यात आले.

पाबळचा माजी ठाणेदार अताउल्लाखान व त्याचा भाऊ अमानुल्लाखान ही मंडळी बादशहाना भेटली.

## सिंहगड

### तीस ऑक्टोबर १७०४

हरकाऱ्याच्या कडून बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—बक्षिंदाबक्ष (सिंहगड) चा किल्लेदार देविसिंग हा किल्ल्याच्या संरक्षणाबद्दल गाफिल आहे व चोर (मराठे) संधीची वाट पाहात आहेत. बादशहा म्हणाले, किल्लेदाराला लिहा—"तुम्ही आपले काम योग्यरितीने बजवावे हे बरे, तसे होत नसल्यास किल्लेदारीचा राजीनामा द्या."

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दीयाकुतखान याने विनंती पत्र लिहून पाठविले की, विश्रामगडची किल्लेदारी माझ्याकडे देण्यात आली आहे. किल्ला जिंकून घेतल्यापासून सिद्दी अंबर हा किल्ल्याची खबरदारी बाळगीत आहे. त्याच्या नावे किल्लेदारी व्हावी, विनंती मान्य करण्यात आली.

### एकतीस ऑक्टोबर १७०४

आज बादशहा पाबळहून निघाले आणि पावणे दोन कोसाची मजल मारुन कोरेगावला पोहचले.

पाईने विलायत (वाईप्रांत) येथील ठाणेदारीवर ख्वाजाखान हा होता. त्याच्या जागेवर मुहंमद सईद अमीरखानी याची नेमणूक करण्यात आली.

चाकणच्या किल्लेदारी व फौजदारीवर अमानुल्लाखानाच्या जागेवर बेनिशाहगड (राजगड) चा किल्लेदार व फौजदार लोदीखान याचा मुलगा अबदुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

### मुक्काम कोरेगाव
### एक नोव्हेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद होते. तरबियतखानाच्या नावे आज्ञापत्र पाठवीण्यात आली.

### शंकराजी मल्हार

दाऊदखान याने पाठविलेली शंकराजी (शंकराजी मल्हार) याला पाच हजार जात आणि दोन हजार स्वार अशी मनसब होती. घोड्यांना डाग देण्याच्या अटीतून त्याला वगळण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, चाकण उर्फ इस्लामाबाद याचे नाव मोमिनाबाद ठेवण्यात यावे आणि कल्याण-भिवंडीचे नाव इस्लामाबाद ठेवण्यात यावे.

सुभे काबूल येथे तैनात असलेला हैदरखान याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

अनुक्रमणिका

सुप्याच्या ठाण्यावर दलसिंगपाशी विठ्ठलराव हा तैनात होता. त्याला हजुरात बोलावून घेण्यात आले.

**मुक्काम कोरेगाव**
**दोन नोव्हेंबर १७०४**

सर्फखासचा दारोगा शेख सैफुल्ला हा छावणीत मरण पावला. त्याच्यावर अंतिम संस्कार करण्यासाठी हमीदोद्दीन आणि काजी अक्रमखान वगैरेंना आज्ञा करण्यात आली. शवपेटीका शाहाजानाबाद (दिल्ली) येथे पाठवून दफनविधी तेथे करावा, अशी आज्ञा करण्यात आली. या कामासाठी सरकारातून एक हजार चारशे रुपये खर्च करण्यात यावे, अशी आज्ञा झाली.

**तीन नोव्हेंबर १७०४**

बादशहा आज कोरेगावहून निघाले आणि दोन कोस आणि अर्धापाव अशी मजल मारुन मौजे तळेगावच्या मुक्कामावर दाखल झाले. प्रवासात पुढील मंडळी बादशहाना भेटली. सैन्याच्या आघाडीचा (यल्तमश) चा बक्षी व वाकेनवीस मीर नोमान, लेखक (खुशनवीस) मोहंमद मेहदी.

**चार नोव्हेंबर १७०४**

आज बादशहा तळेगावहून निघाले व पावणे दोन कोसाची मजल मारुन मौजे तालकी (?) येथे मुक्कामाला आले. आज दिवाणचे काम बंद होते.

अमीरउल्उमरा (मुख्य प्रधान असद्खान) हा मरहूम अमीरखानाचा मुलगा मरहमतखान याला हुजुरात घेऊन आला. बादशहाकडून त्याने मरहमतखानाचे अपराध माफ करविले. त्याला बंगालमध्ये तैनात करण्यात आले होते. तो हुकुम रद्द करून त्याने हुजुरात राहावे, अशी आज्ञा करण्यात आली.

जळगावचा फौजदार मोतेमदखान हा हुजुरात होता. तो बादशहाना भेटला.

अबदुल गफूरदरवेष याने दुपारच्या नमाजाच्या वेळी हुजुरात येत-जात असावे, अशी आज्ञा झाली.

**पाच नोव्हेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद होते. अहदियान (शिलेदार) च्या तनबक्षी (तनखा वाटणारा) बाकरखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली—परगणा फुलंब्री, (औरंगाबाद जिल्हा) माझ्या जहागिरीत आहे. चोरांच्या (मराठ्यांच्या) मुळे परगणा उध्वस्त झाला आहे. या परगण्याची फौजदारी सय्यद मन्सूरकडे देण्यात आली आहे पण परगण्याची दुर्दशा आहे. तर त्या परगण्याची फौजदारी माझ्याकडे देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

अनुक्रमणिका

पाईने विलायत (वाई प्रांत) वर ख्वाजाखान हा ठाणेदार होता, त्याला बदलण्यात आले. खटावचा ठाणेदार किशनराव (कृष्णराव) याच्याकडे खटाबला जोडूनच वाई प्रांताचे (पाईने विलायत) ख्वाजाखानाचे ठाणे सोपविण्यात आले. किशनरावला दोन हजार जात, एक हजार स्वार, सहा दुघोडी अशी मनसब होती त्यात पाचशे स्वारांची भर घालण्यात आली.

**सहा नोव्हेंबर १७०४**

बादशहाचा मुक्काम तालकी (टाकळी?) येथे काल दिवसभर बादशहाने उपवास केला. काल सोमवार होता. त्यामुळे बादशहाने आज येथे मुक्काम केला.

बादशहाना कळविण्यात आले की, तुर्कताजखान करावल हा पेशखान्याच्या बरोबर पुढे गेला होता. काल दिवस माळवता चोर (मराठे) चालून आले. तुर्कताजखानाने त्यांच्यावर हल्ला केला. दोन माणसे मारली. त्यांचे डोके कापून आणले. या शिवाय पाच घोडे पकडून आणले. बादशहाने घोडे तुर्कता जखानाच्या पथकाने ठेवावे, अशी आज्ञा केली.

मतलबखान याने विनंती केली की, अमानगड (तिकोणा) व तुंगीगडच्या किल्लेदारीवर सेनापत याची नेमणूक करण्यात आली आहे. पण ती त्याला मान्य नाही. जर या दोन्ही किल्ल्यांची किल्लेदारी गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार जैनुद्दिन अलीखान याजकडे सांगण्यात आली आणि त्याच्यावर जनुद्दिनचा नायब म्हणून काका नायक याला नेमण्यात आले तर तो (काका नायक) किल्ल्याची उत्तम व्यवस्था ठेवील. बादशहाने ही विनंती मान्य केली

खदाबंदाखान, खानस मान (औरंगजेबाचा मामे भाऊ) याने पुढीलप्रमाणे विनंती केली——माझा धाकटा भाऊ, अबुल मआलीखान याला हुजुरात बोलावण्यात आले होते पण त्याची आर्थीक परिस्थिती चांगली नाही. तो विजापूर-कर्नाटक प्रांतातच राहिला आहे. हुजुरात येऊ शकत नाही. बादशहाने आज्ञा केली की, विजापूर-कर्नाटकच्या खजिन्यातून त्याला एक हजार रुपये मदत म्हणून देण्यात यावे.

बादशहाना कळविण्यात आले की, बादशाही छावणीचे उंट आणि बैल यांना चरण्यासाठी कुरणात नेण्यात आले होते. चोरांनी (मराठ्यांनी) त्यांच्या वर हल्लाकरून ते लुटून नेले.

विजापूर-कर्नाटकचा नायब फौजदार दाऊदखान याचे विनंती पत्र आले ते बादशहाच्या नजरेखालून गेले.

**सात नोव्हेंबर १७०४**

बादशहा आज मुक्कामावरुन निघाले आणि तख्तखांच्या स्वारीतून प्रवास करीत त्यांनी दीड कोसाची मजल मारली आणि ते दुपारी मौजे दहीवाडीच्या मुक्कामावर येऊन दाखल झाले.

काश्मीरचा सुभेदार इब्राहिमखान याचा बक्षी सय्यदअली हा दोनशे स्वार घेऊन हुजरात आली होता. तो बादशहाना भेटला.

करडे निमोण्याचा ठाणेदार मीर अबुलकासिम हा बादशहाना भेटला. अताउल्लाखान हा बादशहाना भेटला.

**आठ नोव्हेंबर १७०४**

आज बादशहा दहीवाडीहून निघाले आणि पावणेदोन कोसाची मजल मारून बीरगाव जवळील मुक्कामावर दाखल झाले.

कडूसचा ठाणेदार निजामराव हा प्रवासात बादशहाना भेटला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली आणि त्याला कडूसकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

बादशहाना कळविण्यात आले ते असे—चोरांची (मराठ्यांची) फौज बादशाही छावणीच्या समोर आली. तुर्कताजखान करावल हा त्यांच्याशी युद्ध करण्यासाठी पुढे गेला आहे. बादशहाने आज्ञा केली की, मतलबखान याने आपल्याबरोबर असलेली पथके घेऊन लढण्यासाठी पुढे जावे.

बादशहाना कळविण्यात आले की, सिकंदरचा मुलगा आणि शिरसाळ्याचा माजी ठाणेदार अमानुल्ला हा मरण पावला.

**बादशहाचा मुक्काम बीरगाव जवळ**
**नऊ नोव्हेंबर १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**दहा नोव्हेंबर १७०४**

आज बादशहा पावणेदोन कोसाची मजल मारून मौजे नागरगाव येथे दाखल झाले. कालरात्रीच्या दोन प्रहर झाले असता हरकाऱ्याकडून कळले ते असे—पेशखान्याच्या बरोबर गंज (बाजार) ची माणसे पुढे गेली होती. चोरांचे (मराठ्यांचे) सैनिक हे रात्रीचा एक प्रहर झाला असता त्यांच्यावर हल्ला करून आले. आणि त्यांना लुटून नेले. बादशहाने आज्ञा केली की, मतलबखानाने फौज घेऊन त्यांच्या मागोमाग जावे.

आज बादशहाना प्रवासात पुढीलप्रमाणे कळविण्यात आले—बादशाही छावणीपासून दोन कोसावर चोर (मराठे) पसरले आहेत आणि मतलबखान, सियादतखान, तुर्कताजखान वगैरे त्यांच्यावर चालून गेले असून लढण्याच्या तयारीत आहेत.

बादशहांना कळविण्यात आले कीं, तुर्कताजखान याने लढाईची लूट म्हणून शत्रूंची दहा डोकी, सात कैदी आणि दहा घोडे हे मीर लतीफ मनसबदाराच्याद्वारे पाठविले आहेत. बादशहा म्हणाले लुटीचा माल तुम्हाला माफ. चोरांना (मराठ्यांना) कोतवालाच्या हाती द्यावे.

अनुक्रमणिका

**बादशहाचा मुक्काम मौजे नागरगाव जवळ**
**अकरा नोव्हेंबर १७०४**

तरबियतखान मीर आतिश हा तळकोकणात शिद्दी याकूतखानाच्या कार्यक्षेत्रातील चिपळूण येथे ठाणी बसवायला गेला होता. त्याच्या नावे आज्ञा पत्र पाठविण्यात आले की, तरबितखानाने तिकडले काम आटपल्यावर तातडीने बहादुरगडला यावे.

बादशहाने खुदाबंदाखान खानसामान याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली—तुमचा कारभारी फजलुल्ला हा तळावर (बहादुरगड येथे) आहे, त्याने आमच्या छावणीच्या प्रवासासाठी ओझ्याची वाहने वगैरे यांचा बंदोबस्त, मरहूम खिदमतगार खानाच्या सरंजामातून करावा. बादशाही सैन्य बहादुरगडला पोहोचल्यावर अंतःपुराच्या तैनातीतील आणि औरंगाबाद येथे तैनात असलेले इसम दिमतीला देण्यात येतील.

**बारा नोव्हेंबर १७०४**

आज बादशहा नागरगावच्या मुक्कामावरुन निघाले आणि पावणेदोन कोसाची मजल मारून मौजे मांडवगण येथे मुक्कामाला आले. कालरात्री बादशहानी बक्षी सदरुद्दीन यास बोलावून याच्याबरोबर खलबते केली.

बादशहाने आज्ञा केली की, आम्ही बहादुरगडला पोहोचल्यावर अंतःपुरातील काही मंडळींना आणि जास्तीचा सरंजाम हे औरंगाबादेस पाठवू. मुहंमद अमीनखान बहादूर याने फौज घेऊन अहमदनगर पर्यंत वरील सामान पोहोचवावे. तेथून नुस्रतजंग (झुल्फिकारखान) हा औरंगाबादेहून येऊन अंतःपुरांतील मंडळी आणि जास्तीचा सरंजाम औरंगाबादेस पोहोचवील.

अमीनखानाबरोबर किती सैन्य आहे, हे सदरुद्दीनखानाने कळवावे. सर्फराजखान यानेही कारखान्यांच्या बरोबर जावे. सदरूस्सुदूर (मुहंमद अमीनखान बहादूर) हा वरील काम करून जेव्हा बहादुरगडला येईल तेव्हा आम्ही बहादुरगडहून पुढे कूच करू.

अबदालखान तोफची बाशी याने शत्रूचा (मराठ्यांचा) एक ध्वज हस्तगत करून आणला होता. तो त्याने बादशहाना दाखविला. त्याने पुण्याहून तीन तोफा व दारुगोळा वगैरे सरंजाम आणला होता. बादशहा म्हणाले वेळेवर आला.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.——जुन्नरचा किल्लेदार व फौजदार अबदुल अजीजखान याचा अधिकारी मुहंमद हुसेन याने शत्रूकडून (मराठे) तीस घोडे, एक ध्वज इत्यादी वस्तू हस्तगत केल्या. अबदुल अजीजखानाने या वस्तू बादशहासमोर आणल्या त्या त्यांच्या नजरेखालून गेल्या.

शम्शुद्दीन याला सोलापूरचा बक्षी व वाकेनवीस आणि मुहंमद मेहदी याला इम्तियाजगड उर्फ अधोनीचा बक्षी आणि वाकेनवीस म्हणून नेमण्यात आले.

अनुक्रमणिका

देवळघाटचा फौजदार नसीरउद्दीनखान याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली.—येथे शत्रू (मराठे) चहकडे पसरले आहेत. येथील रहिवाश्यांवर जिजियाकर हा तीन वर्षासाठी माफ करण्यात यावा. म्हणजे कसब्याभोवती तटबंधी बांधता येईल. विनंती मान्य करण्यात आली.

**बादशहाचा मुक्काम मांडवगण येथे**
**तेरा नोव्हेंबर १७०४**

बादशहाना कळविण्यात आले की, बक्षी सदरुद्दीन हा आज्ञेप्रमाणे सैन्य बरोबर घेऊन छावणी भोवती टेहळणी करण्यासाठी गेला आहे.

मिफतातूल फुतूह (चंदन वंदन) यावर मुहंमद जमाल हा किल्लेदार होता त्याच्या ऐवजी सोर्दाखान (लोदीखान?) याचा जावई मुहंमद आलम याला नेमण्यात आले.

करडे निमोण्याच्या ठाण्यावर अबुलकासिम फालजी हा होता. त्याच्या ऐवजी मुहंमद जमाल याला नेमण्यात आले.

नौलाख उंबरेच्या ठाणेदारीवर निजामराव होता. त्या जागेवर पुरंदरचा माजी किल्लेदार सय्यद जानबाजखान याला नेमण्यात आले. बंकापूर (धारवाड जिल्हा) चा किल्लेदार व फौजदार मुहंमद अन्वर याची मनसब वाढविण्यात आली.

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले.——बादशाही छावणीतील माणसे पुढील मजलेकडे चालली होती. वाटेत दोनशे चोरांच्या (मराठ्यांच्या) स्वारांनी त्यांच्यावर आक्रमण केले.

खुदाबंदाखान हा टेहळणीसाठी गेला होता. त्याला हे कळल्यावर त्याने चोरांच्या (मराठ्यांचा) पाठलाग केला आणि आपली काही माणसे सोडविली.

बादशहाने आज्ञा केली की, पुढील अधिकाऱ्यांनी खुदाबंदाखानाबरोबर टेहळणीसाठी जात असावे. मरहूम अमीरखानाची मुले मरहमतखान व आकिदतखान, दक्षिणच्या सुभ्याचा माजी दिवाण मोतीमदखान, बक्षी मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान, रशीदखान, जैनुलाब्दीन.

**चौदा नोव्हेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**पंधरा नोव्हेंबर १७०४**

आज बादशहा मांडवगणच्या मुक्कामावरुन निघाले. सव्वा दोन कोसाची मजल मारुन ते मौजे तांदळी येथे मुक्कामाला आले.

अनुक्रमणिका

करडे निमोण्याचा माजी ठाणेदार अबुलकासिम हा येऊन बादशहाना भेटला.

मुहंमद अमीनखान बहादूर (भावी निजाम उलमुल्काचा चुलत चुलता आणि मुगल साम्राज्याचा भावी मुख्य प्रधान) याला तळाचे (बहादुरगडाच्या) रक्षण करण्यासाठी ठेवले होते. तो आपली पथके घेऊन आला व बादशहाना भेटला.

मतलबखान, सियादतखान व तुर्कताजखान हे पेशखान्या बरोबर पुढे आले होते. ते बादशहाना भेटले.

बादशहाना कळविण्यात आले ते असे—काल दिवसाच्या चार घटिका राहिल्या असता शत्रूचे (मराठ्यांचे) सहाशे स्वार हे चालून आले.

मतलबखान व सियादतखान वगैरे अधिकारी तेथे होते. त्यांनी त्यांच्याशी युध्द केले. सुप्याचा ठाणेदार दलसिंग हा बादशहाना भेटण्यासाठी आला होता, तोही या युध्दात मुगल अधिकाऱ्यांना सामील झाला. लढाई बाण आणि बंदुकीची झाली. शेवटी चोर (मराठे) पळून गेले. ही बातमी ऐकून बादशहा खूष झाले आणि त्यांनी तारीफ केली. मतलबखानाच्याबरोबर त्यावेळी जी मंडळी बादशहासमोर हजर होती त्यांनी बादशहाना मुजरे केले.

दौंडचा ठाणेदार घोरीखान व सुप्याचा ठाणेदार दलसिंग हे बादशहाना भेटले.

सर्फराजखान याला बेदारबख्तापाशी तैनात करण्यात आले होते. तो हुकुम रद्द करून बादशहाने आज्ञा केली की, सर्फराजखानाने औरंगाबाद येथे राहावे.

## बादशहाचा मुक्काम तांदळी येथे घोड नदीवर
## सोळा नोव्हेंबर १७०४

आज दिवाण बंद ठेवण्यात आले.

## अठरा नोव्हेंबर १७०४

आज बादशहा तांदळी घोडनदीवरील मुक्कामावरुन निघाले आणि सव्वादोन कोसाची मजल मारुन ते दुपारच्या वेळी गढी दिलेरखाना जवळ आले.

मुंहंमद अमीनखान बहादुरचा मुलगा फकरुद्दीन (कमरुद्दीन, असावे मुगल साम्राज्याचा भावी मुख्य प्रधान १७२४ ते १७४८) हा बादशहाच्या स्वारीच्या वेळी तो येऊन त्यांना भेटला. त्याने नऊ मोहरा आणि एक पुस्तकही बादशहाना नजर केली.

आठ मराठे कैदी लाखडी खोडा घातलेले, आठ घोडे आणि एक कापलेले डोके बादशहाच्यासमोर आणण्यात आले.

अनुक्रमणिका

मुहंमद अमीनखान बहादूर याच्या फौजेचा बक्षी व वाकेनिगार हा बादशहाना भेटला. एक इसम मुसलमान झाला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. त्याचे नाव दिनदार ठेवण्यात आले.

औशाचा किल्लेदार (लातूर जिल्हा) सजावारखान याला नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार नेमण्यात आले. त्यावर कासिमखान याची नेमणूक झाली होती ती बदलण्यात आली. कासिमखानाला पूर्वीप्रमाणे परंडयाच्या (उस्मानाबाद जिल्हा) किल्लेदारी व फौजदारीवर पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले, आणि गयूर उर्फ इज्ञतखान याला औशाची किल्लेदारी व फौजदारी पूर्ववत् बहाल करण्यात आली.

**सोळा नोव्हेंबर १७०४**

बादशहाना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले:—

(१) भूपत नावाचा शत्रूचा (मराठ्यांचा) सरदार हा बादशाही छावणीपासून दहा-बारा कोसावार आला होता. मोगल सैन्य आपल्यावर चालून येत आहे या विचाराने तो आपल्या तळाकडे परत गेला.

**मुक्काम गढी दिलेरखान**
**अठरा नोव्हेंबर १७०४**

जुन्नरचा किल्लेदार व फौजदार याचा नातू (मुलीचा मुलगा) मुहंमद हुसेन याने चोरांच्या (मराठे) कडून घोडे वगैरेची लूट मिळवून आणली होती. त्याला मनसब देण्यात आली होती.

[**टीप.**– त्यानंतर एकदम नोंद सांपडते, ती वीस ऑक्टोबरची. त्यावेळी बादशहा खेडहून निघण्याच्या तयारीत आहे.]

**वीस ऑक्टोबर १७०४**

अब्दुलरसूल हा मुहंमद आमीनखान बहादूर याजपाशी बहादुरगड येथे होता. तो येऊन बादशहाना भेटला. त्याची खान ही पदवी पूर्ववत् बहाल करण्यात आली.

बादशहाना कळविण्यात आले की, नेमा शिंदे (नमाजी शिंदे) वगैरे चोर (मराठे सरदार) माळवा सुभ्यात पसरले आहेत. बादशहांनी शाहजादा बेदारबख्त याच्या नावे फर्मान पाठविले. बादशहाने आज्ञा केली की, सर्फराजखान याने शाहजाद्यापाशी जाऊन हजर व्हावे.

हमीदोद्दीनखानाने बादशहाच्या पाहणीसाठी हत्ती समोर आणले.

मतलबखान याने बादशहाच्या प्रवासाच्या पहिल्या मजलेवरील (टप्पावरील) वास्तव्याच्या जागेचा नकाशा तयार करून समोर ठेवला.

बादशहाना कळविण्यात आले ते असे.—कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान व पाईने विलायतचा ठाणेदार (वाई प्रांत) ख्वाजाखान यांच्यामध्ये मारामारी झाली. दोन्ही पक्षाचे बरेच लोक मारले गेले अगर जखमी झाले. बादशहानी सुलेमानखान आणि ख्वाजाखान यांच्या मनसबीत घट केली.

फरासखान्याचा मुश्रफ मुहंमदहादी याला आज्ञा झाली की, पेशखाना तयार करून पहिल्या टप्प्यावर रवाना करा. पेशखान्याच्या बरोबर शिलेदारांचा (अहादयान) चा बक्षी नेकनाम खान आणि कामबक्षाचा दुय्यम बक्षी जाबिताखान यांनी राहावे.

दोन्ही पेशखान्याच्या बरोबर मुगलखान याने रक्षणासाठी राहावे.

बादशहाने आज्ञा केली की, बेनिशाहगड (राजगड) येथील हशमात पगार द्यावयाचा आहे. पगाराची रक्कम मन्सूरखान याचा मलगा मुजफ्फर याने ती रक्कम आधी चाकण येथे पोहोचवावी. चाकणहून अमानुल्लाखान याने ती रक्कम मुहियाबाद (पुणे) पर्यंत न्यावी. तेथून येथील ठाणेदार हश्मतउल्ला हा ती रक्कम राजगड किल्ल्याकडे घेऊन जाईल. बादशहाजवळ किती फौज होती? मीर बक्षीचा नायब मतलबखान याने बादशहा कूच करताना त्यांच्याबरोबर किती स्वारांचे सैन्या राहील याचा तपशील (तूमार) आणि अधिकाऱ्यांची सैन्याच्या विविध भागांवर कशी कशी नेमणूक आहे याचा तपशील बादशहासमोर ठेवला तो असा——खेडहून निघताना बादशहाबरोबरच्या सैन्याची संख्या एकूण वीस हजार स्वार (२०,००० स्वार) सैन्याची रचना अशी:——

(१) उजव्या फळीवर शाहजादा मुहंमद कामबक्ष.

(२) अमीरउल्उमरा जुम्दतलमुल्क (मुख्य प्रधान असदखान) आणि मिर्जा सफवीखान डावी फळी.

(३) हमीदोद्दीनखान बहादूर व अमानुल्लाखान (चंदावल) पिछाडी.

(४) खुदाबंदाखान खानसामान—बादशाही लष्कर आणि चंदावलच्या मध्ये.

(५) मतलबखान आणि तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक—एल्तमश (आघाडी)

(६) बक्षी मिर्जा सदरुद्दीन मुहंमदखान कौल (मध्यभाग).

(७) तुर्कताजखान——करावल (उजव्या फळीची आघाडी).

(८) शेरखान (वाचन शबीरखानही होऊ शकते) डाव्या फळीचा करावल म्हणचे डाव्या फळीच्या तोंडावर.

(९) खुसरौखान——करावल अकब (पिछाडी भागाच्या तोंडावर).

**बादशहाचा मुक्काम हिंगनगाव येथे**
**रमजान ५, एकवीस डिसेंबर १७०४**

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते.

**चोवीस डिसेंबर १७०४**

आज बादशहा आपल्या मुक्कामाहून निघाले. पावणेदोन कोसाची मजल मारून ते असद्नगर उर्फ अकलूज येथे पोहोचले. तेथील किल्लेदार मीर अब्दुलवहाब हा बादशहाच्या स्वारीतच त्यांना येऊन भेटला. बादशहाच्या आज्ञेने तोफांना सरबत्ती देण्यात आली. मरहूम दिलेरखान याचा मुलगा चांद याला शोक वस्त्रे व बालाबंद ही (अलंकार) देण्यात आले.

अहमदनगरच्या किल्लेदारीवर मिफताखान याची नेमणूक झाली होती. त्याची मनसब वाढविण्यात येऊन त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहाने आज्ञा केली की, कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान याजकडे पन्नास मण दारु आणि सरब (सरब व बारूत) ही पाठविण्यात यावी.

**मुक्काम अकलूज**
**पचवीस डिसेंबर १७०४**

दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले.

**सव्वीस डिसेंबर १७०४**

आज बादशहा अकलूजहून निघाले आणि अडीच कोसाची मजल मारून मौजे लौंग (?) येथे मुक्कामाला आले. ऐलापूरचा ठाणेदार सोमानजी हा बादशहाना स्वारीत भेटला.

खलीलुल्लाखान मरहूम याचा मुलगा अजीजउल्ला याला मनसबीहून बडतर्फ करण्यात आले होते. त्याला पूर्ववत बहाल करण्यात आले.

अहमदनगरचा किल्लेदार मिफताहखान याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली. मुगलखानाचा मुलगा आणि इन्दापूरचा ठाणेदार बहरामन याला इन्दापूरकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

अबदुःरसमदखान हा मुहंमद अमीनखानाच्या पथकात होता. त्याला अमानुल्लाखानाबरोबर अहमदनगरकडे पाठविण्यात आले. त्याला आता बादशाही लष्करात चंदावल (पिछाडी) मध्ये तैनात करण्यात आले.

अनुक्रमणिका

कोल्हापुरचा माजी ठाणेदार नाहरखान याची पथके फाजिलखानाने बादशहाना दाखवावी अशी आज्ञा झाली.

**सत्तावीस डिसेंबर १७०४**

आज बादशहा तख्तेखांची स्वारी करून दीड कोसाची मजल मारून मौजे जामगाव येथे मुक्कामाला आले.

मीर लष्करीचा मुलगा मुहंमद बाकर हा अहमदनगरहून आला होता. तो बादशहाना भेटला. अकलूज उर्फ असदनगरचा किल्लेदार याला खिलातीची वस्त्रे देऊन अकलूजकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

कऱ्हाडाबाद (कऱ्हाड) चा ठाणेदार सुलेमानखान याने बादशहाचा निरोप घेतला. बादशहाने आज्ञा केली की, (करडे-निमोण्याच्या) जवळ चोर (मराठे) हे पसरले आहेत. आधी त्यांचे पारिपत्य करा आणि मग तुमच्या स्थळी कऱ्हाडला जा. बादशहाने आज्ञा केली की, सुलेमानखानाबरोबर दोनशे हशम व शंभर बाण हे देण्यात यावेत आणि त्या भागातील ठाणेदार व फौजदार यांनी सुलेमानखानाशी सहकार्य करावे.

एलापूरचा ठाणेदार सोमानजी हा हुजुरात आला. त्याला एक हजार जात व एक हजार स्वार अशी मनसब होती. ती वाढविण्यात आली.

मिफताहुलफुतूह (चंदन वंदन) चा किल्लेदार मुहंमद जमाल याला कर्डेनिमोणे येथे ठाणेदार म्हणून नेमण्यात आले.

खुदाबंदाखान याने दोन कलिंगडे (तरबूज) पाठविली होती.

अजीजखानाने विनंती केली की, माझ्या पथकातील आठ मनसबदार हे माझ्यापासून फुटून सुलेमानखान ठाणेदार यांच्याकडे गेले आहेत. मी त्यांना काही नगद रक्कम दिली. सुलेमानखानाला आज्ञा व्हावी की, त्याने त्या इसमांना आपल्या नोकरीत घेऊ नये.

कोतवालानी त्यांच्याकडे असलेले माझे पैसे त्यांना द्यायला लावावेत. बादशहानी विनंती मान्य केली.

**बादशहाचा मुक्काम जामगाव येथे**
**अठ्ठावीस डिसेंबर १७०४**

हेरांच्या तोंडून कळले ते असे.——चोरांची (मराठ्यांची) फौज आजमगड उर्फ पुरंदरच्या भोवती पसरलेली आहे. बादशहाने आज्ञा केली की, दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा याने तयार राहावे. चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी मी त्याला पाठवीत आहे. त्याच्याबरोबर एक हजार पाचशे स्वार देण्यात यावे.

अनुक्रमणिका

## एकोणतीस डिसेंबर १७०४

आज बादशहा मुक्कामावरून निघाले. पावणेदोन कोसाची मजल मारून ते मौजे कडौली येथे पोहोचले.

सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार नजरबेगखान (सांगीला, सोलापूर जिल्हा) याने विनंती लिहून पाठविली की, बादशहाची स्वारी माझ्या तालुक्याच्या जवळ आली आहे. पाठविली असल्यास माझ्या मुलाला येथे माझा नायब (डेप्युटी) म्हणून ठेवून हुजुरात येईन. विनंती मान्य करण्यात आली.

दुपारच्या नमाजानंतर बादशहाने मन्सूरखान (दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा) याला बोलाविले, त्याला एक ढाल बक्षीस दिली. त्याच्यासाठी बादशहाने प्रार्थना पढली आणि त्याला चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी आजमगड (पुरंदर) कडे जाण्यास निरोप दिला.

## मुक्काम कडौली
## तीस डिसेंबर १७०४

आज दिवाणचे काम बंद ठेवण्यात आले होते.

## लोहगड मराठ्यांच्या ताब्यात

हरकाऱ्यांच्या तोंडून बादशहाना कळले ते असे—चोरांच्या (मराठ्यांच्या) फौजेने लोहगडला वेढा घातला होता. तेथील किल्लेदार व फौजदार सभापत (सेनापती असू शकेल) याने त्यांच्याशी युद्ध केले. चोरांची (मराठ्यांची) फौज मोठी होती. त्यांनी सभापतवर हल्ला करून त्याला जखमी केले आणि कैद केले. त्यांनी (मराठ्यांनी) किल्ल्यावर ताबा मिळविला.

बादशहाने आपल्या आरामगाहची खिडकी उघडली आणि हमीदोद्दीनखान, अबदुल हादी, मुश्रफ आणि शेख नूरमुंहमद, तबेल्याचा अधिकारी यांना बोलावून सांगितले की, अहमदनगरहून घोडे आले आहेत. ते दाखविण्यासाठी आणा. हमीदोद्दीनखानाने दहा घोडे आणले. बादशहाने ते पाहिले.

## एकतीस डिसेंबर १७०४

आज बादशहा दोन कोस पंचवीस साखळ्या अशी मजल मारून दुपारच्या वेळेस मौजे कोकोली येथे आले.

आज दिवाणचे काम बंद होते. बादशहाच्या चौकशीवरून मतलबखानाने कळविले की, इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) येथून सात कोसांवर आहे. चार मजला ठरविल्या आहेत.

अनुक्रमणिका

सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार नजरबेग खान हा आपल्या मुलाला सांगोला येथे नायब म्हणून ठेऊन हुजुरात आला होता. तो व त्याचा धाकटा मुलगा मेहरू हे स्वारीत बादशहाना भेटले. स्वारीमध्ये हमीदउद्दीखान याने बादशहाच्या पाहणीसाठी खाशांचे घोडे आणले, ते पाहून बादशहा म्हणाले.—शेखनूर मुहंमद याने घोडे चांगले धष्ट पुष्ट तयार केले आहेत.

**१६ (सोळा) रमजान, एक जानेवारी १७०५**

आज दिवसाचा एक प्रहर आणि दोन घटिका बादशहा आपल्या मुक्कामावरून निघाले. ते तख्तेरवांवर स्वार होते. दोन कोसाची मजल मारून ते पंढरपूर जवळील आपल्या मुक्कामावर दाखल झाले. बादशहा स्वारीत असताना मुहंमदऐवज उर्फ एतिबारखान आणि पंढरपूरचा जमिनदार (देशमुख) बावजी हे त्यांना भेटले. बावजीने नऊ मोहरा नजर केल्या. मुगलखानाचा मुलगा कल्बेअली याची मनसब वाढविण्यात आली. अब्दालखान तोफची बाशी याला मन्सूरखान हा मोहिमेवरून परत येईपर्यंत त्याचा नायब म्हणून दक्षिणच्या तोफखान्याचा नायब दारोगा म्हणून नेमण्यात आले.

हमीदोद्दीनखान याने तीन हत्ती बादशहाच्या पाहणीसाठी आणले. त्यांची नावे रणबळी, भीमबादी, सिकंदर (?) बादशहाने हत्तीपाहून, रणबळी हत्तीची किंमत सोळा हजार केली.

**पंढरपूर**
**रमजान १७, दोन जानेवारी १७०५**

बादशहाचा मुक्काम पंढरपूर येथे. कालरात्री ख्वाजा मुहंमद शहामुहतसिब (नैतिक आचरणावर देखरेख ठेवणारा अधिकारी) याने बादशहाना पुढीलप्रमाणे विनंती करून कळविले—"मौजे पंढरपूर येथे एक देऊळ आहे. (दर मौजे पंढरपूर बुत्खाना हस्त.)"

लष्करातील हिंदू माणसे तेथे गर्दी, यात्रा व पूजा करीत आहेत. (मर्दुमे हुनूदाने लष्कर मालूम हुजूम व बुतपरस्ती मी नुमायद) त्याप्रमाणे बादशहाने मुहंमद खलील व खिदमतराय, बेलदारांचा दारोगा मुहंमद अमीन यांना हुजुरात बोलाविले. (चुनांचे मुहंमद खलील, खिदमतराय दारोगा बेलदारान्, मुहंमद अमानश बहुजू तलबिदा) बादशहने आज्ञा केली की, देऊळ जमीनदोस्त (नष्ट) करावे, (फर्मूदंद के बुत्खानारा निस्मार नुमायंद) आणि लष्करातील कसाबानी देवळात जावे व गाई कापाव्या (व कसाबाने लष्करा दर बुतखाना बरवद. गावान्हलाल बकुनानद.) तरबियत खान बहादुरचा मुलगा मुहंमद इसहाक याने तेथे (देवळात) जाऊन गर्दी (यात्रा) पांगवावी. (मुहंमद इसहाक पिसरे तरबियतखान बहादुर रफ्ता हुजूम (गर्दी, यात्रा दूर नुमायद.) त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली. (चुनांचे अमल्आमद्). १७०४ संपले.

अनुक्रमणिका

